# पुरस्कार

श्री. प्रभुदेसाई यांनी लिहिलेल्या 'आदिशक्तीचें विश्वस्वरूप अर्थात देवीकोश' या ग्रंथराजाचा ४ था भाग प्रसिद्ध होत आहे. देवीकोश या नावापेक्षा आदिशक्तीचें विश्वस्वरूप हे नावच अधिक अन्वर्थक आहे. लेखकाचे खरे मनोगत त्यामधूनच व्यक्त होत आहे. या चौथ्या खंडाला मी पुरस्कार लिहावा म्हणून माझ्याकडे जेव्हा श्री. प्रभुदेसाई आले, तेव्हा त्यांनी मला ग्रंथासंबंधीची थोडी पूर्व-पीठिका निवेदित केली. मी काही या विषयाचा खास अभ्यासक नाही, तथापि या विषयासंबंधी मला आस्था आहे, हे मी त्यांना सांगितले व नंतर विचारले, "काय हो प्रभुदेसाई, देवीसंबंधी तुम्ही एवढे वाङ्मय वाचले मग त्यात 'लोकाः समस्तास्तव देवि भागाः । स्त्रियः समस्ताः सकला जगत्सु ।' हा श्लोक तुमच्या वाचनात आहे काय?" त्यावर प्रभुदेसाई यांनी देवीकोशाच्या पहिल्या भागातील 'ग्रंथाचे उद्दिष्ट' हे पान काढून दाखविले. त्यात सप्तशतीतील हा श्लोक थोड्या पाठभेदासह उद्धृत केलेला आढळून आला. या श्लोकार्धाचा माझ्या मनावर फार सखोल परिणाम झाला आहे. चांगली वचने देखील ज्या काळी आढळात येतात व ज्या स्थितीत त्याची भेट होते त्यावर त्यांचा परिणाम अवलंबून असतो. मी कलकत्त्याला गेलो होतो. काली मंदिरातून बाहेर पडलो. एक भक्त पोथी वाचीत बसला होता. मी कौतुकाने तो काय वाचतो आहे म्हणून पाहिले, तो माझ्या नजरेला हाच श्लोक प्रथम आढळला. त्याच्या अर्थाचा विचार करीत मी घरी आलो.

"हे समस्त लोक, हे देवी, तुझे एक एक भाग होत. परंतु सर्व स्त्रियांपैकी एक एक स्त्री मात्र तुझे सकल स्वरूप आहे." हा या श्लोकार्धाचा अर्थ मी मनात आठवीत होतो. मग मला हे दिसून आले, ती काही निव्वळ आदिमातेची स्तुती नव्हे, तर तिच्या भक्तांची एक सुलभ साधनाच आहे. प्रभुदेसाई यांच्या ग्रंथांचे उद्दिष्ट असेच काहीसे आहे. त्यांची प्रार्थना, आपणांला आदिमातेचे दर्शन व्हावे अशी आहे. त्यांचा विश्वास, असे दर्शन अनन्य भावानेच होईल असा आहे. हा अनन्यभाव उत्पन्न होण्यासाठी विश्वामध्ये देवीवाचून अन्य काहीच नाही हे समजणे अवश्य आहे. त्यासाठी हा प्रचंड ग्रंथाचा प्रपंच त्यांनी केला आहे.

खरेच हा ग्रंथ एक प्रचंड प्रयत्न आहे. त्यात एवढे विषय आहेत व एवढी माहिती भरलेली आहे की, या ग्रंथाला विश्वकोश म्हणण्याचा मोह कोणालाही होईल. गीतेमध्ये विश्वरूप दाखविण्यापूर्वी श्रीकृष्णांनी आपल्या अनेक विभूती सांगितल्या तसेच हे आहे. विभूती कितीही असल्या तरी ती सर्व एकाच आदिशक्तीची रूपे आहेत हेच लेखकाला आवर्जून सांगावयाचे आहे.

देवीची जशी अनेक रूपे आहेत तसेच तिच्या उपासनेची अनेक रूपे आहेत व या उपासना विविध नावांनी प्रसिद्ध आहेत. श्रीविद्या, ब्रह्मविद्या

इत्यादि ही नावे हात त्यासबधी मथात पूर्ण विवेचन आलेले आहे. या ग्रथा प्रमाणे त्याच्या पूर्वभागाच्या प्रस्तावना, आशीर्वाद, अभिप्राय इत्यादि अत्यत उद्बोधक आहेत

युगपरत्वे देवी उपासना कशी होत गेली, शक्तीपासून पचमहाभूते, त्याचे गुण त्याची प्रतिके म्हणजे मूर्ति या कशा झाल्या, तत्र मार्गाच्या सप्रदायाची शुद्ध अशुद्ध रूपे कोणती ?, मत्र, तत्र, यत्र याचे या उपासनेत स्थान काय आहे ? इत्यादि अनेक विषय या ग्रथात घेऊन गेले आहेत.

देवी व उपासना याचेच कवळ विश्वस्वरूप या ग्रथात दाखविले आहे अस नाही, तर उपासकाचेही विश्वस्वरूप येथे प्रगट केले आहे सारा चौथा खड याकरिता आहे या चौथ्या खडात निरनिराळे देश, वश, सस्कृति, धर्म, पथ या मध्ये देवीचे स्वरूप कसे आहे, याचे वर्णन केले असून या सर्वांच्या अतर्यामी आदिमातेचे एकच स्वरूप कसे आहे हेहि सुस्पष्ट दाखविले आहे. हे सर्व करीत असता शिल्प, ताम्रपट, ग्रथ, धर्माचार, समजुती याचे सर्व धागेदोरे घेतले आहेत. त्याचबरोबर आर्यांच्या धर्मप्रसाराचे वर्णन अनुषगाने आले आहे, कारण सस्कृतीचा इतिहास ओघाने सागणे क्रमप्राप्त होते. हा सारा खटाटोप श्री प्रभु देसाई यानी मोठया परिश्रमाने केला आहे, ही प्रस्तावना लिहिताना सान्द्या ग्रथाचे परीक्षण करण्याची हिंमत धरणे मोठे अवघड आहे. समुद्राच्या लाटा मोजण्यासारखे ते दुष्करही आहे आणि पेय गोळा करण्यासारखे ते निष्फलही आहे कारण ग्रथ वाचकाच्या हाती आहे. स्वत वाचकानी हे समुद्रस्नान करून, देवीदर्शन करावे अशी लेखकाप्रमाणे मीही इच्छा प्रगट करतो मात्र या ग्रथाच्या आत्म्याचे दर्शन घेता यावे म्हणून लेखकाने विस्तृत अनुक्रमणिका प्रत्येक खडाला दिली आहे त्याच्याबरोबर २०० पानापेक्षा अधिक एवढी सूची निर्देशिका ( इडेक्स ) शेवटी तयार करून जोडली आहे ही तर त्या प्रयत्न पराक्रमाची परिसीमाच म्हटली पाहिजे

कालिदासाच्या रघुवशातील नमनाने श्री प्रभुदेसाई यांनी स्वस्ति वाचन केले आहे वाचा आणि अर्थ, याप्रमाणे पार्वती परमेश्वर कसे सलग्न आहेत हे सागून त्यानी अर्धनारीनटेश्वराला वदन केले आहे. ज्ञानेश्वर महाराजानी म्हटल्याप्रमाणे देव आणि देवी समरूप असल्यामुळे कोणाचे अर्धांग कोणाला, कोठे लागले आहे हे समजतच नाही कारण ती रूपे दोन भासतात 'पण तो एक छल आहे त्याचे नेहमीचे स्वरूप एकच आहे.' असे जे जगाचे आईबाप पार्वती परमेश्वर याची एकरूपता जाणणे मोठ कठीण काम आहे. साधकाने साधन परिपक्व होईपर्यंत 'स्त्री पुरुष नाम भेदे। शिवपण एकले नांदे' हे त्याला कसे अनुभवता येणार ? कविराज भर्तृहरींनी साधकाची अवस्था वर्णन केली आहे.

जोवर अज्ञानतिमिराने डोळे भरले आहेत तोवर 'तदा दृष्ट नारीमयमिदमशेष जगदपि' हाच अनुभव येणार आहे. या भूमिकेतून साधनेने उत्क्रांत होत होत, आदिमातेचे विश्वस्वरूप अनुभवाला येणे हे जीवनाचे साफल्य आहे. स्वर्ग, मृत्यु, पाताळ या सर्वांतून व्यापक स्वरूपाचे ज्ञान होण्याची खूण सप्तशतीत दिली आहे ती म्हणजे जगातील प्रत्येक स्त्री आदिमातेचे पूर्ण स्वरूप आहे, अशी अनुभूति होय

श्री प्रभुदेसाई यांच्या या देवीस्वरूपाचे जो अध्ययन करील, मनन करील, साधना साधील, त्यासाठी ही फलश्रुति आहे.

इतके सर्व झाले तरी प्रभुदेसाई यांचे प्रयत्न थिजावलेले नाहीत. त्यांनी शंभर सव्वाशेहून अधिक चित्रे अनेक ठिकाणाहून गोळा केली आहेत. मोठा खर्च करून त्यांचे ठसे बनविले आहेत व ते या ४ थ्या खंडाच्या अखेरीस छापले आहेत. त्यामुळे ज्ञानचक्षूप्रमाणे वाचकाच्या चर्मचक्षूलाही आदिमातेचे विश्वस्वरूप पाहण्याची सोय झाली आहे. ह्या चित्रांपैकी काही चित्रांनी मेक्सिकोपर्यंत भारतीय संस्कृतीचा कसा प्रसार झाला होता हे दिसून येते. अनेक चित्रांतील स्त्री-पुरुष परदेशातले असून भारतीय भासतात. पीठ दळून नेणारी स्त्री, मध्य अमेरिकेतील युवक हे हुबेहुब भारतीय वेषात आढळून येतात. लाकडावर देवतांची चित्रे कोरण्याची प्रथा कॅनेडातील रेड इंडियन्समध्ये आजही आहे हवाई बेटातील असे एक चित्र श्री प्रभुदेसाई यांनी दिले आहे. सूर्यनारायणाच्या मूर्ति आणि रोम व्हॅटिकनमधील २६०० वर्षांपूर्वीचे शिवलिंग ह्या प्रतिमा उद्बोधक आहेत. भारतावाहेरील त्याचप्रमाणे भारतातील अनेक देवतांचे ठसे आपणाला मिळतात. शेष पाताळात आहे असे आपण ऐकतो पण मेक्सिकोमधील आदिशेष मंदिर ह्या चित्रांत आपणास पहावयाला मिळेल. अशी एक ना अनेक चित्रे महान् प्रयत्नाने मिळवून श्री. प्रभुदेसाई यांनी सादर केली आहेत. जावा बेटातील गणेश, मेक्सिकोतील गजानन, महिषासुरमर्दिनी, शिवाचे तांडवनृत्य फार काय पण सन १६०० तील मेक्सिकोमधील शेवटचा हिंदू सम्राट, असा सर्वच चित्रसंग्रह अतिशय बोधप्रद वाटतो. अनेक संस्कृतींचा इतिहास, देवतांच्या प्रतिमा, जगातील आध्यात्मिक प्रतिमा अशा सर्वांचा हा विश्वकोश पाहून विश्वाला सणाच्या दिवसाप्रमाणे आनंद होईल, असे ज्ञानेश्वरांच्या भाषेत मी म्हटले तर त्यात वावगे होणार नाही.

# लेखकाकडून विषय-विज्ञप्ति

देविकोश खंड १ सन १९६७ साली प्रकाशित झाला, नंतर दुसरा झाला, तिसरा झाला आणि आता चौथा व शेवटचा प्रकाशित होत आहे. हा संग्रह अपेक्षेपेक्षा जास्त यशस्वी झाला आहे, यात मला तरी बिलकूल शंका नाही. कारण भाग जसजसे प्रकाशित झाले, जनतेने वाचले, वृत्तपत्रांनी त्याचा परामर्ष घेतला तसतसे अनेकांनी, अनेक प्रसंगी, अनेक ठिकाणी मला विचारणा केली, "काय हो, केव्हा वाचले सगळे तुम्ही हे ! अहो, तुमचे नोकरीचे खाते इंडेल्पीचे, मग अशा विषयाकडे कसे वळलात ! किती वर्षे वाचन करता, व हा सर्व माहिती-संग्रह तरी कोठून मिळविलात ! कमाल आहे बुवा तुमची ! तुमच्या वेशावरून बोलण्यावरून तुम्ही इतके सखोल अभ्यासक व ज्ञानी असाल याची कल्पना करवत नाही इ० इ०" याप्रमाणे अनेकांनी माझे कौतुक केले. या ग्रंथाचे वाचनाने आजवर कोणी एकानेही नाक मुरडलेले मी पाहिलेले नाही, निंदा ऐकली नाही. ऐकली ती स्तुतीच स्तुति. हेही काही थोडे नव्हे.

पराकोटीची प्रशंसा आणि अत्युक्ति यांचे अनुभव आले, पण मी त्या स्तुतीच्या प्रवाहात वाहून गेलो नाही, अगर अहंकार द्रव्ये जमा केली नाहीत. मी सदैव जागृत आहे की "मी देवीचा पाईक आहे, भुत्या आहे, 'कर्तुमकर्तुम्' तीच आहे. मजकडून ती सर्व घडवून आणीत आहेत व मला मोठेपणा देत आहे." हे जाणत असल्याने स्तुतीचा परिणाम होणारच कसा !

मी पूर्ण समाधानी आहे की, देवीतत्त्वाचा आविष्कार जगाला व्हावा ही माझी इच्छा बव्हंशाने पुरी झाली आहे. ज्या उत्कट इच्छेने ही देवीची सेवा दीड तपाहून जास्त काळ झाली, ती पुरी झाली आहे. कदाचित माझे स्वतःचे श्रम तोकडे पडलेले असतील, पण ग्रंथाच्या प्रस्तावना, पुरस्कार, मान्यवर विद्वानांची सखोल परीक्षणे, वृत्तपत्रीय अभिप्राय, अनेकांचे मतप्रदर्शन या सर्वांचा सामूहिक परिणाम एकच झाला की, देवीतत्त्वाचा सागर घुसळून निघाला. देव-दानवाप्रमाणे समुद्र मंथन झाले आणि साररूप अमृत तत्त्वाचा लोण्याचा गोळा देवीभक्ताच्या हाती पडला. मला जे साधावयाचे होते ते हे असे साधले. विषयाला चालना देताना जेथे माझे प्रयत्न तोकडे पडले, तेथे अनेकांनी सहाय्यभूत होऊन माझा अपुरा विषय पुरा केला. मजवर देवीची कृपा हीच, समजतो की, मला कारण करून तिने आपले आजवर कोणाकडून न झालेले कार्य पुरे करून घेतले."

'ज्ञानेश्वरी-दर्शन' घडविणाऱ्या लेखकांनी म्हटले आहे "निरोप घेणे हे मोठे

दुःखाचे काम असते. पुनर्मीलनाची खात्री असली तरी मन उदासीन होते. मग जेथे ती खात्री नाही, तेथे किती दुःख होत असेल याची कल्पनाच वाचकांनी करावी; अनेकांच्या भेटीतील प्रतिसाद आठवून गहिवरून येते त्या प्रतिसादाने कशी स्फूर्ति मिळत गेली हेही आठवते." माझे बाबतीतही तंतोतंत हेच घडत आहे.

मायाशक्तीची महती पूर्वापार आहे. तो कधीही न आटणारा आनंद-स्रोत आहे. ही स्फूर्तीची पौर्णिमा या कोशाद्वारे जनसागराने पाहिली; त्या आनंदात तो जनसागर न्हाऊन निघाला आहे. आता वद्य पक्ष अगर अमावास्या तो पाहणारच नाही. ही नित्याची पापनाशिनी भावगंगा, तो देवघरातच स्थापन करील.

देवीकोशाचे काम मजसारख्या सामान्य माणसाकडे देवीच्याच इच्छेने आले आणि त्याची पूर्तता करावयाची हा कृतनिश्चय मी केला. 'दोंडी तुटो वा पारंबी तुटो' हीच वृत्ती ठेवली होती. एकाने म्हटल्याप्रमाणे 'Divinely ordained task' देवताच्या आज्ञेने कार्य, हेच खरे आहे.

ही जबाबदारी उचलताना प्रथम मी माझे ध्येय निश्चित केले. व्यवहार दोन प्रकारांनी होतो. स्वतःचे हित आणि इतरांचे हित. प्रायः प्रत्येकजण पहिला प्रकार पाहतो, पण मी मात्र दुसरा प्रकार निवडला. या प्रकारात लक्ष्मीची फारशी कृपा होत नाही पण चार-चौघात मान-मान्यता मिळते. अनेक देवीभक्त, शासनाचे मंत्री—सभापति, विद्यापीठातील कुलगुरु, प्राचार्य आणि मान्यवर विद्वान यांसारख्या सर्वोच्च पदांचा उपभोग घेणारांपर्यंत, माझे हात पोहोचले. माझी मान त्यांच्या घरी वाढली, माझ्या कार्याची त्यांनी मुक्तकंठाने स्तुती केली. यातच माझ्या मनाला पूर्ण समाधान मिळाले आहे. भारतीय विद्वानांनी ग्रंथाची वाखाणणी केली यात तर समाधान आहेच, पण इंग्लंड, अमेरिकेसारख्या इतर भाषिकांनी या मराठी ग्रंथाचे कौतुक करून आपल्या संदर्भ ग्रंथालयात त्याची स्थापना केली, हे तर मानाचे मोरपिस समजावयास हवे. सारांश शक्तितत्त्वाचा प्रसार व्हावा, त्याची मूलभूत तत्त्वे सर्व समाजाला समजावीत, या पवित्र हेतूने मी जे कार्य आरंभिले, ते सार्वभौम समाजाला पसंत पडले, झोपडीतील रहिवाशींपर्यंत ते पोहोचले आहे, असे समजण्यात मला समाधान आहे.

या कोशाच्या विक्रीतून काही द्रव्यलाभ व्हावा हा कधी हेतूच नव्हता. यासाठी प्रायः मुद्रण किंमतीत मी ग्रंथांची विक्री आजवर केलेली आहे. ही आदिमायेची लीला घरोघर स्वस्त किंमतीत वाचावयास मिळावी हा हेतु सफल झाला. वाराणसीपासून रामेश्वरापर्यंत अनेक गावी या ग्रंथाचा प्रसार झाला आहे, हे मला निश्चितपणे माहीत आहे. मग या व्यवहारात मला काही तोट आली

तरी ती मी आनंदाने सोसणार आहे. धंदेवाईक प्रकाशकाचे हाती विक्रीची सूत्रे न देण्याचा माझा हेतु सफल झाला आणि वाचकांना ग्रंथ अल्पमूल्यात मिळाला.

देवीतत्त्वाचा सांगोपांग चर्चा करणारा ग्रंथ आजवर मराठी भाषेत नव्हता किंबहुना कोणत्याच भाषेत नाही–तो उपलब्ध झाला आहे व ती अपेक्षा पुरी झाली आहे. हा विषय किती अवाढव्य आहे, याची कल्पना वाचकांना निरनिराळ्या प्रकरणांवरून येईल. ही सर्व प्रकरणे पायाभूत मानून त्यावर अनेक इमारती, विद्वान संशोधकांना उभारता येतील आणि त्यांनी तशा त्या उभाराव्यात ही प्रामाणिक इच्छा आहे. यातील साधकबाधक माहितीचा उपयोग करून त्यांना अनेक निष्कर्ष काढता येतील आणि त्याची वाचकांना जरुरी आहे.

पंच ज्ञानेंद्रिये या आपल्या शक्ति आहेत असे आपण मानतो. पण कान म्हणजे शक्ति नव्हे, नेत्र म्हणजे शक्ति नव्हे, ती शक्तीची इंद्रिये आहेत, त्या त्या शक्तीची साधने आहेत. प्रत्येक इंद्रियाच्या ठायी शक्ति आहे व तिची प्रखरता सर्वत्र सारखी नाही. माणसाचे नेत्र, कावळ्याचे नेत्र, मांजर-वटवाघूळ यांचे नेत्र यांची उदाहरणे पाहण्यासारखी आहेत. पहाणे आणि ऐकणे या दोन्ही क्रिया सर्प एकाच इंद्रियाने ( नेत्राने ) करतो असे शास्त्रज्ञ मानतात. माणसाला जे दिसत नाही ते पाहण्याची शक्ति कावळ्याचे नेत्रांत आहे. पिंडाला कावळा लवकर अगर उशीरा का शिवतो याची मीमांसा त्या प्रसंगीच्या मंत्रात केलेली आहे. ज्या मानवांच्या सर्व आशाआकांक्षा तृप्त झाल्या आहेत त्याचा आत्मा, देहपतन झाल्या बरोबर त्याला सोडून जातो. पण इतरांचा बाकी असतो. पिंड हे मृत माणसाचे प्रतीक होय. त्याचा आत्मा मृतशरीरास तो सोडून गेला तेथे नुसता भात असतो व कावळा लवकर खातो. पण ज्या अतृप्तवासनेमुळे आत्मा रेंगाळत असतो, तो पिंडात कावळ्याला दिसतो आणि त्याच्या भीतीने तो भात खात नाही. शेवटी नातलग माणसे कंटाळून मृतदेहातील अतृप्त वासनेचा एक एक उच्चार करतात व पूर्ण होणार असे वचन मिळाले म्हणजे आत्मा पिंड सोडून जातो आणि कावळा भात खातो. रात्रीचे वेळी अगर अंधारामध्ये माणसाला माणूस दिसत नाही. कारण त्याची नेत्रशक्ति येथे कमी पडते. पण मांजर, वटवाघूळ या सारख्या प्राण्यामध्ये ती नेत्रशक्ति ज्यास्त प्रबळ असल्याने ती काम करते. मांजर उंदीर पाहू शकते व त्यावर नेमके झडप घालून त्याला पकडते. कारण असे सांगतात की, मांजर आपल्या नेत्राच्या बाहुल्या कॅमेऱ्याप्रमाणे कमी जास्त करू शकते आणि वस्तु पाहू शकते. वटवाघूळाची नेत्रशक्ति प्रखर सूर्य प्रकाशात काम देत नाही, रात्रीसारखा मंद प्रकाशच लागतो. सारांश आज ज्या काही अदृश्य शक्ति कार्य करीत आहेत त्याचे संशोधन करून, संशोधकाना अधिक लिहीता येईल,

अशा मालमसाला या ग्रंथात भरपूर आढळेल, त्याचा त्यांनी उपयोग करावा. कदाचित शास्त्रज्ञांनी या मार्गात प्रगती केलेलीही असेल.

पुस्तकविक्रेत्यांनी जरी ग्रंथ विक्रीस हातभार लावलेला असला, तरी अपेक्षेप्रमाणे मात्र नाही, हे नमूद करणे जरूर आहे कारण काहीही असो. मुद्रित प्रती मला हातावेगळ्या करावयाच्या आहेत याची जाणीव असल्याने गावोगाव घरोघर जाऊन मी ग्रंथाची विक्री करण्यात यशस्वी झालो. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांची विक्रीची हातोटी वर्णन करताना जुने लोक सांगतात की, 'डॉक्टरसाहेब ज्ञानकोशाचे खंड पाठीवर मारून घरोघर नेऊन विक्री करीत असत.' मी त्यांचेच अनुकरण केले आणि बराचसा मोकळा झालो आहे. मी जर दहा घरी गेलो तर निदान ७–८ घरी तरी माझी पुस्तकांची विक्री झालेली आहे आणि होतही आहे यामुळे शिल्लक ग्रंथसंपत्ती कशी हातावेगळी होईल याची चिंता वाटत नाही या परीने ग्रंथविक्री करताना, मी उत्तम विक्रेताही झालो व ती कलाही शिकलो, हाही फायदा झाला

विक्रीच्या बाबतीत वाचक हेच माझे दैवत ठरले, अन्नदाते ठरले. त्यांनी केलेल्या कौतुकावर आणि सहकार्यावर ग्रंथ विक्री मी माझ्या जबाबदारीवर करण्याचे ठरविले होते आणि देवीने येथेही हात दिला. विद्वानांनी अभिप्राय देऊन आणि वाचकांनी मायेचा हात पाठीवर फिरवून, मला कृतार्थ केले. माझे श्रमाची पावती, त्यांनी या प्रकारे दिली याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी आहे.

देवीकोश भाग ४ ची रूपरेषा वर्णन करताना मी भाग ३ मध्ये असे लिहिलेले आहे की, देवताच्या इतिहासाबरोबर तत्कालीन समाज, आचार-विचाराचे दर्शन यामध्ये होईल. ही गोष्ट सत्य आहे री, तत्कालीन आचार-विचाराची छाप देवताच्याही पूजासमारंभावर पडते. ऋग्वेदामध्ये यम आणि त्याची बहीण यमी याचा संवाद दिलेला आहे. तेथे ती बहीण भावाबरोबर आपले नाते, पति या नात्याने जोडू इच्छिते. कारण त्यावेळेपावेतो कोणतेही लैंगिक बंधन नसावे, समाज स्वैरपणे वागत असला पाहिजे सांप्रत जसे भारतीय शासनाचे धोरण संतती प्रतिबंधक असून ते प्रत्येकाने आचरणात आणावे अशी यंत्रणा चालू आहे, ती कोणाला मानवते, कोणाला नाही तद्वत बहीण भावाचे लैंगिक संबंध नसावेत अशी त्या वेळी समाज धुरिणाची नवीन घोषणा असावी. ती घोषणा यमाला मानवली पण यमाला मानवेना यामुळे तशा प्रकारचा संवाद वेदांमध्ये आलेला असावा. याचाच अर्थ वेदामध्ये त्या वेळच्या समाजाचे आचारदर्शन घडते भक्त हिंसाचारी असेल तर देवताला नैवेद्य मांसाहार लागतो, पण काही वेळा उलट प्रकार दिसतो देवताच्या रूढी

समजण्यास समाजाच्या तत्कालीन रूढी समजणे अवश्यक आहे. याच हेतूने राष्ट्रीय उत्कर्षाचा संबंध देवतांबरोबर दाखवून तो इतिहास स्फूर्तिदायक बनविण्याचा प्रयत्न या भागात झालेला आहे. देवता समारंभाच्या रूढी समजण्यास तो रात्रीने मार्गदर्शक ठरेल.

कृण्वन्तो विश्वमार्यम् या आर्यांच्या प्राचीन विजिगीषु वृत्तीचे, बृहत्तर भारतामध्ये कसे रूपांतर झाले, हेही पाहण्यासारखे आहे.

( अ ) सूर्यवंशीय आक्रमक वीरांनी पूर्वेकडे जावा–सुमात्रा–बाली–पेरु मेक्सिको– तर पश्चिमेकडे सिरिया–अरेबिया–रोम–ग्रीसपर्यंत दीर्घ प्रयत्नाने व चिकाटीने वसाहती कशा स्थापन केल्या.

( आ ) सनातन वैदिक धर्माच्या ध्वजेची घोडदौड कशी चौफेर झाली.

( इ ) भारतीयांचे प्राचीन कर्मकांडाचे दीप, बाली दीपस्थ बांधवांनी अद्यावत कसे तेवत ठेवले आहेत.

( ई ) शिल्पशास्त्रातील नयनरम्य अद्भुत कलाकृतीचे दृश्य किती परिश्रमाने अखिल मानवजातीपुढे चिरस्थायी स्वरूपात उभे केले आहे.

( उ ) सुवर्णांनी मढविलेली मंदिरे आणि अनेक प्रकारच्या रत्नांनी अलंकृत असलेल्या देवमूर्तींनी राजैश्वर्य कसे अमाप उपभोगले, इत्यादिकांचे मनाला आल्हाददायक व तरुणांना स्फूर्तिदायक, वैभवशाली वर्णन येथे वाचावयास मिळणार आहे.

( ऊ ) आधुनिक अनेक विज्ञान तत्त्वांचा व शास्त्रांचा उगम आपला भारत देश आहे आणि परदेशीय संशोधकांनी त्याला मान्यता दिलेली आहे, हेही आपण या भागात पहाल.

बृहत्तर भारतातील देवतांचे वैभव समजण्यास हा आनुषंगिक इतिहास आवश्यक म्हणूनच दिलेला आहे. भोलानाथाचे दर्शन घेण्यापूर्वी त्याच्या नंदीचे दर्शन घ्यावे लागते, तसाच प्रकार वाचकांनी समजावा. मंदिराचे वैभव जसे कळस दिसताने प्रकर्षाने झळकते, तद्वतच या प्रथमालेतील हा चौथा खंड शिखररूपाने सदैव झळकत राहणार आहे यात मला तरी संदेह नाही.

मेक्सिको येथील देवतांच्या इतिहासावरून, एका प्राचीन भारतीय विचारधारेचा कसा उलगडा होतो तो पाहण्यासारखे आहे. भारतीय संस्कृति मानते की पृथ्वीचा भार, पाताळातील शेष भगवानाच्या मस्तकावर आहे. भौगोलिक दृष्ट्या विचार केला तर भारताच्या विरुद्ध बाजूला मेक्सिको देश आहे, म्हणजे पाताळ

देश आहे. त्या देशात आजही आदि-शेषाचे मंदिर आहे, शिवशंकराचे आहे, कृत-त्रेता-द्वापार-कली या चार युगांचे दर्शक चक्र मंदिर आहे, सूर्य नारायणाचे आहे. इ० इ०. तेव्हां तेथील शेष भगवानाच्या मस्तकावर, आपला भू-गोल आहे, ही प्राचीन भारतीय विचारधारा तेथील सत्य स्थितीला अनुसरून आहे. यात कोणतीही कल्पनेची भरारी नाही. यातील इतिहास मनन केला, तर असे अनेक धागे-दोरे जुळविता येतील.

भारतीय पुराण कथा म्हणजे केवळ भाकड कथा आहेत असा आरोप काही पाश्चिमात्य व भारतीय संशोधकही करतात. ते त्यांचे मत खरे नव्हे याचे उदाहरण वर दिले. तसे आधुनिक संशोधनातूनही देता येईल. दक्षयज्ञाच्या वेळी शंकरपत्नी उमा हिचा अपमान झाला आणि तिने योगाग्नीने आपला देह जाळून घेतला. याचा सूड शंकराचा सेनापति वीरभद्र याने घेतला. दक्षाचे शीर कापले व यज्ञकुंडात जाळून टाकले, पण देह तसाच पडलेला होता. शेवटी दक्षपत्नीच्या विनंतीवरून दक्षाला शंकरांनी जीवदान दिले, पण मस्तक अस्तित्वात नसल्याने यज्ञासाठी मारलेल्या बोकडाच्या मस्तकाचे कलम त्याचे धडावर केले. त्या दिवसापासून दक्ष हा बोकडमुखी झाला. ही भाकड कथा नव्हे. कसे ते पहा. नवशक्ति मुंबई दि. ८-७-७२ यांत प्रसिद्ध झाले आहे की, इटली देशात नुकतीच कलम-तज्ञाची (सर्जन) परिषद भरलेली होती. त्यामध्ये अमेरिकन सर्जन व्हाईट उपस्थित होते. त्यांनी सांगितले की, तपमानाच्या शून्य अंशाखाली मेंदूची शस्त्रक्रिया केली तर मेंदूस कायम स्वरूपाची इजा होत नाही. बबून जातीच्या वानरावर असा प्रयोग यशस्वी झाला आहे आणि मेंदूचे कलम झालेले आहे. हाच प्रयोग माणसावर करणे आता कठीण नाही. याचा अर्थ असा की, एखाद्याला नवीन डोके बसवून मिळू शकेल. अश्विनीकुमार वैद्यकशास्त्रात निष्णात होते, तसाच प्रकार शंकर अगर त्यांचे वैद्यकीय सल्लागारात असावा आणि त्यांनी बोकडाचे मस्तक, दक्षाच्या शरीरावर कलम केलेले असावे, हाच निष्कर्ष या नवीन शोधावरून काढता येण्यासारखा आहे.

वेद-वाङ्मयातील सूत्ररूपाने गणित विषयाची मांडणी हे तर गाढया विद्वानालाही न सुटणारे कोडे आहे. जगन्नाथपुरीचे सांप्रतचे शंकराचार्य भारती कृष्णतीर्थ याचे संग्रही या विषयावरील सुमारे ३० सूत्रें आहेत. ही सूत्रें अथर्ववेदांतील परिशिष्टापैकी असून त्याचे प्रकाशन झालेले नाही. बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, वर्गमूळ, भूमिती–बीजगणित प्रमेये, त्रिकोणमिती, क्यॅलक्युलस् इ० इ० गणित विषयाची मूलतत्त्वे, सूत्ररूपाने वर्णन केलेली आहेत. पण या सूत्राचा अर्थ लावून ती कार्यवाहीत आणण्यास ऋतंभरा प्रज्ञा पाहिजे. या सूत्र पद्धतीने उदाहरणे सोडविल्यास, पाटीवर लांबच लांब आकडेमोड करावी

लागत नाही, हा माझा स्वानुभव आहे. केवढीही मोठी संख्या असो, त्याचा गुणाकार, भागाकार, वर्गमूळ, बीजगणित, प्रमेयांचे अवयव कारण करता येते, अत्यंत जलद आणि बिनचूक हातावेगळे करता येते. यातील काही सूत्रे अशी—

( १ ) एकाधिकेन पूर्वेण, ( २ ) आनुरूप्येण, ( ३ ) शेषाण्यंकेन चरमेण, ( ४ ) निखिलं नवतः चरतम् दशतः, ( ५ ) यावदून तावदूनीकृत्य वर्गं च योजयेत्, ( ६ ) परावर्त्य योजयेत्, ( ७ ) ऊर्ध्वं तिर्यग्भ्याम्, ( ८ ) आद्यमाद्येन, अंत्यमात्येन, ( ९ ) गुणित समुच्चयः समुच्चय गुणितः इ० इ०

या सर्व सूत्रांचे विवरण येथे देता येणे शक्य नाही. पण स्पष्टीकरणार्थ दशांश अपूर्णांकाला लागू असणारी पहिली सूत्रे घेऊ या. या सूत्रानुसार $\frac{१}{१९}$, $\frac{१}{२९}$, $\frac{१}{१३}$, $\frac{१}{७}$, $\frac{७}{४९}$ इत्यादि अपूर्णांकाचे दशांशरूपामध्ये रूपांतरित करता येतात. आधुनिक रीतीप्रमाणे मोठा भागाकार करावा लागत नाही व दशांशांत या अपूर्णांकाचे रूपांतर मिळते. जसे $\frac{१}{१९}$ हा अपूर्णांक घेतला, तर सूत्र एकाधिकेन पूर्वेण प्रमाणे शेवटचा अंक १ येईल. या अंकाला छेदांतील पूर्वेण म्हणजे ९ चे पूर्वीच्या अंकाने म्हणजे १ याच्यापेक्षा एकाने अधिक आकड्याने १ + १ = २ याने गुणले असता, उजवे बाजूकडील येणाऱ्या उत्तराची संख्या मिळते. ही उत्तर संख्या १८ अंकाची आहे. ०५२६३१५७८९४७३६८४२१ या ठिकाणी शेवटचा अंक १ वर सांगितल्याप्रमाणे आहे. त्याला २ आकड्याने गुणले असता संख्या २१ झाली, पुन्हा २ अंकाला दोनने गुणले म्हणजे संख्या ४२१ झाली. ४ अंकाला २ ने गुणले म्हणजे संख्या ८४२१ झाली. ८ आकड्याला २ ने गुणले म्हणजे संख्या ६८४२१ झाली. याप्रमाणे गुणाकार करून वरील संख्या येईल. $\frac{१}{१९}$ या पदाचा नेहमीच्या पद्धतीने म्हणजे १९) १ (०·०५ भागाकार करून वरील संख्याच येईल व अठरा आकड्यानंतर पुन्हा आवर्त म्हणजे तेच चक्र सुरू होईल. नेहमीची पद्धत सुगम नाही. या सूत्राने जलद बिनचूक उत्तर मिळते हेच वैशिष्ट्य होय. निरनिराळ्या सूत्रांचे आधारे याप्रमाणे वर्गमूळ, घनमूळ भूमिती–बीजगणिताचे प्रमेये, त्रिकोणमिती इत्यादि गणित शास्त्रातील अत्यंत क्लिष्ट विषय सहज सुलभ करता येतात. या मार्गातही काही खाच–खळगे आहेत, पारिभाषिक शब्दांचे अर्थ आहेत, काही पदाचे विवरण करण्याचे खास मार्ग आहेत, ते प्रत्यक्ष जाणकाराकडून समजावून घ्यावे लागतील. मात्र, ही सूत्रे समजली तर शालान्त परीक्षेचे गणितच काय, पण पदवी परीक्षाचे गणितही अत्यंत सुलभ होते, असा जाणकाराचा दावा आहे. ऋतंभरा प्रज्ञेने या सूत्राचा माहीत झालेला भाग इतका महत्त्वाचा आहे. परंतु तपश्चर्येने अद्याप कित्येक अज्ञात भागाचे संशोधन करून ज्ञान प्राप्त करून घेणे बाकी आहे. ते

-साप्रतच्या व भावी भारतीयानी करून घेऊन प्राचीन ऋषींचा हा ज्ञानदीप, निखिल विश्वाला दाखवून ते प्रकाशमय करणे हे त्यांचे कर्तव्य आहे. हा प्राचीन ज्ञानसाठा विश्वाला दिला पाहिजे. आधुनिक गणितपद्धती कितीही प्रगत झालेली असली तरी मूलतत्त्वाचा विचार भारतीय ऋषींनी केलेला आहे, हेंच मला येथे दाखवावयाचे आहे. योगवासिष्ठ ग्रंथाप्रमाणे, ही गणितशास्त्रांतील सूत्र-शक्ति आहे व त्याचा अभ्यास झाला पाहिजे. ( श. रा. पेंडसे, पांडुरंग बळीभद्र चाळ, कादेवाडी, मुंबई ४ हे गृहस्थ अधिक माहिती देऊ शकतील ).

यांतील ग्रंथ सूचीचा जर कोणी सखोल अभ्यास केला, तर अनेक संस्कृती-मधील देवताचे नावाचा सारखेपणा चटकन ध्यानात येईल. जसेः—पृथ्वीदेवता.

| | |
|---|---|
| ( १ ) ड्राम— | झव्ह—रशिया |
| झाइप—मय | झाबिठी—आफ्रिकन |
| झिगारा—बॅबीलोन | झेऊस—ग्रीक |
| ( २ ) दिती—भारतीय | दिक्तेनिना—ग्रीक |
| दिकरवाशिनी— | दिक्तेयानी—ग्रीक |

( ३ ) कोकामुखी, कोटरी, कोटेश्वरी भारतीय कोटलीक्यू, कटिस मयसस्कृती

( ४ ) पॉलेनेशिया, मेक्सिको, रशिया यानी नावे ' ट ' कारात्मक तोमन-मदर, तोतेक, तोळेनेचिन् इत्यादि.

( ५ ) ग्रीक नावे ' ड ' कारात्मक—डिंडीमनी, डुडुम, डेरखोटा, डेल्फी इत्यादि.

भारतीय स्त्रियानी अंगावर अनेक अलकार चढविले तरी नाकामध्ये जर नथ नसेल, तर सर्वसुंदर दिसणारे स्वरूप अपुरेच रहाते. तद्वत एवढया मोठया अनेक प्रकरणांनी आणि विविध देवताच्या इतिहासानी नटलेल्या ग्रंथाला जर ' सूची ' नसेल तर स्वरूप पूर्ण होणार नाही. कोणती देवता कोठे पहावी, कोणता विषय कोठे धुंडावा, कोणती व्यक्ती कोठे पहावी, हे सर्व समजण्यास प्रदीर्घ सूची पाहिजे. किंबहुना सूचीवरून सर्व ग्रंथाचे स्वरूप सहज समजते. पण यासाठी सूची प्रदीर्घ पाहिजे, सखोल अभ्यास पाहिजे, तरच संशोधकाना व वाचकाना ती उपयुक्त ठरेल. माझे शाळासोबती श्री. कृष्णाजी गणेश भागवत यानी दीर्घ परिश्रमाने ती सूची मजवरील केवळ प्रेमापोटीच बनविली आहे. ते स्वतः ग्रंथपाल असल्याने, उपयुक्ततेच्या आधुनिक दृष्टीकोनातून त्यांनी ती बनविली आहे. सूचीचा दृष्टीकोन आपल्या निवेदनात त्यांनी उघड केला आहे, त्यास्तव त्याची द्विरुक्ति करीत नाही. शेवटी मी इतकेच म्हणेन की, जगन्मातेची कृपा म्हणून मला

माझ्या स्नेह्याने सूची बनवून दिली व मला आणि वाचकांना सदैव उपकार-ऋणांत ठेवले आहे.

अनेक संस्कृतींच्या देवतांचे दर्शन घडून आदिशक्तिचे भव्य स्वरूपाची कल्पना वाचकांना यावी, यासाठी अनेक दुर्मिळ चित्रे कोशाच्या या भागांत दिली आहेत. त्याचे विवरण त्या प्रकरणांत वाचावे.

महाराष्ट्र शासन, साहित्य आणि सांस्कृतिक मंडळाने, भाग ४ च्या प्रकाशनास आर्थिक सहाय्य म्हणून रु. २५००/– (रुपये पंचवीसशे फक्त) मंजूर केले आहेत, याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

या भागातील छायाचित्रे जमा करण्यास, लोकरे आर्ट स्टुडिओ, गोरेगाव आणि ब्लॉक्स करून देण्यास के. जोशी कंपनी पुणे यांचे सहाय्य झाले आहे. तसेच नकाशे तयार करून देण्यास श्री. ल. वि. भडकमकर, गोरेगाव यांचे सहाय्य झाले आहे. या सर्वांचा मी आभारी आहे. मुद्रणाचे काम नेहमीप्रमाणे प्रतिभा मुद्रणालय, टिळक पथ, पुणे यांनी आपुलकीने करून दिले याबद्दल चालक व त्यांचे सहाय्यकारी यांचे आभार मानतो. मुद्रिते तपासून आणि सूची तयार करून दिल्याबद्दल माझे बालमित्र कृ. ग. भागवत यांचे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत. शेवटी भारतीय संताच्या भाषेत वाचकांचा प्रेमाचा निरोप घेतो—

शोधिली लेकुरे । देवि चरित्रे साकुडे ॥
क्षमा करा अपराध । देविभक्त तुम्ही सिद्ध ॥
नाही मी देखिला । अधिकार हा आपुला ॥
दास म्हणे देवीमाई । राख पायापे ग आई ॥

---

## प्रार्थनेपूर्वी

देवीकोशासारखा प्रचंड ग्रंथ निर्माण करून महाराष्ट्राला अनपेक्षित धक्का देणारे प्र. कृ. प्रभुदेसाई यांनी देवी केकावली लिहून आणखी एक धक्का महाराष्ट्राला दिला आहे. रूढार्थाने ते ख्यातिप्राप्त विद्वान, साहित्यिक, ग्रंथकार या कोणी नाहीत आणि तरीही त्यांनी या प्रांतात जी मुशाफिरी चालविली आहे, त्यातच त्यांच्या लोकविलक्षण व्यक्तिमत्त्वाचे असाधारण वैशिष्ट्य आहे. इतरांना प्रदीर्घ व्यासंगानेसुद्धा जे जमणे कठीण ते प्रभुदेसाई यांनी, जणू लीलया करून दाखविले आहे. लीलया अशासाठी की, हे सारे करण्यासाठी त्यांना साकल्याने प्रदीर्घ व्यासंग करावा लागला नाही असे नव्हे, पण हा व्यासंग त्यांच्या विषय-कक्षेपलीकडचा होता, त्या त्या विषयातील भल्याभल्यांनाही आश्चर्य वाटावे असा हा त्यांचा व्यासंग, म्हणूनच सर्वांच्या आदरमिश्रित कौतुकाला प्राप्त झाला. तानसेनाने मेघमल्हार किंवा दीपराग आळवावा हे समजण्याजोगे आहे. पण एखाद्या संगीतापासून शेकडो मैल दूर असणाऱ्या शेतकऱ्याने मेघमल्हार तानसेनाच्या बरोबरीने आळवावा याचे अधिक आश्चर्य, अधिक कौतुक—श्री. देसाई यांनीही तानसेनाची बरोबरी केली आहे. नुसता मेघमल्हार कोणताही गवई गाऊ शकेल. पण केवळ तेवढ्याने कोणी तो तानसेन ठरत नाही, ठरणारही नाही. तानसेन जन्मावा लागतो, तसेच थोडेसे देसाई यांच्या बाबतीत म्हणावे लागेल.

त्यांची 'देवी केकावली' वाचली आणि देवीकोशासारखा प्रचंड नि भारदस्त ग्रंथराज लिहिणारा हा माणूस इतका कोमल काव्यवृत्तीचा असावा हेच मुळी खटकते. असा माणूस (त्यालाच विद्वान म्हणतात) कसा दरोबस्त गंभीर पाहिजे, त्याच्याकडे पाहिल्यावर, 'आताच होणार की क्षणानंतर जगबुडी होणार असेच वाटले पाहिजे. सदैव कुणाला तरी पोचवून आल्यासारख्या दुःखी नि भयानक गांभीर्याने व्यापलेला चेहरा, अवघ्या जगाचे कसे होणार ? या चिंतेने म्हणजेच अगाध विद्वत्ता असे समजण्याचा पुरावा प्रघात आहे' देसाईंच्या बाबतीत ईश्वरकृपेने असे काही नाही, हा केवढा दिलासा आहे ! ते माणूस असून माणसासारखेच दिसतात नि असतात. आजच्या जमान्यात हे जरा दुर्लभ आहे. ते साहित्यातील कोणत्याही मोरपिसाने सजलेले नाहीत म्हणूनच त्यांचे काव्यही सहज सुंदर झाले आहे. जीवनातील नानाविध अनुभवांनी समृद्ध झालेले, त्या त्यांच्या जीवनाचे सहजसुंदर म्हणजेच त्यांची ही देवी केकावली ! व्यक्तीच्या पातळीवर आलेले अनुभव समाजाच्या व्यापक पातळीवर नेण्याचे काम कवि करीत असतो. व्यक्तीच्या अनुभवात सान्यांना सहभागी जो करू शकतो तोच

खरा कवि ! अशा कवीचे जे दुःख, जे अश्रू, जो आनंद, जो रसानुभव तोच वाचकाला आपला वाटू लागतो असे जेव्हा वाचकाला वाटू लागते तेव्हाच हृदयाच्या अंतर्हृदयाची तार अलगद छेडली जाते.

अशी तार ज्या वेळी छेडली जाते त्या वेळी कवीचे दुःख वा सुख हे मग कवीचे रहात नाही, ते सार्‍या मानवतेचे सुख-दुःख होते. कालिदासाची शकुंतला अथवा बालकवींची फुलराणी ही आता कालिदास, बालकवींची राहिली नाही, तर ती देशकालमर्यादा ओलांडून अवघ्या विश्वाची झाली ! आंबा झाडावर पिकतो पण तो झाडाचा रहात नाही, तद्वतच कवीचा अनुभव हा कवीचा रहात नाही.

कवि काव्य का करतो किंवा असे म्हणण्यापेक्षा ते त्याला का स्फुरते ? याचे उत्तर कवीच्या मनोवृत्तीशी निगडीत आहे. या मनोवृत्तीवर काव्याचे काव्यपण अवलंबून आहे. केशवसुतांसारखे कवि काव्य हे सामाजिक उद्बोधनाचे साधन मानतात. ते म्हणतात—

पद्यपंक्तिची तरफ आमुच्या करीं विधीनें दिली असे ।
टेकुनि ती जनताशीर्षावरि जग उलथुनिया देऊं कसे ॥

जग उलथून टाकण्यासाठी काव्याचा उपयोग तरफेप्रमाणे करणे ही कल्पनाच गद्याहून गद्य तर आहेच पण काव्यामागे असलेल्या कोमलवृत्तींचा चोळामोळा करणारी आहे. जाईसारख्या कोमल तरल सुगंधाने जिथे वृत्ति उल्हसित व्हायची तिथे गंधहीन धोतर्‍याचे फूल आणावे तसेच हे आहे. भावनांच्या मिटलेल्या पाकळ्या अलगद विकसित करण्याचे कार्य काव्य करीत असते. बुद्धीवर घणा-घात करण्याचे काम हे काव्याचे नव्हे. फुलातून जितक्या सहजतेने सुगंध दरवळू लागतो तितक्याच सहजतेने कवीला हवे असलेले उद्बोधन झाले तर काव्यातून व्हावे, पण बुद्धीला गदगदा हलविण्यासाठी काव्याचा उपयोग करू पाहणे म्हणजे सुंदर फुलांचा सुगंध घेण्याऐवजी ते खाऊन पाहण्यासारखे आहे. म्हणूनच अशा बुद्धिवादी कवींना उद्देशून कै. प्रा. शं. नि. परांजपे, हनुमानगढ, वर्धा हे मोरोपंतांच्या केकावलीवरील आपल्या विवेचनांत म्हणतात—

वाङ्मयभूमि बुद्धि कुलटा थयथय नाचे कशी ।
......... जशी कीं रंभा वा उर्वशी ॥

बालकवीसारखा जन्मसिद्ध कवि काव्यासंबंधी म्हणूनच म्हणतो—

मंजुगीत त्यामधुनी स्फुरतें
दिव्य अहा मग तें अवतरतें
मी-तूंपण तें क्षणिं विसरतें
लागे अखंड ध्यास जिवातें

हें खरें काव्य ! तें आपोआप स्फुरते, शब्दांतून अवतरते, मी तूंपणा नाहींसा करते आणि असे काव्य जीवाला अखंड ध्यास लावते. फुलांतुन सुगंध जसा नकळत दरवळू लागतो तद्वतच कवीच्या शब्दाशब्दांतून जीवनाच्या अनुभूतीचा सुगंध न कळत दरवळू लागतो, लागावयास हवा. काव्याचे प्रयोजन भावना हेलावणे हें आहे, भावनेच्या द्वारा बुद्धीवर जो परिणाम होईल तेवढा पुरेसा आहे. बुद्धि ही कांही झाले तरी मर्यादित आहे. भावनेचे तसे नाही. बुद्धि नसणाऱ्या माणसालाही भावना मात्र असते. भावना असणाऱ्याला बुद्धि असेलच असे नाही. म्हणून काव्याचा प्रवेश समाजातील खालच्या स्तरापर्यंत होऊ शकतो. शांकरभाष्य न समजणाऱ्याला कालिदास-भवभूति कळू शकतात. फळाचे विज्ञान कळले नाही म्हणूनच त्याच्या रसास्वादाला अडचण येत नाही. यासाठीच कवीचा महिमा फार मोठा आहे. 'कवी देखे तें रवि न देखे' असें जे म्हणतात त्यात जराची सुद्धा अतिशयोक्ति नाही.

श्री. देसाई यांची देवी-केकावली हे खरें काव्य आहे. ते थेट काळजाला हात घालते. केका याचा अर्थ अंतःकरणापासून टाहो फोडणे. अंतःकरणात निर्माण झालेला अत्युत्कट विचार नि अनावर भावावेग आपोआपच ज्या वेळी शब्दरूपाने प्रकट होतो त्या वेळी त्याला केका असे म्हणतात. मोरोपंतांची केकावली मराठी कवितेचा शिरपेंच ठरला त्याचे कारण हेंच होय.

सर्व समर्पणवृत्तीचा कळस ज्या वृत्तींत होतो तिला भक्ति असे म्हणतात. देवी केकावलीत ही वृत्ति शब्दां शब्दांतून प्रगट झाली आहे. ही देवी-केकावली आहे. देवी केकावली वाचत असताना कवीच्या आशयाशी वाचक केव्हा तद्रूप होऊन जातो हें त्याचे त्याला सुद्धा कळत नाही. कवीला सुद्धा हे कळलेले नाही. कवि म्हणतो—

न जाणें मंत्रातें कृति नच कळे देवि त्वही
न जाणें तंत्रातें मन नच वळे वंद्य पदिंही

न जाणें शक्तीतें स्तवानें न गळे अक्षपणही
सदा दे सद्बुद्धि अनुसर घडो देवि कृति ही

आणि तरीही त्याची केकावली काही काही ठिकाणी अक्षरशः मोरपिंचांची आठवण करून देते हे केवढे आश्चर्य ! देवी केकावलीत कवि एके ठिकाणी असे उद्गार काढतो की—

कसें प्रसवलें ? कुणी वदविलें ? महाकाव्य हें
कुणीं मजमुखीं असे ? स्फुरण दिव्यग्रंथा दिलें ?

कवीला हें कळत नाही हेच त्याच्या कवित्वाचे लक्षण होय. खरी कविता ही आधी कळतच नाही. ती प्रगट झाल्यावरच इतराप्रमाणे कवीलाही कळते! कवीला आलेल्या कटु अनुभवांनून तो जगदंबेकडे वळला. तिच्या पायी त्याचें *मन रमू लागले. अनन्यभक्तीने तो विव्हळ झाला, आर्त झाला! ती अत्युत्कट* आर्तताच मग—

गृहीं-जनि-स्वसौहृदिं कटु अनुभवें पोळलो
म्हणून तर अंबिके तव-पदीं रमूं लागलों
नको परतवूं, नको परतवूं नको लोटुं गे
तुझे चरण सेवितां, मरण येऊं दे, येऊं दे ॥

अशी शब्दाने प्रकट होते.

या देवी केकावलीत महत्त्वाचा गुण म्हणजे प्रसादरम्यता हा होय. साधी सुबोध शैली, प्रौढीमा, प्रासादिकपणा इत्यादि सहज प्राप्त गुणानी या काव्याला एक आगळेच सौंदर्य प्राप्त झाले आहे. काही काही ठिकाणी तर अक्षरशः मोरोपंतांचीच आठवण व्हावी अशी तद्रुपता आली आहे. उदाहरणार्थ—

दयानिधी दयाघना अमित शक्ति वर्णू किती ।
मदीय मति मंदशी स्फुरली काव्यपंक्ति प्रती ।
चुणा चुणुनि मौक्तिका जडण केली काव्या सरी ।
जलौघ जल-जान्हवी, विनवि देवि मानी वरी ॥

ही केका वाचताना मोरोपंतांचीच आठवण होते. देसाई यांना प्रतिभेचे लेणे जगदंबेच्या कृपेने लाभले आहे यात तिळमात्र संशय नाही.

सुख-दुःख सर्वांनाच होते पण क्रान्तदर्शी कवीला होणारे दुःख किंवा सुख यांचा पोतच वेगळा असतो. त्यामुळेच कवीच्या अनुभूतीशी सारे जग समरस होऊ शकते. देसाई यांना आलेले अनुभव इतरांना आले नसतील असे नव्हे; पण देसाई यांच्या प्रतिभेचे वलय प्राप्त होताच त्याच्या अनुभवांना विश्वात्मस्वरूप प्राप्त झाले. देवी-केकावलीत कवीची आर्तता अकृत्रिम असल्याने ती आपल्या अंतःकरणात एकदम प्रवेश करते. ज्ञानदेवांनी म्हटल्याप्रमाणे 'ये हृदयींचें तें हृदयीं घातलें' असाच देवी-केकावली वाचताना शब्दो-शब्दी अनुभव येत असतो. वाचकांनी एकांतात बसून जर एकाग्र चित्ताने ही देवी केकावली पठण केली तर त्यांचे डोळे पाणावल्यावाचून रहाणार नाहीत, इतका यात करुणरस उत्कट आहे. यात अर्थांतरन्यास, सहजतेने आलेले अनुप्रास इत्यादि अनेकविध काव्यगुण तर आहेतच, पण शिवाय रसवत्ता आहे. या रसामुळेच हे काव्य सरस झाले आहे. चपखल शब्द-योजनेने माधुर्य प्राप्त झाले आहे.

अशा या सहजसुंदर काव्यकृतीला मी प्रस्तावना लिहावी असे देसाई यांनी का सांगितले हेच मला समजत नाही. मी कवि नाही, तरी पण त्यांचे आमचे संबंध मात्र काव्यमय आहेत. आज अनेक वर्षे त्यांचे जीवन मी जवळून पहात आलो आहे. निष्काम कर्मयोग्याचे जीवन जगूनही त्यांनी त्याना जाणीवही नाही. दुःखाचे मेरुमांदार त्यांनी हसत-खेळत ओलांडले. त्यांची ती स्थितप्रज्ञवृत्ति पाहून आमचे डोळे अनेक वेळा पाणावले आहेत. अनेक प्रसंगी त्यांची काव्यात्मवृत्ति उचंबळून आलेली आम्ही पाहिली आहे. आमच्या ईशावास्य-प्रकाशनाने प्रसिद्ध केलेले, सुश्लोक गुरुचरित्र त्यांच्याच प्रतिभेतून परिष्कृत झाले आहे. जीवनात अपयश तर सर्वांनाच येते पण त्यांतून वर न येणे हे क्षम्य नाही. अपयश क्षम्य असले तरी त्यातून यशाचा मागोवा न घेणे हे मात्र क्षम्य नाही. अशी अनेक अपयशे ज्या वेळी पचवावी त्या वेळी कुठे यशाचे गौरीशिखर पादाक्रांत करता येते. देसाई यांनी हे गौरीशिखर आता पादाक्रांत केले आहे. आमची त्याना आग्रहाची विनंती अशी की, त्यांनी आपले आत्मचरित्र शब्दबद्ध करून महाराष्ट्राला लवकरात लवकर सादर करावे. नव्या पिढीला त्यामुळे जिवंत प्रेरणा नि स्फूर्ति मिळेल. नानाविध प्रसंगांनी रोमहर्षक झालेले त्यांचे शालेय, सेवामय आणि सार्वजनिक जीवन ही महाराष्ट्र जीवनाचीच सरिता ठरावी असे आम्हांस वाटते. म्हणून त्यात अवगाहन करण्याचे भाग्य तरुण पिढीला मिळावे हा त्यांना आत्मचरित्र लिहिण्यास सांगण्यामागे आमचा मुख्य हेतू आहे.

## १ केकावली—लेखकाचे आत्मनिवेदन

The great lyric must be religious, it must, it would seem, be outpouring of the Soul, not towards man, but towards God, o that of God-intoxicated Prophets ( T W. Daunton )

उत्कृष्ट वृत्तिप्रधान किंवा थोर महाकाव्य हे धर्मविषयकच असले पाहिजे. ामध्ये धर्मग्रंथात वर्णन केलेल्या ईश्वरप्रेमाने धुंद झालेल्या भगवत्स्तुतिपाठक ांप्रमाणे ईश्वरविषयक भावना वर्णन केलेल्या असाव्यात. कवीच्या स्वत:च्या श्वरप्राप्तीविषयक उत्कटवृत्ति पूर्णपणे प्रतिबिंबित झाल्या असल्यामुळे याला उत्कृष्ट तीचे वृत्तिप्रधान काव्य ( Lyric poem ) अगर थोर काव्य म्हणता येईल. आंग्ल वि वर्डस्वर्थ याच अर्थाचें भाष्य करतो.

" Poetry is the spontaneous overflow of powerful feeling "

अंत:करणातील मनोवृत्ति उचंबळून त्या स्वयंभूरीतीने बाहेर पडतात तेच उत्तम काव्य होय. याच निकषावर जसे मोरोपंतांच्या केकावलीकडे वाचक पाहतात आणि धन्योद्गार काढतात, तद्वत् या देवी केकावलीकडे पाहून त्यांनी भावहृदयाने कौतुक करावे एवढीच माझी अपेक्षा आहे.

शिवडेकर

> मेघाचें प्रतिबिंब पाहुनि सुखें नाचोंचि लागे, मुखें ।
> मानी सर्व मनोरथ-द्रुम फलीं ओथंबिले आपुले ॥
> ऐसा भक्त मयूर-चातकहि जो, नेणे दुजीं भावके ।
> तो साक्षात् घनदर्शनीं किति सुखी ? ते प्रेमळा ठावके ॥

कविवर्य मोरोपंत पराडकर यांनी आपल्या एका परिपक्व काव्यास केकावली नाव का दिले त्याचे कारण त्यांनी वरील श्लोकात दिले आहे. मयुराचे वाणीला केका असे म्हणतात. या कवीचे नांव मयूर (मोरोपंत) होते, तेव्हा त्यांच्या वाणीला केकावली नाव दिले हेही युक्तच होय. पण वर्षाकाळी मयूर हे मेघाची मार्गप्रतिक्षा करीत असतात, मेघवृष्टी होऊन ते जल मुखातून पडावे, या हेतूने आक्रोश करीत असतात, मोठ्या आनंदाने आपला पिसारा उभारून नाचत असतात, त्या वेळी तो बराच रमणीय व आकर्षक दिसतो. तेव्हा मेघ मयुराचा हा सेव्य सेवकभाव मनांत आणूनच कवीने आपल्या मुखातून स्रवणाऱ्या या काव्यरसाला केकावली हे नाव दिलेले असले पाहिजे.

केकावली काव्यात शांत किंवा भक्तिरस हाच प्रचुर होय. शांतरसामध्ये देवताविषयक रति अत्युत्कट झाली म्हणजे त्यालाच भक्तिरस म्हणण्यात येते. शांतरसाचा स्थायीभाव, विषयसुखाविषयी तिरस्कार बुद्धि उत्पन्न होणे हाच होय. पुण्यक्षेत्रे, साधुसमागम, भगवत्कथा श्रवण, सत्चरित्र श्रवण, देहाची क्षणभंगुरता, वृद्धावस्था, कामादि षड्रिपूंचा त्रास, इत्यादिक निर्वेदाची कारणे अगर विभाग समजावेत. प्रेमाश्रु वाहणे, कंठ सद्गदित होणे, अष्टसात्त्विक भाव दाटून येणे अगर भक्तिरसाने गळा दाटून येऊन प्रभूला शरण जाणे, या क्रियांना अनुभव म्हणता येईल. स्मरण, धैर्य, चिंता, हर्ष, उतावीळपणा, चांचल्य, इत्यादि मनोविकार हेच व्यभिचारी भाव जाणावेत, आणि या सर्वांच्या संवेदनाने तिरस्काराची पूर्णता होते. यासाठीच केकावलीत शांत रसाचा फार उत्तम परिपाक उतरलेला असतो, म्हणून ते एक उत्कृष्ट काव्य ठरलेले आहे.

केकावली काव्य उत्कृष्ट ठरण्याचे दुसरे कारण म्हणजे त्यामध्ये भक्तकथांची आकर्षक वीण आहे. या भक्तकथा कामधेनूप्रमाणे आहेत, म्हणून त्यांची श्रेष्ठता फार मोठी आहे. जन्म देणाऱ्या मातेपेक्षाही काही काही वेळा त्यांची श्रेष्ठता अधिक आहे. मातांनी लहान मुलांना स्तनपानासाठी घेतले म्हणजे त्या दुधाने पान्हावतात, एरवी तरुण अथवा वृद्धासाठी त्या पान्हावत नाहीत. कामधेनूचे मात्र तसे नाही. लहान मुले, तरुण मुलगे, स्त्रिया, म्हातारे-कोतारे, अशा सर्वांठायी त्या पान्हावतात व सर्वांना आनंद देतात. त्यामुळेच त्या सर्वांचा उद्धार होतो.

आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे ।
कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ॥ ( भागवत १-७-१० )

निर्गुणोपासक मुनीसुद्धा सगुण परमात्म्याच्या गुणवर्णनाने रमून जातात. कारण भगवद्गुणवर्णन फारच चित्ताकर्षक असते. यासाठीच शुकदेवानेही भागवताचेच अध्ययन केले. या भगवत्कथा धेनूचे दूध, कोणीही काढावे, त्या कधी पान्हा चोरीत नाहीत. दोहन करणारा ओळखीचा असो वा अनोळखीचा असो, सर्वांना त्या दूध काढू देतात. इतर धेनु काही ठराविक वेळेलाच दूध देतात, पण या कामधेनूचे दूध अखंड काढीत बसले, तरी आटत नाही. येथे जातीभेद नाही, स्त्री-पुरुष हाही भेद नाही. जसजसे या कथामृताचे पान करावे, तसतशी त्याची गोडी वाढतच जाते आणि सर्वांचा उद्धार होतो.

काव्यात अनेक रस आहेत, आपणाला फक्त भक्तिरस पाहावयाचा आहे. यामध्ये मुख्य प्रकार असे. शांत, दास्य, वत्सल, सख्य आणि मधुर असे पाच

प्रकार आहेत. कवी ज्या मनोविकाराचें काव्यात वर्णन करतो त्या त्या मनोविकाराची कारणे, कार्ये आणि त्यांचे सहकारी इतर मनोविकार, या तिघांचें कवीने सविस्तर वर्णन योग्य रीतीने केले म्हणजे ते वाचून वाचकांच्या मनातही प्रकारांतराने ते ते मनोविकार जागृत होतात व वाचणाराला जणू कार्य साक्षात् आपण त्याचा अनुभवच घेत आहोत असा भास होऊन जो लोकोत्तर आनंद होतो, त्याला रस असे म्हणतात. ( रसबोध ) सर जॉन लबक यांचा अभिप्राय असा की, " A true poem is a gallery of pictures. " काव्यातील प्रसंग वाचून जे निरनिराळे प्रसंग आठवतात व आनंदमय देखावे दिसतात, त्यामुळें वाचकांच्या मनावर फार उत्कृष्ट परिणाम होतो.

श्रीकृष्ण चरित्रामध्ये राधाभक्तीचे गूढ उकलताना कलकत्ता येथील एका इंग्रजी मासिकात म्हटले आहे की, " जीवात्म्याने ईश्वरविषयक गाढानुराग धरून त्याच्या दर्शनाविषयी उत्कट साधनद्वारा कळकळीचा यत्न करणे, साक्षात्कार होण्याच्या मार्गात अडचणी येऊन निराशा वाटली तरी उद्योग चालू ठेवणे, भगवंताचे क्षणभर दर्शन होऊन वियोग झाला असता दुःसह विरह होणे, निराभिमान वृत्तीने पुन्हा त्याचा शोध करून प्राप्ति झाली असता भगवत्स्वरूपात निरंतर समरस होऊन जाणे, हेच राधाभक्तीचे गूढ रहस्य आहे. " हेच विचार आपण केकावली काव्याला लावले तर ते योग्यच ठरतील.

वरील सर्व दृष्टिकोनांतून मोरोपंतांची केकावली ज्याप्रमाणे एक करुणा स्तोत्र ठरते, तद्वतच देवी केकावलीकडे वाचकांनी पहावे अशी माझी नम्र विनंती आहे. दोघांमध्ये जमीन-अस्मानांचे अंतर आहे. पण वाचकांनी सम दृष्टी ठेवली तर आनंद मात्र तोच मिळावा अशी अपेक्षा आहे. भक्त कवि-मयुराने रामरूपी घनांची वृष्टी होऊन आपण शांत व्हावे म्हणून आपल्या अवगुणांची पश्चातापयुक्त आठवण प्रत्यही करून रामरायाचे स्मरण करून, रोमांचित होऊन कंठ दाटून येऊन, डोळ्यांत अश्रू आणून, हृदय पिळवटून अत्यंत कळकळीने टाहोवर टाहो फोडले आहेत. त्यायोगे त्यांना रामरायाचें दर्शन घडले किंवा नाही हे जरी उल्लेखित नसले, तरी त्यांच्या चित्ताला शांति मात्र खासच लाभलेली आहे. माझ्यापुरते मी निश्चयाने म्हणू शकेन की, मला पूर्णपणे शांति लाभलेली आहे. कारण हे काव्य आळविताना, शब्दांमध्ये उतरविताना अष्टसात्त्विक भाव जागृत होऊन माझे नेत्र नेहमी डबडबलेले आहेत

कै. शंकर श्रीकृष्ण देव हे रामदासी वाङ्मयाचे संशोधक करुणाष्टकासंबंधी काय म्हणतात ते पहा. " वाचताना रडविणारी कविता ते करुणाष्टक होय.

हे देवते ! त्रिविध तापाने मी पुरा पोळून निघालो, काही बाकी उरलो नाही, आता परीक्षा पुरे झाली, किती अंत पाहणार, दया करा, आता करुणा येऊ दे, माझे आई ! मनाला नुसत्या आशेवर कोठवर ताटकळत ठेवू ? काही तरी आता प्रचिती येऊ दे. यापुढे धीर धरवत नाही, धैर्य खचत चालले, जीव नकोसा झाला, आता अंत पाहू नको "

माते, मी काय करू ते साग. मला सेवेला लाव, ब्रह्मसुखाची अधुकशी कल्पना दे. आई, तुझे दर्शन दे. हे जगाच्या माते, तू आता धाव, न धावशील, आजून उपेक्षा करशील तर आजवर मी वृथा भरवसा केला असे म्हणावे लागेल. असा बोलण्याचा प्रसंग मजवर आणू नको माते, तू पतितपावन उद्धारकर्ती आहेस ना ? मग माझी उपेक्षा केलीस, तर उद्धारकर्ती हे नाव तू कसे मिरवशील ! मग तुला जगज्जननी कोण म्हणेल ? माझे मन या संसार सागरात होरपळून निघाले आहे, स्वकीयाचा अतिकटु अनुभव आलेला आहे. त्या सर्वांनी मला अगोदरच वाळीत टाकून दूर गेले आहेत. यामुळे तुझे दयासागराचे दरबारात निशीदिनी लोळतो आहे. तुझी कीर्तिस्तोत्रे जनताजनार्दनाला सदैव ऐकवीत आहे. गातही आहे. आई, लवकर उद्धार कर ग. देवी केकावली वाचताना माझे आजवरचे गुणावगुण आठवून सारखे अश्रू ढाळीत आहे. आई, मी रडत आहे ग. हे माझे रडणे आप्तेष्टासाठी नसून, माझे स्वार्थाचे दैनंदिन व्यवहारासाठी नसून फक्त तुझ्या कृपेसाठी, मिळाल्यास, तुझे साक्षात दर्शनासाठी आणि अतीव सुखमय जीवन समाप्तीसाठी आहे. माझ्या आप्तेष्टासाठी माझे रडून झाले. आता फक्त तुझेसाठीच मला रडावयाचे आहे. कारण या रडण्याने अश्रुपाताने तुझी कृपा होईल, अशी माझी श्रद्धा आहे, अढळ श्रद्धा आहे.

" आशा प्रपंची जव दृढ आहे । चित्तीं कदापी नच तूही राहे ॥ " हे तत्त्व मी जाणत असल्याने तर तो संसारीचा सुगंध जाळून तुला प्रसन्न करण्यासाठी मी या केकावलीतून रडत आहे. देवासाठी रडावयाचे ते एकांतात रडावे म्हणजे देवता सन्मुख येते, असा जो तुझा दंडक आहे तो पाळूनच गेली दहा पधरा वर्षे मी एकांतात एकाकी राहून तुजसाठी हे काव्य निर्माण केले आहे. देविकोश या चार ग्रंथाच्या प्रकाशनाने तुझे स्वरूप विश्वाला दाखविले आहे. हे करुणागर्विणी, आणखी मी काय केले असता मला साक्षात्कारी दर्शन देणार आहेस. आई, लहान पोरे सुद्धा रडल्याविना माता त्याला जवळ घेत नाही, त्याला दुग्धपान देत नाही, त्याचे मुखावरुन आपला मायेचा हात फिरवीत नाही. हे मी पूर्णपणे जाणत असल्याने ही केकावली एकांतात तुझे ध्यानांत मग्न होऊन वाचीत असताना तुझे गुणवर्णने गात असतांना, सहज स्फूर्तीने मी रडतो कारण याच वृत्तीने तुला

-करुणा येऊन तूं मला भेटणार आहेस. पांडुरंगाने नामदेवाला उचलून घेऊन त्याचे रडवे मुखकमल आपल्या शेल्याने पुसले, माझे आई, तसे तू माझे अश्रु आपल्या पदराने पुसणार आहेस ना! पूस ना ग! कदाचित तुझा तो पदर, अरी शत्रु-हननाने रक्तबंबाळ झालेला असून तो उद्धार करणारा असेल तरी तसला मला चालेल. नाही तरी तुझे भेटीसाठी शेवटी रक्तबिंदू, रक्तअश्रु गाळण्यापेक्षा रक्तबंबाळ पदराने माझे शुभअश्रू लाल झालेले काय वाईट आहे ग!

आई, शेवटी इतके निश्चयपूर्वक सांगतो की, तूं उद्धार करीपर्यंत या देवी केकावलीचे सतत पठण करून तुला साक्षात मजसमोर यावयाला लावून, माते-प्रमाणे तुझे स्तनपानाने उद्धार करून घेतल्याविना मी कदापी राहणार नाही. श्रीकृष्णाने पूतना राक्षसीचे स्तनपान करून तिला मुक्ति दिली. मग या तुझ्या भक्ताला स्तनपान देऊन मला मुक्ति दिल्याविना तू कशी राहशील? राहणार नाहीस! राहणार नाहीस! राहणार नाहीस!

चंपाषष्ठी, शके १८९३ — म. कृ. प्रभुदेसाई
९ लो. टिळक नगर, गोरेगांव, मुंबई ६२

## विद्वानांचे अभिप्राय

पंडित श्रीपादशास्त्री किंजवडेकर यांनी देवी केकावलीसंबंधी जसे विचार प्रकट केलेले आहेत, तसेच मयुर केकावलीवरील कांही मान्यवर विद्वानांचे अभिप्राय खाली उद्धृत करीत आहे. ते देण्यात मनीचा अंतरीक हेतू आहे. अनेक विद्वानांनी केकावलीकडे पाहण्याचा निरनिराळा दृष्टिकोन मांडलेला असल्याने त्याचा उपयोग वाचकांना देवी केकावलीचे अंतरंग समजून घेण्यास उपयोगी पडेल, भक्तांना श्रद्धेने पारायण करतांना मार्गदर्शन मिळेल, आणि टीकाकारांना कोणत्या निकषावर त्याचे परीक्षण करावे याचे सुलभ साधन उमगेल. वाचकही यातील काही निकष देवी केकावली काव्य समजून घेण्यास आपण लावू शकलात तर मलाही आनंद वाटणार आहे.

### ( १ ) न्यायमूर्ती माधवराव रानडे यांचा अभिप्राय—

हे काव्य ईश्वरविषयक स्तोत्र आहे व त्याची गणना भक्तिपर ग्रंथामध्ये होणारी आहे. येथे जो ईश्वरविषयक भक्तीच्या उद्गाराचा प्रकार आढळतो तो

एतद्देशीय लोकांखेरीज इतर कोणास समजावयाचा नाही व रुचावयाचा नाही. ईश्वरविषयक भक्तांच्या मनात ज्या वृत्ति स्वभावतः उत्पन्न व्हाव्यात म्हणजे ज्याचे ऐश्वर्य पाहून भयचकित होणे, आपली क्षुद्रता मनात येऊन अत्यंत नम्र होणे, त्यांच्या अगाध महिम्याकडे लक्ष जाऊन आश्चर्याने थक्क होऊन जाणे, आपल्या पापमग्नतेमुळे धाक वाटणे असा प्रकार या काव्यात बिलकूल दृष्टीस पडत नाही. उलट भज्य आणि भजक यांजमधील संबंध यात अत्यंत निकटतेचा आढळतो. कवीने आपल्या *श्रद्धेने परमेश्वरापाशी मागावयाचे जे अत्युत्कृष्ट वरदान त्याची प्रार्थना करून ते* मागितले आहे. याच्या तोडीचे काव्य महाराष्ट्रभाषेत दुसरे नाही.

## ( २ ) निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर—

ज्या कोणास मोरोपंताच्या कवित्वगुणाची थोडक्यात परीक्षा कर्तव्य असेल त्यांनी केकावली काव्य हाती घ्यावे. ते हाती घेतले असता कालिदासाचे गुणसर्वस्व जसे मेघदूतात आढळणारे आहे, जगन्नाथपंडिताच्या वाणीचे रस सर्वस्वी जशी गंगालहरी प्रकट करते, त्याचप्रमाणे केकावली ही प्रस्तुत कवीच्या गुणविषयी निर्णयक होईल. रघुनाथ पंडिताचे नलोपाख्यान व मोरोपंताची केकावली हे ग्रंथ कोणत्याही संस्कृत काव्याशी तोलले असता त्यांना हलके ठरविणारा विरळाच सापडेल.

## ( ३ ) महाराष्ट्रभाषाचित्रमयूर कृष्णाजीपंत आठल्ये—

मयूर केकावलीची रचना, त्यातील कल्पना, यमकाची कर्णमधुर जडणी, रूपके, श्लेष आणि शब्दकोमलता ही अपूर्व साधलेली आहेत प्रसाद तर कायम आर्टिशिअन वेलाप्रमाणे जणू काय फोफावत सुटला आहे. फार काय सांगावे ? कालीदासाची सर्व काव्ये आजमितीस ह्यात नसती व फक्त मेघदूत शिल्लक असते तरी त्याची योग्यता जशी सर्व संस्कृत कवींत अग्रस्थानीच मानली गेली असती, त्याप्रमाणे पंताच्या काव्यांतील इतर जरी उपलब्ध नसते, तरी महाराष्ट्रकवींमध्ये त्यांना केकावलीने अग्रपूजेचा मान दिला असता, यामध्ये तिळमात्र शंका नाही. या काव्यात परमेश्वर आपला प्रत्यक्ष पिता असून आपण त्याचे लाडके व अज्ञानी लेकरू आहो, असे समजून त्याच्याशी प्रपंच सलगी केलेली आहे. मानवाची परमेश्वरस्वरूपविषयीची कल्पना, नाना प्रकारचे अवतार, त्याच्या अघटित लीलांचे महात्म्य याच्या वर्णनाने भक्ति, श्रद्धा कशी तल्लीन होत असते, याचा विचार केला म्हणजे हे काव्य किती अप्रतीम, किती भक्तीरसाने डवरलेले व किती काव्यमय चमत्कृतींनी भरलेले आहे याची तत्क्षणी साक्ष पटते. या काव्याची रचना, शब्दमाधुर्य व कोमलता ही इतकी अपूर्व आहेत की, साम्प्रतच्या कवींनी त्यापुढे हातच टेकावेत.

(४) संतचरित्रकार लक्ष्मणराव पांगारकर—

मयूर केकावली हे काव्य आहे तसे स्तोत्रही आहे; आणि ते प्रेमळ स्तोत्र आहे. पंतांची विद्वत्ता, मुमुक्षुपणा, कवित्व, भक्ति, बुद्धिवैभव, पापभीरुता, आत्मप्रत्यय, निरहंकारता, देवाविषयी लडिवाळपणा, या सर्वांचे अत्यंत मधुर मिश्रण या काव्यांत आहे. हे काव्य सहस्रवार वाचूनही पुन्हा पुन्हा वाचावेसे वाटते. ही परिणतप्रज्ञाची वाणी आहे. प्रतिभा व प्रसाद हे त्यामध्ये परिपूर्ण भरलेले आहेत. हे स्तोत्र देवापुढे बसून देवाला नित्य आळविण्यास फार उपयोगाचे आहे. ते सहस्र वेळा म्हणूनही " प्रतिक्षणी नवीच दे रुचि " या प्रकाराने निरंतर प्रेमानंदाने रंगवणारे आहे.

(५) भारतीयसाम्राज्यकर्ते नारायणराव पावगी—

मयूर केकावली म्हणजे सहज स्फूर्ती, प्रचंड काव्यौघ, रसप्राचुर्य, नैसर्गिक माधुर्य, मनोहर पदलालित्य आणि उत्कृष्ट वाक्सरणी, ही चंद्रबिंबाप्रमाणे आपल्या हृत्कमलावर पूर्ण प्रकाश पाडून त्याला पदोपदी तत्काळ प्रफुल्लित करतील व त्याची सत्यता आपल्या अनुभवास केव्हाही आणून सोडतील.

(६) If the reign of Shiwaji was honoured by the appearance of the greatest Marathi poet from the common orders of the people, the reign of the first Brahaman-Peshwah-who was establihed in his administration in the year 1717-was honoured by the appearance of the greatest Marathi poet from the priestly order-one of his books held in most estimation, is the Mayur Kekawali, the Trumpeting of the Peacock, so called from his own name.

( Dr. Wilson—( Molesworth's Marathi Dictionary preface. )

---

सन १९५० साली अंबाबाई देवस्थान गोरेगांव ( मुंबई ) येथे शतचंडी यज्ञ, मंदिर विश्वस्तांनी साजरा केला, त्या वेळी मीमांसातीर्थ पंडित श्रीपादशास्त्री किंजवडेकर यांची प्रथम भेट होऊन, सहवासाने एकमेकांची मने एकमेकाला समजली. या वेळी देवीकोशाचे बरेचसे लिखाण तयार झाले होते, ते शास्त्रीबुवांनी पाहून, प्रकरणवारी मांडणी करून देऊन पुनर्लिखाणासाठी उपयुक्त सूचना दिल्या. त्याच वेळी त्यातील देवीपर कविता पाहून त्यांनी प्रेमाने व कौतुकाने ' कविराज ' असा माझा उल्लेख करण्यास सुरवात केली. त्यांनी त्या वेळी अनाहुतपणे केलेला

गौरव सार्थ करण्यासाठीच या देवी केकावली काव्यावर जास्त मेहनत घेऊन, ती तयार झाल्यावर ( पृ. ३६३-३७६ पहा ), त्यांच्या व इतर मित्रांच्या आग्रहावरून ही केकावली निराळी पुस्तक रूपाने आहे.

खरे म्हणजे देवीकोश ग्रंथाचा जन्मच या प्रथम तयार केलेल्या ७०० श्लोकांतून झालेला आहे, हे कोणास सांगूनही खरे वाटणार नाही, पण हे निर्विवाद सत्य आहे. त्यातील काव्याचा बराचसा भाग देवीकोशात समाविष्ट झालेला असून हा निराळा छापला जात आहे. पंडीत श्रीपादशास्त्रीजींनी ग्रंथनिर्मितीस मांडणी करून दिली, दुसऱ्या खंडास विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहून दिली आणि सांप्रत प्रकृती बरी नसताही माझ्यावरील प्रेमामुळे व आग्रहामुळे देवी केकावली पुस्तिकेला प्रस्तावनाही दिली, या सर्व मुक्त सहकार्याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी आहे. हे नमूद करणे आवश्यक आहे.



शातादुर्गा, कवळे-गोवा (२) ३२१-३२२

श्रीशांता विजयप्रदा विजयसे दुर्गा ह्रदां मी भजे ।
केले शांत हरी-हरां समरिं ते क्रोधासि जी वारिजें ॥

शांतेच्या पदिं मी सदा नमुनिया घाली नमस्कार हा ।
शांता सेवक हा तुझा बहु रमे पादांबुजी नम्र हा ॥

— लेखक



• गरा भइसाटिने भरितसे भू देवता भाऊका । भाळीं भास्कर भर्जनास भरली भू सेवके भक्तिता ॥
भाग्या, भाविक भक्तिभाव भरणा भाग्योदये ये घरा । भू देना, भवभीतिला भिरकना भांडार भावे भरा ॥ –लेखक



सन १९७० साली गच्चीवरील प्रयोगादाखल केलेल्या भातशेताची पाहणी देवीकोशाचे सपादक वरीत आहेत

# आदिशक्तीचे विश्वस्वरूप

अर्थात्

# देवीकोश

## खंड ४ था

*

## पश्चिम गोलार्धातील देवतांचे स्वरूप

## भाग १ ला

### भारतीय संस्कृतीची श्रेष्ठता

" ज्यामध्ये ऐहिक वैभवाची, समृद्धीची, साधनसामुग्रीची व संपत्तीची विपुलता आहे, ज्याचे आत्मिक व अध्यात्मिक सामर्थ्य केवळ अजोड आहे, असे सबंध जगातील एकमेव राष्ट्र म्हणजे भारत आहे. मानवाच्या उत्पत्तीपासून तो आजपर्यंत मानवी जीवनाचे व विविध समस्यांचे सखोल चिंतन भारताने केले आहे. आम्हा युरोपियन लोकांना जर कोणाच्या वाङ्मयाने स्फूर्ति दिलेली असेल तर ती भारतीय वाङ्मयाने दिली आहे. याच वाङ्मयाने युरोपिअनांचे जीवन परिपूर्णतेने, परिपक्वतेकडे नि संपन्नतेकडे नेता येईल. आमच्या ज्ञानाच्या कक्षा, आमचे जीवन सर्वथैव जागतिक बनवावयाचे असेल, ऐहिक जीवन पारलौकिकांतही अमर करावयाचे असेल, तर आम्हास भारतीय वाङ्मयाचीच कास धरावी लागेल "

प्रसिद्ध जर्मन पंडित मॅक्स मुल्लर (स. १८२३-१९००), ज्याला त्याच्या भारतीय संस्कृतच्या ज्ञानाबद्दल 'वेदव्यास' म्हणत असत, त्याने ' What Can India Teach Us ' या ग्रंथामध्ये वरील प्रकारचे उद्गार काढलेले आहेत आणि ते प्राचीन भारतीयांची थोरवी यथार्थपणे वर्णन करणारे असेच आहेत. आपली संस्कृति किती श्रेष्ठ दर्जाची आहे, याचे ज्ञान वरील उताऱ्यावरून सांप्रतच्या तरुण पिढीला व्हावे यासाठीच हा एक उतारा उद्धृत केलेला आहे.

# आदिशक्तीचे विश्वस्वरूप

अर्थात्

# देवीकोश

## खंड ४ था

*

## पश्चिम गोलार्धातील देवतांचे स्वरूप

### भाग १ ला

भारतीय संस्कृतीची श्रेष्ठता

" ज्यामध्ये ऐहिक वैभवाची, समृद्धीची, साधनसामुग्रीची व संपत्तीची विपुलता आहे, ज्याचे आत्मिक व अध्यात्मिक सामर्थ्य केवळ अजोड आहे, असे सबंध जगातील एकमेव राष्ट्र म्हणजे भारत आहे. मानवाच्या उत्पत्तीपासून तो आजपर्यंत मानवी जीवनाचे व विविध समस्यांचे सखोल चिंतन भारताने केले आहे. आम्हा युरोपियन लोकांना जर कोणाच्या वाङ्मयाने स्फूर्ति दिलेली असेल तर ती भारतीय वाङ्मयाने दिली आहे. याच वाङ्मयाने युरोपिअनांचे जीवन परिपूर्णतेने, परिपक्वतेकडे नि संपन्नतेकडे नेता येईल. आमच्या ज्ञानाच्या कक्षा, आमचे जीवन सर्वथैव जागतिक बनवावयाचे असेल, ऐहिक जीवन पारलौकिकातही अमर करावयाचे असेल, तर आम्हास भारतीय वाङ्मयाचीच कास धरावी लागेल "

प्रसिद्ध जर्मन पंडित मॅक्स मुल्लर (स. १८२३–१९००), ज्याला त्याच्या भारतीय संस्कृतच्या ज्ञानाबद्दल 'वेदव्यास' म्हणत असत, त्याने 'What Can India Teach Us' या ग्रंथामध्ये वरील प्रकारचे उद्गार काढलेले आहेत आणि ते प्राचीन भारतीयांची थोरवी यथार्थपणे वर्णन करणारे असेच आहेत. आपली संस्कृति किती श्रेष्ठ दर्जाची आहे, याचे भान वरील उताऱ्यावरून सांप्रतच्या तरुण पिढीला व्हावे यासाठीच हा एक उतारा उद्धृत केलेला आहे.

प्रथम नांव कामी-नो मिची असे होते. परंतु चायनीजमध्ये त्यांचे भाषांतर शिन-टाओ = शिंटो असे झाले आहे आणि तेच रूढ झालेले आहे.

या पंथातील देवतांची संख्या १०० पर्यंत दिलेली असून मानव ज्याप्रमाणे संसारी जीवन व्यतीत करतो, त्याप्रमाणेच त्याचाही जीवनक्रम चालत असतो. तेथील राजा मिकॅडो हा सूर्याचा अंश असल्याने त्याचा मानमरातब देवताप्रमाणे ठेवतात.

## टाओइझम

चीनमध्ये प्रामुख्याने तीन धर्मग्रंथ चालत होते. पैकी टाओइझम हा पंथ लाओत्से यांनी स्थापन केला आहे. हा धर्मवेत्ता सनपूर्व ६०४ ते ५१७ पर्यंत होऊन गेला. भारतामध्ये व्यासांनी ज्याप्रमाणे पूर्वीच्या धर्मतत्त्वाचे सूत्रीकरण केले, त्याप्रमाणे यांनेही पूर्वीच्या धर्मतत्वाचे सूत्रीकरण करून पंथाची निर्मिति केलेली दिसून येते.

टाओ ( Tao ) याचा अर्थ इतकाच की, ब्रह्मज्ञानी. अध्यात्मिक जीवन जगून परमेश्वराप्रत पोहोचणे. दुष्ट कृत्याची भरपाई माणसांनी चांगल्या कृत्याने करावी असे तो सांगत असे. त्याच्या जीवनात त्याला फारसे अनुयायी मिळाले नाहीत. पण इसवी सनाच्या सुरवातीचे शतकात त्याचा मोठेपणा लोकांच्या ध्यानी येऊन त्याला देवपण प्राप्त झाले. त्यासंबंधी अनेक कथा प्रसारात आल्या आणि हे परमात्म तत्त्व आपल्या मातेच्या उदरात ७२ वर्षे होते व नंतर जन्मास आले. इतके मानण्यापर्यंत अनुयायांची मजल गेली. सनपूर्व २१२ साली सम्राट शी-वांग-टी याने हा धर्मपंथ स्वीकारून त्याचा जोरात प्रचार केला. कॉन्फुशिअस पंथाच्या धर्मग्रंथाची होळी करण्याइतपत त्यांची मजल गेलेली होती.

त्याचे धर्मग्रंथ म्हणजे टाओ-ते-किंग ज्यामध्ये सर्व धर्मतत्त्वे निवेदन केलेली आहेत, आणि दुसरा याग-झीची सूत्रे ज्यामध्ये लाओत्सेच्या अनुयायांची निरनिराळी भाष्ये संग्रहित केलेली आहेत. याव्यतिरिक्त वाई-शाग काग-यिंग-पिअन नावाचा आणखी एक ग्रंथ आहे. यामध्ये रानटी काळातील क्रूर व्यवहाराचे वर्णन असल्याने सुधारणावादी त्याकडे विशेष लक्ष देत नाहीत. सांप्रत काळीचा टाओइझम मात्र पूर्वीच्या तत्त्वाचा राहिलेला नाही. पूर्वीच्या धर्मतत्त्वाची जागा अनेक देवमत, राक्षसी वृत्ति, जादुटोणा, व गूढज्ञान यांनी घेतलेली दिसते. या पंथाचे अनुयायी ५ कोटी आहेत.

## कान्फुशिअन

लाओत्सेच्या नंतर पन्नास वर्षांनी हा धर्मवेत्ता जन्मास आला असून दोघांच्या गाठीभेटी झालेल्या होत्या. त्याचा जन्मकाळ सनपूर्व ५५१ ते ४७८

असा समजला जातो. सनपूर्व २४०० वर्षे चीन देशात काही धर्मसंस्कृति होती आणि ती अनेक शतके तशीच चालतही होती. तिचे सूत्रीकरण कान्फुशिअस व लाओत्से यानी केलेले दिसते आणि याजसाठीच धर्मपथाना ही नावे आली आहेत. राज्याचा मुख्य न्यायाधीश म्हणून सेवानिवृत्त झाल्यावर त्याने धर्मग्रंथ रचनेकडे आणि प्रसाराकडे लक्ष दिले व वयाचे ७२ वर्षी तो इहलोक सोडून गेला. त्याच्या पश्चात अनुयायानी या पंथाचा जोरदार प्रचार केला. आजमितीस या पंथाची सुमारे तीस कोटी संख्या, चीन, मलाया वगैरे भागात पसरलेली असावी.

शू किंग ( इतिहास ), शीह किंग ( श्लोक ), ली-की ( धार्मिक बंधने ), आय किंग ( धार्मिक बदल ) इ० दहा धर्मग्रंथ असून लुन-यु हा कान्फुशिअसचा वेचे असणारा ग्रथ सर्वसाधारणपणे अधिक लोकप्रिय आहे. कारण त्यामध्ये त्याचे अनुभवाचे बोल एकनित केलेले आहेत.

आपण काही धार्मिक संस्कृतींचा इतिहास वर पाहिला आहे. सर्व पंथामध्ये उत्तम कर्तव्याचा ऊहापोह केलेला असून बहुधा सर्वांची शिकवण समान असल्याचे दिसून येते. धर्मश्रद्धा, मानवाची कर्तव्ये, मानव कर्मे, आज्ञापालन, पाप, पुण्य, पापनिवेदन ( पश्चाताप ), राग, द्वेष, दान, सहाय्य, न्याय, प्रेम, बंधुत्व, क्षमा, कुटुंबसंस्था, सौख्य, दासता, धैर्य, युद्ध, संपत्ति, उत्सुकता, चिंतन, मार्गदर्शन, भावीजीवन इ० अनेक विषयावर सर्व पंथांचे विवरण समान आहे, असेच आपणाला दिसून येईल. उदाहरणादाखल यातील काही विषय घेऊन अधिक स्पष्टीकरण करतो.

## धर्मश्रद्धा

भारतीय—श्रद्धा ही शहाणपणाकडे नेणारी वाट आहे. मानवाच्या अंतःकरणात जर तळमळ असेल तर ही श्रद्धा त्याला आपोआप प्राप्त होईल. ज्याची अनन्य श्रद्धा आहे, तोच परमेश्वराचा लाडका होय.

बौद्ध—सद्गुणी जीवनासाठी धर्मश्रद्धा ही आवश्यक आहे. श्रद्धेचे फळ त्याला मिळाल्याविना राहणार नाही. श्रद्धेमुळे मानवाचे भाग्य उजाळते.

जैन—श्रद्धावान माणसाने अचुक मार्ग आक्रमण केलेला असतो, त्याने आपली श्रद्धा सदासर्वकाळ जागृत ठेवावी.

झोरोस्ट्रिअन—श्रद्धावान माणसाला उत्तम जीवन आणि अमरत्व प्राप्त होते. सद्धाण्या लोकांना धर्म श्रद्धावानांची सर्व पापे नाहीशी करील.

इस्लाम—मानवाने परमेश्वराच्या ठायी श्रद्धा ठेवल्यास तो सदैव त्याचा पाठीराखा होईल. श्रद्धावान भक्तच परमेश्वरी कृपेची इच्छा करतो.

इसाई—श्रद्धा ही आवश्यक आहे, पण ती कर्मानुसारिणी असावी. जो पूर्ण श्रद्धेने मागतो त्याला मिळते. बुद्धीला समज येण्यासाठी श्रद्धेची जरुरी आहे.

जुडाइझम—परमात्मा हा विश्वासू असून, श्रद्धावानाचे रक्षण करतो. श्रद्धावान भक्त परमेश्वराकडून उत्तम फळाची इच्छा करू शकतो.

शिंटो—श्रद्धा ही मानवी जीवनाला आधारभूत आहे. किंचित संशयही मानवाला, त्याच्या मूळ स्वभावापासून दूर फेकू शकतो.

टाओइझम—अपूर्ण श्रद्धा ही श्रद्धाच होऊ शकत नाही. परमात्मा श्रद्धावानाची भरपाई पूर्णत्वाने करील, तर श्रद्धाहीन माणसाची भरपाई खोटेपणानेच पदरात घालील.

कन्फुशिअन—अश्रद्धावान माणूस केव्हाही विजयी होणार नाही. यासाठी त्याने सर्वकाल श्रद्धावान राहिले पाहिजे. अक्षय्य सुखाचे ठिकाण अनेक श्रद्धाची अपेक्षा करीत असले तरी परमेश्वर श्रद्धावान माणसाची पाठपुरवणी करीत असतो.

विश्वबंधुत्व

भारतीय—सूज्ञ मनुष्य शत्रु-मित्र, आपला-परका यामध्ये कोणताही आपपरभाव मानीत नाही, सर्वांना समान वागणूक देतो. जो खरा मित्र आहे तो सर्वकाळ तुमच्या बाजूलाच राहील.

बौद्ध—मित्र हा एक मौलिक खजिना आहे, म्हणून त्याला बंधूप्रमाणे कवटाळावे. मानवानी उत्तम सद्गुणी माणसेच आपले मित्र करावेत, म्हणजे ते बंधू होतील.

जैन—सर्वांना समान वागणूक द्या. सर्वांना सर्वकाळ आपले बंधू माना. मानवाप्रमाणेच पशूंना वागणूक द्या, तेही तुमच्या बंधूप्रमाणे वागतील.

झोरोस्ट्रिअन—प्रत्येकाचा मित्र हा पवित्र माणूस असावा. पवित्र बांधव सर्वांना पवित्र करून सोडील.

इस्लाम—सर्व मानवजात ही एक कुटुंबसंस्था असून सर्व एकच होत. सर्व मानव हे एकमेकांचे बंधू असल्याने, त्यांनी त्याप्रमाणे वर्तन करावे. जे या रीतीचे वर्तन ठेवतात, त्यावर परमात्मा प्रीति करतो.

इसाई—सर्व मानवजात हे एकमेकांचे बंधू होत. ज्याप्रमाणे परमेश्वराजवळ आपण वागतो, तसेच इतर बांधवांबरोबर वागावे. एखाद्या बंधूचा दुस्वपणा करणे हे पाप आहे. सर्वत्र विश्वबंधुत्वाचे नाते जोडावे.

जुडाइझम—परमेश्वराने सर्व मानवाना बंधूप्रमाणे निर्माण केले असून त्याप्रमाणे त्यानी वागावे. बंधुभावाने वागणे हे त्याच्या हिताचेच आहे. या रीतीने वागले असता, परमेश्वर कृपा करून त्याची भरभराट करील.

शिंटो—अंतरिक्ष हा सर्वांचा पिता आणि भूमाता ही सर्वांची माता होय. यासाठी सर्व मानव हे बंधू असून, त्याप्रमाणे त्यानी वागावे. असे वर्तन केल्यास देशद्रोह आणि दुःख यांपासून दूर राहील.

टाओइझम—खरा मित्र जोडण्यासाठी बंधुत्व आणि दया या गुणाची नितांत जरुरी आहे. बाजारात पदार्थांची विक्री करताना मानवाची जी वृत्ति असते, ती मित्र जोडताना चांगल्या माणसाची असू नये.

कॉन्फुशिअन—मित्रत्व, बंधुत्व हे प्रमुख सद्गुण आहेत. यांभोवती अनेकाना जमवावे आणि बंधू म्हणून मानावे. सुज्ञ माणसे जे बंधुप्रेम देऊ शकतील, त्यानाच जवळ करतील.

## मरणानंतर जीवन

भारतीय—शरीरातील आत्मा मरणसमयी शरीराचा नाश करून दुसऱ्या नवीन सुंदर शरीरात पदार्पण करतो. पूर्णत्वास पोहोचलेला ज्ञानी अमर होतो. मरणानंतर उत्तम सत्कृत्ये तेवढी अमरत्व पावतात.

बौद्ध—सद्गुणी माणसाना मरणानंतर स्वर्ग हा आनंददायक व परम सुख देणारा आहे. जो प्रामाणिकपणे आणि सुज्ञपणाने भूमीतलावर वागला, त्याला स्वर्गात त्याचे फळ मिळते. चांगल्या माणसाना पुन्हा येणाऱ्या जीवनात सुख मिळेल तर, दुष्ट माणसांना शाश्वत जीवनक्रम मिळणार नाही.

जैन—मरणानंतर पुनर्जन्म प्राप्त होईल, त्यामध्ये दुष्ट माणूस नरकात जाईल तर सद्गुणी स्वर्गाला जाईल व तेथे पूर्णत्वास पोहोचेल.

झोरोस्ट्रिअन—पुनर्जन्मानंतर सद्गुणी माणूस सुखाने कालक्रमणा करील, तर दुष्ट माणूस पराकाष्ठेच्या यातना भोगील. परमात्मा दुसऱ्या जगात राहतो आणि तेथे त्याच्या अनन्यभक्ताचे स्वागत करतो.

इस्लाम—परमेश्वराच्या सेवेमध्ये ज्यानी आपले आयुष्य व्यतीत केले, अशा गुणवान माणसाना शाश्वत सुखाचे बक्षीस मिळते. तो दयाळू परमात्मा, मरणानंतर अशा माणसाना आपल्याभोवती जमवितो आणि नंदनवनाचे सुख त्याना प्राप्त करून देतो.

इसाई—मरणानंतर उत्तम लोकासाठी परमेश्वराने वसतीस्थान निर्माण करून ठेवलेले आहे. जो परमेश्वराच्या आज्ञा पाळतो तो चिरकाल जगतो. स्वर्ग

ही सुखाची जागा असून नरक ही शिक्षेची जागा आहे. मरणानंतर त्यांच्या बऱ्यावाईट वागणुकीचा न्याय होईल व या जागा मिळतील.

जुडाइझम—मरणानंतर जड शरीर मातीत मिसळेल आणि आत्मा अमरत्वाचे ठिकाणी जाईल. ज्यांनी उत्तम आचरण केले आहे, त्यांना परमात्मा शाश्वत सुखाचे बक्षीस देईल आणि आत्मा त्यांच्याच संगतीत कायमचा राहील, कारण तो त्याचाच अंश आहे.

शीखधर्म—आचरणशील मनुष्य मरतो, तेव्हा तो आपल्या शाश्वत घराकडे जातो व तेथे शाश्वतपणे राहतो. स्वर्गामध्ये सदैव संतांची संगति त्याला प्राप्त होत असते.

टाओइझम—मानवाचे मरण म्हणजे आत्म्याचे आपल्या पूर्वीच्या घराकडे प्रयाण होय. गुणी आणि शहाणी माणसे मरणानंतर दुःख भोगणार नाहीत.

याप्रमाणे वर उल्लेखिलेल्या अनेक विषयांवर समान विचार दाखविता येतील, पण विस्तारभयास्तव मी त्याचे विवरण केलेले नाही. सांप्रतच्या प्रमुख पंथियांचे विचार सर्वत्र सारखे कसे आहेत, हे स्पष्ट करण्यास वरील तीन उदाहरणे पुरेशी व्हावीत.

( Sacred Writings of the World's Great Religions by S. E. Frost, published by New Home Library, Philadelphia, America, 1947 Edition, या ग्रंथाच्या आधारे वरील विवेचन केलेले आहे. )

धार्मिक वाङ्मयातील काही चमत्कार

आपला धर्मच इतरांपेक्षा श्रेष्ठ असून त्याचे श्रेष्ठत्व भक्तांवर व इतर धर्मीयांवर बिंबविताना बहुतेक सर्व धार्मिक पंथियानी अद्भुत घटनांची मालिका धर्मग्रंथातून विणलेली आहे. पण त्या घटना वाचीत असताना त्यातील फोलपणा सर्वसाधारण माणसाच्याही ध्यानात येतो. आपण जैन धर्मातील काही उदाहरणे पाहू म्हणजे या विधानाची सत्यता पटेल.

( १ ) ऋषभदेव या प्रथम तीर्थंकरांपासून, त्यांची उंची, जीवनमान दिलेले असून उंची ७०० फुटापासून, शेवटचा महावीर याची उंची ११ फुटांपर्यंत व वयोमान ७ कोटी वर्षांपासून ७२ वर्षांपर्यंत दिलेली आहे पण हे अशक्य वाटते.

( २ ) नागकेतानें एक ग्रामविस्ताराएवढा पर्वत एका अंगुलीवर उचलला.

( ३ ) महावीराने पायाचे अंगठ्याने भूमि दाबली असता शेषनाग भीतीने थरथर कापू लागला.

( ४ ) एका सर्पाने महावीराला दंश केल्यावर त्याचे शरीरातून दूध गळू लागले, तरीही हा सर्प महावीराच्या संगतीमुळे ८ व्या स्वर्गात गेला.

( ५ ) एका लहान भांड्यात उंटाला घालण्यात आले.

( ६ ) माणसाने अंगावरील मळ काढू नये अगर अंग खाजवू नये.

( ७ ) कोशा नावाच्या नृत्यांगनेने एका थाळीत मोहरीची रास करून, त्यामध्ये एक सुई उभी केली आणि त्यावर नाचली, तरी तिला रक्तस्राव झाला नाही.

( कल्पभाष्य आणि विवेकसार या ग्रंथातील हे उतारे आहेत )

इसाई पुराणात ( बायबल ) या रीतीचे चमत्कार वर्णिले आहेत.

( १ ) एक महारोगी येशूजवळ येऊन रोग निवारणाची विनंती करताच येशूने त्याला हाताचा स्पर्श केला व त्वरित तो रोगमुक्त झाला. ( मॅथ्यू, ७-२-३ )

( २ ) थडग्यातून दोन जीव बाहेर आले आणि मुक्तीसाठी विनंती केली. मुक्ति दिली असे म्हणताच ते डुकराचे कळपात शिरले आणि गडबड उडाल्याने सर्व कळप त्यांचेसह जलाशयात नाश पावला. ( मॅथ्यू, ८-२८, २९-३१ )

( ३ ) अर्धांगवायूच्या आजाराने पछाडलेला रोगी डोलीतून येशूकडे आणला आणि त्याने पश्चात्ताप व्यक्त करताच तो बरा झाला. ( मॅथ्यू, ९-२-१३ )

भारतीय वाङ्मयातील काही चमत्कार

( १ ) याज्ञवल्क्याने जनकाचे पलंगाची सुकी लाकडे जिवंत करून त्याला पाने, फुले आणली.

( २ ) जनकराजाने सुवर्णाच्या गायी याज्ञवल्क्य ऋषीला दान केल्यावर त्यांनी त्या जिवंत करून आश्रमाकडे चालत नेल्या.

( ३ ) नारदाचा जन्म ब्रह्मदेवाचे मांडीतून झाला व म्हणून तो त्याचा मानसपुत्र झाला ( भागवत पुराण )

( ४ ) संत ज्ञानदेवाने निर्जीव भिंत चालवून ते चांगदेवाला सामोरे गेले.

( ५ ) ज्ञानदेवाने रेड्यामुखी वेद वदविले. इ०

या चमत्कारामध्ये कूट प्रश्न असा उत्पन्न होतो की, ( १ ) पाने-फुले

तशीच कायम राहिली काय ? ( ३ ) गाईचा विस्तार वाढला काय ? ( ४ ) भिंत कायम सजीव राहिली काय ? ( ५ ) रेड्याने पुन्हा वेदपारायण केले काय ? या सर्वांना उत्तर नाही हेच येईल. याचे कारण असे की, चमत्कार दोन प्रकारे करता येतात. एक सिद्धीच्या सामर्थ्यावर आणि दुसरा ब्रह्मविद्येच्या सामर्थ्यावर. भैरवी अगर स्मशानी विद्येच्या बळावर सिद्धि प्राप्त होतात. ही सिद्धि प्राप्त झाली म्हणजे तो मुंगीपासून ब्रह्माविष्णूपर्यंत सर्वांचे दर्शन घडवू शकेल, परंतु या भेटीचा काळ फक्त पावणे चार घटिकाच असेल, त्यानंतर तो चमत्कार संपेल. पण दुसरा चमत्कार म्हणजे ब्रह्मविद्येच्या जोरावर केलेला असेल, तर तो कायम राहील. देवदानवांनी केलेले अनेक चमत्कार हे साधन विद्येमुळे झालेले आहेत.

चमत्कार का केले जातात ? असा प्रश्न नेहमी उपस्थित केला जातो. याचे उत्तर दोन्ही तऱ्हेने देता येईल. ( १ ) गोमुखींत हात घालून नित्य जपजाप्य करणाऱ्या या महात्म्यानी चमत्कार केले, आपल्या शक्तीचा प्रभाव दाखविला, म्हणजे इतराना भीती वाटून ते नम्रभावाने त्या महात्म्याबरोबर वागतील. ( २ ) सर्वसाधारण जनता चमत्कार करणाऱ्या माणसावर विश्वास लवकर ठेवते. श्रद्धा असते पण एरव्ही जवळ न येणारी हजारो माणसे महात्म्याजवळ आली म्हणजे उपदेश करून त्याना सन्मार्गाला लावणे सुलभ होते.

( अनादि-स्वयं-सिद्ध-वस्तु-विचार, ले. वि ना. पावसकर )

## राजा हा देवाचा अंश होय

ना विष्णुः पृथ्वीपतिः । ( देवी भागवत, ६–१०–२३ )
विश्वाधिकः केशवरूपभूयः । ( पद्म-भूमि, ४२–२२ )
सर्वदेवमयो नृपः ( भागवत, ७–११–२० )
साधु सुजाननृपाला । ईस अंस भव परम कृपाला ।
( तुलसीमानस, १–२७–४ )

सनातन आर्यांची ही भावना आहे की, राजामध्ये विष्णूचा अंश आहे आणि त्याच्या माध्यमाने प्रत्यक्ष परमेश्वरच राज्य करीत असतो. ही भावना इतर देशातही दिसून येते. यासाठी देशात दुष्काळ पडला, वादळामुळे नुकसान झाले, भूकंप झाले अगर रोगराईच्या साथीमुळे अनेक माणसे मृत्युमुखी पडली इ० इ० गोष्टींची उत्पत्ति झाली की, त्याचा दोष राजाच्या गैरवर्तणुकीस लावण्यात येऊन त्याला राज्यपदावरून दूर करीत, अगर वेळ-प्रसंगी फासावरही लटकावीत. यासाठी राजाचे वर्तन अगदी कठोर न्यायनीतीचे, धार्मिक आचार-विचारांचे व कोणताही क्षोभ उत्पन्न करणारे नसावे, अशी दक्षता त्याला बाळगावी लागे. काही देशात

तर असे मानीत की, राजसिंहासन हा सर्व घडामोडींचा मध्यबिंदू आहे. तेथून निघणाऱ्या बऱ्या-वाईट कंपलहरी भूतलाची दयनीय अवस्था करून टाकतात. इतकेच नव्हे, तर राजाचे पाहणे, हातवारे एखाद्या विनिश्चित दिशेकडे जाणे म्हणजे त्या दिशेकडे संकटे निर्माण करणारे होत. वरील गोष्टींचा उलगडा करण्यासाठी आपण जपानमधील मिकाडो राजाची हकीगत पाहू.

जाणकार इतिहासकाराचे असे मत आहे की, सुमारे १४०० वर्षे तरी हे राजसिंहासन अखंडपणे टिकून आहे. हा सूर्यवंशीय राजा म्हणून प्रसिद्ध आहे. यावरून एक अनुमान काढता येते की, भारतीय आर्य पूर्वेकडे संस्कृतिप्रसरणार्थ ज्या वेळी गेले, त्यापैकी कोणी सूर्यवंशीय राजाने ही गादी स्थापन केलेली असावी. या राजाची सत्ता सर्व विश्वावर चालते, देशावर चालते अशी त्याची भावना आहे. यासाठी वर्षातून एक महिना त्यांनी असे ठरविले आहे की, मंदिरात न जाता राजाचे दर्शन घ्यावयाचे आणि सर्व विधि त्याला अर्पण करावयाचे. सन ६४६ साली काढलेल्या एका फर्मानात असे वर्णन आढळते, 'विश्वाचे नियंत्रण करणारा राजा ही साक्षात् देवता होय.' सुमारे दोनशे वर्षांपूर्वी या राजाचे दैनंदिन आचरणासंबंधी जे लिहून ठेवले गेले आहे, त्यातील काही बोधप्रद भाग असा आहे--

'राजसिंहासनावर बसण्यासाठी मिकाडो राजा हा अतिशय पवित्र आणि पूजनीय आहे. प्रजेची ही भावना कायम राखण्यासाठी राजाला अतिशय काटेकोर वर्तन ठेवावे लागते. राजाने जमिनीला कधीही पाय लावावयाचे नाहीत. यासाठी एका जागेवरून दुसरीकडे जावयाचे असल्यास त्याला इतरांनी आपल्या खांद्यावरून नेले पाहिजे. हा स्वत सूर्यवंशी असल्याने आकाशातील सूर्यकिरणाचाही स्पर्श त्याला होऊ नये. देवाचे सर्वांग जसे पवित्र असते, तसे ते या राजाचेही असल्याने व त्याला दुखापत होऊ नये यासाठी, त्याची नखे काढावयाची नाहीत अगर मस्तकावरील केस (दाढी) कापायचे नाहीत. राजाचे शरीर साफसूफ करावयाचे तर रात्री राजे झोपी गेले म्हणजे इतरांनी त्याचे अंगाची साफसुफी करावी आणि घाण बाहेर टाकावी. तसे केल्याने या गोष्टी राजाच्या नकळत घडत असल्याने राजाला कोणताही दोष लागत नाही. दररोज सकाळी काही तास त्याला सिंहासनावर बसावे लागे. अंगावर राजाची वस्त्रे, डोक्यावर राजमुकुट असे. पण सिंहासनावर असताना देवमूर्तीप्रमाणे निश्चळ बसावे लागे. हात, पाय, डोळे इ० हालचाल बिलकूल होता नये कारण त्याची दृष्टि एखाद्या दिशेकडे गेल्यास, अंगुलीनिर्देश झाल्यास, त्या दिशेकडे संकटे उत्पन्न होतील अशी त्यांची भावना होती. सांप्रत नुसता राजमुकुटच सिंहासनावर ठेवतात. कारण तो स्थितप्रज्ञ असल्याने, राजाने तशा अवस्थेत बसणे काय अगर नुसता मुकुट तेथे असणे

काय, एकच कार्य घडते, यामुळे आता मुकुट ठेवण्याचा प्रघात सुरू झाला असावा. काही खास प्रसंगी मात्र राजेसाहेब बसतात.

राजाचे भोजन नित्य नवीन पात्रांतून दिले पाहिजे आणि ती पात्रे साधीसुधी मातीची असली पाहिजेत. जेवण झाले म्हणजे ती फेकून देता आली पाहिजेत. कारण ती जर तशीच बाहेर टाकली गेली आणि त्यातील उरलेले अन्न अगर उष्टे भांडे कोणी वापरले तर खाणाराचे तोंड सुजेल, घशाला रोग उत्पन्न होतील.' याप्रकारे अनेक समजुती प्रचलित होत्या.

मात्र राजाची कृति अशी होती असे नव्हे, इतरत्रही असे पुरावे मिळतात. आफ्रिकेतील दक्षिण गिनी प्रदेशात केप पॅड्रनजवळ कुकुलू नावाचा राजा जंगलात रहात असे. त्याला एक आरामखुर्चीवर बसवून ठेवीत. तेथूनच त्याने सर्व व्यवहार करावयाचे. झोपायचे तिथेच, खावयाचे तिथेच. त्याने घर सोडावयाचे नाही, अगर कोणत्याही स्त्रीला स्पर्श करावयाचा नाही. समजूत अशी की, राजा झोपण्यासाठी आडवा झाला, म्हणजे देवच झोपला. मग वारा वाहणार नाही, जहाजे चालणार नाहीत वायूचे, हवेचे नियंत्रण तो करीत असल्याने, त्याने गादीवर राहून चालणार नाही. इजिप्त देशातील राजाची देवाप्रमाणे पूजा होई व मानमरातब असे. त्याच्या आयुष्याची दिनचर्या ठरलेली असे. त्याबाहेर त्याने वागावयाचे नाही. त्याने झोपावे केव्हा, उठावे केव्हा, दरबारी काम करावे केव्हा, राणीसरकारबरोबर फिरावे केव्हा, रहावे केव्हा या सर्वांचे नियम असत. सारांश राजा जरी देव मानीत तरी त्यावर अनेक बंधने मानव घालीत असत व त्यांचे वागणुकीचे नियम करीत, असे त्याचे नाते होते.

## ईश्वरस्वरूप राजाचे मरण

देवीकोश, भाग ३ मध्ये प्रथम प्रकरणात हा विचार मांडलेला आहे की, 'देवताना मरण आहे का? असेल तर कोणत्या प्रकाराने? इ०' त्याचेच हे पुढील विवरण समजणे युक्त होईल. राजा हा ईश्वरस्वरूप आहे म्हणजे तो ईश्वर आहे आणि त्यालाही मरण आहे, म्हणजे ईश्वराला मरण आहे, हा विचार अनेक देशात प्रचलित होता. त्याची काही ठळक उदाहरणे येथे आपणास पाहावयाची आहेत.

पाश्चात्य संस्कृतीमधील झेऊस हा प्रमुख देव. त्याची कबर क्रीट बेटावर इसवी सनाच्या सुरवातीपर्यंत दाखविली जात असे. डायोनिसस हा प्रमुख देव. त्याचे शरीर डेल्फी येथे अपोलो देवाच्या पुतळ्याजवळ पुरलेले असून थडग्यावर लेख होता की, 'Here lies Dionysus, the son of Semele' या ठिकाणी सिमिली पुत्र डायोनिसस विसावा घेत आहे. अपोलो देव हा सुद्धा डेल्फी येथे पुरण्यात आला होता.

या सर्वाचा निष्कर्ष हाच की, झेऊस, डायोनिसस, अपोलो हे देव मानलेले असले, तरी पूर्वी ते मानव होते, कर्तृत्ववान मानव होते, यामुळेच त्यांना मृत्यु आला आणि थडगी तयार झाली. त्यांच्या अलौकिक कर्तृत्वामुळे त्यांना देवपण मिळाले ही गोष्ट वेगळी. इजिप्तमधील प्रमुख देव ओसिरिस याचे मसाला भरून ठेवलेले शरीर मेडिस येथे मिळणे, थिनिस याचे शरीर अनहौरी येथे मिळणे, या गोष्टी वरील सिद्धांतालाच पाठिंबा देतात. बॅबीलोन संस्कृतीमधील देवींची हीच स्थिति होती.

## राजातील देवत्व अखंड राखणे

राजामध्ये देवत्व आहे, प्रजेचे बरेवाईट करण्याचे सामर्थ्य व कर्तुमकर्तुम शक्ति त्यामध्ये आहे, अशी भावना प्राचीन काली होती. यासाठी राजाचे संरक्षण व सुस्थिति पाळली जाई. शक्तिहीन राजा प्रजेचे संरक्षण करू शकणार नाही ही त्यांची भावना होती. प्रजेने कितीही काळजी घेतली तरी कालमानाप्रमाणे त्याला वृद्धत्व येणे अपरिहार्य असून तो शक्तिहीन होणारच. मग हा राजा प्रजेचे संरक्षण कसा करणार? त्यांची दुसरी अशी भावना होती की, सृष्टिनियमाप्रमाणे तो मृत्यु पावला म्हणजे देवरूपी प्राण निघून जाणार, कोठे तरी भटकत बसणार व पुन्हा दुसऱ्या राजाच्या वेळी तो देव मिळणार नाही म्हणजे देवाच्या परंपरेत खंड पडणार, देवपूजेत व्यत्यय येणार.

त्यांच्या वरीलप्रमाणे दु:खाचे व चिंतेचे निवारण करण्यासाठी त्यांनी उपाय शोधून काढला. तो असा की, पहिला राजा सशक्त कार्यक्षम आहे तोपर्यंतच त्याला गादीवर ठेवावयाचे व कार्यक्षमता कमी होण्याची लक्षणे दिसू लागताच, त्याचा शिरच्छेद करून दुसरा नवीन रक्ताचा कार्यक्षम राजा निवडावयाचा. या कृतीमुळे पहिल्या देवपूजनात खंड पडणार नाही. देवरूपी राजाची कार्यक्षमता कधी कमी पडणार नाही. याच प्रमुख भावनेने राजाचे मरणाचे निरनिराळे प्रकार पुढे प्रचारात आले.

( १ ) कांगो प्रदेशात लोकांचा धर्माधिकारी राजा चितोम (Chitome) आजारा पडून मरणोन्मुख होणार व तो मेल्यावर जगाचा नायनाट होईल. कारण तोच विश्वाची धारणा धरून आहे. अशी स्थिति प्राप्त झाली म्हणजे नवीन राज्यावर येणारा उमेदवार, त्याच्या घरात शिरून डोक्यावर गदाघात करून अगर गळफास लावून त्याला ठार करी व आपण राजा म्हणून गादीवर येई.

( २ ) इथोपियामधील मेरो (Meroe) राजांना देवाप्रमाणे मानीत. परंतु धर्मगुरूंच्या मनात त्यांचे राज्य संपविण्याचे आले म्हणजे देवतांचा कौल म्हणून

राजाला तो निरोप पाठवी की, त्याने इहलोकींची यात्रा संपवावी. हा आदेश आवश्य पाळला जाई आणि त्या देवाचे मरण ओढवे, ही रूढी टॉल्मी ( दुसरा ) पर्यंत चालू होती. पण त्या वेळी गादीवर असणारा राजा इर्गामिनिस याने धर्मगुरूचा आदेश मानला नाहीच, पण उलट आपल्या सैन्यासह धर्मगुरूंच्या मठात शिरून त्याने त्याचा शिरच्छेद केला.

( ३ ) आफ्रिकेतील पझोग्ल जमातीत अशी रूढी होती की, राजाने दररोज एका विवक्षित वृक्षाखाली बसून न्यायदान केले पाहिजे. पण जर आजारी-पण किंवा दुसऱ्या कोणत्याही कारणाने त्याने तीन दिवसापर्यंत हे आपले कर्तव्य केले नाही, तर त्याच झाडावर त्याला फासावर चढविले जाई.

असे. बारा वर्षांची मुदत भरली म्हणजे मोठा समारंभ केला जाई व त्यामध्ये दरबारी, मानकरी आणि इतरांना मेजवानी दिली जाई. हा समारंभ तेथील एका उच्चवर्णीयासाठी असलेल्या देवतेसाठी आयोजित करीत. या मंदिराशी मोठा जमीनजुमला तोडून दिलेला असे व उत्पन्नही मोठे असे. या वेळी मोठ्या संख्येने उपस्थित असलेल्या ब्राह्मणांना भोजन दिले जाई, दक्षिणा दिली जाई.

यानंतर राजेसाहेब वाजतगाजत देवीच्या मंदिराजवळील तळ्यात स्नान करून मंदिरात येत. देवीची प्रार्थना करीत व नंतर एका उंच लाकडाच्या परांचीवर चढत. रेशमी वस्त्रांनी ती परांची सुशोभित केलेली असे. वर चढल्यावर अनेक प्रजाजनांदेखत चाकूने भराभर आपले नाक, कान, ओठ इ० अवयव कापून तो खाली फेकीत असे. जितके शरीरातील मासाचे तुकडे तोडता येतील तितके तोडून नंतर कंठ कापून घेई. याप्रमाणे देवतेला आपला देह अर्पण करी. यानंतर जो राजा येणार, तोही या समारंभाला उपस्थित असे. जणू काय त्याला ही शिकवणच मिळत असे. इंग्रज प्रवासी लेगन याचे सांगण्याप्रमाणे ही प्रथा सन १७४३ पर्यंत चालू होती, नंतर बंद झाली.

(६) दक्षिण भारतामध्ये मलबार प्रांती अशीच एक शासनसंस्था होती व तेथे राजाची मुदत फक्त पाच वर्षांची असे. याचे नाव 'थलवेत्ती पेरोथिअम' असून त्याचा अर्थ शिरच्छेद करून राज्यपद मिळविणे असा होता. या मुदतीत त्याची सर्वांगीण सत्ता जनतेवर चाले, पण ही मुदत भरली म्हणजे प्रजाजन एकत्र जमा होत आणि राजाचे शीर तोडून वर उंच उडविले जाई. खाली पडता पडता ते शीर जो पकडील, तो पुढील पाच वर्षांसाठी राजा होई.

(७) राजाने स्वतः मरण्याऐवजी दुसऱ्या कोणाचा तरी बळी देवाला देण्याची रूढी नंतर प्रचारात आली. कोणाचा तरी बळी अर्पण करायवाचा, मग राजाऐवजी दुसरा दिला तरी चालेल ही भावना प्रसृत झाली. स्वीडन देशात राजा औन गादीवर असताना दर नऊ वर्षांच्या मरणाच्या समयकाळी तो आपला एक एक मुलगाच ओडिन देवतेला बळी देत असे. शेवटी दहाव्या मुलाची वेळ आली आणि तेवढाच राजपुत्र शिल्लक उरलेला असल्याने प्रजाजनांनी त्याचा बळी देण्यास विरोध केला. राजाचा नाइलाज झाला आणि तो स्वतः बळी गेला. उपसाला शहरी त्याची कबर उभारण्यात आली होती.

(८) ग्रीस देशातील स्पार्टन वंशात ही मुदत आठ वर्षांची होती व ती आकाशातील सूर्य-चंद्राच्या भ्रमणावरून ठरविलेली होती. दर आठ वर्षांनी त्यांच्या गति जवळपास येतात म्हणजे पूर्ण चंद्राची गति, ही सूर्याच्या गति एवढीच असते. दोन्हींचा भ्रमणकाळ सारखाच असतो, यासाठी ती मुदत घातली

होती. पण येथे राजाला ठार मारण्याऐवजी, दुसऱ्या राजाला नेमीत. यामुळे राजाची शक्ति व कार्यक्षमता सदैव तरतरीत राहील अशी त्यांनी भावना होती. याचप्रमाणे क्रीट बेटातील मिनोस राजाची कारकीर्द आठ वर्षांची ठरवून दिलेली होती. पण येथे थोडी सुधारणा दिसून येते. आठ वर्षांच्या मुदतीनंतर राजा मौंट-इडा पर्वतावरील एका संबंधित गुहेमध्ये काही काळ राहावयाला जाई आणि तेथे प्रत्यक्ष देव झेऊस याला गेल्या आठ वर्षांच्या कारकीर्दीचा अहवाल तो सादर करीत असे. त्यानंतर पुढील काळासाठी उपयुक्त सूचना त्या देवाजवळून घेऊन परत पुन्हा गादीवर येई. देवाच्याच आज्ञेने तो पुन्हा गादीवर आल्यामुळे जनता त्याला देवाप्रमाणे मानी व त्याच्या आज्ञेचे पालन करी.

राजा म्हणजे देवाचा अवतार ही कल्पना जरी सर्वत्र सारखी रूढ असली तरी त्याचे देवत्व कशा प्रकारे संपुष्टात आणले जाई याचे निरनिराळे प्रकार वरीलप्रमाणे आहेत. इतरही अनेक आहेत वाचकांना या देवाबद्दल कल्पना यावी यासाठी काही प्रमुख उदाहरणे येथे नमूद केली आहेत इतकेच.

## नवबालकांचे निर्मूलन

मीस देशातच नवबालकांचा घात केला जाई असे मात्र नव्हे. ज्याप्रमाणे राजे व इतर धार्मिक गुरु यांचा काही ठराविक वर्षांनी घात केला जाई, तद्वत् प्राचीन काळी काही जमाती नवबालकांचा घात करीत असत व वाढीव प्रजेला प्रतिबंध करीत. पॉलिनेशियामध्ये दोन तृतीयांश मुलांचा नाश केला जाई. ईस्ट आफ्रिका भागात साधारणतः तेच प्रमाण होते. अंगोला भागातील जागा ही आक्रमक जमात सदा स्वाऱ्यांवर असल्याने आपली सर्व लहान मुले ठार करीत. तसे करण्याचे कारण ते देत की, स्वाऱ्यांवर असताना मुलांचे ओझे मातांना नसावे. जमात टिकविण्यासाठी ते इतर जमातींची विशेषतः ज्यांचे आईबाप त्यांच्या हल्ल्याला बळी पडलेले आहेत, अशी १४–१५ वर्षांची मुले जवळ करीत आणि त्यांनाच मुले मानीत. दक्षिण अमेरिकेतील मयवंश फक्त शेवटचा एक मुलगा जिवंत ठेवून इतरांचा नाश करीत. याचा परिणाम मात्र असा झाला की, सर्व मयवंशाचा शेवट झाला व स्पेन लोकांविरुद्ध लढाईची वेळ आली, तेव्हा माणूसबळच कमी पडले. पश्चिम आफ्रिका खंडात तर युवेट ( Uwet ) नावाचा वंश विषप्रयोगाची दिव्ये करण्याने नामशेष झाला. याप्रमाणे सर्व वंश नाश पावण्याची काही कारणे संभवतात.

( Golden Bough, Ch. XXVII )

सांप्रत सर्व देशांत संतती-नियमनाचा पुरस्कार करण्यात येत असतो, त्यातीलच हा प्रकार समजण्यास हरकत नसावी.

रूढी कशी प्रचारात येते ?

पूर्वी ग्रीस देशात अथमस नावाचा राजा असताना राणी नेफेलपासून त्याला पुत्र फ्रीकस व एक मुलगी झाली. त्याने दुसरे लग्न केल्यावर इनो राणी-पासून दोन पुत्र झाले. सवतीमत्सरामुळे तिने पहिल्या दोन मुलाचा काटा काढण्याचे ठरविले. तिने अशी युक्ति योजिली की, धान्य भाजून शेतकऱ्यांना पेरणीसाठी दिल्यामुळे ते उगवले नाही व सर्वत्र दुष्काळ पडला. भोळ्या भावाने राजाने डेल्फी देवीचा कौल घेण्यास सांगितल्यावर, त्या दुष्ट सवतीने तेथील पुजाऱ्याला पैसे चारून कौल देण्यास सांगितले की, 'राजाने आपला मोठा मुलगा बळी दिल्यास पाऊस पडेल व दुष्काळ निवारण होईल.' मुलाला ही वार्ता समजल्यावर तो एका दिव्य मेंढ्यावर बसून पसार झाला. तेव्हा पुन्हा कौल मिळविला की, प्रजेच्या दुःख निवारणासाठी राजालाच बळी द्यावा. राजाही निसटून गेला आणि शेवटी इनो राणीच्या मुलाचाच बळी देण्याची स्थिति प्राप्त झाली. परिणाम शेवटी झाला तो असा की, राजाने आपला पहिला मुलगा डेल्फी येथील झेऊस देवाला अर्पण करीत जावा, हीच रूढी पुढे चालू राहिली.

सेमेटिक वंशात देशावरील संकट निवारणार्थ राजा आपला प्रथम पुत्र देवाला बळी देत असे. याच कारणासाठी अथवा मोठ्या साथीच्या रोगाचे संकट टाळण्यासाठी अगर युद्धातील पराभव टळावा म्हणून, अनेक नागरिक आपली मुले बालदेवीला बळी देत. कार्थेजिअन लोकांचा एका लढाईत पराभव झाल्यावर त्याना असे समजून आले की, संकटाच्या वेळी स्वतःच्या मुलांचे बलिदान करण्याऐवजी त्यांनी भाडोत्री मुलाचांच बळी दिला, म्हणून त्यांचा पराजय झाला.

पॅलेस्टाईनमध्ये पूर्वी कनानिट वंश रहात असे. त्यांची देवता बाल हिचे मंदिर उंचावर बांधलेले असे आणि त्याला अशेरिम ASHERIM (भारतीय शब्द आश्रम असावा) म्हणत. या ठिकाणी देवीच्या प्रीत्यर्थ आपली मुले ते बळी देत असत. पुढे जोसिआ राजा झाल्यावर त्याने ही रूढी बंद केली, तरी पशु-पक्ष्यांच्या बाबतीत पहिल्याचा बळी देवाला देण्याची धार्मिक आज्ञा होती. न्यू साऊथ वेल्स, क्वीन्सलॅंड, दक्षिण ऑस्ट्रेलिया या देशांतही प्रथम मुलाचा बळी देत.

पण चीनमधील खाई-मुह प्रदेशात पहिल्या मुलाची हत्या करून त्याचे, तुकडे तुकडे करून घरातील सर्व मंडळी खात असत. काही वेळा इतरांनाही तो शिजविलेला पदार्थ वाटीत असत. भारतामध्ये काही लोकांची अशी श्रद्धा होती की, प्रथम मूल गंगेला अर्पण करावयाचे असते. अबीसीनियामधील कैरी, बन्ना, बशादा जमाती आपली मुले आकाशदेवता वाक (Wak) ला बळी देत असत. म्हणजे

रानात झाडाझुडुपात फेकून देत, अगर ओमो नदीत फेकीत असत. रशियामध्ये केव्हन ( Cavan ) प्रदेशात क्रोम क्रुअच ( Cromm Cruach ) देवीची सुवर्णाची भव्य मूर्ती असून, धनधान्य, मध व दूध भरपूर मिळावे म्हणून पहिल्या मुलाचा देवीला बळी देत असत. पेरु देशात काझामारका भागात मुले प्रत्येक महिन्याला बळी देत आणि बळीचे रक्त देवाचे तोंडाला व दरवाज्याला लावीत असत.

वरील त्रोटक विवरणारून ध्यानी येईल की, प्राचीन काळी प्रथम मुलाचा बळी देवाला देण्याची रूढी सर्वत्र चालू होती. पहिले फळ देवाला वाहण्याची रूढी आजही प्रचारात आहे. तिचाच हा एक भाग असावा. बाप मरणाला टेकला म्हणजे त्याचे मरण टाळण्यासाठी मुलाचा बळी देत असावेत, पण हिंदु तत्त्वज्ञानाप्रमाणे मुलाचा जन्म म्हणजे बापाचाच पुनर्जन्म असल्याने, त्याने जर बापाचे सत्त्व शोषून घेतले तर बापाचे जीविताला धोका येईल, आणि तो टाळावा म्हणून मुलाचा बळी दिला जात असावा, असे एक मत आहे.

## मृत्यूची मिरवणूक

राजाचे मरण व त्याचा पुनर्जन्म, वृक्षदेवताच्या मिरवणुका, तसेच पशुरूपी देवताचे बळी, धान्यदेवतेचे बळी याला आणखी जोड प्रत्यक्ष मृत्यूच्या मिरवणुकीची दिलेली दिसते. अर्थात ही फार प्राचीन म्हणजे मानव जेव्हा शिकारी जीवन जगत असे अगर पूर्ण रानटी अवस्थेत होता त्या वेळची ही रूढी असावी. आज त्या रूढीचे काही अवशेषच शिल्लक राहिलेले दिसतात. आपण त्यातील वानगीदाखल काही पाहू.

युरोपमध्ये 'श्रोव्ह मंगळवार' अगर 'ॲश बुधवार' या लेंट महिन्यातील दिवशी हा समारंभ करीत. रोमजवळ फ्रोसिनन् गावी या समारंभाचे वर्णन मिळते, ते असे की, त्या दिवशी सायंकाळी ४ वाजता राडिका ( Radica ) उत्सवाला प्रारंभ होई. एक मोठी मिरवणूक वाजत गाजत सरकारी ठाण्याजवळ येई. मिरवणुकीत एक शृंगारलेली गाडी चार घोडे ओढीत असत. गाडीत भव्य खुर्चीवर एक नऊ-दहा फूट उंचीची मानवाची आकृति, रंगीबेरंगी कपडे, डोक्यावर शिरस्त्राण, पायात लांबलांब बूट, एक हाताने लोकांना मुजरा करीत बसलेली असे. हाच मृत्युपुरुष होय. मिरवणुकीत भाग घेणाऱ्या प्रत्येक माणसा-जवळ राडिका वृक्षाचे मूळ घेतलेले असे अगर पान असे. पण तसा कोणी नसल्यास त्याजबरोबर हिसकाहिसकी होऊन त्याला पळून जाण्याची वेळ येई. मिरवणूक सरकारी ठाण्यावर आली म्हणजे सरकारी अधिकारी बाहेर येऊन त्यामध्ये सामील होत. नंतर प्रमुख रस्त्याने पुन्हा मिरवणूक चाले. मिरवणुकीच्या मागे दारू भरून पिपे घेतलेली असत आणि नित्येकजण हा सरकारी माल

मनमुराद पीत, कारण पैसे द्यावे लागत नव्हते. एका सार्वजनिक चौकात ही मिरवणूक थांबल्यावर, त्या पुतळ्याच्या अंगावरील कपडे काढून प्रेत व लाकडी चौकट सर्वांसमक्ष जाळून टाकीत. लोकांचा जयजयकार मोठमोठ्याने चालत असे आणि हातातील रानटिकाची मुळे पाने त्यावर फेकून जाळून टाकीत. मोठ्या आनंदाने लोक घरोघर निघून जात.

सन १८७७ साली एका इंग्रज प्रवाशाने स्पेनमध्ये ,काटालोनिआ भागात लेरिडा गावी असाच एक सोहळा पाहिला. मिरवणुकीत सैन्य, घोडेस्वार व इतर रक्षक असत. ही मिरवणूक ' पाव पी ' ( Pau Pi ) देवीची काढीत. तीन दिवस ही मिरवणूक निघाल्यावर शेवटच्या दिवशी ती प्रमुख रस्त्याने जात असताना दोन्ही बाजूंनी घरातून माणसे पाहत असत. कोणी त्यावर प्रकाशझोत टाकीत, घोड्याच्या टापाचे आवाज दणाणत, बँडवादन चालूच असे, पण या सर्वांवर कडी म्हणजे धर्मगुरु मृताचा आत्मा आणि शरीर यासंबंधीत मंत्रोच्चार गर्जत असत. एका ठराविक चौकात मिरवणूक थांबल्यावर पाव-पी देवीचा मोठ्याने जयजयकार करून दिवे मालविले जात. अंधार झाल्याबरोबर जनसमुदायांतून प्रेत पळविण्यासाठी बनावट यमदूत व देवदूत धावून येत आणि प्रेत घेऊन धावत जात. रक्षक, जनता त्यांचा पाठलाग करी आणि प्रेत ताब्यात घेऊन त्यासाठी तयार केलेल्या खड्ड्यात ते पुरून टाकीत. याप्रमाणे मृत्यूचा नाश करीत.''

बोहेमियामधील ब्रालरगांवी गवताचा बनविलेला पुतळा एका चाके नसलेल्या गाडीवर बसवीत आणि ती गाडी दोन पांढरे व दोन पिंगट रंगाचे घोडे ओढीत असत. त्यांच्या अंगावर फाटके कपडे व बूट असत. दोन मुले वृद्धाचे सोंग घेऊन गाडीमागे रडत जात, दोन मुली मिरवणुकीचे अग्रभागी असत आणि इतरेजन त्यामध्ये सामील असत. मिरवणूक थांबल्यावर एका झाडाखाली त्या माणसाचा न्यायनिवाडा केला जाई व त्याला फाशीची शिक्षा मिळे. वृद्धरूपी दोन मुले त्या पुतळ्याला पळविण्याचा प्रयत्न करीत, पण त्या दोन मुली त्याला पकडून आणून मारेकऱ्यांचे हाती देत, आणि झाडावर टांगलेल्या फासावर त्याला फाशी देत. त्याचे पाठीराखे दोन वृद्ध झाडावर चढून आपले जीव धोक्यात घालून त्याला सोडविण्याचा प्रयत्न करीत. पण यश न आल्यामुळे शेवटी खाली उड्या मारून त्या मृतासाठी शोक करीत बसत. शिक्षा देणारा अधिकारी भाषण करून सांगे की, ' मृताने जनतेचे नुकसान केलेले असून त्यांचे कपडे घेतलेले आहेत आणि त्याना आळशी बनविले आहे. यासाठी त्याला फासावर चढविला आहे. ' या वेळी ते गाणे म्हणत—

' Now carry we Death out of the village,
The new Summer into the village welcome dear Summer '

या गाण्यावरून असे म्हणता येते की हा पुतळा पूर्वीच्या वसंत ऋतूचा असावा आणि त्यांचे दहन झाले म्हणजे ग्रीष्म ऋतूचे स्वागत करीत गाणी म्हणत.

We carried Death away for you
We brought the Summer,
Give us a good year
For wheat and rye.

वरील प्रकारची अनेक गाणी या मिरवणुकीचे वेळी म्हटली जात आणि त्यावरून हा उत्सव म्हणजे एका ऋतु काळाचे आगमान व्यक्त करण्यासाठी होता. कारण त्यामुळे त्यांना धान्य मिळणार होते, हिरवे हिरवे गवत मिळणार होते, सौख्यदायक दिवस येणार होते व नवजीवन प्राप्त होणार होते. मृत्यूच्या पुतळ्याची मिरवणूक निघाली म्हणजे त्यासंबंधी जनमतांच्या अनेक समजुती असत. हा महाभयंकर प्राणी आपल्या गांवातून दुसऱ्या गांवात नेऊन सोडला म्हणजे आपला गाव सुखी राहील. मिरवणुकीतील मंडळीना एकाद्याकडून वर्गणी वसूल करावयाची असली म्हणजे तो पुतळा त्यांच्या घरात खिडकींतून डोकावून पाही. समजूत अशी की, त्या घरांत वर्षभरांत एकादा मृत्यु घडून न यावा असे वाटल्यास वर्गणी देऊन मोकळे व्हावे लागे. काही ठिकाणी पुतळा गावाबाहेर पोहोचविला म्हणजे अनेक जण धावत गांवात परत येत. किंबहुना मृत्यु त्यांचे मागे त्यांचे घरी परत येईल, इतकेच काय पण धावताना एकादा खाली पडला तर त्याला मृत्यूने गाठले असे समजून तो वर्षभरांत मरण पावेल, असेही मानीत.[१] पुतळा नदीकाठी नेल्यावर व जाळल्यावर प्रत्येकाने पाण्यात उतरून पाय धुतले पाहिजेत पण पाण्यात एकाद्याने पाय धुतले नाहीत आणि तसाच घरी परत आला, तर वर्षभरात तो मरण पावेल असे मानीत. ज्या घरातून मृत्यूच्या पुतळ्याची मिरवणूक निघाली, त्या घरांत वर्षभर कोणीही मरणार नाही, वर्षभर त्या गावात रोगराई अगर प्लेग-सारखा महाभयंकर रोग उद्भवणार नाही असे मानीत. पुरुषपुतळ्याऐवजी काही ठिकाणी वृद्ध स्त्रीचा पुतळा बनवून त्याची मिरवणूक काढीत. काही गावी या पुतळ्याचे दहन न करता त्याचे अंगावरील कपडे अगर गवत यांची हिसका-हिसकी करून ज्याचे हाती कापडाचा तुकडा अगर गवत मिळेल ते घेऊन तो घरी जाई आणि गाईचा गोठा अगर कोंबड्यांची खुराडी यामध्ये ठेवी. तसे

१ भारतीय जनतादेखील प्रेताला पोहोचविल्यानंतर, हात-पाय धुवून, स्नान करून घरात प्रवेश करते, त्यामागील भावना हीच असावी.

केल्याने गाई विपुल दूध देतील आणि कोंबट्याची भरपूर अडी मिळत राहतील अशी त्याची श्रद्धा होती.

साराश, अशा प्रकारच्या पुतळ्याची मिरवणूक म्हणजे जुन्या ऋतूचे विसर्जन आणि नव्याचे स्वागत, अगर पुनर्जन्म या प्रकारची असल्याने प्रत्येकजण अहमहमिकेने त्यात भाग घेत असे. भूदेवीचे एक प्रकारचे हे पूजनच होते. तिच्या विश्वस्वरूपाचे उत्तम प्रदर्शन होते. मानवस्वभाव सर्वत्र सारखा, त्याच्या कल्पना सारख्याच, हे वरील उदाहरणावरून चागले दिसून येते.

भारतातील उदाहरण घ्यावयाचे तर पजाब प्रांतीच्या कागरा जिल्ह्यातील 'राली का मेला' या उत्सवाचे देता येईल. चैत्र महिन्यात हा समारभ घडतो आणि त्या वेळी शकर-पार्वतीचा विवाह लावतात. शकर-पार्वतीचे मुखवटे मातीच्या मडक्यावर रगवितात आणि ते झाडाच्या फाद्या तोडून आणून, त्यावर बसवितात. जमिनीत पुरलेल्या फादीच्या मुळात फुलाचा ढीग रचलेला असतो. नेहमीचे पद्धतीने विवाह झाल्यावर वर्गणीतून भोजनसमारभ करतात. वैशाख सक्रातीचे दिवशी त्या पुतळ्याची मिरवणूक काढून, नदीवर नेऊन तेथे मूर्ति पाण्यात बुडवितात. या प्रकारे विसर्जन झाल्यावर थोडा वेळ रुदन केले जाते. हा समारभ वनस्पतीच्या पुनर्जीवनाचा असतो, हे वृक्षाच्या फाद्या वापरतात यावरून घ्यानी येईल. वृक्षदेवतेचेच एक प्रकारे ते पूजन होय. कारण त्यामध्ये अनेक फुलाचेही प्रयोजन करतात. हा समारभ घडवून आणण्यात तरुण मुलींची गुप्त भावना असते की त्याना उत्तम पति प्राप्त होईल

(टीप—'राजा हा देवाचा अश आहे' येथपासूनचा भाग फ्रेझरच्या गोल्डन बॉऊ या ग्रथमालेतून घेतलेला आहे.)

## मानवाची दु खे निवारण पद्धति

प्राचीन काळी युरोपातील मानव आपली शारीरिक दु:खे अनेक प्रकारानी निवारण करी. त्यातील काही आपण पाहू.

(१) रोमन लोक ताप आलेल्या माणसाची नखे तासून, मेणावर चिटकवून ते मेण शेजारच्या घरावर सूर्योदयापूर्वी चिटकवी व ताप उतरत असे.

(२) शरीरावर जितके चामखीळ असतील, तेवढे लहान दगड घेऊन त्याना लावून पानात गुडाळून, रस्त्यावर टाकावेत. जो ते पान उचलील त्याकडे रोग जातो.

( ३ ) विंचू चावलेला मनुष्य गाढवावर शेपटीकडे तोंड करून बसणे, अगर त्याचे कानात गुणगुणणे—' मला विंचू चावला आहे, ' विंचवाचे विष उतरते व गाढवात शिरते[1]

( ४ ) दाढ दुखत असल्यास उत्तम दिवशी सुवेळी, बेडूक पकडून त्याचे तोंडात थुकावे व सोडून द्यावे दाढदुखी थांबते व बेडकाला दुखणे जडते

( ५ ) वेल्समध्ये कोणी कफ विकाराने आजारी झाल्यास त्याच्या डोईचा केस पावाच्या तुकड्यात घालून कुत्र्याला खावयाला देत कुत्रे कफाने नतर आजारी होते

( ६ ) बोहेमियामध्ये ताप जाण्यासाठी, सूर्योदयापूर्वी जगलात जाऊन स्नाईप पक्ष्याचे घरट्यातून एक पिलू घरी आणून, तीन दिवस जवळ ठेवून, परत नेऊन सोडणे, ताप जातो

( ७ ) अथेन्स शहरी सेंट जॉन बॅप्टिस्ट चर्च आहे तापकऱ्याने तेथे जाऊन मेणाचलेला दोरा खांबाचे आतील बाजूस बांधल्यास ताप त्या खांबात शिरतो व हा बरा होतो

( ८ ) बल्गेरियामध्ये ताप जाण्यासाठी तापकऱ्याने सूर्योदयाचे वेळी विलोवृक्षाचे भोवती तीन प्रदक्षणा घालताना म्हणावयाचे, ' तापाने झाड हलो, सूर्यमाला उष्णता देवो. '

( ९ ) फिनलडमध्ये तापकरी सकाळीच जुनाट विलोवृक्षाजवळ जाऊन एका फांदीला सुताच्या तीन गाठी मारून म्हणतो, ' माझा ताप तुला दिला आहे ' नतर पाठ फिरवून तो त्याकडे फिरून न पाहता पळत घरी येतो त्याचा ताप जातो

( १० ) माणसाचा रोग झाडाकडे वर्ग करण्याची एक पद्धत अशी की, रोग्याची नखे तासून, पायावरील थोड्या केसात गुडाळून, ओकवृक्षाचे खोडात भरून, गाईच्या शेणाने तो भाग बुजवून टाकणे रोग झाडामध्ये जातो

---

१ टीप—अर्धशिशीची व्यथा असणाराने सूर्योदयापूर्वी गाढवाला नमस्कार केल्यास त्याची व्यथा थांबते व गाढवाकडे जाते, असा अनुभव रा नारायणराव चिटणिसानी लेखकाला सांगितला आपली दु खे पशुपक्षी अगर अचेतन वस्तूकडे वर्ग करण्याची जी कल्पना प्राचीन मानवांनी उपयोगात आणली, त्याच कल्पनेत पुढे वाढ होऊन आपली दु खे व्यक्तिश अगर सामुदायिक रीत्या देवाकडे वर्ग करण्याची रूढी अस्तित्वात आली असली पाहिजे

हा बोधक इतिहास देण्याचे कारण इतकेच की, प्राथमिक अवस्थेत रोग निवारण करण्याच्या मानवाच्या भावना सर्वत्र एक प्रकारच्याच होत्या. आपले दुःख कुणी माजरासारख्या जिवत प्राण्याकडे देणे अगर ल्तावृक्षादिक सजीव विश्वशक्तीकडे सुपूर्त करणे, किंबहुना खाबासारख्या निर्जीव वस्तूकडे वर्ग करणे या भावना सर्वत्र दिसतात. भारतामध्येही या रीतीने अनेक प्रकार आजही दृष्टोपत्तीस येतात.

(Golden Bough, LV/706, by Frazer)

'The accumulated misfortunes and sins of the whole people are many times laid upon the Gods or the dying God who is supposed to bear them away for ever, leaving the people innocent and happy'

ज्याप्रमाणे आपल्या खाद्यावरील ओझे दुसऱ्याच्या डोकीवर देता येते, आपल्या हाती असलेली वजनदार पिशवी दुसऱ्याकडे देता येते व आपले ओझे हल्के करून सुखी होता येते, तद्वत् आपली पापे अगर निरनिराळ्या प्रकारची दुःखे देवाकडे सुपूर्त केली म्हणजे त्या पापाचे धनी देव होईल व आपण त्यातून मुक्त होऊ, ही भावना सगळीकडे बळावली. सध्याही याच भावनेतून देवाकडे पाहिले जाते. नरबली-पशुबली देऊन अगर इतर दाने करून, देणग्या देऊन, मंदिराचा जीर्णोद्धार करून अगर ती बाधून जो तो आपली पापे देवाकडे देण्याचा प्रयत्न करीत असतो. गगा नदीमध्ये एकदा स्नान केले म्हणजे सर्व पापे त्यामध्ये धुतली जातात व तिच्याकडे सोपविली जातात, तो मनुष्य पापमुक्त होतो. ह्याच भावनेतून गंगास्नानाचे अतिशय पुण्य मानलेले आहे. यामध्ये धूर्तपणाने अनेक गोष्टी मानव साध्य करून घेतो. एक तर देवाचे श्रेष्ठत्व मान्य करतो आणि आपली पापे अगर निवारण करण्याची त्याच्यामध्ये शक्ति आहे हे कबूल करतो आणि सर्व आपली पापे अगर दुःखे आपण ती देवाकडे वर्ग करून मोकळा होतो. भारतीय संत वाङ्मयात अशी अनेक उदाहरणे आहेत की, आपली दुःखे भक्तानी त्याच्याकडे वर्ग केल्यावर, ती त्यानी स्वतः भोगून सपविलेली आहेत. साराश मानवानी जाणूनबुजून पापे करावीत, उघड्या डोळ्यानी करावीत आणि या ना त्या प्रकारे देवाकडे वर्ग केली म्हणजे आपण पापमुक्त झालो, या भावनेने जगावे किंवा किंबहुना अधिक पापे करावीत, ही भावना अनेक देशात आजही दिसून येत आहे. अर्थात सदासर्वदा ही पळवी युक्ति फलद्रूप होईलच असे नाही आणि यासाठीच देवाकडे पापे वर्ग केल्यावर काही वेळा फळ मिळते व काही वेळा मिळत नाही. सर्वांविषयी शुद्ध, पवित्र, भावना हाच श्रेष्ठ मार्ग होय, यात संशय नसावा. विचार एकच उद्‌भवतो की आधुनिक मानवाने प्राचीन मानवावर प्रगति केलेली आहे किंवा नाही!

## प्रार्थना म्हणजे दीर्घायुष्य व ईश्वरप्राप्ती

मानवी मन अशांतीमुळे सतत शरीर-शक्ति घालवीत असते हे ध्यानात येण्यास बुद्धीचा अडथळा येतो. मनाच्या स्थिरतेमुळे शरीर-शक्तिव्यय थांबतो, मनाच्या स्थिरतेची आत्मानुभूती आणि प्रार्थना यांमध्ये फारसा फरक नाही. याचे थोडे विवरण करू.

यामध्ये सामान्यतः तीन गोष्टींचा विचार व्हावयास पाहिजे.

( १ ) प्रार्थनेशिवाय असलेल्या अवस्थेत शरीराची झीज कशी होते ?

( २ ) प्रार्थना मुक्त-अवस्थेत शरीराची झीज कमी प्रमाणात होते का ?

( ३ ) प्रार्थनामय अवस्थेचे सुपरिणाम टिकविण्यासाठी इतर उपाय कोणते ?

या प्रश्नांचा विचार करण्यापूर्वी प्रार्थना म्हणजे काय हे पाहिले पाहिजे. प्रार्थनेचे वेळी देवाजवळ सतत मागणी करीत राहणे, त्यासाठी धरणे धरून बसणे, आपल्या दैनंदिन गरजांसाठी मागणी करीत रहाणे, याला प्रार्थना म्हणता येणार नाही. सॉक्रेटीस जरी मोठा तत्त्ववेत्ता होता तरी नास्तिक नव्हता. त्याचे म्हणणे असे की, देवाच्या बुद्धिमत्तेबद्दल माणसाने भलतीच कल्पना करून घेऊ नये. मागितल्याविना त्याला काही कळत नाही, तो देणार नाही, अशी कोती समजूत मानवाने करून घेऊ नये. तुमची मनोभावे श्रद्धेने केलेली इच्छा प्रत्यक्ष मागणीत उतरल्याविना ज्याला कळणार नाही, तर तो देव कसला ? भक्ताचा उणेपणा स्वयम् जो जाणतो तो देव मागितल्याविना मनोरथ पूर्ण करतो. तो देव सर्वव्यापी सर्वगामी आहे प्राचीन ऋषिमुनींनी प्रार्थनेचे तत्त्व पुरेपूर जाणलेले होते. त्यांना कोणी गूढवादी म्हटले तरी त्याकडे त्यांनी लक्ष न देता एकांतात प्रार्थना चालू ठेवली. गॅलिलिओपासून हायसेनबर्गपर्यंत सर्वांनी प्रार्थनेचे महत्त्व जाणले होते. डॉ. अलेक्सिस कॅरेल–नोबल पारितोषिक विजेता–हा प्रार्थनेचा पुरस्कर्ता होता. इतकेच काय, डॉ. रॉबर्ट ओपनहेमरनेही अणुध्वमाची पहिली चांचणी घेताना प्रथम गीतेमधील कृष्ण-मंत्र गायिले. सारांश प्रार्थनेचा परिणाम मानवी शरीरावर घडत असल्याविना वरील श्रेष्ठ व्यक्तींनी प्रार्थनेची महती गायलेली नाही हे ध्यानात घेणे आवश्यक आहे.

### वैज्ञानिक दृष्टिकोन

प्रार्थना ही शरीरातील अणुरेणूवर जशी परिणाम घडविते, तशी ती बाह्य परिस्थितीवर घडवीत असते. मानव शरीरातील रक्त अनेक पेशींचे बनलेले

आहे. त्यांतील एक रक्तपेशीचे उदाहरण घेऊ. नाडीमधील ही एक पेशी दर सेकंदाला ७ मीटर धावत असते. मनुष्य अशांत झाला, रागावला म्हणजे साहजिकच रक्ताची उष्णता वाढते आणि या पेशीच्या गतीत वाढ होते व तेवढा शक्ति-व्यय होतो. अनेक कारणांनी असा शक्तिव्यय सतत होत राहिला, म्हणजे जलद श्वसन, रक्त-दाब, मेंदू विकृति यासारखे रोग उत्पन्न होतात. इतकेच काय पण आयुष्यही क्षीण होते. कारण की, साठ वर्षे वयाच्या गृहस्थाची नाडी-गति मिनिटास ७० आहे, इतर सामान्य व्यवहारात ती ७७-७८ आहे आणि भावना क्षोभाचे वेळी ती ८० पर्यंत आहे. याचाच अर्थ असा की, प्रार्थना वेळेपेक्षा इतर व्यवहारामुळे सबंध दिवसात तिचे सुमारे २००० ठोके वाढले. याचाच दुसरा वैज्ञानिक परिणाम असा की, त्याचे आयुष्य २४ मिनिटांनी कमी झाले. यासाठीच शांततेची जरूरी असते.

'फिजिक्स अ‍ॅण्ड केमिस्ट्री ऑफ लाईफ' या ग्रंथामध्ये शरीराच्या या गतिमानाचे सुंदर चित्र रेखाटले आहे. एका मिनिटाला तीस लक्ष या वेगाने आपल्या शरीरातील रक्तगोलक मरत असतात आणि तितके जन्मतही असतात. या प्रचंड वेगाने ९० दिवसात रक्तातील सर्व पेशी बदलून जातात. हीच क्रिया मांसलघनभाग व हाडे यामध्येही होत असते. साराश, तीन महिन्यांच्या काळात शरीरातील कण न कण बदलून जात असतो. याचाच अर्थ ९० दिवसात मानवाला स्वशुद्धीची संधी मिळत असते, पण मानव ती गमावत असतो.

अशांत जीवनक्रमाने शरीराला भावनाक्षोभाचे धक्के देत राहतो व त्यामुळे ९० दिवसांत नवीन येणारी पेशी पूर्वीपेक्षा कमजोर, दुखावलेली रहाते. प्रत्येक ९० दिवसांचे टप्प्याला आपण आपले शरीर अधिक दुबळे बनवीत असतो. गणपती-च्या साच्यांत जर सोंड मूळच्यापेक्षा वाकडी घडलेली असेल तर त्या साच्यातून बाहेर येणाऱ्या मूर्ति वाकड्या सोंडेच्याच निघतील, सरळ निघणार नाहीत. भावना-क्षोभापासून अलिप्त राहिलेले सनकादिक भक्त, याच कृतीमुळे सदैव बालरूप राहिलेले असावेत. 'एतावदेव वक्तव्यं नातो भूयोऽस्ति किंचन। षण्मासाभि-युक्तस्य योगः पार्थ प्रवर्तते ॥' ( महा. अनुगीता, १९।६६ )

एकादी वाईट गोष्ट जर शरिरात वाईट बदल घडवू शकते, तर चांगले कृत्य चांगला परिणाम का घडवू शकणार नाही ? रोज एक मिनिट प्रार्थना केली, ज्ञानदेवांनी म्हटल्याप्रमाणे 'निमिष एक मोटके' जरी प्रार्थना केली, तरी रक्त-पेशींना नवे वळण लागल्याविना राहणार नाही. कारण या मिनिटाचे महत्त्व कमी नव्हे, ते मिनिटही साधेसुधे नव्हे. त्यामध्ये दृढनिश्चय, ज्ञान, विश्वास ओतप्रोत भरलेला असतो. त्याचा परिणाम दृश्यपणे पेशींवर होत रहाणार आणि सद्

महिन्यांचे काळात नवनिर्मित पेशी समाधानाचे साम्राज्य पसरणार हे निर्विवाद आहे. अनुगीतेतील श्लोकांचा हाच भावार्थ आहे. एका सेकंदाच्या प्रार्थनेमुळे काय होणार हे उद्गार हताश आहेत. प्रत्येक सेकंदाला एका पेशीतून नवी शक्ति दुसऱ्या पेशीत पुलकित होत जाते. एका सेकंदाला तीस लक्ष पेशी म्हणजे एका मिनिटास १८ कोटी पेशी नव्या शाळेत शिकत असतात. नवशिक्षीत पेशी प्रथम संख्येने कमी असल्या तरी त्या प्रार्थनेमुळे शिस्तबद्ध आणि कमी शक्ति-व्ययामुळे अधिक शक्तिशाली असतात. आपला प्रभाव सर्व पेशींच्या साम्राज्यावर हळूहळू पसरवीत असतात, हे साम्राज्य जुलमी नसते, लादलेले नसते. स्वतःला सुधारावयाचे या निश्चयाच्या मुशीतून ओतलेले असल्याने प्रज्ञा अहंकारी बनत नाही, साक्षात्कारी होते. शेवटी एक क्षण असा येतो की, आपण प्रार्थना करतो हीच जाणीव हरपते आणि हरिहराची अगर जीवाशिवाची भेट होते. हेच प्रार्थनेचे अमृत फळ होय. ( स्वामी विज्ञानानंद, दि. १६–२–६९ केसरीचे आधारे )

## मातृशक्तीचे पूजन

भूतलावर अन्य देशीयांनी व धर्मीयानी प्राचीन काळी मातृशक्तीची पूजा केलेली आहे. त्याचे त्रोटक दिग्दर्शन ह्या प्रकरणात करण्याचे योजिलेले आहे. हे प्रकरण देण्याचे कारण उघडच आहे की, भारतीयांना असे वाटू नये की, आपला देशच फक्त शक्तिपूजक आहे आणि सांप्रत निधर्मी म्हणून मिरविणारे देश शक्तिपूजक नव्हते. आज जरी बऱ्याच देशांनी धर्मांतर केलेले असले, तरी पूर्वी हे देश शक्तिपूजकच होते, हेच प्रामुख्याने येथे दाखवावयाचे आहे.

अतिप्राचीनकाळी आणि मध्यकाळी चीन, पेरु, मिसरदेश, मेसापोटेमिया, युरोप, जपान, मलाया, मेक्सिको, आफ्रिका खंड इ० देशात मातृशक्तीची पूजा चालू होती. त्यांच्या देवता होत्या, मंदिरे होती आणि त्याचे उत्सव-पूजा होत असत. मूल आणि माता यांचा जसा दृढ संबंध आहे, तद्वत मातृशक्ति आणि जगाची उत्पत्ति ह्यांचा संबंध आहे. मानव अगर पशु-पक्षी ह्यांच्या उत्पत्तीलाही कारण मातृशक्तीच असल्याने, तिला सर्वत्र मान व मिळाला [illegible]. मातृशक्ति म्हणजे दया-मायेचे प्रतीक समजावयाचे असल्याने साहजिकच तिला श्रेष्ठपणा प्राप्त झाला आहे. युरोप व मध्य आशियामध्ये प्राचीन काळी अनेक संस्कृति होऊन गेल्या आहेत. त्यांचा थोडक्यात इतिहास पाहू.

बॅबिलोनिअन संस्कृतीमधील उरुक, लागाश, बॅबिलोन, निनावे इ० प्रमुख ठिकाणी मातृशक्तीच्या मूर्ति होत्या. त्यांची नावे त्या त्या शहरावरून पडलेली आहेत. इश्तर ही त्यांची प्रमुख देवता होय. मूळ पिता व मूळ माता तैमत ह्यांपासून सर्व देवतांची उत्पत्ति झाली आहे अशी त्यांची श्रद्धा होती. इनालिल, इया,

अनु, निलग्लि, डामकिना, अनातु इ० देवता होत ईस्तर ही बॅबिलोनमध्येच प्रमुख नव्हती तर तिच्या बहुमोल गुणामुळेच व प्रभावामुळे ती सिरियामध्ये अस्टार्टे, माओआमध्ये आस्तर, अरबस्तान व अबेसिनियामध्ये आस्तार ह्या नावाने पूजली जात होती.

मिस्त्रसंस्कृति म्हणजे आजचा इजिप्त देश होय. त्याची प्रमुख देवता इसिस हाती आदिदेवी 'नूत' होय. तीच पुढे 'हाथोर' झाली इ. स. पूर्वी सुमारे २००० वर्षे ह्या देवीची प्रसिद्ध होती ग्रीक लोकांनी ह्या देवीला आपल्या देशात नेली आणि पुढे ती सिसली, इटलीमध्ये गेली इ. स. चौथ्या शतकापर्यंत तिची पूजा चालत असे. असे सांगतात की, रघुवंशीय दशरथराजाच्या विनंतीवरून मिस्त्र राजाने निनाव्ह शहरातून इस्तरदेवीची मूर्ति त्याला भेटीदाखल म्हणून पाठविली होती. क्रीट बेटात मयासोनिअन संस्कृति होती. रिआ, फ्रिजिआ, सिबेले स्वरूपात देवता पूजिल्या जात होत्या होमरने फ्रिजिआ देवीवर स्तवकाव्य केले आहे. याच रोममध्ये इ. स. पूर्वे दुसऱ्या शतकापर्यंत पूजा होत असे.

इसाई धर्म सुरू झाल्यावर पहिली चार शतके मातृशक्तीची पूजा त्या धर्मामध्ये होत नव्हता ईस्तरदेवीचा प्रभाव कमी झाल्यावर रोमन राजाने प्रथम चौथ्या शतकात इसाई धर्माचा स्वीकार केला आणि अंध विश्वासाने अनेकांनीही तोच धर्म स्वीकारला पुढे मठव्यवस्था येऊन त्याची संरक्षक देवता म्हणून मेरी देवीची स्थापना झाली असेही कारण असू शकेल की, दक्षिण युरोप, सिरिया, आशियामायनर आदि देशात मातृशक्तीचा प्रभाव वाढता असल्याने तशी शक्ति इसाई धर्मात असल्याशिवाय अर्धशिक्षित लोकसमुदाय ह्या धर्माकडे आकर्षिला जाणार नाही म्हणून ह्या देवतेची पूजा होऊ लागली असावी विल् ड्युरंट आपल्या 'Age of Faith' ह्या पुस्तकात लिहितो की, 'मेरीच्या पूजेमुळे कॅथोलिक धर्मपंथीयांना अत्याचारी मार्गापासून निवृत्त करून प्रेमाची शिकवण मिळाली.' प्रत्येक शनिवारी व मे महिन्यात ह्या देवतेची पूजा केली जाते.

गिलगमिशाच्या महाकाव्यात इस्तरदेवीचा वारंवार उल्लेख येतो. ह्या काव्यात इनिना अथवा इस्तरचा नरक प्रवेश ह्याचे वर्णन आहे. तिचा प्रियकर तामुज ह्याला ठार मारून नरकात नेले जाते. अर्थात सर्वत्र दुष्काळाची छाया पडते आणि त्याला शोधण्यासाठी देवी स्वत निघते. नरकाची सात प्रवेशद्वारे ओलांडतांना प्रत्येक दरवाज्यावर आपले कपडेलत्ते व अलंकार काढून ठेवून आत गेल्यावर नरक-स्वामिनी 'अल्लातु' देवी तिला शिक्षा सांगते की, 'तुझे सर्व शरीर व्याधिग्रस्त होऊन जाऊ दे.' जोपर्यंत इस्तर त्या ठिकाणी राहिली तोपर्यंत भूतलावर दुष्काळ पडला शेवटी सर्व देवतांच्या विनंतीवरून तामुजला प्राणदान

मिळाल्यावर त्याला घेऊन ती भूतलावर येते. ह्या वेळी तिचे नाव अस्टार्टे होते. ह्या कथेवर दक्षकन्या सतीच्या मरणाची व पार्वतीच्या जन्मकथेची छाया पडलेली दिसते.

वरीलप्रमाणे आणखी अनेक संस्कृतींचा त्रोटक इतिहास देण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यामध्ये इस्लाम, निग्रो, कनाइट, केल्टिक, टयुटॉनिक, पॉलेनेशियन, फोनेशिअन, फ्रिजिअन, मेक्सिकन, सुमेरिअन, सेमेटिक, हिटाइट संस्कृतींचा समावेश झालेला आपणास दिसेल. वाचकांनी तो भाग मुळातीलच 'पूर्व पश्चिम गोलार्धांतील देवता' ह्या प्रकरणात वाचावा. 'पाश्चिमात्य देवता' ह्या प्रकरणात अर्थातच सध्याचा युरोप व दक्षिण आशिया, रशिया, आफ्रिका खंड आणि दक्षिण अमेरिकेतील पेरु व मेक्सिको येथील इतिहासात वाचावयास मिळेल. इतिहासाबरोबर प्राचीन संस्कृति आणि देवतांचेही दर्शन घडेल.

If we survey the whole of the evidence on this subject we may conclude that a Great Mother Goddess, the personification of all the productive energies of nature, was worshipped under different names, but with a substantial similarity on myth and ritual by many people on Western Asia; (2) that associated with her, was lover, or rather series of lovers, divine or mortal, with whom she mated year by year, their commerce being deemed essential to the propogation of animals and plants, each in their several kind; and further, that fabulous union of the divine pair was simulated and as it were multiplied on by the real, though temporary union or human sexes at the sanctuary of the Goddess for the sake of, thereby ensuring the fruitfulness of the ground and increase of man and beast.' (Golden Bough, XXXI /P. 436, by Frazer)

गोल्डन बॉव या ग्रंथाचा कर्ता फ्रेझर याने आदिशक्तीच्या विश्वव्यापीपणाचा वरीलप्रमाणे निष्कर्ष काढला आहे. सृष्टीच्या जीवनक्रमात अनेक वस्तूंची उत्पत्ति व वाढ होत असते आणि ती फलोत्पादन शक्ती म्हणजेच आदिशक्ति होय, असे भासवीत असते. या शक्तीचे अनेक स्वरूपात जल, स्थल, वायु, पाषाण रूपात पूजन घडत असते. जो त्या फलोत्पादनाला कारणीभूत होतो, संगतीत राहतो, तोच तिचा प्रियकर होतो, मग तो दैवी असो अगर मर्त्य मानव असो. त्याचे एकमेकांशी घनिष्ट संबंध असणे हे मानवसृष्टि व वृक्षसृष्टि यांच्या वाढीला जरूरीचे असते. सृष्टीतील हे कल्पित संबंधच सत्य आहेत असा बडेजाव करून

देवस्थानातारल्या देवाच्या निवासस्थानी मानवही संभोग करून प्रजोत्पादन करू लागला आणि तीच आदिशक्तीची इच्छा होय, असे ढोंगीपणाचे प्रतिपादन करू लागला सारांश आदिशक्तीची मूळ कल्पना तिची वाढ आणि मानवी जीवनात तिचे कार्यांचा अवतार कसा कसा होत गेला, याचे उत्तम चित्र ग्रंथ कर्त्याने थोडक्यात रेखाटलेले आहे.

याच उदाहरण असे की, पूर्वी पाफोस ( Paphos ) या शहरी तेथील राजा सिनिरस याने आपल्या राजकन्या आणि अडोनिस देवाच्या बहिणी यांना याप्रमाणे धार्मिक वेश्या व्यवसाय करण्यास भाग पाडले होते अडोनिस हे राज पुरुषाचे नाव नसून ती त्याची पदवी होती याच्या मूळ पुरुषाने धान्य देवतेच्या सार्वजनिक उत्सव प्रसंगी आपली मुलगी मिरा हिच्याबरोबर संभोग करूनच अडोनिसचा जन्म झाल्ला होता याप्रमाणे अनेक राजकन्येच्या संभोगाच्या कथा उपलब्ध आहेत या प्रेमसंबंधामुळेच अडोनिसराजे जसे देवीचे पुजारी होते, तसे ते तच प्रियकरही मानले जात होते इजिप्त देशांतही राजा हा देव मानला जात असल्याने त्याची पत्नी देवी मानली जाई ' Wife of the God ' अथवा ' Mother of God ' मानली जात असे

One fa ls to unders'and that men create their Gods in their own likeness and that when the creator is a savage, his creatures the Gods are savage al-o ' ( P 191 )

फ्रेझर या ग्रंथकाराचे वरील मत असे की, मानवच आपले देव निर्माण करतो आणि त्यामुळे प्रत्यक्ष गुणधर्मात अथवा स्वरूपात ते त्या मानवाप्रमाणे असतात देवनिर्माता जर सुसंस्कृत असेल तर देव सुसंस्कृत असतील, जसे विष्णु लक्ष्मीचे वार्तीत म्हणता येईल. पण निर्माताच जर रानटी असेल तर त्याचा देव त्याच्या आचारविचाराबरहुकूम तयार झालेला असेल यामुळे काही देवता संस्कृत तर काही प्राकृत हा प्रकार निर्माण झालेला आहे

भारतीयसंस्कृतीत पार्वती ही शंकराची पत्नी मानलेली असली तरी ती भगिनीही मानलेली आहे तसेच ग्रीक पुराणात क्रोनस देवाने आपली बहीण व्हीआ बरोबर विवाह केला तर त्याचाच पुत्र झेऊस याने आपली बहीण हिरा बरोबर विवाह केलेला दिसून येतो अशा गोष्टी का घडतात तर त्या वेळची राजकीय परिस्थिति तशी होती आणि ते चित्र देवतांचे संबधात उमटलेले दिसते गादीचा वारसा आपल्याच रक्ताच्या कुळांत रहावा, सरमिसळ होऊ नये म्हणून राजा आपल्या बहिणीबरोबर विवाह करी. मातृसत्ताक पद्धतीतून पितृसत्ताक पद्धतीमध्ये गादीचा वारसा बदलून घेण्याच्या वेळची ही परिस्थिति होती आणि देवादिकांचे संबधावर

त्याचेच प्रतिबिंब पडलेले आपणाला दिसून येते. यामुळेच मानव आणि देवता यांच्या मध्ये बरेच साम्य काही वेळा दिसून येते.

मानवप्राणी राहत असलेल्या या विश्वाची उत्पत्ति केव्हा झाली याचे निश्चित प्रमाण कोणीच खात्रीने सांगू शकत नाही. कोणी लक्षावधी वर्षे झाली असे म्हणतात, तर कोणी हा आकडा पाच कोटी वर्षांपर्यंत मागे नेतात. भूतलावर मानवप्राण्याची वस्ती केव्हापासून झाली याचीही निश्चित कालमर्यादा कोणाला देता येत नाही. यासाठी खिस्तपूर्व अगर ताम्रयुगापूर्वीची माहिती गोळा करण्यासाठी पूर्वीची उत्खनने, ताम्रपट, गुहा, हाडांचे सांगाडे, पाषाणाची अस्त्रे यांचा संशोधकांना अभ्यास करावा लागतो. अवशेषांचे परिशीलन केल्यावरच तो ऐतिहासिक काळापर्यंत मानवाच्या प्रगतीचे टप्पे अनुमानाने सांगू शकतो. अशा अवशेषात हजारो वर्षांपूर्वी चालत असलेल्या सांस्कृतिक कार्यक्रमाचे प्रकार उपलब्ध झालेले आहेत. सुप्रसिद्ध संशोधक ई. ओ. जेम्स असे आवर्जून सांगतात की, **प्राचीन सांस्कृतिक कार्यक्रम ज्या श्रद्धेने अगर विश्वासाने केले जात होते, त्याच श्रद्धेने आणि आपुलकीने आपण त्यांच्याकडे पाहिले पाहिजे. हे कार्यक्रम वर्तमानकाळाच्या निकषावर घासून त्यावर तार्किक भाष्य करणे सयुक्तिक नव्हे.**

इजिप्त, मेसापोटेमिया, आशियामायनर, सिरीया इत्यादि प्रदेश हे प्राचीन संस्कृतींचेच भाग म्हणून समजले जातात. यामध्ये पर्शियाचे आखात, कॅस्पियन समुद्र, क्रीट बेटे, पूर्वेस सिंधुखोरे आणि पश्चिमेस उत्तर युरोप खंडाचा भाग येतो. या भागामध्ये आदिशक्तीची पूजा, वृक्ष वनस्पतींच्या वाढीच्या काल-चक्राशी निगडीत असून पुरुषप्रकृतींचा देव हा त्या मायास्वरूप आदिशक्तीचा मुलगा म्हणूनच दाखविलेला आहे. आशियामायनरपासून मायसोनियन संस्कृती-पर्यंत काही स्थानिक फरक ध्यानात घेऊनही असे म्हणता येते की, प्रत्येक ठिकाणी आदिशक्तीविषयक मध्यवर्ती कल्पना आणि शेतीविषयक उत्पादनात त्याची घातलेली सांगड ही सारखीच दिसते. भारतामधील वैदिक धर्म सोडला तर इतर प्रमुख इसाई, इस्लाम, यहुदी इत्यादि पंथाची उत्पत्ति त्याच भू-प्रदेशात झालेली आहे. या धर्मांची वेदान्त-तत्त्वे, व श्रद्धास्थानांची निर्मिति याच भागात झालेली असल्याने उपलब्ध साधनांच्या आधारे त्यांचा चर्चा करून काही निष्कर्ष काढल्यास ते यथायोग्य होणार आहे.

या भागात प्राचीन शिल्पकलेतील अनेक नमुने उपलब्ध झालेले आहेत आणि त्यांवरूनच सांस्कृतिक गोष्टी व पुराणकथा यांचा उलगडा होण्यास मदतच होते. शिल्पकलेने विनटलेल्या अनेक मोठमोठ्या गुहा उपलब्ध झालेल्या असून

त्यांमधून जे अस्थिपंजर उपलब्ध झालेले आहेत, ते पंचवीस हजार वर्षांपूर्वीचे असावेत असे तज्ञांचे मत आहे. पशूंचे अस्थिपंजर ह्या ठिकाणी आपोआप जाऊन पडलेले नाहीत. उदरनिर्वाहासाठी मानवांनी ते पशु तेथे नेले असले पाहिजेत, म्हणजेच मानव आपली उपजीविका त्या काळी पशुपक्ष्यांवर करीत असे, हे मानावे लागते. निऑक्स या फ्रान्समधील शहरी अर्धा मैल खोल असलेली एक गुहा आहे. तसेच लासकॉक्स या ठिकाणीही एक गुहा असून तिच्या भिंतीवर सुंदर चित्रे चितारलेली आहेत. सुमारे वीस हजार वर्षांपूर्वी या ठिकाणी एक जुने धर्मपीठ असावे, असे मानण्यात येते. एके ठिकाणी गेंड्याच्या मुंडक्यांचे पुतळे खडकाला टेकून उभे केलेले आहेत.

'The numerous skulls and headless bodies that have been found in Palaeolithic and Neolithic sites suggest that the custom of cannibal feast was wide-spread and peristent'

अशा प्रकारच्या गुहांमधून धर्मकृत्ये चालत आणि नरबलीची प्रथा त्या वेळी प्रचारात होती, याचे दिग्दर्शन येथे होते. दहा सहस्र वर्षांपूर्वीच्या अश्मयुगामध्ये चित्रकला अस्तित्वात होती आणि ती भांड्यांवर चितारली जात होती, असे उपलब्ध अवशेषांवरून दिसून येते. टेपगवरा (निनेव्हजवळ) व टेलहसूना या ठिकाणी जे उत्खनन झाले, त्यामध्ये मिळालेली मातीची भांडी वरील विधानाला दुजोराच देतात. ते अवशेष असेही दाखवितात की, त्या काळी आदिशक्तीचा प्रसार भरपूर प्रमाणात झालेले होता.

'The goddess cult became the predominent influence, until at length she herself appeared in funerary architecture and its symbolism in her life.'

(Myths & Rituals in the Ancient Near East by E. O. James; हे संदर्भ, पृ. ३२, ३६, ११३, २४३, या ग्रंथातील समजावेत.)

इजिप्तमधील पिरॅमिड्स् हे खिस्ताब्द सुमारे तीन सहस्र वर्षांपूर्वी मृतांच्या स्मृति म्हणून उभारलेल्या आहेत. सक्कारा या ठिकाणी जे उत्खनन झाले त्यामध्ये भिंतीवर व चुन्याच्या दगडावर अनेक लेख कोरलेले आढळले. त्यांवरून ओएसिस व इतर राजे लोक यांचा इतिहास समजून येतो. ओएसिस हा जरी देव मानला गेला असला, तरी तो एक सुधारणावादी राजा होता हे आपल्याला समजून येते. भारतामध्ये श्रीकृष्णाला देव मानीत असले तरी तोही एक राजाच होता. नरकासुराचा वध करून आणि त्याच्या बंदिवासात असलेल्या सोळा हजार

मुलींची सुटका करून, समाजाने पतिता अथवा व्यभिचारी ठरलेल्या त्या मुलींशी विवाहबद्ध होऊन त्याने एक मोठीच सामाजिक सुधारणा केली होती, असे म्हटले तर ते वावगे ठरू नये. सगर राजाने गंगेच्या ओघाचा उपयोग करून घेतला, त्याचप्रमाणे या ओएसिस राजाने नाईल नदीच्या ओघाचा उपयोग करून घेऊन तेथे शेतकीव्यवसाय सुरू केला होता. हा राजा मूळचा जर सीरिया प्रांतातील मानला तर तो स्वजातीय टोळ्या घेऊन नाईल नदीच्या खोऱ्यात आला आणि व्यवसाय सुरू केला. वास्तव त्याला आकाशदेवता नात व पृथ्वीदेव गेब यांचा मुलगा मानला गेले आहे कोणत्याही चांगल्या कृतीस विरोध करणारे सवकाळ असतातच. या नियमानुसार त्याचा शत्रु सेथ (Seth) याने ओएसिरिस त्याच्या या सुधारणावादात विरोध केला. इतकेच नव्हे, तर त्याचा खून करून त्याच्या शरीराचे बारीक तुकडे केले आणि ते नाईल नदीत फेकून दिले. परतु या कामी ओएसिसची पत्नी इसिस ही त्याच्या मदतीला धावली आणि तिने त्याची सुटका केली. हाच ऐतिहासिक कथाभाग इजिप्तमधील पुराणात अंतर्भूत करण्यात आलेला आहे. या मूळ गाभ्यावर निरनिराळ्या व्यक्तींनी आपापल्या मताचे पूट चढविले असल्याने सांप्रत त्या कहाणी विकृत भासतात इतकेच! परतु पुराणातील कथा या केवळ काल्पनिकच आहेत असे मात्र म्हणता यावयाचे नाही!

वरीलप्रमाणे मेसापोटेमियामधील तामुझ इस्टर कथा, सिरियामधील कनाईट संस्कृतीच्या पुराणकथा, बॅबीलोन व मायसेनियन पुराणकथा यांचा साकल्याने विचार केला असता असे स्पष्टपणे दिसते की, त्याकाळी त्या प्रांतातून आदिशक्तीचा प्रसार झालेला होता. माल्टा बेटात जी मंदिरे उपलब्ध झालेली आहेत ती सुमारे खिस्ताब्द तीन सहस्र वर्षापूर्वीची असावीत असे संशोधकांचे मत आहे. या मंदिरात आदि-शक्तीच्या मूर्ति असून त्यानंतर पुरुषप्रकृतीच्या देवताही आढळतात जसे सिबिल ॲटिस, अफ्रोदिता अॅडोनिस इत्यादि. मध्यपूर्वेतील ही देवताउपासना इंग्लंडमध्येही गेलेली आढळून येते. डॉरसेट, अल्बेवरी, नॉरफोक इत्यादि ठिकाणी खडूवर कोरलेल्या स्त्रीदेवतांच्या प्राचीन मूर्ति आढळून आलेल्या आहेत

## पुराण ग्रंथाचे श्रेष्ठत्व

आदिशक्तीचा प्रचार निरनिराळ्या देशांच्या पुराणग्रंथातून जास्त पहावयास मिळतो. परतु हल्लीच्या वैज्ञानिक युगात प्रत्येक गोष्ट सत्याच्या निकषावर घासून तिचा खरेपणा पडताळून पाहाण्याची विचारप्रणाली काही संशोधकांनी अवलंबिल्यामुळे अनेक संशोधकांचा कल या पुराणकथा सर्वस्वी काल्पनिक असाव्यात असे मानण्याकडे झुकलेला आहे. भारताचा पौराणिक इतिहास अनेक पुराणग्रंथांतून विखुरलेला आहे. अर्थात कालांतराने त्यात काही प्रक्षिप्त भाग मागाहून घुसडला

गेला नसेल, असे म्हणता येणार नाही. परंतु याचा अर्थ असाही खात्रीने नव्हे की, जुने पुराणग्रंथ हे विश्वासार्ह नाहीत. पाश्चात्य संशोधकांची यासंबंधीची काही मते पहा.

( १ ) एक रशियन संशोधक मॅलिनोवस्की म्हणतात, ' पुराणकथा या केवळ काल्पनिक भाकडकथा नसून पूर्वी मानव जेव्हा प्राथमिक रानटी संस्कृतीत वावरत होता त्या काळच्या त्या सत्यकथा आहेत. त्या कथा म्हणजे आपण सांप्रत वाचत असलेल्या कादंबरी ग्रंथाचा प्रकार नसून प्राचीन काळी साक्षात घडलेल्या गोष्टींचा इतिहास आहे. जगाच्या आणि मानवाच्या चारित्र्यावर त्या कथा आजही आपले ठसे उमटवीत आहेत ज्याप्रमाणे ख्रिस्ती धर्मपंथीय जनता आपल्या पवित्र बायबल मधील जगाची उत्पत्ति, स्थिति व लय आणि ख्रिस्त येशूचे मुळावरील शुद्ध भावाचे वर्तन या कथा सत्य मानतात, तद्वतच प्राचीन आदमयुगीन मानवाच्या त्या कथा सत्य आहेत अर्थात त्या कथा वर्णन करताना मानवी जीवनाला आवश्यक असणारी धार्मिक जीवनमूल्ये, सामाजिक कर्तव्ये, स्वकर्तव्यांतील प्रामाणिकपणा आणि नित्य उत्पन्न होणाऱ्या दैनंदिन गरजा यांची सांगड घातलेली असते ही वचने सत्य मानल्याने मानवी उत्कर्ष होण्यास मदतच होते. '

( २ ) दुसरे एक संशोधक मॅरेट म्हणतात, ' पुराणग्रंथाचे काम म्हणजे मानवी कुतूहल पुरे करणे हे नसून मानवी श्रद्धा दृढ करणे हे आहे. शंकेखोराचे समाधान करणे आणि त्याच्या निरर्थक प्रश्नांची उत्तरे देणे हे या ग्रंथाचे काम नसून भाविकाची श्रद्धा वाढविणे व ती दृढ करणे हे या ग्रंथाचे काम आहे.

( Faith, Hope & Charity in Primitive Religion, 1932, P 106 )

पुराणग्रंथाकडे पाहण्याची वाचकांची दृष्टि कशा प्रकारची असावी, हे दर्शविण्यासाठीच वरील दोन उतारे मुद्दाम घेतलेले आहेत आपल्या पुराणग्रंथामध्ये जर श्रद्धा आणि विश्वासपूर्ण दृष्टीने आपण पाहिले तर त्यामध्ये प्राचीन इतिहासच आपल्याला सापडेल. त्यात त्या वेळच्या सांस्कृतिक चालीरीति आढळतील आणि त्यांची उत्क्रांति कशी झाली हे आपल्याला समजून येईल.

देवता आणि ऋतु यांचे संबंध एकमेकांशी निगडित झालेले आहेत. इजिप्त हा देश नाईल नदीच्या पाण्यावर अवलंबून असल्याने, त्या नदीचे पूर व पाण्याचे ओसरणे यावर वर्षारंभ अवलंबून असतो. तसेच धान्याची पेरणी व कापणी यावर काही इतर ऋतूंची मांडणी झाली ज्याप्रमाणे भारतामध्ये गंगा नदीचा प्रतिनिधि भगीरथ मानला जातो कारण त्यानेच पश्चिमाभिमुख प्रवाह खाली भारता-

कडे वळविला, तद्वतच नाईलचे खोरे सुपीक करण्याचा मान ओएसिस याच्याकडे असल्याने त्याला नाईलचा प्रतिनिधि मानण्यात येऊ लागले. यामुळे नदीच्या प्रवाहाच्या अनुरक्षून त्याचे जन्मोत्सव अथवा पुण्यतिथी उत्सव साजरे होऊ लागले. धान्यपेरणी व कापणी हे कार्यक्रम आदिशक्तीच्याच इच्छेने होतात, असे मानल्या-वर त्या त्या काळी देवतांचे उत्सव चालू झाले. ओएसिसची प्रतिमा कबरीतून एका ठराविक वेळी वर काढणे, ती सोन्याच्या मुर्तीत ठेवणे, त्यावर वाळी व रेती पसरणे आणि पाण्याचे सिंचन करून आठवडाभर त्याच स्थितीत ठेवणे, तसेच चोविसाव्या दिवशीं ती प्रतिमा पुन्हा कबरीत ठेवणे, या कार्यक्रमावर चित्रे काढली जाऊ लागली. त्या चित्रांमध्ये जवळपास धान्याची कणसे अगर नाईल नदीच्या पाण्याचा प्रवाह दाखविण्यात येऊ लागला. या कार्यक्रमासंबंधच्या कथा पुराणात लिहिल्या गेल्या आहेत, सिरिया, मिसेन, यहुदी, बॅबीलोनियन संस्कृतींच्या व वर्षा-रंभीच्या कथा या अशाच ऋतूच्या आधारे लिहिलेल्या आहेत.

' Whether or not the mother Goddess was the first deity, the wit of man devised her symbolism unquestionably is a predomnant feature in the archaeological record of the ancent world of Western Asia, the Indus Valley and the Agean cult. ' ( James, Page 113 )

पश्चिम आशिया, सिंधुखोरे, इजिप्शियन संस्कृति इत्यादींमध्ये मातृशक्तीचे स्वरूप मानवाने प्रथम निर्माण केले हे आपल्याला अवशेषावरून दिसून येते. पुढची पायरी म्हणून क्रमाक्रमाने पति असणे, मुले होणे इत्यादि नाती जोडण्यात येऊ लागली. प्रथम ही शक्तिरूपे कुमारी स्वरूपात मानली गेली. परंतु पुढे पुढे त्यांना पुरुष जोडीदाराची आवश्यकता भासू लागली. तेव्हा विवाहसमारंभ आले. मग मुलेबाळे आली! भूमाता म्हणून ती धान्य व वनस्पति यांची उत्पादक बनली, वनस्पतीची वाढ करणारी झाली. क्रमाक्रमाने फल आणि पुष्पदायी झाली. म्हणजेच एकच देवता निरनिराळ्या स्वरूपात मानली गेली. इनाना अथवा इष्टर ही देवता माता व पत्नी या दुहेरी भूमिकेत वावरू लागली. तसेच मॅग्नाडोलेरोसा ही या निनेह, निंतू, अरुण इत्यादि नावाने ओळखली जाऊ लागली.

प्राचीन काळी राजा हा पृथ्वीपति मानला जात असे. लोकांच्या सुख-सोयींची व्यवस्था करणे हे काम उत्तम रीतीने पार पाडल्यावर त्याला सर्व साधनसंपन्न करणारी शक्ति ही राजाच्या आश्रयाने असते असे मानण्यात आले. ह्या अदृश्य शक्तीचे महत्त्व वाढविण्यासाठी राजेलोक तिला स्वर्गाची राणी, अंतरिक्षाची स्वामिनी, भू-देवता इत्यादि नावाने ओळखूं लागले, या त्यांच्या सहवासामुळे

लोकांनी त्यांना एकत्र जरडून टाकले. देवताचे विवाहसमारंभ राजेलोकांनी साजरे करीत आणि त्यांच्या मिरवणुकी काढाव्यात. हा एक नित्याचाच प्रकार होऊन बसला. इजिप्तमध्ये हॅथोर व इसिस, सिरियामध्ये अनात व बाल, यहुदी पुराणात अवरोह व अष्टारोह या जोडया आढळून येतात.

वरील अनेक कारणासाठी सांस्कृतिक कार्यक्रमांमधून पुराणकथा अवश्य वाचल्या गेल्या पाहिजेत. विश्वाचे कोडे अद्याप शास्त्रज्ञानाही सुटलेले नाही. तेव्हा आपल्या पूर्वजानी ते कोडे उलगडण्यासाठी काय काय भगीरथ प्रयत्न केले, याचे दिग्दर्शन या देवताचा इतिहास पाहून होते. विश्वनिर्मितीच्या वेळेचा विस्कळीतपणा घालविण्यासाठी, अंधकाररूपी राक्षसाचा नाश करण्यासाठी, दुष्ट प्रवृत्तींचा नाश करण्यासाठी प्रथम देव-दानव युद्धे झाली. त्यांची वर्णने पुराणात वर्णिली गेली. विश्वाची घडी बसविताना सत्प्रवृत्तींचा कसकसा विजय होत गेला आणि त्यापासून आजच्या मानवाला कसे मार्गदर्शन मिळेल ते पुराणवाचनाने समजते. तेव्हा तात्पर्य काय की प्रत्येकाला आपल्या धर्माच्या पुराणग्रथाचे वाचन करणे अतिशय आवश्यक आहे.

पश्चिम गोलार्धात अनेक संस्कृतींचा समावेश आहे, अनेक वंशांचा समावेश आहे. त्या सर्वांचा या ठिकाणी समग्र परामर्श घेणे कठीण आहे. तेव्हा काही प्रमुख संस्कृतींचा विशेष ऊहापोह करून इतरांचा त्रोटक निर्देश करणे स्थलमावी अपरिहार्यच होणार आहे.

## मिसरसंस्कृति

या भागातील मिसर देशाची संस्कृति फार प्राचीन मानली जाते. तेव्हा आपण त्या संस्कृतीचा इतिहास प्रथम पाहू. सनपूर्व सुमारे ४००० वर्षांपूर्वी ही प्रथम स्थापन झाली आणि इ. स. ५ व्या शतकात संपुष्टात आली. सुमारे ४॥ हजार वर्षे ही संस्कृति प्रामुख्याने गाजत होती. या देशातील मेमफॉस, टानिस-शहरी सन १८८३ साली उत्खनन झाले. हे संशोधन फ्लिंडर्स पेट्री याने केलेले आहे. तसेच दुसरे एक संशोधक सर जॉन मॅसरेपो यांनी उनास येथील मृतराजाचा पिरॅमिड उघडला, त्या वेळी काही गोष्टी दृग्गोचर झाल्या. 'A Book of Dead' हा या संस्कृतीचा पुराणग्रंथ आहे आणि तो फार महत्त्वाचा समजला जातो. त्याप्रमाणे टेटोचा पिरॅमिड आणि पेपी येथील पिरॅमिड्स उघडले जाऊन त्यांची माहिती प्रकाशात आली. येथील सर्व अवशेषांचा विशेष अभ्यास केल्यावर संशोधकांना असे दिसून आले की, पिरॅमिड्स या कलाकृति खिस्ताब्द पाच सहस्र वर्षांपूर्वीच्या असाव्यात. तसेच इतर ठिकाणी झालेल्या उत्खननात असे आढळून

आले की, मंदिराभोवती माणसांना राहण्यासाठी घरे बांधलेली असत. उत्तम रस्ते बांधलेले असून बाजूला पाणी वाहून नेण्यासाठी उत्तम गटारे होती. सिंधुसंस्कृतीमधील हराप्पा येथील उत्खननात ज्याप्रमाणे ह्या शहरातील बागा, चौक, बाजारपेठा इत्यादि आढळून आल्या, त्याचप्रमाणे या ठिकाणीही आढळून आल्या आहेत. एका राजाच्या राजवाड्यातील दिवाणखान्याचा आकार तर ४२३ X २३४ फूट इतका होता. भिंती चुन्याने रंगविलेल्या असून त्यावर द्राक्षांच्या वेलींचे चित्रण होते. मंदीराचे प्रवेशद्वार खुजे असून गाभाऱ्यात दाट अंधार असे.

या संस्कृतीमध्ये वृक्षदेवतांची पूजा केलेली आढळते. ही संस्कृति पंचमहाभूतात्मक देवतानाही मानीत होती. त्याचप्रमाणे या संस्कृतीत पशूंचीही पूजा केली जात असे, हे त्यांच्या पशुमुखी देवतावरून कळण्यासारखे आहे. त्यांच्या पशुमुखी देवताची ही प्रतिके पहा.

बास्टदेवी—मार्जारमुखी; सेबेकदेवी—मगरमुखी

रा देव[1]—ससाणामुखी; अनुबिसदेव—कोल्हामुखी इ० इ०.

पिरॅमिड्समध्ये जे काही देवताचे अवशेष मिळाले आहेत, त्यावरून काही देवता बेडकमुखी, सर्पमुखी व काहींचे चेहरे चतुर्मुख असे आढळून आले आहेत. काही संशोधकांचे तर असे म्हणणे आहे की, गाई व बैल यांची पूजा करण्याची पद्धत आर्येतर संस्कृतीत फार पूर्वीपासूनच होती. वेदकाळी इन्द्र-वरुणाना गाईचा बळी दिला जात असून आर्येतराना हे आवडत नाही, हेही आर्यांना ठाऊक होते. गाईसारखी शिंगे असलेली देवता मिसरसंस्कृतीमध्ये आहे. अथर्ववेदामध्ये 'गोहत्या हे पाप आहे, गोहत्या करू नये.' हे प्रथमतःच नमूद करून ठेवलेले आहे. ह्यावरून संशोधकांचे असे मत झाले आहे की, गाईला असलेले पावित्र्य आर्यांनी इतरांकडून उचलले आहे, आणि ते तिचे पावित्र्य आजतागायत त्यांनी कायम राखिले आहे. पण भारतीय संस्कृतीचा इतिहास पाहिला तर हे खरे वाटत नाही.

### पक्ष्यांना महत्त्व का?

या संस्कृतीमध्ये आत्म्यासंबंधी विवेचन आणि संशोधन झालेले होते व त्याच्या स्वरूपाबद्दल निरनिराळे विचार प्रचलीत होते. देवादिकांची वस्ती

---

१ टीप—भारतात सूर्य, रवि या नावाने ओळखला जातो, त्या शब्दाचा अपभ्रंश असावा.

अंतराळात असते. पक्षी हा आपल्या पंखाद्वारे अंतराळात उडतो. पर्यायाने तो कदाचित देवलोकाप्रत देखील पोहोचू शकतो, किंबहुना तो देवांच्या सान्निध्यातच वावरत असतो. यामुळे त्यांनी अशी कल्पना केली की, मानवी आत्मा हा देखील एक पक्षीच असून त्या रूपाने तो देवलोकात वावरू शकतो. देवाचे वास्तव्य अंतराळात असते. तेथे ते कायमचे राहतात, म्हणजे त्यांनाही पंखाची आवश्यक्ता असलीच पाहिजे. या समजुतीमुळे देवाना अगर या ठिकाणी राहणाऱ्या अन्य योनींतील प्राण्यांना पंख दाखविले गेले आहेत. याच संस्कृतीत केवळ अशी समजूत होती असे नव्हे, तर अमेरिकेत रेडइंडियन लोकांचीही धारणा अशीच होती नि अजूनही आहे की, पक्षी हा मानवाच्या मृत्यूनंतरचे दृश्य स्वरूप आहे. व्हर्जेनिआमधील चौहाटन वंश असे मानतो की, त्याच्या जमातीचा प्रमुख त्याच्या मृत्यूनंतर पक्षीरूपाने त्याच्यामध्ये वावरतो. अझेटिक वंशाची अशी समजूत आहे की, युद्धात वीराचे मरण प्राप्त झालेला योद्धा भुंगा बनून निरनिराळ्या फुलातील मधुरस चाखून उत्तम गतीस जातो. ब्राझीलमधील बोरोरो वंश असे मानतो की, मृत्यूसमयी आत्मा स्वप्नामधून शरीराच्या बाहेर जातो आणि पक्षीरूपाने जगात वावरतो. ब्रिटिश कोलंबियामधील बिलिक्विला इंडियन वंशाचे म्हणणे असे की, मानव शरीरातील आत्मा मानेजवळ मणक्यात असलेल्या एका अंड्यात असतो. जर हे अंडे फुटले आणि आत्मा बाहेर गेला तर मानव मृत्यू पावला असेच समजतात. मलेशिया, बोहेमिया व मॅलेनेशिया येथील जनतेची धारणा अशी की, जादुगार-लोक जहाजाची टेहळणी करण्यासाठी त्यांचा आत्मा समुद्रावर पाठवितात. आर्यसंस्कृतीमध्ये शरीर व आत्मा हे निरनिराळे परंतु परस्परपूरक कल्पिलेले असून शरीर नष्ट झाले तरी आत्मा कायम राहतो असेच मानले आहे. पुन्हा मानवयोनी प्राप्त होईपर्यंत तो आत्मा पंचमहाभूतामध्ये विलीन न होता निरनिराळ्या चौऱ्याशी लक्ष योनींमध्ये वावरत असतो. तेव्हा सर्वांचा साकल्याने विचार केल्यास शरीर व आत्मा हे सर्वच संस्कृतींनी निरनिराळे मानलेले आहेत आणि माणसाचे शरीर नष्ट झाले तरी आत्म्याचे अस्तित्व कायमच राहते असेच सर्वांचे म्हणणे दिसते. शेवटी ' आत्मा अमर आहे ' याबद्दल सर्वांचेच एकमत दिसते.

सनपूर्व चार सहस्र वर्षे इजिप्शियनसंस्कृति प्रथम नाईल खोऱ्यात स्थापन झाली व सुमारे इसवी सनाच्या पाचव्या शतकात संपुष्टात आली. याचे प्रमुख कारण म्हणजे पूर्वीचे सूर्यपूजन व नंतरचे ओरिसीसपूजन यामध्ये द्वंद सुरू झाले व हेलिओपोलीस येथील प्रमुख सूर्यपीठाचा पराभव झाला व सूर्यसंस्कृति नष्ट झाली.

( अर्नोल्ड टायन्बी–Study of History, Vol. I, P. 51 )

दोन संस्कृतींमधील मत्सर व द्वेषभावे हेच संस्कृति ऱ्हास पावण्याचे कारण होय. त्यांना समन्वय साधता आला नाही.[1]

या संस्कृतीमधील देवतांची ही पार्श्वभूमि पाहिल्यावर त्यातील काही प्रमुख देवतांचे त्रोटक वर्णन पाहू या. यातील अनेक देवतांचे सविस्तर वर्णन याच ग्रंथात अन्यत्र वाचावयास मिळेल.

## इसिस

इजिप्तमधील मूळ आद्यशक्तीची ही देवता. इ. स. पूर्व १७०० च्या वर्षी ती इजिप्तमध्ये होती. पण कालांतराने ती ग्रीस व रोमन भागांत गेली. इसाई धर्माची ही प्रमुख विरोधक देवता मानली गेली आहे. ती सेब (पृथ्वी देवी) व नत (आकाश देवता) यांची मुलगी होय. असिरिस हा तिचा पति (असिरिस पहा) व त्यापासून तिला तीन मुलगे झाले. त्याची नावे ओसिरिस, होरस व सेट अशी होती. पण पहिला मुलगा ओसिरिस त्याचीही ती बायको मानली गेली आहे. (जेम्स कोश ७/४३४). ही मूळ लिबिअन उत्पत्तीची देवता असेही कोणी मानतात; पण आता ती इजिप्शियन लोकांची प्रमुख देवता मानली गेली आहे. ती लोकांच्या विश्वासास अत्यंत पात्र अशी होती. प्रेम करणारी पत्नी, भूगर्भ देवाची, पत्नी जलप्रलय करणाऱ्या देवाची पत्नी, पितराना अन्नपाणी पोहोचविणारी व नाईल नदीला पूर उत्पन्न करणारी अशी ती मानली गेली आहे. सती आगर सेत असेही ह्या देवीचे नाव होते. जलप्रलयाने सर्व शेतामळ्यांना पाणीपुरवठा करणारी म्हणून तिला सँकेत असे म्हणत. ती नुसतीच जलदेवता नसून, पृथ्वी, धनधान्य व आकाशातील उडुगणांची तिला देवता मानीत. ह्या देवीचे स्त्रीस्वरूप गिधाडासारखे, मस्तकावर शिरस्त्राण व पॅपीरस झाडाचा दंड हातात धारण केलेली व काही वेळा मस्तकावर शिंगे असलेली असे दाखविले जाते.

(जेम्स कोश, १२/७७१)

ह्या देवतेची चित्रे इजिप्तमधील तांब्याच्या नाण्यांवर आढळून आली आहेत. इ. स. पूर्व २० वर्षांच्या एका नाण्यावर ह्या देवतेचे स्वरूप विवस्त्र,

१ टीप—या संस्कृतिमधील द्वेषभावे जसे संस्कृति नष्ट होण्यास कारणीभूत झाले, तसे ज्यू धर्मामध्ये याह्वे यांनी इतर पंथीयांबरोबर असहकार केला. 'Thou shalt have now other God but me' अहुरमज्द याने अमान-रे बरोबर आणि मार्डुक-ब्रेल याजबरोबर असहकार केल्याने त्या संस्कृति बुडाल्या. भारतीयांनी शैववैष्णव पंथीयांमध्ये जसा समन्वय साधला तसे त्यांनी न केल्याने संस्कृति बुडाल्या.

मांडीवर मूल घेतलेले, व होरसला स्तनपान करीत असलेली, असे दाखविले असून कलेच्या दृष्टीने हे चित्र जरा वेधकच वाटते (न्यूमन, चि. २८). दुसऱ्या एका चित्रात ती राजाच्या मांडीवर बसलेली आहे. आणखी एका चित्रात ती डुकरावर पाय पसरून बसलेली व हातात अद्‌भुत शिडी धारण केलेली अशी आहे व त्या ठिकाणी डुक्कर हे स्त्रीत्वदर्शक रूप अगर पशूची चिन्हे दाखविणे हा उद्देश दिसतो. एके ठिकाणी तिचे सर्व शरीर सर्पवेष्टित दाखविले आहे (न्यूमन, पा. १४४). त्यावर पसरलेले पंख हे त्या देवीचे वैशिष्ट्य, दुसऱ्या एका चित्रात दाखविले असून त्या स्वरूपातच ती आपला पति ओसिरिस ह्याला भेटते, पंखाखाली झाकते, आश्रय देते. तशीच ती सर्व मानवानाही आश्रय देते अशी लोकांची श्रद्धा आहे. तिच्या हातात गुलाबाचे फूल असते (न्यूमन, पा. २२२).

ह्या देवींमध्ये अनेक गुण दाखविले आहेत. स्वर्गदेवता, उडुगणाची माता, माया, प्रकृतीची जननी, खलाशी जीवनाची रक्षणकर्ती, सागराचो तारा, मातरडोलोरसा, दुःखी जनाचे सांत्वन करणारी, मानवी जीवनाची रक्षणकर्ती इत्यादि तिचे वर्णन केले जाते. ह्या सर्व बहुगुणामुळे सर्व संस्कृतींमध्ये तिला स्थान मिळाले असून ती लोकप्रिय झाली आहे. ही देवता अनेक नावांनी ओळखली जाते. कशी ती पहा—फ्रिजिअन संस्कृतींत सर्व देवांची माता, अथेनियन–मिनर्व्हा अगर अथेनी, सायप्रस–व्हीनस, क्रेटन–दिक्तेतिना, सिसली–प्रोसरफीन, एल्युशिअन –डिमिटर इ० तिच्या ह्या अनेक नावामुळे तिला अनेक नावांची देवता असे म्हणण्याचा प्रघात पडला आहे. (इ. ओ. जेम्स, पा. १८०)

## नेपथिस

ओसिरिसचा शत्रु सेथ ह्याची ही जोडीदारीण सेब व नाट यांची ही मुलगी होय. तसेच 'अनुबिस' या देवीची ती माता होय. इसिस ही तिची बहीण असून तिच्याबरोबर ही जास्त निष्ठेने वागत असे. तिच्या नवऱ्याने ओसिरिसचा खून केल्यावर त्याच्या प्रेताचे तुकडे जमा करण्यात तिने इसिसला मदत केली आहे. तिची आकृति दाखविताना तिच्या मस्तकावर एक टोपली आणि एक घर दाखवितात. ती जरी इसिसला मदत करी, तरी स्वभावतः ती दुष्ट प्रवृत्तीची आणि लाचखाऊ होती. म्हणजेच हा तिचा स्वभाव इसिसच्या स्वभावाच्या अगदी उलट होता. काही वेळेला या देवतेला मृत्युदेवता मानले आहे.

## मात ( Maat )

ही एक सूर्यदेवता होय. देवाची बोट जेव्हा पाण्यातून प्रथमच वर आली, तेव्हा मात ही देवता त्या बोटीत होती. वास्तव ती एक आद्यदेवता मानली गेली

आहे. वक्तशीरपणा हा सूर्याप्रमाणेच तिचाही एक नैसर्गिक गुण असल्याने तिला सूर्याची कन्या मानले आहे. तिचे स्वरूप दाखविताना तिच्या मस्तकावर शहामृगाची पिसे खोचलेली दाखवितात. याचा अर्थ असा की, सर्वत्र समतोल दृष्टीने पाहणारी ती एक न्यायदेवता आहे. याच कारणासाठी मात या शब्दाला असा अर्थ प्राप्त झाला आहे की, मात म्हणजे सत्य अथवा खरी गोष्ट. बेचाळीस सभासदाच्या न्यायालयात बसून ती सर्व मानवांच्या पापपुण्याचा निर्णय करीत असते.

मत ( Mut )

रा या सूर्यदेवतेची ही पत्नी असून तिला एक मातृदेवता मानले आहे. ही देवी गिधाडमुख असून तिच्या दोन्ही बाजूना पंख आहेत आणि हातामध्ये पापरिसवृक्षाचा दंड धारण केलेला आहे. सूर्याबरोबर तिचे गमन होत असल्याने तिने अनेक लहानसहान देवतांचे भक्षण केलेले आहे. अशर व येरु या गावी या देवतेची प्रमुख स्थाने आढळतात. या मंदिराच्या उत्तर दिशेला तिचा पति रा देव ( सूर्यदेव ) याचेही मंदिर आहे. हे मंदिर खिस्ताब्द १४५० साली राजा अमेन हेटप ( तिसरा ) याने उभारले आहे. मार्गाच्या प्रवेशद्वारीच अनेक सिंहाकृति ओळीत उभ्या केलेल्या आहेत. अंतराळामधील ती राणी मानली असल्याने इजिप्त देशातील अनेक राण्या आपल्या शय्यावर या देवतेचे मुखवटे उठवून घेत असत. ही एक न्यायदेवता होती. राजे लोक न्यायदान करताना ते देवीचे मुकुटातील पिसाकडे लक्ष देत ज्या पक्षकाराकडे ते पीस कलले जाई, त्याचा पक्ष खरा समजून न्यायनिवाडा होत असे.

बास्ट

प्राचीन काळी या संस्कृतीमध्ये मार्जारपूजा करणारे काही लोक होते. त्यांनी ही देवता निर्माण केली मार्जाराला सूर्याच्या उन्हात बसणे फार आवडते, म्हणून देवीला हे नाव प्राप्त झाले असावे. काही वेळा सूर्यदेव रा आणि सेखमठ या देवी-बरोबर बसवितात आणि मग त्या तिघांची त्रिमूर्ति बनते. या देवीचे मुख जरी मार्जारासारखे असले तरी तिचे शरीर मानवी असून पाठीतून दोन बाजूला पंख फुटलेले आहेत. मानेच्या भागातून दोन्ही बाजूना दोन गिधाडाची मुखे बाहेर आलेली दाखवितात. या देवीचा पुत्र खेनसू हा चंद्रदेव मानला जातो. बुआस्तिस येथे देवीचे मंदिर होते.

### हॅथोर

प्रारंभी ही देवता गायीच्या स्वरूपात पूजिली जात होती. परंतु कालांतराने तिच्या स्वरूपात फरक पडत गेला व शेवटी तिला स्त्रीस्वरूप प्राप्त झाले, परंतु तिचे शिंग मात्र कायमच राहिले दोन्ही शिंगाच्या मध्यभागी चंद्रकोर असते. आपण नेहमी पूर्ण चंद्रबिंबामध्ये हरिणाकृति व त्याची लांबलचक शिंगे पाहतो. या देवीलाही शिंगे असल्याने तिला प्रामुख्याने चंद्रदेवता मानले गेले. काही लोक तिला सूर्याचे नेत्रच समजतात. ती पाताळलोकावर अधिकार गाजविणारी आहे काही वेळा तिला रा या सूर्यदेवाची माता, पत्नी व कन्याही मानतात. याचे कारण असे देतात की, ज्या वेळी सूर्योदयापूर्वी चंद्र उगवला असेल त्या वेळी ती माता होय. सूर्याबरोबर चंद्र उगवला म्हणजे ती त्याची पत्नी होय आणि सूर्योदयानंतर चंद्र उगवला म्हणजे ती कन्या होय. इजिप्त पुराणग्रंथात या देवीचे अनेक गुण वर्णन केलेले आहेत. ती जरी चंद्रदेवता असली तरी ती अंतरिक्षदेवता, पूर्व व पश्चिम दिशांची देवता, विश्वदेवता, वनस्पति अथवा धान्यवर्धन करणारी देवता इत्यादि भूमिकांतूनही वावरते. उत्तर इजिप्तमध्ये डेरेराह या ठिकाणी या देवीचे मुख्य ठिकाण असून त्या ठिकाणी एकूण सात हॅथोर देवतांचे पूजन होई. काही वेळा हिला सती देवता म्हणतात. फोनेशियन वंशाची फलोत्पादक आणि वैषयिक प्रणयाची ही देवता होय. सेमेटिक वंशाच्या इस्टर समान ही मानली जाते. काही संस्कृतींनी या देवीला चंद्रदेवता मानलेली असल्याने ती सिलेनी अगर आर्टेमिस समजली जाते (वेबस्टर शब्द कोश). हिटाईट संस्कृतीमध्ये हीची मूर्ति होती.

### ॲस्टार्टे

या देवीचे नाव ॲस्टार्टे ऊर्फ केडेश ही सिंहवाहिनी असून तिच्या मस्तकावर टोप, हातात कमळाचे फूल व नागपाश असून ती नेहमी विवस्त्र असे. ही वैषयिक भावनांना चेतविणारी असून वंशवर्धन हे तिचे प्रमुख कार्य होते. या देवीचे प्रतिक हॅथोरप्रमाणे शिंगे असलेले अगर पक्ष्याच्या चोचीप्रमाणे मुख असलेले दाखवीत (वाल्कर शब्दकोश). सनपूर्व १३ व्या शतकातील एक सोन्याचा शिक्का सापडला असून त्यावर या देवतेचे चिन्ह आहे. त्यामध्ये ती कृश, विवस्त्र, रुंद चेहरा, हातामध्ये पुष्पगुच्छ व वक्षःस्थलावर सर्प रुळलेला दाखविला आहे. (जेम्स धर्मकोश)

### आसिरिस

असिरिस नांवाचा देव पूर्वी इजिप्तमध्ये होता. हे नाव पूर्वी नाईल नदीलाही होते. ह्याला विजय व धान्य-देवता मानीत. ह्या देवाने शेजारचा प्रांत जिंकून घेतल्यावर त्या प्रांतातील इसिस हिच्याबरोबर विवाह केला. इसिस ही असिरिस याची प्रथम बहीण व नंतर पत्नी ह्या दोन्ही नात्याने होती. भारतीय

पुराणात अदिति व दक्ष यांचे नाते असेच दाखविले आहे. ह्या देवीने सर्व कायदे-कानून बनविले. ओसिरिस याचा सेट नावाचा एक भाऊ होता. तो स्वभावाने अतिशय दुष्ट होता. त्याने ओसिरिस ह्याला मारून नाईल नदीत फेकून दिले. इतकेच नव्हे तर नंतर ७२ मित्रांच्या साहाय्याने त्याने त्या प्रेताचे तुकडे तुकडे करून ते सर्व दिशांना फेकून दिले, ( भारतीय पुराणात असेच सादृश्य आढळते. ते म्हणजे विष्णूने सतीच्या प्रेताचे तुकडे करून सर्व दिशांना फेकले आणि *त्यापासून शक्तिपीठे तयार झाली.* ) परंतु ओसिरिसची पत्नी इसिस हिने ते सर्व तुकडे गोळा केले. नंतर मृताला जिवंत करण्याची संजीविनी विद्या तिने शिकून घेतली आणि पतीला जिवंत केले. त्यानंतर ह्या जोडप्याला होरस हा मुलगा झाला. ( ऋग्वेदकालीन इतिहास, सहस्रबुद्धे, पा. ६ )

### सप्तमातृका

आर्यसंस्कृतीप्रमाणे या संस्कृतीमध्ये सप्तमातृकांचे पूजन होत असे. त्यांची नावे अशी— प्रॉसिसमिया, देरव्होनिया, निस्काम, मेरिआ, मॅथोनिआ, मेट्रेस व फ्रड्रिव्हीआ. या सप्तमातृका पूर्वी ब्रिटन देशात आणि फ्रान्समधील कोलोन शहरी पूजिल्या जात होत्या. केल्टिक व ट्यूटेनिक पंथांत त्यांचे अस्तित्व पूर्वीपासूनच होते. या संस्कृतीमध्ये ( EL ) एल ही अक्षरे देववाचक आणि ( ELAT ) एलाट ही अक्षरे स्त्रीदेवतावाचक म्हणून वापरली जातात. उपलब्ध पुराव्यावरून असे दिसून येते की, भारत व मिसर देश यांचे घनिष्ठ संबंध फार प्राचीन काळापासून आहेत. राजा ओसिरस आणि रोम शहरचा राजा बॅक्स यांनी दक्षिण भारताचा दाशरथी रामराजाप्रमाणे प्रवासही केला होता, असे मानण्यात येते. इजिप्शियन भाषेत राम याचा अर्थ ' HIGH ' म्हणजेच उंच असा केला जातो. उंच म्हणजे पिरॅमिड असेही कोणी पुढे जाऊन आपले तर्क चालवितात. सध्या दक्षिण भारतामध्ये लिंगायत समाज ज्याप्रमाणे आपल्या गळ्यात चांदीच्या छोट्याशा पेटीत ठेवलेले शिवलिंग घालतो, तद्वतच प्राचीन काळी इजिप्तमधील स्त्रिया चिनीमातीचे लिंग वापरीत असत. दक्षयज्ञाच्या वेळी सतीच्या शरीराचे ज्याप्रमाणे श्रीविष्णूने आपल्या सुदर्शन चक्राने तुकडे केले, त्याप्रमाणेच सेथने ओसिरसच्या शरीराचे तुकडे तुकडे करून ते नाईल नदीमध्ये फेकून दिले. गंगा-नदीचा उगम जसा श्रीशिवाच्या जटेतून झाला तसाच नाईल नदीचा उगम ओसिरसच्या जटेतून झाला असे मानतात. ही इतकी माहिती उपलब्ध असल्याने डॉक्टर श्री. व्यं. केतकर म्हणतात की, ' ओसिरस व दक्षयज्ञकथा याबाबत संशोधन व्हावयास पाहिजे ' !

( औरंगाबाद जिल्हा गॅझेट, पृष्ठ ३४४. )

## बॅबिलोन संस्कृति

**बॅबिलोनिअन संस्कृति**—ही अत्यंत प्राचीन संस्कृति समजली जाते. सध्याच्या इराणच्या आखाताच्या मुखाजवळ बॅबिलोन हे शहर निप्पूर शहराच्या वायव्य दिशेला वसलेले होते. युफ्राटिस व तैग्रिस या नद्यांच्या दोन्ही बाजूंना ही संस्कृति वसलेली होती. त्या काळी हे साम्राज्यही होते. सनपूर्व १७५० चे सुमारास इराण देशातील कनाईट जमातीने बंड करून येथील पूर्वीच्या सत्ती राजवटीकडून या प्रदेशाचा ताबा घेतला आणि तो सनपूर्व ७०० पर्यंत म्हणजे सुमारे हजार वर्षेपर्यंत टिकविला. हीच बॅबिलोन संस्कृति मानली जाते. शंभर वर्षांच्या आपसा-तील यादवी युद्धामुळे ही संस्कृति शेवटी सिरीयस राजाने बुडविली, असे सर अर्नाल्ड टायन्बी या इतिहासकाराचे मत आहे. भारतामधून बॅबिलोन शहरी खुष्कीच्या मार्गाने व्यापार चालत असे, तसाच तो जलमार्गानेही चालत असून याच बंदरानी युरोप आणि भारत याचा संबंध जोडलेला होता. सनपूर्व सुमारे चार सहस्र वर्षे सेमेटिक या वंशाने या प्रदेशावर स्वारी करून तो काबीज केला होता. या साम्राज्याची व्याप्ति पूर्वेला इराणचे आखात व पश्चिमेला भूमध्यसमुद्र येथपर्यंत होती. या प्रांती स्थायिक झाल्यावर त्यांनी शेजारच्या सुमेरिअन राष्ट्राची संस्कृति जमीच्या तशी उचलून सारे व्यवहार सुरू केले.

शहरातून पक्क्या सडका बांधणे, विटांचे रस्ते तयार करणे, इजिप्त व अरबस्तान यांच्याबरोबर जलमार्गाने व्यापार करणे आणि त्यासाठी मोठमोठी लाकडी जहाजे बांधणे, शत्रुरक्षणार्थ शहरांना चौफेर तटबंदी करणे, देवालये बांधणे इत्यादि अनेक सुधारणा त्यांनी आपल्या वेळी केल्या. समाजधारणेसाठी भारतात मनूने जशी मनुस्मृति तयार केली, तद्वतच त्यांच्या हम्मूराबी राजाने एक कायदासंग्रह तयार केला. त्याला आज 'हम्मूरबीचे कोड' असे संबोधिले जाते. जमिनींची मालकी, विभागणी, टपाल, कालवे, व्यापारी सवलती, मालक-नोकर-संबंध इत्यादि अनेक विषयांची माहिती हा समह वाचल्यावर कळून येते. त्या काळी समाजव्यवस्था किती सुधारलेली होती हे देखील आपल्याला दिसून येते.

कालांतराने सनपूर्व ११ व्या शतकापूर्वी असिरियन सेमेटिक लोकांनी बॅबिलोन साम्राज्यावर स्वारी करून त्याचा विध्वंस केला आणि आपली नवीन राजधानी निनवे या शहरी स्थापन केली. हे नवीन साम्राज्य पुढे अलेक्झांडरने बुडविले.

(ऋग्वेदकालीन इतिहास, चिं. ग. काशीकर, पृष्ठे ३२–३३)

सनपूर्व सुमारे चार सहस्र वर्षांपूर्वीचा तामुझपुराण या नावाचा एक ग्रंथ उपलब्ध आहे. तसेच गिल्गामेश या नावाचाही एक पुराणग्रंथ अस्तित्वात आहे.

त्यावरून या संस्कृतीबद्दल बरीच माहिती कळून येते. गिलगामेशपुराण तर शिलालेखांसारखे मोठमोठ्या पाषाणांवर कोरलेले होते आणि त्यापैकी १२ तुकडे मिळालेले आहेत. या पुराणाप्रमाणे सागरदेवता इआ ( EA ) हिला ते आपसु म्हणतात. ( ' अप्सु मे सोमो अब्रवीत् ' हे एक वैदिक सूत्र आहे. ) हिचे दुसरे नाव झिगरम असे असून अखिल विश्वाची व जलाची उत्पत्ति या देवीने केली असे मानले जाते. अनु + एनलिल + इआ ही त्यांची त्रैमूर्ति होती. अनु ( अनुमती ) देवीची मुलगी नानी असून तिला काही वेळा नाना म्हणून संबोधित. उरुक या शहरी तिचे मंदिर होते. कालातराने ती इस्टरमध्ये विलीन झाली.

भारतामध्ये इंद्राने वृत्राला ठार मारल्याचा कथाभाग जसा आहे, तसाच तो इतर संस्कृतींमध्येही थोड्याफार फरकाने आढळतो. इजिप्तमध्ये ' अपेप ' ( APEP ) या महाभयंकर सर्पाने रा आणि होरस या सूर्यकुलोत्पन्न योद्धया-बरोबर युद्ध केले. चीनमध्ये एक मोठा सर्परूपी दैत्य सूर्यदेवाला गिळून टाकीत असल्याचे वर्णन मिळते, तर उत्तर अमेरिका व ऑस्ट्रेलिया या देशांच्या संस्कृतींत सर्पाची जागा बेडकाने घेतलेली आढळते. या संस्कृतीमधील जोना ( JONAH ) ही अंधाराची देवता एकदा प्रवास करीत असताना तिचे जहाज सागरामध्ये बुडाले. तेव्हा अनेक दिवस ती माशाच्या उदरात वास्तव्य करून नंतरच वर आली. हर्क्युलस हा देव याचप्रमाणे माशाच्या उदरात तीन दिवस राहून मग पृष्ठभागावर आला होता. भारतीय पुराणातसुद्धा भगवान शंकर पार्वतीला गुह्यज्ञान सांगत असताना ते चोरून ऐकण्यासाठी भगवान विष्णु माशाच्या उदरात लपून बसले होते आणि पुढे मच्छिंद्रनाथ या नावाने वावरू लागले, ही कथा सर्वश्रुतच आहे.

या संस्कृतीमधील दुसरी एक देवता–नेबो–तास्मीत याचा शिक्का उपलब्ध झालेला असून तो सनपूर्व सुमारे ४५०० ते ३५०० वर्षांपूर्वीचा असावा असा संशोधकाचा अंदाज आहे. नेबोचे मुख पसरलेले, तर तास्मीतचे कान भयंकर मोठे दाखविलेले आहेत. या जोडप्याने जंगली जनावरे आपल्या हातानी धरलेली आहेत.

ज्योतिषशास्त्राचा उगम आणि अंतराळामधील तारे व ग्रह याचा अभ्यास साधारणतः अक्केडियन संस्कृतीच्या वेळी झालेला असावा. बॅबिलोनमध्ये या शास्त्रांतील तीच आद्यसंस्कृति मानली जात होती आणि त्याची वाढ या संस्कृतीने केली. सूर्य आणि चन्द्र याना देवता मानले गेल्यामुळे साहजिकच इतर ग्रहानाही देवत्व प्राप्त झाले. सूर्य आणि चन्द्र हे अंतराळामध्ये फिरत असल्याने अग्नी

कल्पना केली गेली की, देवाचे कायमचे वास्तव्य अंतराळात म्हणजेच स्वर्गात आहे. सूर्याच्या भ्रमणाचा मार्ग तो अनुदेवाचा मार्ग होय. तेव्हा इतर लहान-महान देवही त्याच पोकळीत राहात असले पाहिजेत. त्यांना जी नावे आहेत ती पुढीलप्रमाणे

गुरु—मेरोडाक,[1] शुक्र—इस्टर,
मंगळ—मार्स, बुध—नेबो,
शनि—निनिम्र, इत्यादि, इत्यादि.

या संस्कृतीमधील ग्रहांची नावे पुढे हेलिनिक आणि रोमन संस्कृतांनी घेतली असली पाहिजेत. या संस्कृतीमधील इस्टर, त्याची अफ्रोदिता झाली, डायना इसिस झाली. अनेक फरक भाषा आणि प्रांतपरत्वे झालेले आढळून येतात. अनु हा ध्रुवतारा, बेल हा विषुववृत्तावरचा तारा, आ हा दक्षिण ध्रुवतारा असे बॅबिलोनियन संस्कृति मानीत असे. भारतामध्ये ज्याप्रमाणे सूर्याचे भ्रमण सात घोड्यांच्या रथामधून होते असे मानले जाते, तद्वतच या संस्कृतीमध्येही मानले जात होते. वार्षिक पंचांग चंद्राच्या गतीवर आधारलेले असे. महिन्यांची नावे त्या त्या समयी उत्पन्न होणाऱ्या धान्यावर आधारित ठेविली गेली. ते महिने आकाशातील एकाद्या ग्रहाच्या आधिपत्याखाली दिलेले आढळून येतात. त्यांच्या वर्षाचा पहिला महिना निझान हा अनु अथवा बेल त्यांच्या अधिपत्याखाली दिला गेला. दुसरा महिना आयर हा आ ह्याच्या अधिकाराखाली गेला. तिसरा सिवान हा महिना चंद्राच्या अधिपत्याखाली दिला आणि सहापासून बारापर्यंतचे सर्व महिने क्रमाने इस्टर, शामस, सूर्य, नेरगल, नेबू, रामन, अन्नर इत्यादि देवतांच्या अधिपत्याखाली गेले. आश्चर्य मानण्याइतकी गोष्ट हीच की, कोणत्याही स्त्री देवतेला यामध्ये स्थान मिळालेले नाही. ग्रहांना प्राप्त झालेले हे देवपण पुढे इतर संस्कृतींनी अनुसरले असले पाहिजे.

## मंदिर कल्पना

या संस्कृतीमध्ये मंदिराची कल्पना पूर्णत्वाला पोहोचली होती असे त्यांच्या बांधणीवरून दिसून येते. कांहींचे असे मत आहे की, ही बॅबीलोनीयन संस्कृति सनपूर्व सुमारे तीन सहस्र वर्षांपूर्वी लय पावली. त्यांच्या मंदिरांची स्थाने उच्च

---

टीप—१ माईर ही अनु (आकाशदेवता) आणि इस्टर (पृथ्वीदेवता) यांची मुलगी असून तिचे मंदिर दिला या गावी होते. यामध्ये तिची सुवर्णाची मूर्ति होती. ऋग्वेदामध्ये या देवीचा उल्लेख 'मार्डिक, मार्डिके, मार्डिकेभि' असा मिळतो (ज्ञानकोश, ७-८४)

टेकाडावर असत. देव अशा उच्च ठिकाणीच जन्म पावतात आणि त्या ठिकाणीच राहावयाला त्याना जास्त आवडते, ही कल्पना त्यानी केलेली होती. मदिराची माडणी चौकोनी असून बाधकाम भाजलेल्या विटाचे होते. चारी दिशाना प्रवेशद्वारे असत. दिसण्यात ती विशेष सुबक नसली तरी रगरगोटी केलेली असे. त्या मदिराना ते 'झिकुराट' (ZIKKURAT) असे म्हणत. मदिराचे वरील बाधकाम गोलाकार व टप्प्याटप्प्याने केले असल्याने शेवटी ते गोपुराकारचे तयार होत असे. मदिराचे प्राकार प्रशस्त असून काही ठिकाणी फरसबदीही केलेली असे

'These courts, which were open to the sky, coverd large areas, as much perhaps as ten or twelve acres in some cases Brick was the material employed for the structure, though wood was used for gateways and roofs of smaller temples '

( James, Page 243 )

तसेच गाभाऱ्यामध्ये देवाची मूर्ति बसविलेली असे.

मेक्सिको अथवा मध्य अमेरिकेमध्ये ज्याप्रमाणे 'टिओकली' (Teocalli) म्हणजे देवताची मदिरे असत, त्याचप्रमाणे ही होती. एकूण बाधणी वरून असे अनुमान काढले जाते की, दोन्ही देशाच्या या मदिराकृति समकालीन असाव्यात. अमेरिकेमधील प्रमुख मदिराच्या बाजूला ल्हान ल्हान ओवऱ्या बाधलेल्या असत आणि त्यामध्ये देवाचा पुजारी वर्ग रहात असे. भारतातील अनेक मदिरामधून ही व्यवस्था केलेली आपण आजही पहातो. मथुरा येथील केशवाच्या मदिराला मी भेट दिली असता पहिल्याच प्राकारात अनेक ओवऱ्यातून सुमारे ११० पुजारी रहात असलेले मी पाहिले आहेत. पण बॅबिलॉनमधील मदिरातून ही व्यवस्था आढळत नाही याप्रमाणे प्रत्येक शहरी एकेक धार्मिक सस्था असे हे निप्पूर येथील उत्खननावरून आढळून आले आहे. त्या शहरी मदिराखाली सोळा एकर जमिनीचा भाग होता. लाकडी छत आणि साठ लाकडी खाब असलेला भव्य दिवाणखाना होता. मदिराचे कागदपत्र सुरक्षित ठेवण्यासाठी खास व्यवस्था केलेली होती दिवाणखान्यात दररोज प्रार्थना होत असे. मदिरात जाताना पाय धुवून जावे लागे. त्यासाठी खास एक हौद बाहेरच बाधलेला होता.

पूर्वेकडील बाजूला लाकडी छत असलेली एक प्रशस्त जागा होती आणि सेमेटिक सस्कृतीचे हे वैशिष्ट्यच मानले जाते. हेहु सस्कृतीमधील मदिरेही याच धर्तीवर बाधलेली होती. त्यामध्ये बाहेरच्या प्राकारातील ओवऱ्यामध्ये व्यवस्थापकाच्या राहण्याची जागा असे पुरोहिताची निवासस्थाने असत. पूजासाहित्य

विक्रेत्याची दुकाने माडलेली असत, क्वचित लहान मुलाची एखादी प्राथमिक शाळाही असे. या ठिकाणच्या धर्मपीठामध्ये समाजातील तंट्याबखेड्याचे न्याय-निवाडे केले जात. बॅबिलॉन, निप्पूर, सिपरऊर ही प्रचड धार्मिक स्थाने हेच काम करीत धर्मपीठाचे बाधकाम भाजलेल्या विटाचे असून, दरवाजे पितळी पत्र्याने मढविलेले असत. आतील बाजू रगविलेली आणि शृगारलेली असे. प्रवेश दरवाजे भरपूर उच्च असल्याने आत प्रवेश केल्यावर एका पवित्र व प्रसन्न वातावरणात शिरल्याची जाणीव भक्ताना होऊन त्याचे मन भक्तिसागरातच डुबून निघत असे. या धर्मपीठातील गर्भगृहात देवतेची मूर्ति असून तिच्या समोरच पडदा सोडलेला असे. गाभाऱ्यामध्ये पुजारी अथवा राजासारख्या व्यक्तीलाच प्रवेश मिळत असे. पावित्र्य टिकविण्याची पराकाष्ठा केली जाई. गर्भगृहाचे नाव 'पापाखू' असे होते, इतर शक्तिपीठाप्रमाणे या पीठात सुद्धा देवतेसमोर एक यज्ञकुड असे बॅबिलॉन येथील मेरोडाक मदिरातील देवतेची मूर्ति आणि तिच्यासमोरचे यज्ञकुड तर सुवर्णाचे होते, असे समजते

भारतामध्ये शैव व वैष्णव याची भक्तिस्थाने एकत्र दिसून येत नाहीत आणि ती ती मडळी अद्यापही त्या दोन देवतासबधाचा द्वैतभाव मनात ठेवून वागत असतात या संस्कृतीमध्येही असा द्वैतभाव काही देवताच्या बाबतीत होता. परंतु तो न वाढावा, म्हणून प्रयत्नही केलेले दिसतात.

'The temple of Merodack at E-sagila and that of Nabu at E-Zida were inseparately associated, for a visit of one means the other also '

देवताच्या एकत्र वसतिस्थानामुळे द्वैतभाव नष्ट होण्यास मदतच झाली आहे. ज्या ठिकाणाहून सूर्योदय झालेला दिसतो ती जागा पवित्र मानून काही मदिरे उच्च पर्वतावर बाधलेली होती. नैसर्गिक आपत्ति किंवा राष्ट्रीय सकटाच्या वेळी या मदिरामधून सामुदायिक प्रार्थना केल्या जात, तसे केल्याने सकटनिवारण होते अशी लोकाची श्रद्धा होती, विश्वासही होता. विसाव्या शतकात आपण राष्ट्रीय सकटाच्या वेळी मदिरातून, मशिदीमधून अथवा चर्चेसमधून सामुदायिक प्रार्थना करीत असतो. घोर सकटाच्या समयी अशा सामुदायिक प्रार्थना धार्मिक संस्था मधून व्हाव्यात म्हणून राजाज्ञाही होत असते.

बॅबिलोन शहरातील बेल देवाचे मदिर फार प्रसिद्ध होते. त्याची बाधणी इतकी मजबूत होती की, हिरोडटसच्या काळापर्यंत ते अस्तित्वात होते, नतर ते काळाच्या उदरात गडप झाले. कारण हिरोडटस हा ग्रथकार त्या मदिराचे वर्णन आपल्या लेखनातून देतो. भारतामध्ये, विशेषत दक्षिणेत, ज्याप्रमाणे सात प्राकार

व उंच गोपुरे असलेली मंदिरे आपल्याला दिसतात त्याप्रमाणेच या मंदिराची बांधणी होती.

' It consisted of eight stages or towers one above another, forming pyramids, the holy of holies being placed upon the highest stage of all the entire building being about 600 ft. high.'

सर्वांत बाहेरील प्राकाराचा आकार ११५६ × ९०० फूट होता. चारी कोपऱ्यात चार देवताची लहान लहान मंदिरे होती. पूर्वेकडे ११७ × ६७ फूट, उत्तरेकडे १४० × ५० फूट तर दक्षिणेला ११७ × ५० फूट असे त्यांचे आकार होते. आतील प्राकार क्रमाने लहान लहान होत आले. त्याची मापे अशी.

पहिला प्राकार : ३०० × ११० फूट, दुसरा प्राकार : २६० × ६० फूट आणि तिसरा प्राकार : २०० × २० फूट.

या भव्य आकृतींची एकूण उंची देवळाच्या पायथ्याच्या रुंदीइतकी म्हणजे सुमारे ३०० फूट तरी होती. मुख्य प्रवेश दरवाजे पितळेचे होते. प्रवेशद्वाराच्या चौकात चितोडगडावरील जयस्तंभाप्रमाणे आठ माळ्याची आकृति असून वर जाण्यासाठी बाहेरील बाजूनेच गोल जिना होता. अगदी वरच्या माळ्यावरील जागेत एक सुवर्णाचा पलंग आणि उत्तम सजावटीचा शामियाना होता. देवांनीच निवडलेली खाल्डियन वंशातील एक स्त्री त्या ठिकाणी राहून देवाची पूजा करीत असे. हे मंदिर सनपूर्व सुमारे तीन सहस्र वर्षे तरी बांधलेले होते. भारतामधील भव्य मंदिरे बांधण्याची कल्पना या संस्कृतीमधूनच भारतीयाना आली असेल की काय अशीही शंका मनाला चाटून गेल्याशिवाय रहात नाही.

निप्पूर येथील एनलिल देवतेचे मंदिर तर सनपूर्व चार सहस्र वर्षांपूर्वीचे असावे असे मानले जाते. कारण खिस्ताब्दपूर्व २७०० साली त्याची प्रथम दुरुस्ती झाल्याचा उल्लेख मिळतो व ती ऊरवन या राजाने केली होती. या मंदिराने अनेक राजवटी उपभोगल्या. पहिली मूर्ति जाऊन त्या ठिकाणी बेलदेवतेची मूर्तीही आली. कालांतराने ती बदलून तिच्या जागी मेरोडाकची आली. सनपूर्व १२०० साली सगिला राजाने ते मंदिर पैशासाठी लुटले आणि त्याची मोडतोडही केली. पुढे असिरियन राजवशाने ते मंदिर पुन्हा बांधले. सनपूर्व सातव्या शतकात पुनरपि त्याची मोडतोड झाली आणि भक्तांनीच एकत्र येऊन त्याचा जीर्णोद्धार केला.

केवळ भारतातील मंदिराचीच मोडतोड इस्लामी राजसत्तांकडून केली गेली आणि इतर देशातील मंदिरांना धक्का लागला नाही, असे वरील माहितीवरून मुळीच म्हणता येणार नाही. बरे, ही मोडतोड थांबली आहे असेही नाही. या

विसाव्या शतकाच्या मध्यकाळी दक्षिण भारतात लोकशाहीच्या जमान्यात खिश्चन जमातीच्या हाती राजसत्ता आल्यावर त्यांनी हिंदूंची शेकडोंनी मंदिरे उध्वस्त केली (अथवा करविली), असे इतिहास सांगतो. हे तर काहीच नव्हे. निदान वरील परिस्थितीमध्ये खिश्चनांनी दुसऱ्यांची मंदिरे लुटली, जाळली पण या विसाव्या शतकात आणि लोकशाही नांदत असलेल्या अमेरिकेसारख्या राज्यात काय घडत आहे, ते पाहण्यासारखे आहे. गेली काही वर्षे अमेरिकेमध्ये निग्रो विरुद्ध गोरे लोक यांचे जातीयवादावरून भांडणे चालू आहेत. सरकारने जरी सर्वांना समानतेची वागणूक मिळेल असे घोषित केले असले तरी प्रत्यक्षात मात्र उलटाच प्रकार चालला आहे. याच संदर्भात श्री. एच आर. व्होरा, मुंबईच्या 'टाईम्स ऑफ इंडिया' या अग्रगण्य वृत्तपत्राचे एक वातमीदार दिनांक २२-९-१९६२ रोजी तेथून लिहितात की, 'जॉर्जिया राज्यातील सघर या गावी माउट मेरी बॅप्टिस्ट चर्चचा दोन दिवसापूर्वी गोऱ्या लोकांनी विध्वंस केला. याचे कारण असे की, ते चर्च निग्रो जमातीच्या चळवळीचे केन्द्र होते. एका खांबावर लटकलेली चर्च-मधील घटा, राखरूपाने तेथे धुमसणारे अवशेष आणि जळक्या चर्चभोवती सजल नेत्रांनी प्रार्थना करणारे असंख्य निग्रो स्त्रीपुरुष हे सारेच हृदय हेलावून सोडणारे चित्र होते. ते निग्रो स्त्रीपुरुष टाहो फोडीत होते, 'स्वधर्मीय असूनही आमच्यावर उलटलेल्या या गोऱ्या लोकांपासून नि त्यांच्या छळापासून आम्हाला वाचवा' तीन आठवड्यापूर्वी लीजबर्ग या दुसऱ्या एका गावी तेथील एक चर्च जमीन-दोस्त करण्यात आले. या भक्तिस्थानांच्या नाशाव्यतिरिक्त निग्रो पुढाऱ्यांना गोळ्या घालणे, त्यांची धरपकड करून त्यांना क्रूरतेने वागविणे वगैरे अत्याचार चालूच आहेत.'

या ठिकाणी विशेष लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे आक्रमक आणि आक्रमण सहन करणारे दोन्ही समानधर्मीय, म्हणजे खिश्चन, आहेत. तेथील केन्द्र सरकार या आक्रमकाच्या विरुद्ध आहे, इतकेच नव्हे तर निग्रोंना साहाय्यक असूनही हे अत्याचार त्या सरकारला टाळता आले नाहीत. किंबहुना सर्वाधिकारी व्यक्तींनाही यामध्ये बळी पडलेला आहे. मग भारतासारख्या निधर्मी राज्यात सरकार मूग गिळून बसले असता एकाद्या शांतताप्रिय जमातीवर आक्रमण न झाले तरच नवल! असो. आपल्याला एवढेच पहावयाचे की, धर्मस्थानावरही अत्याचार करणारे नराधम युगानुयुगे वावरत आहेत आणि आणखी किती युगे ते वावरणार आहेत, ते एका आई अंबेलाच ठाऊक!

आपण वर्णन वाचीत असलेल्या या भूभागात अनेक संस्कृति आल्या आणि लयाला गेल्या, त्यांची नामनिशाणीही राहिलेली नाही. त्या त्या संस्कृतींचे अवशेष आणि कथा-पुराणातून मिळत असलेल्या इतिहास हाच केवळ स्मृति म्हणून उरलेला

आहे मेलेल्या माणसाचा देह पुरल्यानंतर बाकी उरणाऱ्या राखेप्रमाणे! या सर्व संस्कृतींमधून आदिशक्तीचे पूजन होत होते आणि त्यासंबंधीची माहिती जगाचे ग्रामग्रंथरूपाने या ठिकाणी आपण पहात आहोत

## सुमेरिअनसंस्कृति

सुमेरिअनसंस्कृति ही सर्वात आद्य समजली जाते त्यानंतर क्रमाक्रमाने इतर संस्कृति उदयाला आलेल्या आहेत सनपूर्व सुमारे पाच सहस्र वर्षे[1] तैग्रिस व युफ्रेटिस नद्यांच्या दुआबात हे राष्ट्र वसलेले होते त्या काळी ते अत्यंत सुसंस्कृत मानले जाई निप्पूर ही राजधानी होती राष्ट्राच्या नावावरूनच या संस्कृतीला 'सुमेरिअन संस्कृति' हे नाव प्राप्त झाले आहे हा वर्ग शहरे वसवून त्यामध्ये राहात असे जमिनीची लागवड करी पारदर्शक कांच तयार करी आणि लिहिण्याचा मजकूर भाजलेल्या विटांवर कोरण्याचा किंवा खोदण्याची कलाही त्यांना अवगत होती भौतिक शास्त्रात हा वर्ग स्वपक्ष प्रगत होता त्यामुळे नक्षत्रे आणि राशि या त्यांनीच प्रथमतः तिकडे शोधून ज्योतिषशास्त्राचा श्रीगणेशा केला असे मानले जाते नौकानयन शास्त्र त्यांना अवगत होते उत्तम बांधणीच्या जहाजांतून ते इतर देशांशी सलोख्याचे व्यापारी संबंध ठेवीत असत सोने, रुपे, तांबे यांचा उपयोग त्यांना ठाऊक होता उंच उंच शिखरे असलेली मंदिरे आणि कलापूर्ण राजवाडे, महाल बांधण्याचा त्यांना खूप षोक होता बॅबीलोन संस्कृतीप्रमाणे त्यांनी विधिनियम तयार करून समाजव्यवस्था अनुक्रमरीतीने चालविण्याची व्यवस्था केली होती या सर्व गोष्टींमुळेच ते सुसंस्कृत राष्ट्र ठरले होते

(ऋग्वेदकालीन इतिहास, चिं ग काशीकर, पृष्ठ ३२)

या संस्कृतीमध्ये बॅबिलोन व असिरिअन संस्कृतींची खूपच सरमिसळ झालेली असल्याने या संस्कृतींमधील देवता कोणत्या ते निश्चितपणे ओळखणे, कठीण मानले जाते परंतु ज्या देवता त्या दोन्ही संस्कृतींमध्ये नाहीत त्या देवता या संस्कृतीच्या म्हणावयास हरकत नाही भरीस भर म्हणून असे दाखविता येईल की, याच संस्कृतीला कित्येकदा 'खाल्डिअन संस्कृति' असे म्हणतात

(१) अमा एन तुट = सर्व शक्तिमान अशी अनेक देवांची माता

(२) अमा साग गा = शांत स्वभावाची दयाळू देवता

१ टीप — इतिहासकार अर्नोल्ड टायन्बी म्हणतो, ते सन पूर्व २२९८ साली स्थापन झाले ऊर येथील उत्खनन सनपूर्व ४००० वर्षांची संस्कृति दर्शविते त्यालाही सुमेरिअन संस्कृतीच म्हणता येईल

(Study of History by Toynbee P 47)

( ३ ) निना-अमा-दरी = स्वर्गप्राप्ती करून देणारी निनादेवता.
( ४ ) बॅन-अमा = बॅन या देवाची माता.

इनाना, दिंगरसेर, ऐनानची राणी याप्रमाणे आणखी काही स्त्री-देवतांची नावे आढळतात. या ठिकाणी अमा म्हणजे माता हा अर्थ ध्यानात ठेवण्यासारखा आहे. कारण भारतीय संस्कृतीतही तोच शब्द त्याच अर्थी वापरलेला दिसून येतो.

( जेम्स धर्मकोश, ९/१७२ )

सेमिटिकसंस्कृति

सेमेटिकसंस्कृति ही ख्रिस्तपूर्व सुमारे तीन सहस्र वर्षांची आहे, असे मानले जाते. हिचा विस्तार पश्चिम आशिया आणि अफ्रिकादेश यातील मृत समुद्र या भागात झालेला होता. या संस्कृतीमध्ये अनेकांचा समावेश केला जातो. अक्केडिअन, असिरिअन, कनाइट, आर्मेनियन, फोनेशियन, कार्थेजिअन, हेब्रु, अमोनाईट, माओबाईट, अरेबिअन, साबिअन, अबेसिनिअन, इडोमाईट, नबाथिअन, इजिप्शिअन इत्यादि इत्यादि. वरील सर्व वंशीयांमध्ये, भाषेचे, शारीरिक प्रकृतीचे, बुद्धिवैशिष्ट्यांचे बरेचसे साम्य असलेले आढळून आलेले आहे. कपालमितिशास्त्राप्रमाणे मस्तकाची ठेवण, त्यांची लांबी-रुंदी इत्यादि गोष्टीत साम्य असे. सिरिअन्स व आर्मेनिअन्स हे एकाच वंशाचे असावेत. आराम-सोबा हे शहर कॅनन व इतर प्रदेशाची राजधानी होती. लेबनॉन येथे राजधानीच्या मागील बाजूलाच मौंटहेरमॉनचा प्रदेश होता. नेबटिअनवंश हा काहींच्या मते अरबवंशच होय. तर दुसरे कोणी तो आर्मेनिअनवंशाचा असावा असेही मानतात. अरब संस्कृतीचे वडपण आल्यामुळे तो वंश त्या संस्कृतीचा मानला जातो. परंतु या बाबतीत ख्रिस्ताब्दापूर्वीचा जो पुरावा उपलब्ध आहे त्यामध्ये ' अरब ' शब्दाचा उल्लेख आढळून येत नाही.

( जेम्स धर्मकोश, ११/३७८ )

टामुझ हा पश्चिम आशियामधील सेमेटिक वंशाचा प्रमुख देव होय. या संस्कृतीमधील पुराणग्रंथ असे सांगतात की, अफ्रोदिताच्या आज्ञेप्रमाणे टामुझाने आपल्या कन्येवर बलात्कार केला ( भारतीय पुराणात ब्रह्मदेवाने आपल्या मुलीवर बलात्कार केल्याचे नमूद आहे. ). अशी विपरीत आणि विचित्र आज्ञा टामुझला देण्याचे कारण असे सांगितले जाते, की ह्या मुलीने एकदा अफ्रोदिताचा अपमान केलेला होता. त्याचा सूड घेण्यासाठी तिने टामुझाला अशी आज्ञा केली होती. प्रत्यक्ष पित्याने बलात्कार केल्याने ती मुलगी अत्यंत शरमिंधी होऊन तत्क्षणीच पळत पळत रानावनात गेली. आत्महत्या करून देहाचा—प्रत्यक्ष पित्याने बिटाळलेल्या

देहाचा-नाश करण्याचे तिने ठरविले. परतु वेळीच इतर देवानी तिचे मतपरिवर्तन करून तिला त्या विचारापासून परावृत्त केले. तरीही तिला चैन पडेना आणि परिणामी तिने आपले रूपातर एका वृक्षात केले (भारतीय पुराणातही भगवान विष्णूनी तुळशीवर अत्याचार करून तिचे पातिव्रत्य भगविले, म्हणून तिनेही आपले रूपातर तुळशीवृक्षात केलेले आहे अशी कथा आलेली आहे) आणि ती भूतलावर नादू लागली. कालातराने त्या झाडाच्या खोडातून एका मुलाचा जन्म झाला आणि त्याचे नाव टामुझ असेच ठेवण्यात आले. यालाच पुढे अडोनिस असे म्हणू लागले (भारतीय पुराणात धात्री वृक्षाच्या खोडातून दीर्घश्वासाबरोबर एकादशीदेवीचा जन्म झाला आणि तिने मृदुमान्य राक्षसाला ठार केले अशी कथा आहे.). सिरिया, बॅबीलॉन, सायप्रस, ग्रीस इत्यादि अनेक देशामध्ये या टामुझ देवाची पूजा होत असे

हडाड ही या सस्कृतीमधील मेघगर्जना व विद्युल्लतेची देवता होय त्याच्या पत्नीचे नाव होते **अत्तार-गॅटिस** अनिरत पर्जन्य पाडून सदैव समृद्धि राहावी म्हणून शेतकरीवर्ग या जोडप्याची पूजा करीत असे या जोडप्याला पुढे एक पुत्र झाला आणि त्यामुळे त्या तिघाची या सस्कृतीची त्रैमूर्ति बनली. त्याची मदिरे होमस, रापेनी व लेबनॉन या शहरी होती असे जरी असले तरी त्याचे प्रमुख स्थान मात्र दमास्कस या गावी होते अत्तार गॅटिस म्हणजेच **अलाट** नागर व्हीनस ही देवता होय असे मानले जाते तसेच **अस्टर** ही या सस्कृतीची प्रमुख देवता होय (जेम्स धर्मकोश, १२।१८७)

इस्टर

सुमेरिअन सस्कृतीप्रमाणे ती झुझुची मुलगी, पृथ्वी व स्वर्ग ह्याची मालकीण तिचे मूलस्थान उरूक येथे होते इस्टर हा शब्द सेमेटिक आहे. अतिप्राचीन काळी तिला सूर्यदेवता मानीत व त्या कारणास्तव ती पृथ्वी व सूर्य ह्याची देवता मानली गेली कालातराने तिचे रूपातर प्रणयदेवतेमध्ये झाले ह्याच स्वरूपात ती शुक्र (व्हीनस) देवतेप्रमाणे स्वर्गदेवतारूप झाली ह्या देवीला कायदा व सुव्यवस्था प्रिय असल्याने तिने व टामुज ह्यानी स्त्री पुरुषाच्या वागणुकीची नियमावली तयार केली युद्धाच्या समयी ह्या देवतेला प्रथम वदन करून मगच सैनिक रणक्षेत्रात प्रवेश करीत इ० स० पूर्व ३००० वर्षाचे ह्या देवीचे काही शिक्के सापडले आहेत त्यामध्ये ह्या देवीचे स्वरूप युद्धदेवतेचेच आहे गिल गामेश पुराणात तिचे वर्णन युद्धदेवता म्हणूनच आहे तसेच असिरियन सस्कृतीच्या काळी तिचे वर्णन युद्धदेवता म्हणून पूजन घडत असे त्या सस्कृतीमध्ये ती असुराची जोडीदारीण बनली आणि इतकी लोकप्रिय झाली की, असिरिअन राजधानीच्या निनेव्ह शहरात तिच्या

मूर्तींची स्थापना झाली. ह्याचा परिणाम असा झाला की, देवीच्या नावाचे नामांतर निनेव्ह, अरबेला व किडमुरु ह्यामध्ये झाले. ह्या देवीचे पुरुषरूप सकाळचा तारा ( Morning Star ) व स्त्रीरूप म्हणून सायंतारा ( Evening Star ) समज लागले. वीराची श्रद्धा होती की, ती हातात धनुष्य-बाण घेऊन, एखाद्याला खाऊं का गिळू ह्या इर्षेने रणक्षेत्रात उडी घेते. सिंहवाहन व तिचे मस्तकावर अष्टकोनी लुब्धक तारा ( व्याध ) असे. ह्याच देवीला इशारा ( विजयदेवता ), इनिनि ( प्रकाश देवता ), अनुनित ( युद्धदेवता ), अंतुन ( स्वर्गदेवता ), अजा ( प्रकाश व युद्ध देवता ) व निनि अगर नाना असे संबोधित असत. ( जेम्स कोश, १२।७०० )

पृथ्वीची स्वामिनी, शक्तिमान व दैदिप्यमान मूर्ति, जीवाधिष्ठात्री देवता, संग्रामदेवता, वसंत ऋतु व वनस्पतींची देवता, प्राणिमात्राच्या उत्पत्तीची देवता, गृहदेवता, कायदेकानू व न्यायदेवता, मानवी जीवन नष्ट करणारी देवता, वादळ-देवता इ० इ० शक्तींची देवता मानली गेली आहे. ( जेम्स कोश, ७।४३४ )

सेमेटिक वंशामध्ये समाजाचे पालनपोषण करण्याचा अधिकार जसा मातृवंशा-कडून पितृवंशाकडे गेला, त्याप्रमाणे कित्येक देवताही स्त्रीरूप सोडून पुरुषरूप घेऊन बसल्या. ह्याच कारणामुळे इस्टर ही देवता पुरुष व स्त्री ह्या दोन्ही रूपांत आता आढळून येत आहे. निरनिराळे वंश ह्या देवीला ज्या स्वरूपांत पाहात असत ते येणेप्रमाणेः—कॅनान–अस्टार्टे, मेसापोटेमिअन–आटार, माओब–अस्टर; दक्षिण अरेबिआ–अप्पार; अबिसिनिआ–अस्टर इ० इ० सेमेटिक वंश बॅबिलोनमध्ये गिरल्यावर, त्यांना तेथे पूर्वीच्या सुमेरिअन संस्कृतीच्या काही देवता आढळून आल्या. असे मानतात की, चंद्रदेवता सिन ( सिनीवाली ) व त्याची स्त्री अनु ( अनुमती ) ह्याची इस्टर ही मुलगी. टामुझ हा तिचा प्रियकर. देवीचा कर्कश स्वरविलाप व तिचा पाताळात अवतार ह्यामुळेच ती ग्रेट मदर ह्या महत्त्वपूर्ण पदवीला पोहोचली असावी. पश्चिम आशियामध्ये ह्या देवीची सर्व ठिकाणी पूजा होई. तिची सुमेरिअन नावे निनि व निनिअर अशी आहेत. ( वेबस्टर डिक्शनरी )

### कनाइट संस्कृति

कनाइट संस्कृति सनपूर्व २५०० वर्षांमध्ये अस्तित्वात होती. भूमध्य-समुद्राच्या पूर्वेला नाहरेलरबीरपासून करमेल पर्वतापर्यंत पसरलेल्या भूभागाला त्या वेळी फोनेशिया म्हणत असत. जेबेल-नुसारिआ, लेबनॉन पर्वताचा काही भाग, गलिलाचा उंचवटा इत्यादि भू-प्रदेश या राज्यात मोडत असे. आर्डोरस, सिमिरा, बैरूट, सरपेता, टायर ही पाच शहरे त्यामध्ये होती. उत्तर आफ्रिका खंडातील फोनेशियन वसाहतवाले आपल्याला कनाइट असे म्हणत असत. वास्तव

सर्व फोनेशियन लोकांना तेच नामाभिधान लावले जाते. सेमेटिक ही एक उपसंस्कृतीच होय.

( १ ) अस्टार्टे—ही एक कनाइट देवता होय. तिला हेब्रुवंशाच्या देवी अष्टोरथ प्रमाणे मानली जात असे. अनाथ ही या वंशाची दुसरी एक देवता. परंतु बॅबीलॉन संस्कृतीमधील अंतूभदेवतेसमान तिचे स्वरूप भासते. बाळ ही एक स्वर्गीय देवता आणि सर्व देवांची मालकीण समजली जाई. ॲन्थिट या देवतेचेही पूजन या संस्कृतीमध्ये होत असे.

( २ ) अनाथ—कनाइट संस्कृतीमधील एक देवता असून तिचे बॅबिलॉन-मधील अंतुम देवीशी सादृश्य आहे. सेमेटिक विभागात ही फार लोकप्रिय होती. इजिप्शियन लोक तिला युद्धदेवता व अन्नदेवताही मानत. सुमेरिअन हिला स्वर्गीय देवता व सर्व देवांची मालकीण समजत व ॲन या नावाने ओळखीत. एका हातात भाला व दुसऱ्या हातात परशु ही आयुधे नेहमी फिरवीत राहणारी असे रूप दाखविले आहे. ॲंथिट ही फोनेशियन युद्धदेवता या देवीचेच स्वरूप मानले गेले आहे.

## केल्टिक संस्कृति

केल्टिक या नावाचा वंश सनपूर्व सुमारे दोन सहस्र वर्षे युरोपामधील ऱ्हाईन, एल्ब आणि डॅन्यूब नद्यांच्या तीरावर वस्ती करून होता. नंतर क्रमाने तो जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड या भूभागाकडे पसरला. या संस्कृतीमध्ये गॉल वंशाचा समावेश होतो. त्यांच्या देवता पुढीलप्रमाणे :

देवी–मातर, म्हणजे भू-देवी.
देवी बैरे सिंथिआ, कोमडोव्ही, डोमिनी,
कुमारी व निस्की ( जलदेवता ) इत्यादि.

**वानवेन** ही उत्तर समुद्रावरील एक प्रेमदेवता आणि शुक्राची कन्या होय. **डोनदेवी** ही मथ या देवतेची बहीण असून वंशवृद्धीसाठी आणि संस्कृतिरक्षणा-साठी या देवीची प्रार्थना केली जाई. याच देवीला पुढे इराणमध्ये डननची माता असे मानू लागले ( आर्यांची ' दनू ' ही कश्यप ऋषींची कन्या आणि दानव-दैत्याची माता होय. ). **अरिऔरहोड** प्रायडनमधील शुभदेवतापैकी ही एक होय. काही वेळा या देवीची पूजा कुमारी स्वरूपात केली जाई आणि तरीही तिला पृथ्वीचे स्वरूप मानीत असत. **किर्येर्वी** ही प्रियकराला मोहविणारी पण एक प्रेम-देवता होय.

या संस्कृतीची जर्मन देशातील नावे मात्र अगदी निराळी वाटतात आणि त्यामध्ये माता या शब्दाला जास्त प्राधान्य दिलेले दिसते. देई मात्रेस, मात्रोनि, मात्रेस, मात्री, मातृस, मातृवस, मातर, मात्रा इत्यादि नावाने त्या ओळखल्या जातात. प्रकृतीचे मूलतः स्वरूप जे माया (Maternity) त्याबरोबर ही नावे जास्त निगडित आहेत. त्याचप्रमाणे फुले, फळे, पृथ्वी या सर्वांना अधिष्ठात्री देवता आहेत अशी त्यांची श्रद्धा होती. जर्मनीचा प्रसिद्ध योद्धा व युद्धसेनानी हेर हिटलर स्वतःला पूर्ण आर्यन वंशाचा मानीत असे आणि म्हणूनच त्याने ज्यू जमातीचा छळ केला असे बोलले जाते. इंग्लंडमध्ये आदिशक्तीची स्वरूपे आढळतात. ती अशी :

अंद्रस्ता—विजयदेवता.
सूल—निनर्व्हीइमान आणि उष्ण झऱ्याची देवता.
इपोना—अश्वदेवता.
वेली-सामा—कृपा करणारी देवता.

(जेम्स धर्मकोश, भाग ३, पृष्ठ २१२)

हिटाइटसंस्कृति

हिटाइटसंस्कृति सनपूर्व १७ व्या शतकात होऊन गेली. हम्मुराबी राजाच्या मरणानंतर सुमेरिअन साम्राज्य मोडले आणि सनपूर्व १७५० साली उत्तरेकडील रानटी टोळ्यांनी (फ्रिजीअन) कॅपडोशिया भागाचा ताबा घेतला. मूर्सील खत्ती हा पहिला राजा झाला. त्याने पुढे बॅबीलोनवर स्वारी करून भयंकर लूट आणली. हे नवी राज्य म्हणजेच हिटाइटसंस्कृति होय.

सन १९०७ साली बोघाज केवूं येथे या संस्कृतीच्या संशोधनार्थ उत्खनन झाले आणि त्यामध्ये जे अवशेष मिळाले, त्यांवरून बरीच माहिती उपलब्ध झालेली आहे. इतर संस्कृतींच्या आक्रमक हालचालींमुळे पुढे ही संस्कृति नष्ट झाली. सांप्रत आपण ज्याला मेसापोटेमिया प्रदेश म्हणून ओळखतो त्याच भागात ही संस्कृति चालत होती. मित्र, वरुण, इन्द्र या भारतीय देवांचीही पूजा तेथे केली जात असे. सनपूर्व नवव्या शतकात या संस्कृतीच्या नावात बदल होऊन ती इराणीयन नावाने ओळखली जाऊ लागली. काही वेळा तेथील लोकांना 'मिडिअन्स' असेही म्हणण्यात येत असे, आणि तसा उल्लेख असिरियन स्मारकावर केलेला दिसून येतो. मिडिआ हा प्रदेश बॅबीलोनच्या वरती ईशान्य दिशेला व कॅस्पिअन समुद्राच्या दक्षिणेला पसरलेला होता. ऋग्वेदामध्ये मित्र या देवतेसाठी एकच ऋचा आहे असे सांगितले जाते, तर या संस्कृतीमध्ये मित्र

वरुणासाठी अनेक ऋचा होत्या. हिटाइटवंशीय राजा सुबिली लुमा आणि मिटिनीचा राजा मंतिउंझा या दोघांचे युद्ध झाल्यावर तहाच्या करारनाम्यात ज्या अटी ठरल्या, त्या भाजलेल्या विटांवर खोदून ठेवलेल्या आहेत. त्यामध्ये मित्र, वरुण, इन्द्र, नासित्य इत्यादि भारतीय देवांचा उल्लेख आहे. त्यांची पूजा त्या वेळी तेथे होत असे. मा ही या संस्कृतीची प्रमुख शक्तिदेवता होती.

पूर्वी आशियामायनरमध्ये कॅपडोशिया या नावाचा एक जिल्हा होता. सध्या त्या भागाचा समावेश इराकमध्ये केला आहे. मा अथवा मेनेदेवी ही त्या लोकांची देवता होती. तिच्या रक्षणासाठी स्त्रिया, कुमारिका लष्करी गणवेष घालून व हातात शस्त्र घेऊन उभ्या असत. या देवतेला प्रसन्न करून घेण्यासाठी भक्त आपले रक्त तिला अर्पण करीत.

मा—ही मूळ अनातोलियाची देवता. हिटाइट सांस्कृतिक देश व कॅपडोशिया ह्या ठिकाणी ह्या देवीची पूजा होत असे.

ही देवता एक आदिशक्ति मानली गेली असून हिलाच रोममध्ये युद्धदेवता मानीत असत. आशियामायनरमध्ये 'लिथिअन नीय' म्हणून ह्या देवीची पूजा केली जाई. जनौरस असा तिला एक पुत्र झालेला होता. रोमन सैनिक तिची 'मा बेलोना' म्हणून पूजा करीत, काही ठिकाणी तिला सिबेले देवी समजत असत. हिच्या स्वभावात व गुणात व अस्टार्टे, ॲफ्रोदिता, आयर्लंडमधील केल्टिक वंशाची अनु, स्कॉटलंडमधील 'केलीच येऊर' ह्या देवींच्या स्वभावात व गुणांत साम्य होते. (इजिप्तपुराण, पा. २५८)

ह्या देवीचे पुजारी काळे कपडे घालून, ढोल व वाद्यांच्या गजरात तरवारीने अंगाला जखम करून घेत आणि त्यातून वाहणारे रक्त त्या देवीला अर्पण करीत. तशा धुंद स्थितीत ते भविष्य वर्तवीत व भक्तांच्या अंगात वीरश्री उत्पन्न करण्याचा प्रयत्न करीत (जेम्स, पा. १८२). ह्या देवीच्या स्त्री-रक्षकाचा लष्करी पोषाख असून त्या शस्त्रधारी असत (ज्ञा. को., क ५५). बोगाझ केवूं येथील उत्खननात सापडलेल्या अवशेषावरून ह्या देवीचा झगा लांब घड्यांचा, केसांची लांब वेणी, मस्तकावर मुकुट, डाव्या हाती देवीचे राजचिन्ह व हातात काठी असून वाघ व सिंह हे वाहन असावे, असे दिसून येते. ह्याच चित्रात तिचा मुलगाही दाखविला आहे. पुरुष वेष, दाढी वाढलेली, हातात काठी व कुऱ्हाड, कमरेस खंजीर, सिंहवाहन असे एक रूप असून ह्या देवालाच ॲटिस म्हणत असत. येथील

उत्खननाचे वैशिष्ट्य असे की, येथे उत्खननात इंद्र, वरुण, मित्र व नासत्य ह्या चार मिटानिअन देवतांची चित्रे मिळाली आहेत. अर्थात, हे चारही देव आर्यसंस्कृतीमधीलच आहेत, हे निराळे सांगण्याची गरज नाही. (जेम्स कोश, ६।७२५ ).

फ्रिजिअनसंस्कृति

काही युरोपिअन टोळ्या सनपूर्व दहाव्या शतकात आशियामायनर प्रदेशात शिरल्या. म्हणजेच डार्डानेल्सच्या पलिकडे जाऊन नतर त्या पूर्वेकडे व दक्षिणेकडे पसरल्या. पूर्वेकडील टोळ्या कालांतराने आपणाला फ्रिजिअन असे म्हणू लागल्या. ही टोळी या प्रदेशात येण्यापूर्वी येथील संस्कृति अतिशय सुधारलेली होती. या टोळीने या प्रदेशात आपले वर्चस्व गाजविल्यावर त्यांनी आपली भाषा व संस्कृति मूळच्या रहिवाश्यावर लादली आणि तसे करताना त्यांच्या धर्माची मूलतत्त्वे त्यांनीही काही प्रमाणात आत्मसात केली. वास्तव जिला फ्रिजिअन संस्कृति म्हटले जाते, ती बरीच प्राचीन आहे यात शंका नाही. ही संस्कृति अनाटोलीयन, हेलेनिक अगर पेलासजिअन धर्मसंस्कृति पूर्वीची असावी असे अनेक विद्वानांचे मत आहे.

सन १९११ साली ॲंटीओकपिसडिया या प्राचीन फ्रिजिअन शहरी उत्खनन केले असता त्या ठिकाणी दोन धार्मिक मठ आढळून आले आहेत. त्यांपैकी एका मठात सिबेल, आर्टिमिस व आफ्रोदिता या देवतांच्या मूर्ति आढळून आलेल्या आहेत. त्या मठातील पूजाविधि हा स्त्रीदेवतांचाच होता, पुरुषदेवतांचा नव्हता. सिबेलदेवी ही या संस्कृतीची प्रमुख देवता होय. आशियामायनरमध्ये या देवतेची पूजा त्याच सुमारास सुरू झाली. पुढे ग्रीक व रोमन संस्कृतीने या देवीची पूजा चालू केली. ग्रीक लोक तिला ऱ्हिआ, गी, डिमिटर या देवतासमान मानीत असत. फ्रिजिअन साम्राज्याच्या सीमेवर गिलाशियन प्रांतातील पेसिनस या गावी सिबिल देवीचे एक पवित्र मंदिर होते. रोमन संस्कृतीमध्ये या देवीची नावे टेलस, सिरिज, ऑपस व मैय्या अशी होती. कोपनहेगन येथील एका "पॉरमिड" मध्ये (पिरॅमिड) या देवतेची मूर्ति आढळून आली आहे. (जेम्स धर्मकोश, ४।३७७ व ९।९०० ).

ही संस्कृति इडा या भारतीय देवतेचीही उपासक होती. या संस्कृतीच्या काही टोळ्या पुढे ग्रीसमध्ये शिरल्या आणि त्या ठिकाणी त्यांनी तेथील डायोनिसस या देवीची पूजा आत्मसात केली. फ्रिजिअन म्हणजे मराठीत ज्यांना भृगुलोक म्हणता येईल ते हे लोक असावेत असा संशोधकांचा शोध आहे. डायोनिसस हा आर्यांच्या 'भग' अथवा 'भगवान' या शब्दाचा द्योतक

आहे, असे मानतात. ऋग्वेदातील ऋचाप्रमाणे भगूचा संबंध पाण्याबरोबर आलेला आहे. काहींच्या मते भृगुलोक हे उमादेवीचे उपासक असून सर्वेम्बा व एलमा ऊर्फ रेणुका या देवतांनाही मानीत असत. नासदीयसूक्ताप्रमाणे या रेणुकेलाच कोणी 'एकवीरा' असेही म्हणतात. ऋग्वेदाप्रमाणे द्रुह्यु, तुर्वसुराजे गुजराथ-काठेवाडमध्ये वस्ती करून होते आणि भृगुकच्छ (भडोच) हे गाव त्या प्रदेशात मोडते गोपथब्राह्मण, शतपथब्राह्मण, ऐतेरियब्राह्मण यांच्या मते भृगु हा वरुणाचा मुलगा होता, म्हणून काही वेळा त्याला वारुणी या नावाने संबोधिले जात असे. यदु, तुर्वसु हे जसे उत्तर प्रदेशातून गुजरातमध्ये आले, तसेच फिजि-अन लोक व्यापारासाठी येथे येऊन स्थाईक झाले असल्याचे संभवनीय आहे. भृगुवंशीयांनी भृगुकच्छ शहर वसविले. परशुरामाचे आणि सहस्रार्जुनाचे भांडण होण्यास आणि त्याचे रूपांतर युद्धात होण्याचे प्रमुख कारण म्हणजे परदेशी व्यापार आणि त्यामुळे मिळणारा अफाट नफा, हेच होते. फिजिअन संस्कृतीची देवता अम्मा (मा) हीच भार्गवाची अंबा अथवा अम्बिका होय. अमरकोश मधातील शब्दाप्रमाणे मा, अम्बा, मात्री, भार्गवी, लोकमाता, रमा अगर लक्ष्मी ही एकाच देवतेची नावे होत. अनाटोलियामधील देवता मा हीच साधारणपणे इजिप्तमधील मातृदेवता असावी.

('Mother Goddess' by S. K Dixit, Pages 58–65).

## इस्राइलसंस्कृति

इस्राइलसंस्कृति सनपूर्व सतराव्या शतकात अस्तित्वात येऊन इजिप्त अरबस्थान यांच्या दरम्यान ती चालत होती. अब्राहमं हा त्याचा प्रसिद्ध कर्ता पुरुष. अब्राहमचा नातू जेकब आणि त्याचा ४ था मुलगा यहुदा यावरून त्यांच्या वंशाला यहुदी हे नाव आले. याहवे ही त्याची युद्धदेवता होती. सृष्टीसंचार करताना ती पंख असलेल्या देवदूताप्रमाणे अगर सर्प व वृक्षरूपाने दृग्गोचर होत असे. लिलिथ ही त्यांची आणखी एक पूजनीय देवता होय आणि तिचा जन्म इव्हाच्या अगोदर परंतु राक्षस कुळात झालेला होता असे मानतात.

अब्राहमने या पंथाची स्थापना केली त्याच सुमारास किंवा किंचित पूर्वी अटेनधर्म याच प्रदेशात चालू झाला होता परंतु तो पूर्णत सूर्यवंशीय व सूर्यो-पासक होता. कोणी असे मानतात की, अब्राहम हाच मुळी सेमेटिक वंशाचा मूळपुरुष होय आणि या वंशात मूर्तिपूजा केली जात असे हे सिद्ध झालेले आहे. इस्राइल हा एकेश्वरी धर्मपंथ होता. जीझस खाईस्ट हा पुढे याच धर्मपंथात जन्म पावलेला आहे.

(जगातील धर्मपंथ–लेखक श्री. द. ल. सहस्रबुद्धे, पृष्ठ ११)

**हेब्रु संस्कृति आणि ज्यू संस्कृतीसंबंधी काही माहिती**

१. पृथ्वीची उत्पत्ति—देवाने आकाश व नंतर पृथ्वी निर्माण केली. देवाचा आत्मा जलावर तरंगत राहिला. त्यामुळे प्रकाश उत्पन्न झाला. सूर्य, चंद्र, तारे, पृथ्वीवर वन्यपशु, जलचर व मानव निर्माण झाले.

२. देवाधिदेव—याहोवा अगर याह्वे याचा अर्थ जो सदैव आहे, जो सदैव होता, व जो सदैव असणार, असा परात्पर देव. आकाश-पृथ्वीचा धनी.

३. मानवनिर्मिति—बागेमध्ये आदम झोपला असता, देवाने त्याच्या छातीची एक फासोळी बाहेर काढून त्यामध्ये मास भरले. तात्काळच एक सुंदर स्त्री तयार झाली व ती आदमजवळ राहू लागली. नग्नावस्था झाकण्यासाठी त्यांनी अंजिराच्या पानाचे वस्त्र शिवून तयार केले व वापरू लागली.

४. दीर्घायुष्य—आदमने वयाचे १३० वर्षी शेथ या मुलाला जन्म दिला व एकुण ९३० वर्षे तो जगला. (२) शेथने वयाचे १०५ वे वर्षी अनोशाला जन्म दिला व ९१२ वर्षे जगला. (३) अनोशाने ९० वे वर्षी केनानला जन्म दिला आणि ९०५ वर्षे जगला. (४) यांची संतति 'केनान ९१० वर्षे; त्याचा पुत्र महलेल ८९५ वर्षे; त्याचा पुत्र योरद ९६२ वर्षे; त्याचा पुत्र हेनाख ३६५ वर्षे; लामेखने नोहाला जन्म दिला आणि तो ७७७ वर्षे जगला. नोहाने वयाचे ५०० व्या वर्षी शेम, हाम, याफेथ याना जन्म दिला. आणि वयाचे ९५० व्या वर्षी निधन पावला. इसाक १८०, अब्राहाम १७५ आणि याकोबाचा पुत्र योसेफ ११० वर्षे जगला. (याचा अर्थ कृत, त्रेता, द्वापार युगातील भारतीय वयोमानाप्रमाणे येथेही वयोमान दिसते.)

५. नोव्हाची होडी—पृथ्वीवर प्रलयकाळ झाला, त्या वेळी नोव्हाच्या होडीने काही प्राणी तरले. या होडीची लांबी ३०० हात, रुंदी ५० हात व उंची ३० हात होती. बहुधा ती तीन माळ्याची असावी. डागडुगीच्या वेळी बाहेरून डांबरासारखा टिकावू पदार्थ लावावा लागे. प्रलयकाळी नोव्हाने ठरविले की, सर्व प्रकारचे दोन दोन प्राणी (नर-मादी) बायका-मुले व इतर सर्वांची बीजे होडीवर घेतली. ४० दिवस अहोरात्र पर्जन्य चालू राहिल्याने पृथ्वी जलमय झाली आणि १५० दिवस हा धुमाकूळ चालू होता. नोव्हाच्या होडीमुळे काहींचे प्राण रक्षण झाले, इतर सर्व बुडाले. प्रलय संपल्यावर नोव्हा व इतर बाहेर पडले आणि पुन्हा वसाहत केली. या वेळी नोव्हा ६०० वर्षांचा होता.

६. मानवाची वाढ—शेम, हाम, याफेथ या नोव्हाच्या मुलापासून पुढे मानववंशाची वाढ झाली. भूपृष्ठावरील भागाची वाटणी या मुलांमध्ये झाली. (भारतीय मनुच्या मुलामध्ये याप्रमाणे वाटणी झालेली आहे.)

७. बापापासून संतती वाढ—लोट आपल्या दोन मुलींसह डोंगरात राहू लागला. इतर कोणी पुरुष तेथे नव्हता. तेव्हा मुली म्हणाल्या, आपल्या सहवासाला कोणी पुरुष नाही, तेव्हा आपण बापच शय्या सोबती करू आणि त्याचा वंश पुढे चालवू, त्यांनी बापाला द्राक्षाचा रस पाजला आणि रात्री एकाच शय्येवर झोपल्यामुळे त्या गरोदर झाल्या. त्याना पुत्र झाले, एक मवाब व दुसरा बेन अम्मी यानंतर मानववंश वाढीस लागला.

८. दासीपुत्र—संतती वाढविण्यास हा उपायही योजण्यात आला. अब्राहम व त्याची पत्नी साराय याना मूल नव्हते. तेव्हा सारायने आपली दासी हागार हिला पतीकडे पाठविले आणि तिला पुत्र झाला. त्याचे नाव इमाएल ठेवण्यात आले. या वेळी अब्राहम ८७ वर्षांचा होता. याकोबाला मूल नव्हते. तेव्हा त्याची पत्नी राहेल हिने आपली दासी बिल्हा पतीकडे पाठविली व तिजपासून दान, नफ्ताली, आशेर असे मुलगे झाले. अनानाने आपल्या भावजयीबरोबर संबंध जोडून तिला मुले प्राप्त करून दिली. फेरो राजाचा योसेफ हा सरदार असून तो देखणा होता. राणीने त्याला वश करून घेण्याचे प्रयत्न केला पण ' मालकाचे स्त्रीबरोबर व्यवहार कसा करावा ' असे म्हणून तो नकार देत असे. एके दिवशी तो एकांतात सापडल्यावर राणीने त्याचे वस्त्र धरून लगट करू लागताच वस्त्र सोडून टाकून तो पळून गेला. परिणाम मात्र असा झाला की, राणीने त्याजवर बलात्काराचा आळ घेतला व त्याला तुरुगात घातले.

९. यज्ञार्पण—याकोबाने डोंगरावर यज्ञ केला. याहोवा मोशेला सांगतो यज्ञाच्या वेळी कोकरू कापावे आणि त्याचे रक्त दोन्ही दाराच्या कपाळपट्टीवर लावावे. मोशेने याहोवासाठी वेदी बांधली व त्याचे नाव याहोवा-निस्सी असे ठेवले. मोशेचा सासरा इथ्रो याने यज्ञार्पण केले. अब्राहामने यज्ञवेदी बांधली. (ही वचने भारतीयाची यज्ञ कल्पना उचलून धरणारी अशीच आहेत.)

१०. देवदर्शन— याहोवाने आब्राहामला दर्शन दिले. वयाचे ९९ वर्षी आब्राहमचा पुत्र इसाक याला याहोवाने दर्शन दिले याकोबाला याहोवाने दर्शन दिले.

११. शापदेणे—(१) सर्पाने एका स्त्रीला भुलवून फळ खाण्यास सांगितले म्हणून याहोवाने सर्पाला शाप दिला, ' तूं पोटाने चालशील व माती खाशील.'

(२) देवाच्या आज्ञेविरुद्ध स्त्रीने फळ खाल्ले म्हणून देवाने शाप दिला, ' गरोदरपणाचे दुःख तुला अनेक वेळा भोगावे लागेल, लेकराना जन्म देताना अपरंपार दुःख होईल व पति तुजवर सत्ता गाजवील. '

( ३ ) देवाने आदमला शाप दिला, ' आयुष्यात सर्व दिवस कष्ट करून तू फळे खाशील, पृथ्वीवर काटेरी झाडेझुडपे उगवतील आणि शेवटी तू मातीमध्ये परत जाशील. '

( ४ ) काइनने आपला भाऊ हाबेल याचा शेतात वध केला, म्हणून देवाने शाप दिला, ' पृथ्वीवर तू परागदा आणि भटकणारा होशील. '

१२ शेळ्याची संतति—याकोबा शेळ्याचे कळप चारीत होता त्याने हिवर, बदाम व अर्मोन झाडाच्या कोवळ्या काड्या सोलून आतील पांढरा भाग उघडा केला. सोलीव काड्या कुंडातील पाण्याच्या पन्हळात ठेवल्या. परिणाम असा झाला की, त्या काड्याचे पाणी शेळ्या प्यायल्यानंतर त्या सर्व फळल्या आणि कालांतराने प्रसवल्या, तेव्हा बांडी आणि ठिपकेदार प्रजा निर्माण झाली.

१३. स्मारक स्तंभ—याकोबा रात्रभर एक धोंडा उशाला घेऊन झोपला. त्याला एक स्वप्न पडले, ' उच्च शिडी उभी केलेली असून तिचा शेंडा आकाशाला भिडलेला आहे, देवदूत तिजवरून खालीवर जातयेत आहेत, याहोवा वरील बाजूस उभा आहे. ' त्या पाषाणात देव आहे म्हणून असा देखावा दिसला, या श्रद्धेमुळे तो पाषाण स्मारक स्तंभ बनला आणि लोक त्यावर तेल ओतू लागले. एल् बेथेल येथे याहोवाने याकोबाला दर्शन दिल्यावर त्याचे नाव इस्राइल ठेवण्यात आले. दर्शन मिळाल्यावर स्मरण म्हणून याकोबाने येथे पाषाणाचा स्तंभ उभा केला, त्याचे पूजन केले आणि तेल ओतले.

१४. सूर्यपूजन—फारोने योसेफचे नाव सापनाथ पोनह ( सूर्याचा देव ) असे ठेवले, यासाठी मिसरी लोक इब्र्याच्या पंक्तीस बसून जेवत नव्हते.

१५. धान्य—जवस व सातू याचा नाश झाला, पण गव्हाचा नाश झाला नाही असे वचन आहे ( आर्यांचे प्रमुख धान्य सातूचे होते. ). उत्पन्नाचा पाचवा वाटा फारो राजाला द्यावा लागेल.

१६. प्रेतसंस्कार—योसेफचे वडिलांचे प्रेताला मसाला भरण्यास ४० दिवस लागले व नंतर ते पुरण्यात आले. त्यानंतर ७० दिवस त्यांचे रडणे चालू होते.

१७. संस्कृतीमधील काही चमत्कार : उदाहरणे—(अ) सूर्य मावळून अंधार झाल्यावर एक धुमसती भट्टी आणि जळती दिवटी लोकांच्या समूहातून गेली.

( आ ) याहोवाने आकाशातून सदोम व गमोरा योजवर अग्नि आणि गंधक यांचा वर्षाव केला व अनेक नगरे उजाड केली.

( इ ) मोशेने काठी जमिनीवर टाकली व तिचा सर्प झाला. शेपूट धरून पुन्हा वर उचलले, तेव्हा काठी झाली.

( ई ) नदीतील पाण्याचे गोरडया जमिनीवर रक्त झाले.

( उ ) अहेरानाने आपला हात नदीच्या जलात धरता, त्यातून असंख्य बेडूक तयार होऊन त्यानी भूमि व्यापून टाकली.

( ऊ ) अहेरानाने काठी भुईवर मारताच सर्वत्र उवाचे साम्राज्य झाले. तसेच गोमाशा सर्व घराघरातून शिरल्या.

वरीलप्रमाणेच गुराची मरणपीडा टळणे, मानव शरिरावर गळवे येणे, गारा व अग्नीचा वर्षाव एकाच वेळी होणे, टोळधाडी येणे, तीन दिवसाचा सतत अंधार पडणे इ० अनेक चमत्कार आहेत.

याप्रमाणे फारोच्या राज्यात देवाने अनेक चमत्कार केल्यामुळे राजाने इस्राइल प्रजेला मिसर देशातून जाण्यास परवानगी दिली. त्या वेळी एकूण सहा-लक्ष लोक बाहेर पडले, इस्राइलमध्ये गेले व तेथे वसाहत केली. फारोच्या राज्यात ही जमात सुमारे ४०० वर्षे गुलाम म्हणून रहात होती. ज्या दिवशी त्याची सुटका झाली व त्यानी मिसरची सीमा ओलांडली तेव्हा त्यानी सात दिवसाचा वल्हाडण उत्सव साजरा केला आणि साम्प्रतही तो चालू आहे.

सीमा ओलांडून इस्राइलमध्ये जात असताना सागराची जले दुभागली, जमीन कोरडी पडली. फारोचे सैन्य जे पाठलागावर आले होते, ते जेव्हा आले तेव्हा जले पुन्हा एक होऊन त्यामध्ये ते गडप झाले. ( श्रीकृष्णासह वसुदेवाने यमुना नदी पार करताना, असेच पाणी दुभागून त्याची वाट मोकळी झालेली होती. )

१८. देवाच्या दहा आज्ञा ( Ten Commandments ).

( १ ) मिसर देशातून सोडविले तो यावोहादेव मी आहे.

( २ ) माझ्याशिवाय इतर देव तुला नसावेत.

( ३ ) पूजनासाठी कोरीव मूर्ति तयार करू नका.

( ४ ) शानाथ दिवस पाळावा.

( ५ ) यावोहाने सहा दिवस काम करून सातव्या दिवशी विश्रांती घेतली आहे.

( ६ ) कोणाची हत्या करू नका.

( ७ ) कोणाची चोरी कधीही करू नका.

( ८ ) शेजाऱ्याचे घरावर लोभ करू नका, त्याच्या बायकोचा लोभ धरू नका, दासीचा लोभ धरू नका.

( ९ ) सुवर्ण अगर चादी याचे अन्य देव बनवू नका. इ०

वरील कराराच्या आज्ञा तयार झाल्यावर, शेकडो वर्षांनी देवाने आपला पुत्र येशू याला जगदोद्धारासाठी पाठविला. सारांश इसाईसंस्कृतीचा उदय याप्रमाणे झाला.

(देवाच्या दहा आज्ञा, अनुवादक पंडिता रमाबाई, मुक्ति मिशन, केडगाव, पुणे. १९५८)

## ग्रीक संस्कृति

ग्रीक देवता व अन्य देवता प्रकरणे तयार करताना ती एका विशिष्ट हेतूने तयार करण्यात आलेली आहेत. देवताच्या वर्णनापूर्वी काही सांस्कृतिक इतिहास देण्याचे प्रयोजन असे की, तत्कालीन समाजरूढीचे प्रतिबिंब देवतावर कसे आरोपित केलेले आहे, हे समजून यावे. देवताची वर्णने, पूजा समारंभ, वार्षिक उत्सव म्हणजे तत्कालिन समाजाचे प्रतिबिंब होय. या सर्वसाधारण सिद्धान्ताला, या वाचनाने वळकटी येईल.

एकाद्या सुंदर चित्रकलेची पार्श्वभूमि समजल्यावर ते चित्र समजण्यास जसे उत्तम सहाय्य होते, तद्वत संस्कृतीच्या पार्श्वभूमीवर देवताची चरित्रे वाचली म्हणजे त्या संस्कृतीपेक्षा निराळ्या नाहीत हे वाचकाच्या ध्यानी येईल.

सर्वेऽपि देवा ममैव मूर्तय' । भारतीय अध्यात्मशास्त्रातील हे परमेश्वरी वचन सर्वत्र खरेच आहे हे दिसून येईल. परमात्मतत्त्वाची मूर्ति तयार झाली म्हणजे तिला नाश आहेच. ज्ञानेश्वरीतील वर्णन मार्मिक आहे.

उपजेल ते नाशे । नासे ते पुनरपि दिसे । हे घटिका यंत्र जैसे । परिभ्रमे ॥

सारांश इतकाच की, मानसरूपी देवता तयार होतात, क्रमाने नाश पावतात व कारणपरत्वे पुन्हा उत्पन्न होतात.

## प्राचीन ग्रीक संस्कृति

युरोप खंडातील ग्रीक संस्कृति ही फार प्राचीन व प्रगत मानली जाते. तेथील संस्कृति निर्माण होण्यास त्या देशाची विशिष्ट परिस्थिति कारणीभूत झालेली आहे. लहानसा मध्यवर्ती देश, दंतुर किनारा आणि आजुबाजूला एजियन समुद्रातील अनेक बेटांचा समूह. तसेच बराचसा भूभाग डोंगरांनी व्याप्त. शेतीवाडीसाठी भूभाग कमी आणि पाणी अन्न मिळवण्यासाठी आपसांत मारामाऱ्या व सागरावरून स्वारी करून लुटालूट करणे हे त्यांना क्रमप्राप्तच होते. अनेक लहान लहान

राज्याचा हा प्रदेश बनलेला असल्याने अपसात नेहमी वैरभाव चालत असल्याने स्पार्टनसारखे उत्तम योद्धे त्या देशात निपजले. शिवाय परदेशातून आणलेले युद्ध-कैदी गुलाम म्हणून तेथे राबवीत आणि त्याची संख्या बहुसंख्य असल्याने, त्याच्यावर आपले वर्चस्व गाजविण्यासाठी ग्रीक लोकाना नेहमी युद्धाच्या अभिनिवेषात तयार रहावे लागे.

सन १८९९ चे सुमारास डॉ. स्लायमन याला क्रीट बेटातील ग्रीसच्या प्राचीनतम सस्कृतीचा शोध लागला. ग्रीक दंतकथेमध्ये मीनोस राजाला मोठा मान आहे. त्याचा राजवाडा या बेटावर होता असे आढळून आले आहे. त्याचा काळ सुमारे सनपूर्व ३००० वर्षांचा असावा. नॉसस हे प्रमुख शहर असून राजाचा भव्य वाडा उत्खननात मिळाला आहे. राजवाड्याचे क्षेत्र एकूण सुमारे पाच एकराचे असून तीन मजली लाकडी बांधकाम आणि भिंतीवर मानवी कृति चितारलेल्या मिळाल्या आहेत. साडपाण्याची व्यवस्था मोहेंजदारोप्रमाणेच व्यवस्थित होती. राजवाड्यात ऑलिव्ह तेलाचे मोठे राजण, पैलू पाडलेले हिरे, हस्तीदंतावरील कोरीव शिल्प, नागदेवता, सहा इच उंचीच्या चांदीसोन्याच्या मूर्ति इ० अनेक वस्तु मिळल्या आहेत. मत्स्य हेच मुळी राजचिन्ह होते. सनपूर्व १२०० साली हे वैभवसंपन्न शहर भूकंपाने उध्वस्त झाले असावे. याच सस्कृतीला मिनोअन, क्रीटन, अथवा एजियन सस्कृति म्हणून संबोधिली जाते. काही भारतीय संशोधकाच्या मते ही संस्कृति आणि भारतीय सस्कृति यामध्ये बरेचसे साम्य व समानधर्म आहेत.

इलियड आणि ऑडिसी ही दोन ग्रीक महाकाव्ये म्हणजे भारतीय रामायण-महाभारताप्रमाणे असून त्यातील वर्णन म्हणजे या क्रीटनमधील वैभवाचे वर्णन होय, असेच साप्रत बहुमत आहे. उत्खननामध्ये ज्या वस्तु मिळाल्या आहेत, त्यामध्ये राजे लोकांच्या थडग्यात शवावर सुवर्णाचा मुखवटा, चिलखत, अगठ्या, बांगड्या, नक्षीकाम असलेली तरवार, सुवर्णाची भाडी, ब्रॉझचे खजीर, रत्नजडित सोंगट्या आणि पट इ० अनेकांचा समावेश आहे. सूर्यपूजन, बैल, परशु आणि पितराचे पूजन त्या वेळी होते. राजाजवळ मोठे आरमार होते. भूकंपामुळे हे शहर नष्ट झाले हे जसे एक मत आहे, तसे दुसरे मत असे की, डोरिअन (स्पार्टन लोकाचे पूर्वज) लोकाच्या स्वारीमुळे सनपूर्व बाराव्या शतकात ही सस्कृति नष्ट झाली आणि त्यानतर ग्रीक संस्कृतीचा उगम झाला.

ग्रीक लोकाचा धर्म हा नव्या-जुन्यांच्या मिश्रणाने झालेला एक धर्म आहे. ग्रीकांच्या आगमनापूर्वी त्या देशात पेलासजीयन व क्रीटन वंशीय रहात होते आणि त्यांच्या अनेक गोष्टींचा ग्रीकांनी अंगिकार केलेला दिसतो. जसे अथेन्स शहरातील अथिना देवी ही मूळ क्रीटन येथील मिनोस राजाच्या राजवाड्यातील देवता.

ग्रीकांनी तिला आपली मानली झ्यूस हा देवही ग्रीकांनी आपल्याबरोबर आणला विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे ग्रीकांचे देव देवता, या विचारविकार असलेले मानवच असत झ्यूस हा एक मानवी राजाच होता त्याला मांडलिक असत आणि सल्लामसलत देणारी सभाही असे सर्वांना श्रेष्ठ व शक्तिमान देव म्हणजे झ्यूस किंवा जुपिटर हा होय हवा, वारे, ढग व प्रकाश ही सर्व त्याचीच निर्मिति होय त्याला दाढी असून तो सुवर्णांकित ढगाच्या सिंहासनावर बसतो इच्छेला येईल तेव्हा ढग जमविणे, विजा निर्माण करणे, पर्जन्य पाडणे त्याला शक्य असते इतर सर्व देव झ्यूसच्या आज्ञेत सदैव रहातात, यामुळेच मानवाप्रमाणे कायदे व राज्यव्यवस्था आहे

जगाच्या जीवनात जशी मानवाची आवश्यकता आहे, तद्वत देवांचीही आहे असे ते मानीत इतर संस्कृतीप्रमाणे ग्रीकांचे देवही उत्तर ग्रीकमधील ऑलिंपस पर्वतावर रहात असून, तेथून ते विश्वाचा कारभार पाहात ऑलिंपस पर्वत म्हणजे भारतीय हिमालय अगर मेरु पर्वताप्रमाणे ते मानीत असत या ठिकाणी वैभव भोगणारा हा झ्यूस आपणाला अत्यंत सामर्थ्यवान मानीत असे. सर्व देव—मानवांनी साखळी बांधून जरी त्याला खाली ओढण्याचा प्रयत्न केला, तरी त्यांची निराशाच होईल पण याच्या उलट झ्यूसने जर इच्छा केली तर समुद्र, पृथ्वी व मानव यांना एका साखळीने बांधून ओढून घेऊन ऑलिंपस पर्वतावर तो लटकावू शकेल असे त्यांची श्रद्धा होती त्याच्या बाजूला गरूड नेहमी उभा असून उजव्या हाती वज्र असते ओक वृक्ष त्याला फार प्रिय आहे हा देव मानवाचा मित्र असल्याने प्रवाशाला मदत देणे, विजय देणे, न्याय देणे अशी अनेक कामे तो करीत असतो

हिरा किंवा जुनो ही शनी व त्याची पत्नी ऑप्स यांची कन्या असून तीच झ्यूसची पत्नी व बहीण समजली जाते ही देवता उच्च, रुबाबदार, मोठ्या व तेजस्वी नेत्रांची, शुभ्र हाताची, सद्गुणी, स्त्रियांची आवडती अशी आहे या देवतेची मंदिरे अरगॉस व ऑलिंपिया येथे होती झ्यूस देवाचे वर्णन भारतीय इंद्र देवाबरोबर बरेच जुळते आहे

प्राचीन भारतीयांप्रमाणे ग्रीकांचा अनेक देवतांवर संपूर्ण विश्वास होता. त्यांचा प्रत्येक देव म्हणजे मानव व निसर्गशक्तिस्वरूपाचा असे जमीन, हवा, समुद्र, पर्वत, वळी, नद्या, ओढे, मैदाने इ० प्रत्येकाला निरनिराळी देवता होती त्यांची अशी धारणा होती की, ही सर्व निर्माण करणारी एकच शक्ति नसून अनेक आहेत व मानव हा त्यांचे प्रतिक आहे. यासाठीच सर्व देव बहुधा मानवच

होते. इतकेच की, मानव मर्त्य असतो तर त्याचा देव हा अमर असतो. त्याच्या भावनां मानवाप्रमाणे असून ते मानवाप्रमाणे जखमीही होतात, युद्धे खेळतात, हेवेदावे करतात. इ० इ०. ग्रीक कवींनी सर्व देवाच्या कथा याच परपरा व रूढी याच्या मिश्रणातून निर्माण केल्या आहेत. ट्रॉजन युद्धामध्ये एका शिपायाने एका देवाला जखमी केल्याचे व तो विव्हळत पडल्याचे फार उत्कृष्ट वर्णन रगविलेले आढळते ते याच भावनेतून होय

भारतामध्ये ज्याप्रमाणे ३३ कोटी देव असल्याचा उल्लेख येतो, तसे ग्रीक कवि हेजिअड हा पृथ्वीवर तीस हजार देव असल्याचे सागतो मानवाप्रमाणे या देवाना शरीर असून वस्त्रे, शस्त्रे, राजवाडे याची गरज असते प्रत्येक देवाचे वेगळे शस्त्र हे वैशिष्ट्य होय. जसे भारतात विष्णूचे सुदर्शन, शकराचे त्रिशूळ इ० प्रमाणेच होय. काही मानवी दुर्गुणही त्यामध्ये दिसून येतात. हर्म्स देव हा चोरी करण्याबद्दल प्रसिद्ध, तर आफ्रोडाईट देवता छचोरपणाबद्दल प्रसिद्ध. अरेस हा रागीट असून, यज्ञात त्याला आहुति न देणाऱ्यावर तो डूक धरीत असे. ( भारतामध्ये आहुति न दिल्यास इद्र असाच रागवत असे ) ग्रीकाचे देव विलासी असून, आनद, सुदर दृश्ये, उत्सव त्याना फार प्रिय असत. भारतामध्ये जसे प्रभू रामचद्र अथवा भगवान् श्रीकृष्ण याचे उत्सव डामडौलाने साजरे होतात, त्याप्रमाणेच हेही उत्सव होत. भारतीय जनता देवाना प्रसन्न करून घेण्यासाठी कडक तप श्चर्या व अचारण करीत असे, तशी ग्रीक जनता देवाबरोबर करार करून प्रसाद मिळवीत असे. अपोलो देवाचा एक भक्त म्हणतो, 'आतापर्यंत अनेकदा लठ्ठ बैल मी तुजपुढे जाळले, आता माझी इच्छा तू पुरी कर' आणि देवाने त्याची इच्छा पुरी केली. असे जरी असले तरी फार सुख किंवा वैभव मानवाना मिळालेले देवताना आवडत नसे. याचे कारण ग्रीक पुराणे असे देतात की, मानवाला वैभव हे धोक्याचे असून त्याने तो उन्मत्त झाल्यावर देवताचा क्रोध त्याजवर होत असे आणि सर्वनाश होई. यासाठीच ग्रीक भाषेत एक म्हण प्रचारात आली आहे की, 'मरेपर्यंत कोणत्याही माणसाला सुखी समजू नये.'

आता ग्रीक पुराण ग्रथातील काही उद्बोधक माहितीचा आढावा घेऊ.

## मानवाची उत्पत्ति

बोएशियामधील पनोपी गावी असे काही मातीचे पुतळे आढळून आलेले आहेत की, ते मानवानीच तयार केलेले आहेत. असे सांगितले जाते की, टिटानवशिय प्रोमेथिअस हा महाउद्योगी मनुष्य होता आणि त्यानेच हे पुतळे बनविले असले पाहिजेत. पुतळे तयार झाल्यावर अथेनी देवीने त्यांमध्ये प्राणदान केले

आणि ते सजीव केले,[1] पण सृष्टीकर्ता झ्यूसला देवीचे हे कृत्य आवडले नाही आणि त्याने या पुतळ्याचा नाश करण्यासाठी स्वर्गातून अग्नि आणला, पण मानवाना मात्र तो मिळू नये अशी व्यवस्था केली, परंतु प्रोमेथिअसने तो अग्नि चोरून आणून, मानवाचे उपयोगी पडेल अशी व्यवस्था केली. अर्थात हा अग्नि त्याने एका वृक्षाच्या वाळलेल्या ओंडक्यातून उपलब्ध करून दिला त्याप्रमाणे या देवाने मानवाना उत्तम कला शिकवून, रानटी वागणुकीतून चांगली स्थिति प्राप्त करून दिली अथेनी देवीने मानवाना प्राणदान केले, म्हणून तिला मानवाची हितकर्ती देवता मानतात.

## देवतांचे स्वभाववर्णन

देवतांची शरीरयष्टि मानवाप्रमाणेच आढळते, कारण यांचे देव म्हणजे मानवच होत, हे आपण पाहिले आहे. तत्त्वज्ञानी व अध्यात्मिक मनुष्य देवतांचे ठायी अतिशय उच्च भाव, उच्च कर्तृत्व, शुचिर्भूतपणा, स्पृहणीय वागणूक इ० सद्गुणाची सदैव अपेक्षा करीत असतो. तर सर्वसाधारण माणूस आपले बुद्धीच्या पातळीप्रमाणे देवतांचे ठायी इतका उच्चतम भाव पाहत नाही. मानवाप्रमाणेच त्यांच्या ठायीही त्या त्या स्वभावगुणाचा व दुष्ट गुणाचा आरोप करीत असतो. देवगण हा साधारणतः सरळमार्गी व दयाळू असतो, पण काही वेळा त्यांच्या हातून घडलेल्या कृत्यामुळे, रागीटपणा द्वेषभावही व्यक्त होतात

मानवाना राहावयास घरे लागतात, तद्वत देवतानाही मंदिरे लागतात, पण काही वेळा त्यांची घरे पर्वतमध्यावर, एकांतात, शांत वातावरणात असतात अगर स्वर्गात असतात मानवाप्रमाणे त्यानाही खावयास नैवेद्य, बली लागतो आणि अमृताचेही सेवन ते करीत असतात, त्यामुळे त्यांना मरण प्राप्त होत नाही. मानवाप्रमाणे देवानाही युद्धामध्ये जखमा होतात, ते येद्धही होतात. त्यांची शरीरे अतिशय चपळ व हलकी असल्याने, थोड्या वेळात ते खूप अंतर प्रवास करू शकतात. त्यांची वर्णेद्रिये अतिशय तीक्ष्ण असल्याने अतिशय दूर अंतरावरीलही गोष्टी त्यांना ऐकू येऊ शकतात, इतकेच नव्हे तर भक्तानी केलेली कुजबुज त्यांच्या कानी जाऊ शकते. भक्तांच्या संकटाची खात्री झाल्यास ते त्वरित उपाययोजनाही करतात. भूतलावरील मानवाची प्रार्थना त्याना ऐकू येते आणि योग्य परिस्थितीत ते साहाय्यही करतात. एकाठिकाणचे आकाशवाणीचे संदेश जर

---

१. टीप—भारतात पैठण शहरी शालिवाहन राजाने पुतळे केले होते, त्यामध्ये युद्धप्रसंगी प्राणदान करून सैनिक खडे केले, असा इतिहास आहे. याज्ञवल्क्यांनी सुवर्णाच्या गायीमध्ये प्राणदान केले होते.

अनेक मैल अंतरावर ऐकले जातात, ग्रहगोलावरील संदेश पृथ्वीवर ऐकावयास मिळतात, तर देवांना मानवाची हाक ऐकू येणे अशक्य नाहीच नाही. चंद्र-मंगळावरील संदेश पृथ्वीवर येण्याची किमया मानवाने सांप्रत साधली आहेच ना!

सर्व देवाची शक्ति सारखी नसल्याचे आढळून येते, त्यामध्ये कमीजास्तपणा दिसतो. झ्यूस अगर अपोलो देवता जे कार्य करील ते इतर लहान देवांना करता येणार नाही. (भारतामध्ये शंकर जे कार्य करू शकतात, ते विष्णु, इंद्र करू शकत नाहीत). प्रत्येक देवाजवळ त्याचा एकेक आवडता प्राणी असतो. झ्यूस–गरूड; हिरा–मोर अगर गाय; अपोलो–राजहंस; आर्टिमिसदेवी–हरण अगर अस्वल; आफ्रोदिता–चिमणी अगर बगळा; हर्मिस–कोंबडा; डिमिटर व पर्सोफिन –घोडा अगर डुक्कर; पोसेडन–घोडा अगर बैल; अथेना–घुबड; इ० (भारतामध्येही शंकर–नंदी; विष्णु–गरूड; ब्रह्मा–राजहंस इ० वाहने आहेत.)

देवतामध्ये अशी एक अलौकिक शक्ति आहे की, कोणत्याही वेळी त्या कोणाचेही रूप धारण करू शकतात, आपला जीवात्मा दुसऱ्याचे रूपाने उभा करू शकतात. याचे कारण असे दिले जाते की, देवता प्रथम उत्पन्न झाल्या आणि मानव, पशु व पक्षी नंतर झाले. तेव्हा त्याची रूपे ते धारण करू शकतात. यामुळेच जर कोणी प्रतिपादन करू लागला की, मानवप्राणी हा पशु पूजनातून, देव-पूजनाकडे वळला तर ती गोष्ट पटणारी नाही. देवताचा उल्लेख व अस्तित्व प्रथम आणि त्याचे आवडते प्राणी याचा उल्लेख मागाहून येतो, तो यामुळेच होय.

### राक्षसांची उत्पत्ति

यांची उत्पत्ती मानवाप्रमाणे भूमीवरच झालेली आहे. प्रथम हे मानवच होते पण त्यांच्या कृतीमुळे त्याना राक्षसी स्वरुप देण्यात आले. ज्या वेळी युरेनस देवाची हत्या झाली आणि त्याचे रक्त भूमीवर पडले, त्या वेळी त्या भूमीवर पडलेल्या रक्तबिंदूपासून राक्षसाची उत्पत्ति झाली. यास्तव त्याना जेजीनीस (Gegeneis) असे म्हणतात. ॲग्रीऑस, फाइटॉस, हिपोटॉस, इफायल्टेस इ० राक्षसाची नावे पुराणात आढळतात. (भारतीय संस्कृतीमध्ये रक्तबीज राक्षसाचे थेंब भूमीवर पडल्याने राक्षसाची उत्पत्ति झाल्याचे उदाहरण आहेच.)

### ट्रॉजनचे युद्ध

सनपूर्व बाराव्या शतकांत (११९० साली) हे झाले असे मानतात. झ्यूस या सृष्टीकर्त्या देवाला असे वाटले की, भूमीवर माणसाचा भार फार झाला असून तो हलका करणे अवश्य आहे. यासाठी हे युद्ध व्हावे म्हणून त्याने एक युक्ती योजली. पेलीज व थेटीस याचा विवाह समारंभ चालू असता एक सफरचंदाचे

नाही. ट्रॉजन युद्धातील अनेक वीर जसे देवत्व पावले, तद्वत भारतीय युद्धातील धर्म, भीम, अर्जुन, भीष्म द्रोण हेही देवत्व पावलेले दिसतात. भारतीय युद्ध ट्रॉजन युद्धाचे आधी अनेक शतके झालेले आहे असे निश्चितपणे म्हणता येते. )

## नरबली

पत्राय गावानजिक आर्टिमिस देवीचे एक मंदिर असून तिला **आर्टिमिस ट्रिक्लरिआ** म्हणत असत. या क्षेत्री नरबलीची रूढि होती. ही रूढि पडण्याचे कारण असे दिले जाते की, तेथील देवतेची पुजारीण कोमाथथो ही मेलानिपास देवाचे प्रेमपाशात अडकली. हा देव अतिशय सुंदर, देखणा होता, पण घरची मंडळी त्याच्या विवाहाला अनुकूल नव्हती. यास्तव मंदिरात दोघांच्या गाठीभेटी होत आणि प्रणयचेष्टा चालत. आर्टिमिस देवीला अर्थातच हा अनाचार आवडला नाही आणि तिने गावात रोगराई पसरून, सर्वत्र दुष्काळाने हाहा:कार केला. जनतेने चौकशी करता त्याना खरा प्रकार समजून आल्यावर, त्यांनी जोडप्याला देवीसमोर बळी दिले. इतकेच नव्हे, तर त्या दिवशी प्रत्येक वर्षी एक सुंदर पुरुष व मुलगी बळी देण्याची रूढि चालू केली.

## अश्विनीकुमार

भारतीय संस्कृतीमध्ये सूर्य आणि त्याची घोडीच्या स्वरूपातील पत्नी संज्ञा यापासून अश्विनीकुमारांची उत्पत्ति झालेली आढळते. ग्रीक संस्कृतीमध्ये डिमिटर देवता आपली कन्या कोरे हिला शोधीत असताना पोसेडन या सागरदेवाची तिजवर नजर गेली. त्याला चुकविण्यासाठी डिमिटरने घोडीचे रूप घेतले असता पोसेडनही घोड्याचे रूप घेऊन तिजजवळ गेला. त्यांच्या संयोगामुळे जो पुत्र झाला, त्याचे नाव एरिअन ( Arion ) असे ठेवण्यात आले.

## समुद्रमंथन

भारतीय संस्कृतीप्रमाणे देवदानवांनी केलेल्या समुद्रमंथनाची कथा ग्रीक व सेमेटिक संस्कृतींमध्ये आढळते. तसेच इराण संस्कृति मित्रावरुणाचे पूजन करते तर बॅबिलॉन संस्कृति अंतरिक्षामधील वरुण व इतर देवताचे पूजन मान्य करते. याचा अर्थ इतकाच घेता येईल की, या सर्व संस्कृतींचे घनिष्ट दळणवळण असले पाहिजे.

**देवतांना उत्तम वस्तू का अर्पण केल्या जात नाहीत ?** याचे उत्तर ग्रीक पुराणकरानी असे दिले की, देवताना यज्ञामध्ये उत्तमोत्तम हविर्भाग द्यावा, असे सर्वानुमते ठरलेले होते. पण एके वेळी अशी गोष्ट घडली की, एकादा पशूचा

उत्कृष्ट फळ विवाह मंडपात टाकले. ते दिव्य फळ पाहून सर्व देव मानवांना मोह उत्पन्न झाला आणि जो–तो ते मिळविण्याचा प्रयत्न करू लागला. हिरा, अथेना, आफ्रोदिता या देवतांनाही वाटले की, ते फळ आपणाला मिळावे. झ्यूसने सर्वांच्या भांडणात निकाल दिला की, जी सर्वात सुंदर स्त्री असेल, तिला ते फळ मिळावे. सर्वोत्तम स्त्री निवडण्याचे काम त्याने प्रिआमचा पुत्र पॅरिस यावर सोपविले. सर्व स्पर्धकांनी परिक्षकाजवळ आपली कहाणी सांगून, गुणवर्णन केले, स्वरूप वर्णन केले आणि आपल्या मनासारखा निकाल मिळविण्याची खटपट चालू केली.

एवढ्यावरच भागले नाही. स्पर्धा जिंकण्यासाठी लालूच अथवा आमिष परीक्षकाला दाखविण्यात आले. ( १ ) हिरा देवीने त्याला राज्यपद देऊ केले, ( २ ) अथेना देवीने त्याला युद्धात जय मिळवून देण्याचे वचन दिले तर ( ३ ) आफ्रोदिताने स्वत त्याची पत्नी होण्याचे मान्य केले. इतर देवतांची आमिषे अर्थातच यापेक्षा कमी दर्जाची असल्याने, शेवटी परीक्षकाने निकाल आफ्रोदिताचे बाजूने देऊन पत्नी मिळविली, हे निराळे सांगण्याची जरुरी नाही.

पण यामध्येच भावी संहार युद्धाचे बीज पेरले गेले. कारण हीरा आणि अथेना देवी, आफ्रोदिताचा द्वेष करू लागल्या, इतर स्पर्धकही अतिशय रुष्ट झाले, खरा न्याय न दिल्याने चिडले आणि तरवारी उपसून युद्धास तात्काळ सुरुवात झाली. हे युद्ध अनेक दिवस चालले होते आणि त्यामध्ये असंख्य माणसे मृत्युमुखी पडली व पृथ्वीचा भार हलका झाला. ( भारतीय युद्धात भगवान श्रीकृष्णाचे वर्तन, द्रौपदीची अवहेलना, द्रोणाचार्य, कर्ण, यांचे मृत्यू आणि अठरा अक्षौहिणी[१] सैन्याचे रणांगणावर समर्पण यांची तुलना या युद्धाबरोबर केल्यास चावगे ठरणार

---

१ टीप—१ अक्षौहिणी हा संख्यावाचक शब्द अनेक वेळा वाचण्यात येतो. पण ही संख्या किती याचे ज्ञान पूर्णपणे नसते. एका अक्षौहिणीमध्ये खालील प्रमाणे सैन्याचा समावेश आहे—

( १ ) २१८७० हत्ती–माहुत ( २ ) २१८७० रथ–सारथी ( ३ ) ६५६१० घोडे ( स्वाच्या तिप्पट ) ( ४ ) १०९३५० पायदळ ( रथाच्या पाचपट ) कौरव–पांडवांचे सैन्य १८ अक्षौहिणी होते, म्हणजे भारतीय युद्धात केवढी एकूण हत्या झाली ती पहा. ( १ ) ३९३६६० हत्ती ( २ ) ३९३६६० रथ ( ३ ) ११८०९८० घोडे ( ४ ) १९६८३०० पायदळ हत्ती + रथी घोडे = १९६८३०० + तितकेच पायदळ = ३९३६६०० म्हणजे सुमारे चाळीस लक्ष संख्या होते. यासाठीच कुरुक्षेत्र शब्द उच्चारला, म्हणजे अंगावर आजही शहारे येतात.

नाही. ट्रॉजन युद्धातील अनेक वीर जसे देवत्व पावले, तद्वत भारतीय युद्धातील धर्म, भीम, अर्जुन, भीष्म द्रोण हेही देवत्व पावलेले दिसतात. भारतीय युद्ध ट्रॉजन युद्धाचे आधी अनेक शतके झालेले आहे असे निश्चितपणे म्हणता येते. )

## नरबळी

पत्राय गावानजिक आर्टिमिस देवीचे एक मंदिर असून तिला आर्टिमिस टिकारिआ म्हणत असत. या क्षेत्री नरबळींची रूढि होती. ही रूढि पडण्याचे कारण असे दिले जाते की, तेथील देवतेची पुजारीण कोमायथो ही मेलानिपास देवाचे प्रेमपाशात अडकली. हा देव अतिशय सुंदर, देखणा होता, पण घरची मंडळी त्याच्या विवाहाला अनुकूल नव्हती. वास्तव मंदिरात दोघांच्या गाठीभेटी होत आणि प्रणयचेष्टा चालत. आर्टिमिस देवीला अर्थातच हा अनाचार आवडला नाही आणि तिने गावात रोगराई पसरून, सर्वत्र दुष्काळाने हाहा:कार केला. जनतेने चौकशी करता त्यांना खरा प्रकार समजून आल्यावर, त्यांनी जोडप्याला देवीसमोर बळी दिले. इतकेच नव्हे, तर त्या दिवशी प्रत्येक वर्षी एक सुंदर पुरुष व मुलगी बळी देण्याची रूढि चालू केली.

## अश्विनीकुमार

भारतीय संस्कृतीमध्ये सूर्य आणि त्याची घोडीच्या स्वरूपांतील पत्नी संज्ञा यापासून अश्विनीकुमारांची उत्पत्ति झालेली आढळते. ग्रीक संस्कृतीमध्ये डिमिटर देवता आपली कन्या कोरे हिला शोधीत असतांना पोसेडन या सागरदेवाची तिजवर नजर गेली. त्याला चुकविण्यासाठी डिमिटरने घोडीचे रूप घेतले असता पोसेडनही घोड्याचे रूप घेऊन तिजजवळ गेला. त्यांच्या संयोगामुळे जो पुत्र झाला, त्याचे नाव एरिअन ( Arion ) असे ठेवण्यात आले.

## समुद्रमंथन

भारतीय संस्कृतीप्रमाणे देवदानवांनी केलेल्या समुद्रमंथनाची कथा ग्रीक व सेमेटिक संस्कृतीमध्ये आढळते. त्सेच इराण संस्कृति मित्रावरुणाचे पूजन करते तर बॅबिलॉन संस्कृति अंतरिक्षामधील वरुण व इतर देवताचे पूजन मान्य करते. याचा अर्थ इतकाच घेता येईल की, या सर्व संस्कृतींचे घनिष्ट दळणवळण असले पाहिजे.

देवतांना उत्तम वस्तू का अर्पण केल्या जात नाहीत ? याचे उत्तर ग्रीक पुराणकारांनी असे दिले की, देवतांना यज्ञामध्ये उत्तमोत्तम हविर्भाग द्यावा, असे सर्वानुमते ठरलेले होते. पण एके वेळी अशी गोष्ट घडली की, एकादा पशूचा

कोणता भाग देवास अर्पण करावा आणि कोणता भाग भक्तानी घ्यावा, हे निश्चित करण्याची पाळी प्रोमेथिअस देवावर आली. त्याने एक बैल बळी दिल्यावर शरीराचे कापून निरनिराळे भाग तयार केले. पोटाच्या आतड्याचे एक बोचके तयार करून त्यामध्ये मासविरहित हाडे भरली, आणि दुसऱ्यात फक्त मास भरले. इतराना त्याच्या कृत्याबद्दल गधवार्ता नव्हती. झ्यूस या देवाला प्रथम पसती देण्यात आली असता, मोठे बोचके म्हणून त्याने फक्त हाडे भरलेले बोचके पसत केले आणि सहाजिकच भक्ताना मासाचे बोचके मिळाले त्या दिवसापासून देवाचे भक्त स्वत साठी भरपूर मांसल भाग ठेवतात आणि हाडासारखा निकृष्ट भाग देवाला अर्पण करतात इतर बाबतींतही हेच सदैव घडत असते. देवासाठी अर्पण करावयाच्या वस्तु निकृष्ट, बारीक, कमी किंमतीच्या दिल्या जातात आणि स्वत-साठी मात्र उत्तमोत्तम वस्तु घेतल्या जातात, वापरल्या जातात. लहान मुलाना खेळणी देऊन समजूत काढावी त्यातलाच हा प्रकार हरघडी घडतो आणि त्याच्या मोबदल्यात भक्त मात्र उत्तम गोष्टींची अपेक्षा देवापासून सदैव करतो.

### मंदिरप्रवेश फक्त स्त्रीवर्गाला

ऐरिस देवतेचे मदिर टेगी या गावी होते या मदिरात फक्त महिला-वर्गालाच प्रवेश मिळत असे यासबधीची दतकथा अशी की, स्पार्टन वीरानी या गावावर हल्ला केला असता येथील महिला गायकन्यानी शत्रूपासून रक्षण करण्यासाठी अत्यत भक्तिभावाने या देवतेचा धावा केला. भक्तांची हाक देवीने ऐकली आणि हातात शस्त्रसंभार घेऊन ती प्रकट झाली. आपल्या दिव्य तेजाने आणि पराक्रमाने तिने स्पार्टन सैन्याची दाणदाण उडवून दिली. या गोष्टीची स्मृति म्हणून या मदिरात फक्त स्त्रीवर्गाला प्रवेश देण्यात येतो (भारतामध्ये दुर्गादेवीने अनेक वेळा प्रकट होऊन शत्रूसैन्याची दाणादाण उडविलेली आहे भारतामध्ये पार्वतीचा पुत्र स्कद अथवा कार्तिकस्वामी याचे मदिरात स्त्रीवर्गाला प्रवेश देण्यात येत नाही )

### देवताचे इतर प्राण्यापासून पोषण

या सस्कृतीमधील देवताच्या जन्मापासून पोषण इतर प्राण्याकडून केले जाते हे एक वैशिष्ट्य मानावे लागेल. याचे एक कारण असे असू शकेल की, यांच्या देवता म्हणजे मानवच आहेत आपण काही उदाहरणे पाहू

(१) सायरस (मोठा) याला जन्मत आजोबांनी उकिरड्यावर टाकले असता, त्याचे पोषण कुत्री अथवा गायीने केले.

( २ ) अटलांटा ही जन्मतः स्त्री अथवा पुरुषदर्शक नसल्याने, तिला फेकून देण्यात आल्यावर तिचे पोषण वाघ व इतर रानटी जनावरांनी केले. कालांतराने तिची गाठ एका धनगराबरोबर पडल्यावर, त्याने तिला आपल्या घरी नेऊन वाढविली.

( ३ ) नानादेवीच्या छातीवर झ्यूसने एक डाळिंब ठेल्यावर ती गरोदर राहिली, ॲटिस नावाचा मुलगा झाला, पण जन्मतः तिने मूल फेकून दिल्यामुळे, त्याचे पोषण एका बोकडाने केले.

( ४ ) राजा गारगोरीस याच्या मुलीला एक विचित्र मुलगा झाल्यावर त्याचा नाश करण्यासाठी मातेने अनेक प्रयत्न केले, पण पुन्हा पुन्हा त्याचे रक्षण व पोषण पशूंनी केले. हाच मुलगा पुढे हॅबीस नामे मोठा योद्धा निपजला.

( ५ ) प्रिआमचा पुत्र पॅरीस याचे पोषण एका अस्वलिणीने केले.

( ६ ) किनोसचा जन्म झाल्यावर आईने त्याला समुद्रकिनारी टाकले, पण हंसपक्ष्याने त्याचे पोषण केले. कालांतराने एका कोळ्याने त्याला आपल्या घरी नेऊन पोषण केले.

( ७ ) इजिप्तचा राजा लॅगोस याला आपल्या नवबालकाबद्दल शंका येताच, त्याला फेकून देण्यात आल्यावर त्याचे पोषण एका गरुड पक्ष्याने केले, आपल्या पंखाचे त्याला आच्छादन दिले, इतकेच नव्हे तर त्याला जगविण्यासाठी स्वतः रक्तदानही केले.

सारांश, स्त्रीयांनी जन्मतः मुलाचा त्याग करण्याची प्रथा फार प्राचीन आहे. जेव्हा मुलाच्या जन्माने मानवी जीवनात अडचण निर्माण होते तेव्हा त्याग केला जात असला पाहिजे. अनेक प्राचीन संस्कृतींत ही रुढि आढळते.

## काही अद्भुत गोष्टींचे प्रकार

( १ ) होरेस नावाचा लेखक लिहितो की, एका राक्षसाने मुले गिळली आणि नंतर तशीच सुरूप परत ओकली. कोनेस व त्यांची मुले आणि हर्क्युलस व जेसन यांच्या साहसी कृत्यांमध्येही वरील गोष्टीस दुजोरा मिळतो.

( २ ) जादूच्या झाडामुळे (विशिष्ट वनस्पतीमुळे) मृत झालेला मानव जिवंत करता येत असे. याचे उदाहरण असे देतात की, क्रीट येथील मिनोस राजाचा पुत्र ग्लौकस अचानक एका मोठ्या पिपामध्ये बुडाला. त्याला जिवंत करण्यासाठी

राजाने दौंडी पिटली आणि मोठे इनाम जाहीर केले. पॉलिओडास नावाचा एक तपस्वी जवळपास रहात होता आणि त्याला पशुयोनीतील प्राण्यांचे गुणधर्म माहीत होते. काही फुले आणि प्राणी यांवर त्याने पूर्वी प्रयोगही केलेले होते. त्या मृत मुलाला घेऊन पॉलिओडास काही सुवासिक गुलाब[1] पुष्पासह एका मोठ्या पेटीत बसला असता, त्या सुवासिक वासाच्या रोखाने एक सर्प त्या पेटीत शिरला पॉलिओडासने त्याला त्वरितच ठार मारून त्याचे शव पेटीतच ठेवले. काही वेळाने वासाच्या दिशेने दुसरा सर्प पेटीत आला, पण पहिल्याचे मृत शरीर पाहाताच तो त्वरेने परत गेला. थोड्या वेळाने एक दिव्य औषधी वनस्पति घेऊन पुन्हा पेटीत येऊन त्या औषधीच्या योगे मृत सर्पाला त्याने जिवंत केले. दोनही सर्प बाहेर निघून गेल्यावर, त्या अवशेष औषधीच्या साहाय्याने पॉलिओडसने त्या राजपुत्रालाही जिवंत केले आणि राजाकडून बक्षीस जिंकले.

( ३ ) पक्ष्यांची भाषा—एका गृहस्थाने सर्पांचे जोडपे ठार केल्यावर त्याच्या पिलांचे पोषण मेलापस नावाच्या तापसीने केले. ती पिले मोठी झाल्यावर एके दिवशी त्यांनी आपल्या उपकारकर्त्याच्या कानाची पाळी चाटली. आश्चर्य असे की, त्या दिवसापासून मेलापसला पक्ष्यांची भाषा समजू लागली. हेलेनॉस व कासेंड्रा देवीच्या बाबतीत अशीच कृति पूर्वी झालेली होती.

( ४ ) कोल्हा-लांडगा गोष्ट—एकदा एक कोल्हा शेतातील धान्य साठवण्याच्या कणगीत शिरला आणि त्याने यथेच्छ ताव मारला. कच्चे धान्य भरपूर पोटात गेल्याने त्याचे पोट फुगले आणि प्रवेशद्वारातून त्याला बाहेर पडता येईना. इतक्यात एक लांडगा तेथे धान्य खावयास आला असता कोल्ह्याची हकिगत त्याला कळाली. तो कोल्ह्याला म्हणाला, आता शरीर बारीक होईपर्यंत आतच बसून रहा, बाहेर येण्याची गडबड करू नकोस अगर धान्यही खाऊ नकोस. कोल्ह्याने तशी वागणूक ठेवल्यावर त्याची तेथून सुटका झाली.

भारतीय पुराणात या तऱ्हेच्या अद्भुत गोष्टी आहेत. चोरी करणारा मनुष्य एका विशिष्ट आकाराच्या भोकातून पलिकडे जाऊ शकत नाही. पण निर्मळ मनुष्य मात्र जाऊ शकतो. पक्ष्यांची भाषा अनेक साधुसंतांना समजत असे, पण ती त्यांची तपस्या होती. सर्पाने चाटण्यासारखा अद्भुत प्रकार नव्हता. दिव्य औषधीने आजही सर्पविष उतरविता येते. राम-रावण युद्धात द्रोणागिरी पर्वतावरील दिव्य औषधीनेच लक्ष्मणाला प्राणदान मिळाले. सारांश, अशा प्रकारच्या कथा या दोन्ही संस्कृतींमध्ये आढळतात.

---

१. टीप—भारतीय संस्कृतीमध्ये चंदन, केवडा, रातराणी यांच्या वासाला सर्प आकर्षित होतो, हे सर्वांना माहीत आहेच.

## कोळी जाळे का विणतो ?

प्राचीन काळी लिडिया प्रांती आर्चिन नावाची हुशार विणकर बाई होती. ती आपल्या कलेत तरबेज असल्याने एके वेळी तिने अथेनादेवीलाच आव्हान दिले. थोड्या वेळाने देवता एका वृद्ध स्त्रीरूपाने तिजपुढे उभी राहून तिला म्हणाली, 'तू आपल्या कलेबद्दल भलतीच समजूत करून घेऊ नकोस आणि देवादिकांना आव्हानही देत बसू नकोस.' इतकी समजूत घातल्यावरही जेव्हा आर्चिन ऐकेना, तेव्हा तिने आपले देवतास्वरूप प्रकट करून आव्हान स्वीकारले. देवीने जे वणग तयार केले, त्यामध्ये सर्वसाधारण माणसे देवताचा राग कोणत्या कृतीने ओढवून घेतात, त्यांना शिक्षा कोणत्या प्रकारच्या होतात, देवताना प्रसन्न करून घेण्यासाठी कोणत्या कृति कराव्यात इ० कृति चितारल्या होत्या. आर्चिन बाईने आपल्या वणगात याच्या विरोधी कृति म्हणजे प्रेमकथा, प्रणयप्रसंग चितारले होते. अथेनादेवीने ही कलाकृति पाहिल्यावर तिचा क्रोध भडकला आणि तिने ते वस्त्र फाडून टाकले. इतकेच नव्हे, तर मानवाना अधोगतीला नेणाऱ्या असल्या कृति रेखाटल्याबद्दल तिला भरपूर खरपूस मारही दिला. देवीच्या कृतीमुळे आर्चिन बाईला खूप त्वेष चढला आणि रागाच्या भरात गळफास लावून जीव देण्याचा तिने प्रयत्न केला, पण अथेना देवीने तिला मरू दिले नाही तिचे रूपांतर कोळ्यामध्ये केले आणि कापडरूपी जाळी तिने विणीत बसावे असा शाप दिला. यासाठीच कोळी सदैव जाळी विणीत असतो अशी त्या संस्कृतीमध्ये समजूत आहे.

**ग्रीक देवतांना अनेक जोडीदार का दाखविले जातात ?** याचे थोडक्यात असे उत्तर देता येईल की, हेलेनिक काळापूर्वी देवता कुमारी स्वरूपात असत. ज्यांचे विवाह झालेले नाहीत अशा कुमारिकांना अनेक प्रेमवीर असणे अशक्य नव्हे, पण विवाह झाल्यावर हे बंधन येते. अर्थात ज्यांचे विवाह झालेले नाहीत अशानाच कुमारी म्हणून संबोधिले जाते. डिमिटर किंविली याच्या उदाहरणाने ही गोष्ट स्पष्ट झालेली आहे.

## पॅंडोरा देवीची पेटी

देवतांना उत्तम वस्तु का अर्पण केल्या जात नाहीत, या परिच्छेदामध्ये झ्यूस देवाची इतरांनी कशी फसगत केली हे आपण पाहिलेच आहे. त्यानंतर झ्यूस देवाने बदला घ्यावयाचे ठरविले. अग्निदेव यानी फायस्टोस याला मातीच्या चिखला पासून एक स्त्री बनविण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे पुतळा बनताच अथिना देवीने त्यामध्ये प्राणदान केले, चॅरिटीज या दयाशील देवतेने तिच्या अंगावर वस्त्रालंकार घालून सजविले, होराई देवतेने तिला उत्तम पुष्पालंकार घातले, आम्रोदिता

देवीने आपले सौंदर्य आणि मोहकता तिला दिली आणि शेवटी हर्मिस देवाने फसवणुकीची आणि घातकीपणाची विद्या दिली. एका पेटीत सर्व रोगराई व दुःखाची बीजे गच्च भरून झ्यूसने ती पेटी या सर्वसंपन्न पॅंडोराजवळ देऊन तिला सांगितले की, 'देवाची ही भेट तू प्रोमेथिअस याला नेऊन दे.' पण प्रोमेथिअस हा सावध होता. त्याला झ्यूस देवाचा डंख माहीत होता, म्हणून त्याने भेट स्वीकारण्याचे टाळले. परंतु, युक्ती-प्रयुक्तीने पॅंडोरादेवीने प्रोमेथिअसच्या भावाची भेट घेऊन ती पेटी त्याच्याजवळ देऊन त्याला प्रोमेथिअसला देण्यास सांगितले. ती स्त्री नंतर निघून गेली. काही वेळाने प्रोमेथिअसने ती पेटी घरात पाहताच सहज उघडली. तेव्हा सर्व रोग व दुःखबीजे त्यातून भराभर बाहेर पडून सर्वत्र फैलावली. पेटीत शिल्लक राहिली ती फक्त आशा. याप्रमाणे पृथ्वीवर रोगराई व दुःखाचा प्रसार सर्वत्र झाला व मानव फक्त सदैव आशा करीत राहिला.

भारतीय संस्कृतीत दुर्गादेवीची उत्पत्ति झाल्यावर अनेकांनी तिचे स्वरूप सजविण्यास सहाय्य केलेले असले, तरी ते दुष्टांचे निर्दालन करण्यासाठी आहे. पण या संस्कृतीमध्ये पृथ्वीवर दुःखाचा फैलाव होण्यासाठी अवतार झालेला असल्याने, येथे विरोधाभास आहे.

## शुभकार्यास देवतांना निमंत्रण नाही

हिरादेवीने एकदा सर्व देवांना उपहार दिला. पण त्या प्रसंगी पेलियस देवाला निमंत्रण दिले नाही; आर्टेमिस देवीने असाच एका शुभ प्रसंगाच्या वेळी ऑयनेस देवाला निमंत्रण दिले नाही; पेरेथिअन देवीने आपल्या विवाहप्रसंगी एरिसदेवाला बोलावले नाही इ० इ०.

भारतीय संस्कृतीमध्येही दक्षयज्ञाच्या प्रसंगी आपली कन्या उमा व जावई शंकर याना निमंत्रण दिलेले नाही. काही यज्ञयागप्रसंगी वशिष्ठांनी इंद्रदेवालाही निमंत्रण दिलेले नाही, अशी उदाहरणे सापडतात. यावरून हेच सिद्ध होते की, देवादिकांमध्ये हेवेदावे असतात, आणि वेळप्रसंगी त्याचे असे प्रदर्शनही घडवितात. मग मानवानी आपले हेवेदावे प्रकट केले तर नवल वाटावयास नको.

## देवतांचे विवाह-समारंभ

भारतीय संस्कृतीमध्ये ज्याप्रमाणे दरवर्षी तुळशी विवाह, राम-सीता विवाह इ० समारंभ साजरे केले जातात, तद्वत ग्रीक संस्कृतीमध्ये ही रूढि होती. युबोइआ प्रांती एक गुहा दाखविली जाते, ज्यामध्ये असा विवाह साजरा होत असे. क्रीटमध्ये थेरेस नदीच्या किनारी एक देवीची मूर्ति आहे, जिचा विवाह करीत असत. सॅमोस हे हिरा देवीचे जन्मस्थान मानले जाते. त्या ठिकाणी विवाह साजरा होतो, तेथील

रूढि अशी की, देवीच्या प्रतिमेची मिरवणूक नदीकिनारी गेल्यावर काही तास ती लपवून ठेवतात. याचे कारण असे दिले जाते की, फार पूर्वी या क्षेत्री मिरवणूक आल्यावर, चोरांनी देवीच्या मूर्तींचे हरण करून, काही काळ लपवून ठेवून, नंतर परत केली.

या रूढीचे महत्त्व पुढे प्रत्येक व्यक्तीच्या विवाह समारंभातही उमटले. विवाह झाल्यावर काही वेळ नवरी मुलीला वऱ्हाडी मंडळी लपवून ठेवीत, वर तिला शोधून काढी व समारंभ पूर्ण केला जात असे.

ॲरगॉस शहरी हिरादेवीची प्रतिमा मिरवणुकीने नदीवर नेत व तेथे मंगल स्नान घालून परत आणली जाई. यामध्ये भक्ताची भावना अशी होती की, भक्तांनी दर्शने घेताना अगर पूजन करताना जी पापकर्मे तिला अर्पण केलेली असतील आणि ज्यांचा अमाप साठा तिजजवळ झालेला असेल, ती स्नानाच्या वेळी देवता नदीच्या पाण्यात समर्पण करून, पुन्हा पूर्व तेजाने परत येते.[१] या देवीच्या राजदंडावर मोराची आकृति असे. याचे कारण असे की, मोर हा पर्जन्यसूचक प्राणी आहे असे मानीत. काही ठिकाणी ती कुमारी, सौभाग्यवती व विधवा स्वरूपात पूजली जाई, याचे विवरण इतरत्र येऊन गेलेले असल्याने द्विरुक्ति नको.

देवाच्या उत्सव-समारंभांतून एक फार चांगली प्रथा रूढ झाली व ती म्हणजे निरनिराळ्या खेळांचे सामने सुरू झाले. हे सामने सांघिक असल्याने, तेथील निरनिराळी नगरराज्ये जरी आपसात लढून सतत रक्तपात करीत, तरी या वेळी वैर विसरून धार्मिक कारणासाठी एकत्र येत. ग्रीसच्या चार भागांत हे सांघिक खेळ होत.—( १ ) आलिंपियन, ( २ ) पिथिअन, ( ३ ) इस्थमिअन, ( ४ ) नेमियन अशी त्यांची नावे होती. वर्षातील ७०–७५ दिवस या सर्व सामन्यात जात. त्यामुळे एकोपा वाढत असे. प्रत्येक नगराच्या देवतेसाठीही खेळ होत. भारतामध्ये प्रत्येक ग्रामदेवतेच्या नावाने आजही वार्षिक यात्रा भरून काही खेळ खेळले जातातच. ऑलिंपिया शहरी झ्यूस देवाच्या नावाने यात्रा भरून ५–६ दिवस सामने होत. प्रथम हे सामने मोकळ्या मैदानात होत. पण नंतर भव्य क्रीडांगण सुमारे ६५० चौ. फूट क्षेत्रफळाचे तयार होऊन तेथे भरत. तेथे

---

१. टीप—भारतीय संस्कृतीमध्ये गंगा, नर्मदा इ० नद्यांच्या बाबतीत हाच न्याय लागू केलेला दिसून येतो. भक्त आपली पापे नद्यांना अर्पण करतात आणि नारदासारखे साधुपुरुष त्या नद्यामध्ये स्नान केल्यास नद्या ती पापकर्मे साधु पुरुषाच्या चरणी अर्पण करून ब्रह्मदेवाकडे पोहचती करून स्वताचे जीवन निर्मळ राखण्याचा प्रयत्न करतात.

झूसच्या पुतळ्यासमोर एक डुक्कर आणि पेल्पॉस ( या देवाने पूर्वी शत्रूवर विजय मिळवून, हिप्पोडोमियाबरोबर विवाह केला. या दुहेरी आनंदाप्रीत्यर्थ हे सामने सुरू झाले असे मानण्यात येते. ) देवाला काळा मेंढा बळी देऊन, खेळाचा मुहूर्त केला जात असे. मारलेल्या पशूच्या रक्तात हात बुचकळून प्रत्येक खेळाडूला शपथ घ्यावी लागे, की, "आपण एक वर्षभर रीतसर क्रीडा विषयाचे शिक्षण घेतलेले असून, सामन्यात कोणतीही लाडीलबाडी करणार नाही." देवताविषयी खेळाडूंना इतका आदर व्यक्त करावा लागे. इतक्यावरही भागत नसे, तर खेळाडूंना प्रेक्षागृहात नेऊन नग्न करून, शारीरिक तपासणी होई. त्यामध्ये ते हेलेनिक वंशाचेच आहेत, त्यांचे रक्त शुद्ध आहे, चारित्र्य विशुद्ध आहे, यांची खात्री करून घेण्यात येत असे. कारण हे सामने देवतेसमोर व्हावयाचे असत.

भालाफेक, थाळीफेक, कुस्ती, मुष्टीयुद्ध, पळणे इ० खेळात प्राविण्य दाखविणाराला मानाचे कडे देण्यात येई, पण त्याचा मोठा फायदा म्हणजे आयुष्यभर त्याला राजकीय करापासून सूट मिळे व जेवणही फुकट मिळत असे. सनपूर्व नवव्या शतकात हे सामने सुरू झाले आणि सन ३९३ साली रोमन सम्राट थिओडोसिअस याने ते बंद केले. सांप्रतचे ऑलिंपिक सामने दर चार वर्षांनी भरतात, त्यांचे मूळ या सामन्यात आहे. कारण ते त्यांचेच पुनर्जीवन आहे. स्त्रीवर्गाला या सामन्यात मज्जाव असून, त्यांच्यासाठी हिरादेवीच्या उत्सवात निराळे सामने होत.

पिथिअन सामने अपोलो देवाच्या स्मरणार्थ सनपूर्व ५८६ मध्ये सुरू झाले व दर चार वर्षांनी भरत असत. याच वेळी डेल्फिदेवीचा उत्सवही होत असे. इस्थिमियन सामने सनपूर्व ५८२ साली पोसेडन देवाप्रीत्यर्थ सुरू होऊन दर तीन अगर पाच वर्षांनी भरत. नेमियन सामने हरक्युलसने झ्यूस देवासाठी निमिया येथील खिंडीत सुरू केले, म्हणून हे नाव आले.

शक्तीचे प्रदर्शन व कौशल्याचे खेळ यांच्या या स्पर्धा धर्मकारण आणि एकता याला फार उपयुक्त होत असत. देवताचे उत्सव होत, त्यांना योग्य ती बळींच्या रूपाने आहुती मिळे आणि त्यांचा मानसन्मान झाल्यावर, ग्रीक जनता देवाजवळ मागणे मागत असे की—

"संपत्ति, आरोग्य आणि विजयप्राप्ती मिळावी, शुभ व अशुभ शकुन दाखवून, संकटाची पूर्वसूचना देऊन त्यापासून बचाव करावा, देशात सैनिक-वृत्ती तेवत राहून उत्तम शिपाई पैदा व्हावेत, काव्य आणि संगीत यांच्याही स्पर्धांमुळे त्या कलांची भरभराट व्हावी, राष्ट्राची सदैव भरभराट व्हावी इ० इ०." देवता त्यांच्या इच्छा पूर्ण करते अशी त्यांची श्रद्धा होती.

## शुभाशुभ शकून

भारतामध्ये ज्याप्रमाणे काही कृतींवरून शुभाशुभ ठरविण्याची पद्धती आहे, त्याप्रमाणे या संस्कृतीमध्ये होती. स्वप्ने, पक्ष्याचे उड्डाण, भूकंप, ग्रहण, बळी दिलेल्या प्राण्याची आतडी याच्यावर त्याचा विश्वास होता. निकियस हा अथिनियन योद्धा लढाईतून माघार घेण्याच्या तयारीत असता, चंद्रग्रहण सुरू झाले आणि त्याची हालचाल बंद झाली, पण शत्रूंनी त्याचा फायदा घेतला. नाकेबंदी करून आरमाराचा नाश करून टाकला. माघार घेणाऱ्या सैन्याला चंद्रग्रहण अशुभ असते, या श्रद्धेपोटी त्याला थांबावे लागले, पण सर्वनाश झाला. दुसरे उदाहरण म्हणजे ग्रीकांनी इराणवर स्वारी केली, त्या वेळी झेनोफन हा नेता होता. त्याचा आत्मविश्वास होता की, "देवाच्या कृपाप्रसादाने आपण निश्चित यशस्वी होऊ." सैनिकासमोर त्याने आत्मविश्वास प्रकट करताच, एका शिपायाला शिंक आली आणि तो शुभशकून मानून त्याने त्वरितच देवाला पशुची आहुती दिली.

## देवतांचा कौलप्रसाद

भारतामध्ये ज्याप्रमाणे काही व्यक्तींच्या अंगात देवताचा संचार होऊन कौलप्रसाद घेतला जातो, तद्वत् ग्रीक लोकातही होते. महाराष्ट्रात ज्याप्रमाणे लढाईत पतन झालेल्या वीराचे स्मारक 'वीरगळ' या स्वरूपात करतात आणि त्या ग्रामदेवता बनतात, त्याप्रमाणे ग्रीक योद्ध्याचेही 'वीरगळ' उभारले जात व ते ग्रामदेवता बनत. पारनासस पर्वताच्या पायथ्याशी डेल्फी व एपिरसमध्ये डोडोना ही देवताची दोन स्थळे असे भविष्य सांगण्याबद्दल प्रसिद्ध होती. डेल्फी येथे जमिनीतून एका ठिकाणी थंड हवा वर येत असून तो अपोलो देवाचा श्वासोच्छ्वास आहे, अशी भाविकांची श्रद्धा होती. देवीची जोगतीण पिथिया ओढयावर स्नान करून, त्या ठिकाणी तिपाईवर बसून उत्तरे देत असे. तिला प्रश्न विचारल्यावर ती अर्धवट बेशुद्धावस्थेत जाई, आरोळ्या देई आणि तुटक-तुटक वाक्ये बोलत असे. तेथे असलेले देव-पुजारी ती वाक्ये उतरून घेत[1], आणि काव्यरूपाने उत्तरे सांगत असत. उदाहरणच घ्यावयाचे, तर मीडियाचा राजा क्रोसेस याचे देता येईल. इराणी सम्राट कायरस यावर स्वारी करण्यापूर्वी देवीला ग्राकून विचारला, तेव्हा उत्तर मिळाले, "क्रोसेस जर हॅलीस नदी ओलांडील तर साम्राज्याचा नाश करील." या लढाईत क्रोसेसचा पराभव झाला, तेव्हा नष्ट होणारे साम्राज्य इराणचे नसून त्याचे स्वतःचेच होते, असा अर्थ होता.

---

१. टीप—बाली बेटात धर्मगुरू पेदादा याप्रमाणे अंगात संचार झाल्यावर प्रश्नाची उत्तरे देतो व ती लिहून घेतली जातात.

डेल्फीवर सर्व ग्रीक जनतेचा विश्वास होता. स्पार्टन योद्धे प्रत्येक स्वारीच्या वेळी पिथियाकडून कौल घेत असत. ग्रीकांना एकत्र ठेवणारे हे एक राष्ट्रीय साधन होते. झिमॅन नावाचा लेखक म्हणतो, " अनेक शतके ग्रीक जगतात डेल्फी ही एक अपूर्व दैवी शक्ती बनलेली होती. " तेथील मंदिराच्या व्यवस्थेसाठी ग्रीसमधील बारा जमातींचा एक संघ स्थापन केलेला होता. त्याला ' अँफिक्टियनी ' म्हणत असत. या संघाचा उद्देश केवळ धार्मिक असून मंदिराची दुरुस्ती व रक्षण याची ते व्यवस्था पहात. सनपूर्व सहाव्या शतकात सिन्हाच्या लोकांनी डेल्फी देवीच्या यात्रेकरूंवर कर बसवून भरपूर द्रव्य संपादन केले. ही वार्ता व्यवस्थापक संघाला कळताच, देवीच्या भक्तावर हे आक्रमण समजून, ह्या संघाने सिन्हा लोकावर स्वारी करून ते नगर नष्ट करून टाकले आणि तेथील लोकांना गुलाम म्हणून बाजारात विकले. त्याचप्रमाणे येथील देवस्थानची काही संपत्ती लाटल्याबद्दल आणि अपोलो देवस्थानच्या जमिनीत जबरीने शेती केल्याबद्दल या संघाने गुन्हेगाराना शिक्षा केलेली होती.

परंतु दुर्दैव असे की, या संघ-सभासदाची एकी फक्त मंदिराच्या कारभारापुरतीच होती. राजकीय बाबींशी त्याचा सुतराम संबंध नव्हता. इतकेच नव्हे तर प्रांतीय राजकारणावरून ते एकमेकात भांडतही असत. यामुळे धर्मकारणात सर्वसमर्थ असलेला हा संघ राजकारणात निष्फळ ठरला. सर्व ग्रीकांना तो एकत्र आणू शकला नाही.

ग्रीक संघाचे हे उदाहरण मुद्दाम विस्तृत देण्याचे कारण इतकेच की, ते सांप्रतही अनेक मंदिराना अनुकरणीय व्हावे. मंदिरे उभारली जातात. दैनंदिन खर्चासाठी द्रव्यनिधी, जमिनी व इमारती उभारल्या जातात, पण कालांतराने येणारे काही पदसिद्ध विश्वस्त अनेकदा या द्रव्याचा वा जमिनीचा अपहार करतात आणि मूळ देवस्थान भिकेला लावतात. अशा वेळी गावातील सर्व जमात पुढाऱ्यांनी एकत्र येऊन प्रामाणिकपणे नियमांची अंमलबजावणी केली, तर मंदिर उभारणाऱ्या व्यक्तीचा उद्देश नक्कीच सफल होऊन त्याचा आत्मा संतुष्ट होईल. मंदिर विश्वस्तांनी वरील उदाहरण सदैव ध्यानात ठेवण्याजोगे असेच आहे.

ही ग्रीक संस्कृति जरी अनेक वर्षे अस्तित्वात होती, तरी सनपूर्व सहावे शतक हे धार्मिक दृष्ट्या आणि तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने फार महत्त्वाचे समजले जाते. कारण उघडच आहे की, याच वेळी एकसमयावच्छेदेकरून अनेक देशांत धार्मिक क्रांती झालेली दिसून येते. महाराष्ट्रीय संत ज्ञानेश्वर यांच्याच शब्दांत सांगावयाचे झाले तर " हीं ईश्वरभक्तांची मांदियाळी " निर्माण झालेली होती. भारतामध्ये गौतमबुद्धाचा सनातन धर्मातून वेगळे होऊन अहिंसाप्रचार, चीनमध्ये लाओत्से

व कान्फ्युशिअस यांचा धर्मप्रचार, अरबस्थानात इसिया आणि त्यांचे सहकारी यांची हिब्रू धर्माची शिकवण, इराणमध्ये झोरोस्तिअन आणि ग्रीकमध्ये पायथॅगोरस यांची वैदिक वेदान्ताची शिकवण ही सर्व उदाहरणे पाहिली म्हणजे मांदियाळीचा बरोबर अर्थ ध्यानात येईल.

ग्रीसच्या दक्षिणेस अयोनिअन सागर द्वीपसमूहात सॅमॉस नावाचे बेट असून सनपूर्व ५८२ साली या क्षेत्री पायथॅगोरस याचा जन्म झाला. त्याचे वडील मेसारक्स हे उत्तम सुवर्णकार असून, त्यांच्या कृती अद्यापही काही पदार्थ-संग्रहालयात पाहण्यात येतात. पायथॅगोरसचा जन्म हा विशेष अर्थाने महत्त्वाचा आहे. पूर्वी ग्रीसमध्ये ओरॅकस नावाच्या देवताची मंदिरे असून तेथे शकून सांगितले जात. शुभकार्याला जाण्यापूर्वी भारतामध्ये ज्याप्रमाणे देवतांचा कौलप्रसाद किंवा मुहूर्त पाहून निघण्याची प्रथा होती ( काही ठिकाणी चालूही आहे. ), तद्वत् ग्रीकांमध्येही होती. मेसारकसला या देवीने असा आशीर्वाद दिला की, " तुला सुंदर देखणा पुत्र होऊन, तो अत्यंत बुद्धिवान् आणि दिगत कीर्तीचा होईल. " ती भविष्यवाणी खरी ठरून पायथॅगोरस याचा जन्म झालेला आहे.

धार्मिक संस्कृति आणि अध्यात्म यांच्या अभ्यासकाला खूपखूप प्रवास करावा लागणे, हे जणू ठरलेलेच आहे. आद्य शंकराचार्य, रामदास, नामदेव, गुरुगोविंदसिंह या भारतीय व्यक्तींप्रमाणे पायथॅगोरस याने वयाच्या सुमारे विसाव्या वर्षी प्रवासाला सुरवात करून ऑरफिक, कॅबेरिक व खल्डियन संस्कृतींचा अभ्यास करून अरेबियात आला. तेथे २२ वर्षे धर्मशास्त्रांच्या संगतीत घालवून नंतर तो भारतामध्ये येऊन गौतम बुद्धाचे संगतीत राहिला. तत्कालीन बौद्ध धर्मग्रंथामध्ये त्याला ' यवनाचार्य ' म्हणून संबोधिले आहे. अनेक भारतीय विद्यांचे आणि तत्त्वज्ञानाचे परिशीलन करून सुमारे वीस वर्षांनी तो मायदेशी परत गेला. क्रोटोना गावाजवळ एक उंच टेकडीवर राज्यकर्त्यांनी भव्य संगमरवरी पाषाणाची इमारत त्याला बांधून दिली आणि त्यामध्ये त्याने ज्ञानसत्राचा आरंभ केला. याच ठिकाणी मुझेस ( सरस्वती ) देवीचे सुंदर मंदिरही होते. या संस्थेत ६०० विद्यार्थी असून, त्याची श्रावक, गणितज्ञ व आध्यात्मिक अशी वर्गवारी होती. अर्थात ही सर्व भारतीय नावे आहेत. प्रोकस नांवाचा संशोधक लिहितो की, ग्रीसचा धर्मदाता ऑरफ्यूज हा भारताचा रहिवासी असून ग्रीसमध्ये दिलेले सर्व तत्त्वज्ञान भारतीय होते. इतकेच नव्हे तर ज्याला आज ' फोर्थ डायमेन्शन ' शास्त्र म्हणतात ते शास्त्र तेथील विद्यार्थ्यांना शिकविले जात होते.

या संबधांत टेनिसन म्हणतो—

The individual itself seemed to dissolve and fade away in to bondless being, and that is not a confused state of mind, but

clearest of the clearst, surest of the surest, utterly beyond words the only true life"

संशोधक आइनस्टाईनही तोच खुलासा करतो—

The mind can proceed so far upon what it knows and can proves There come a point when the mind takes a leep (call it intuation or what you will) and comes out on a higher plague of Knowlege but can never show how it gets there"

वरील उताऱ्याचा सारांश असा की, भारतीय योगमार्गातील जपी, तपी, संत, साधूनी जी अवस्था 'तुरीय' म्हणून समजली आणि वर्णन केली तीच ही अवस्था होय. मानसशास्त्रासारख्या विद्या मनाने रचल्या पण मनाच्या ज्ञान धारणेलाही काही सीमा आहेच. मन सर्वज्ञ नाही. मन द्वैतात विचार करू शकते, पण अद्वैतात नाही. कारण ते स्थलकालातीत आहे. पण योगी तुरीयावस्थेत गेल्यावर मनाच्या पलीकडे जाऊ शकतो. हीच चवथी अवस्था म्हणतात. याचे ज्ञान पायथॅगोरसने प्रथम भारतात शिकून घेतले आणि ग्रीसमध्ये प्रचार केला.

हे सर्व जरा खुलासेवार देण्याचे कारण इतकेच की, ग्रीक तत्त्वज्ञान म्हणून जे सांगितले जाते, त्याचा मूळ पाया भारतीय तत्त्वज्ञानावरच आधारित आहे. पायथॅगोरसनंतर सॉक्रेटिस आणि त्यानंतर प्लेटो जन्माला आले व क्रोटोना विद्यालयात जे तत्त्वज्ञान पायथॅगोरसने शिकविलेले होते, त्याच्याच आधारे आपल्या भाषेत ग्रीक तत्त्वज्ञान म्हणून सांगितले इतकेच.

## सामाजिक-स्थिति

वरीलप्रमाणे उच्च तत्त्वज्ञान शिकविण्यास, त्या वेळची सामाजिक परिस्थिती कारणीभूत झाली, असे म्हटल्यास वावगे ठरू नये. त्या वेळी समाजाचे आचार विचार अथवा सामाजिक नीतिमत्ता कोणत्या थरातील होती यासंबंधी काही उदाहरणांनी स्पष्टीकरण केलेले बरे.

(१) महिलावर्ग व्यभिचार मानीत नसे. नवरीला वर जबरीने पळवून नेई. शारीरिक स्पर्धांमध्ये स्त्रिया नग्नावस्थेत पुरुषवर्गाच्या बरोबर सहभागी होत. त्यांचे आरोग्य व शरीरसौष्ठव श्रेष्ठ प्रतीचे असे. पति, बंधू अगर पुत्र युद्धामध्ये मारला गेल्यास त्यांना धन्यता वाटे, पण पळून अगर अपयश घेऊन आल्यास अतिशय दुःख होई.

(२) सनपूर्व ६२१ साली ड्रेको नावाच्या अधिकाऱ्याने अतिशय कडक कायदे केले की, (अ) खून करणारास फाशी, तसेच आळशीपणाने रहाणाऱ्या

व्यक्तीलाही फाशीची शिक्षा ठेवली. (ब) कर्ज न फेडणाराला, कर्ज देणारा इसम गुलाम म्हणून वापरू शकत असे. (क) एखाद्याने साधा कोबीचा कांदा चोरला तरीही फाशीची शिक्षा होत असे.

(३) अथेन्स शहरी जन्मलेली मुलगी घराबाहेर टाकीत आणि तिला जो घेऊन जाईल, त्याची ती गुलाम होत असे. पंधराव्या वर्षी विवाह होईपर्यंत मुलींना घरातच कोंडून घ्यावे लागे.

(४) वयाच्या सातव्या वर्षी मुलाला गुरूकडे शिक्षणासाठी पाठवून देत आणि तेथे तो १७ वर्षांपर्यंत रहात असे. गुरुग्रही गवतावर झोपणे, पायात जोडे न घालणे, एकच कपडा वापरणे, जेवण कमी जेवणे आणि एकदा तरी आर्टिमिस देवीसमोर फटके खाणे इ० व्यवस्था असे. अशा शिक्षणसंस्थांना ते फिडिशिआ म्हणत.

(५) प्रत्येक नागरिकाला वयात आल्यावर शपथ घ्यावी लागे-" आमचे देव व घरे यांचे रक्षण करीन, मातृभूमीचा वारसा कधीही कमी होऊ देणार नाही, विधिनियम व राजाज्ञेचे पालन करीन, घटनेचे रक्षण करीन, आयुधांना कमीपणा आणणार नाही, सार्थदारांना सोडणार नाही, पूर्वजांचा धर्म सन्मानपूर्वक पाळीन. या सर्वांना देव साक्षी आहेत." राष्ट्राबद्दल एवढी निष्ठा होती, ती पहा.

ग्रीक संस्कृतीच्या वेळी, तेथे "सोफिझम" नावाचा एक मतप्रवाह अथेन्स शहरी चालू झाला. सॉक्रेटिसचा जन्म सनपूर्व पाचव्या शतकात झाला आणि त्यानेही यांतील काही तत्त्वे स्वीकारली होती. या पंथाचे लोक अत्यंत बुद्धिवान् व कुशलवक्ते होते. आपल्या सबल कोटीप्रमाणे ते सर्व जनतेला शिकवीत की, " ग्रीक पुराणामध्ये वर्णिलेल्या देवता, ह्या केवळ मनुष्याच्या अज्ञानी मनाने उभे केलेले आभास आहेत. या देवतांचा आणि निसर्गाचा मुळीच संबंध नाही. समुद्रात जो वादळे होतात, ज्या भूकंपामुळे पर्वत हलतात, ज्या कारणामुळे अवर्षण होते, या सर्वांचा आणि देवतांचा काडीमात्र संबंध नाही. या देवतांच्या ठिकाणी मानवांनी स्वतःच्या भावना कल्पिलेल्या आहेत. या देवता खरोखरच जर अस्तित्वात असतील, तर त्यांच्या ठिकाणी क्रोध, असूया, सूडबुद्धी, द्रव्यलोभ वगैरे संभवत नाही."

याच्या अगोदरचा ग्रीक इतिहास पाहिला, तर भारतीयांप्रमाणे सी देवतांच्या अवतारविषयक कथांनी भरलेला आहे, असे त्यांच्या पुराणावरून दिसून येते. त्यांतील ही कथा पहा. ट्रायवर स्वारी करण्यासाठी ग्रीक आरमार एकत्र केले असता, समुद्रावर प्रचंड वादळ झाले आणि आरमाराची संपूर्ण वाताहत झाली. हे संकट जलदेवतेच्या कोपानुळे झाले असे समजून, राजाने आपली कन्या सागराला

अर्पण केली, पण राणीला हा देवाधर्मासाठी दिलेला बळी आवडला नाही, म्हणून तिनें स्वतःच्या नवऱ्यावरच सूड उगवला. या राजाचे नाव सेफिउस, राणीचे नाव कासिओपिआ आणि मुलीचे नाव आंड्रोमिडा होते. वादळ उठण्याचे कारण असे होते की, वरुणदेव नेपच्यून याचा राणीने अनेक वेळा अपमान केलेला होता, यास्तव वादळ उठवून आरमार नष्ट केले होते. राजाची डेल्फी येथील देवी कुल-स्वामिनी होती आणि तिच्या आज्ञेवरूनच मुलीला समुद्रदेवता नेपच्यूनला संतुष्ट करण्यासाठी बळी दिली होती. परंतु समुद्रकाठी तिला जखडून बांधली असता, पर्सिउस नावाचा देव तेथे अवतरला आणि त्याने आंड्रोमिडाची सुटका केली.

या कथेचे साम्य भारतीय शर्मिष्ठा, देवयानी कथेबरोबर लावले जाते. आकाशात शर्मिष्ठेचा तारा, वृषपर्वा, ययाती ही नक्षत्रे या कथेचीच द्योतक होत.

तात्पर्य हेच की, सॉफिझम रूपाने त्या वेळी बुद्धिवादी देव न मानणारा वर्ग होता, तसाच साम्प्रतच्या कालीही आहे. दुर्जन असल्याविना सज्जनाचे महत्त्व पटणार नाही, त्यांतीलच हा प्रकार समजावा आणि उपेक्षा करावी, हे योग्य होय.

### १. ग्रेट मदर

अनातोलियामधील वनस्पतीची प्रमुख देवता. तिचे मूळ नाव सिबेले अथवा किबेली. ह्या देवीला अनेक नांवे आहेत. भूदेवी, पर्वतदेवी, अगदस् (पर्वत शिखरावर राहणारी म्हणून अगदस्), तिला डिंडिनस पर्वतावर राहणारी म्हणून डिंडिमनी म्हणत. ह्या पर्वतावर प्रथम एका दगडाची पूजा करीत. उल्कास्वरूप (Batulie) हा दगड स्वर्गातून पडला अशी लोकाची श्रद्धा होती. हाच दगड पुढे रोममध्ये आणून त्याची पूजा सुरू झाली. अशीच पूजा क्रीट व ग्रेस येथे आढळून आली आणि त्यावरून असे अनुमान काढले की, ग्रेट मदर ही हेलेनिक कालापूर्वीची असावी. क्रेटन बेटातील ऱ्हिआ, ब्रिटोमार्टिस, दिकत्याना, सिमिली, बेंडिस, कोटीस, हेकेटी ही सर्व रूपे ह्या देवीची संबंधी असावीत अशी भाविकांची श्रद्धा आहे. कालांतराने हेलेनिक देवता आर्टिमिस, डिमिटर, त्यांच्या स्वरूपांत क्रीटमदेवतामध्ये विलीन झालेल्या असाव्यात. आटार गाटीस व डेरसोटो ह्या देवतामुळे सेमेटिक देवतांचे वळण, डिमिटर, आर्टिमिस् ह्या देवतांवर आले. अनातोलिया येथील देवतांमुळे इजिप्तची डायना ह्या देवीवर सेमेटिक व हेलेनिक देवतांचा प्रभाव पडलेला असावा. ग्रेट मदरचे स्वरूप हे अशा रीतीचे आहे. (वेबस्टर डिक्शनरी)

### २. अर्थ मदर (Earth Mother)

भूमातेचे कार्य अनेकविध आहे. पशु, पक्षी, झाडे, झुडपे, वन्य प्राणी व मानव ह्या सर्वांचे पोषणकार्य ह्या देवीला करावयाचे असते, इतकेच नव्हे तर

वस्तूंचे उत्पादन व संवर्धन करावयाचे असते. खाण्यासाठी फळे व अन्न, वापरण्यासाठी कापूसादि तंतुमय पदार्थ, लेण्यासाठी सुवर्णादि धातू इ० इ० जीवनोपयोगी आवश्यक त्या वस्तू प्राथमिक अगर पूर्णावस्थेत उत्पन्न करून प्राणिमात्रांना पुरवावयाच्या असतात. कोणी एका कवीने भाषेची थोरवी गाताना म्हटले आहे की, " दे जन्म मात्र माता, भाषा व्यवहार चालवी सकळ. " पण ह्यांत भाषा ह्या शब्दाऐवजी माता शब्द घातला. " माता व्यवहार चालवी सकळ " इतकी थोरवी वर्णन करावी लागेल. पुराणातील बहुतेक कथा ह्याच तत्त्वावर आधारित आहेत. ह्या तत्त्वांचे उत्तम प्रतीक म्हणून वृक्षाकडे बोट दाखविता येईल. जन्म, संवर्धन, रूपांतर आणि शेवटी नाश ही सर्व स्थित्यंतरे हे रूपक दाखविते. पाने, फुले, फळे ह्यावर सर्वांचे जीवन अवलंबून आहे. पक्षी वृक्षावर घरटी बांधतात, त्यांचे तो रक्षण करतो, मानव त्याच्या छायेखाली आसरा घेतो, अगर त्या वृक्षाच्या काटक्या व पाला गोळा करून आच्छादन तयार करतो. परंतु झाडाच्या खोडात त्याचे जीवनसत्त्व साठवून ठेवलेले असते. पुरुषत्व अगर स्त्रीत्व दोन्ही रूपे एकात्तच विलीन झालेली असतात. फळ तयार होण्यास लागणारे स्त्री-पुरुषबीज एका ठिकाणीच असते. इतकेच नव्हे तर अडोनिससारख्या देवाची अगर एकादशीसारख्या कुमारी देवीची उत्पत्ति झाडाच्या खोडातच होते. झाड हे पृथ्वीचे गुप्तस्वरूप होय आणि म्हणूनच ती एक आदिशक्ति मानली आहे.

## ३. अटलांटा ( Atalanta )

अर्केडिया प्रांतातील आयसस व क्लिमेनी या जोडीची ही मुलगी होय; काही वेळा बाओशिया प्रांतातील शोइनसची मुलगी म्हणूनही मानतात. पण ही दोन्ही स्वरूपे एकच होत. तिचा जन्म झाला तेव्हा बापाने तिला फेकून दिले, कारण त्याला मुलगा पाहिजे होता. त्या अर्भकाचे पोषण एका अस्वलिणीने केले. बालपणापासून रानटी जनावरांच्या संगतीत राहिल्यामुळे, ती अतिशय धैर्यशील आणि युद्धकलेत तरबेज झालेली होती. शिकार करण्यात तर ती मटाईत होतीच, पण तिचा प्रमुख गुण म्हणजे पळण्याच्या शर्यतीत ती कोणालाही हार जात नसे. आपली तैलबुद्धी आणि चतुरपणा या कलेत ती प्रकट करीत असे.

ती विवाहयोग्य झाल्यावर बापाने तिची भेट घेतली आणि विवाहाविषयी सुचविले. तिने वडिलांची आज्ञा मान्य केली पण अट अशी घातली की, " पळण्याच्या शर्यतीत जो मला हरवील त्याच्याबरोबर मी विवाह करीन. स्पर्धक जर हरला तर त्याला ठार करण्यात येईल. " या विचित्र अटीमुळे सर्वसाधारण माणूस तिजबरोबर विवाहास तयार होत नसे. शेवटी हिपोमेनेस नावाच्या तरुणाने

तिचे आव्हान स्वीकारले. तो ॲफ्रोदिता देवींचा भक्त असल्याने यातून यशस्वी होण्यासाठी त्याने देवीची प्रार्थना केली. देवीने त्याला दिव्य तीन सफरचंदे देऊन सांगितले की, " पळताना तू मागे पडल्यास एकेक सफरचंद मार्गावर टाकीत जा. " याप्रमाणे शर्यत सुरू झाल्यावर जेव्हा अटलांटा त्याच्या पुढे गेली, तेव्हा त्याने एक फळ खाली टाकले. ते दिव्य फळ पाहताच अटलांटा आकर्षित झाली, खाली वाकली आणि फळ उचलून घेतले, पण तेवढ्यात ती मागे पडली. याप्रमाणे दुसरी दोन फळे क्रमाने खाली टाकली आणि अटलांटाने उचलून घेण्यात वेळ गमावल्याने ती शर्यत हरली. अर्थात युक्ति आणि ॲफ्रोदिता देवींच्या मार्गदर्शनामुळे तो विवाह घडून आला.

## ४. अथेना

क्रीट बेटातील मायसन संस्कृतीमधील एक देवता होय. मायसन राजवाड्याजवळ या देवीचे एक मंदिर होते. या देवतेच्या उत्पत्तीसंबंधी कथा अशी की, सृष्टिकर्ता झ्यूस याने आपली सहचरी मेतीस हिचा गर्भ गिळल्यानंतर, तो कोठून तरी बाहेर निघणे अपरिहार्य होते. वास्तव त्याने आपल्या मस्तकातून तो गर्भ बाहेर पडण्यास जागा दिली, तीच ही अथेना देवी होय. जन्मतःच या देवीच्या हाती कुऱ्हाड हे शस्त्र दिले गेल्याने सर्वत्र घबराट उत्पन्न झाली, सूर्यदेवानेही आपली गती थांबवली. आपले शस्त्र परजून ती सर्वांना भीती दाखवीत होती. शेवटी तिला शांत करण्यासाठी सूर्यदेवाच्या दोन पुत्रांनी यज्ञयाग आरंभिला, पण होमकुंड पेटविण्यासाठी ते अग्नीला आणण्यास विसरले. तरी त्यांनी तसेच पूजन पुरे केले. पुढे अशी प्रथा पडली की, अग्नीशिवाय पूजन पुरे करावयाचे. ऱ्होड्स बेटातील लोकांनी ही प्रथा चालू ठेवली होती. त्यामुळे देवी त्या जनतेवर प्रसन्न झाली आणि उत्तम कलाकौशल्याचे ज्ञान त्यांना अर्पण केले.

परंतु दुसरे एक मत असे की, या देवीचा जन्म कोणत्या तरी जलाशयाच्या काठी झालेला असावा. कारण जलाशयाच्या उत्सवप्रसंगी अर्केडिअन प्रांती, ट्रिटन नदीच्या उगमस्थानी जलाशयाचे पूजन झाल्यावर या देवतेच्या जन्मप्रसंगाचे वर्णन सांगण्याची रूढी आहे. आफ्रिकेमध्येही ट्रिटोन सरोवराच्या उत्सवप्रसंगी जन्म वर्णन करण्याची रूढी पाळण्यात येते.

ही देवता कुमारी होती किंवा नाही याबद्दल काही वेळा मतभेद होतात. याबद्दलची अशी कथा आहे की, हेफायस्टॉस या देवाला हिच्याबरोबर विवाह करावा असे वाटले. ही वार्ता देवीला समजताच ती लपून बसली. तरी शेवटी देवाने तिला शोधून काढून धरले आणि विवाहास तिच्या इच्छेविरुद्ध प्रयत्न चालविले. आपल्या शस्त्रानिशी देवी प्रतिकार करीत असता, हेफायस्टॉस देवाचे रेत खाली

भूमीवर पडले आणि त्यातून एरिक नावाचा पुत्र जन्मास आला. तो पुत्र अथेना देवीचाच आहे असे समजून गीया देवतेने तो उचलला आणि मातेजवळ संरक्षणासाठी आणून दिला. पण अथेनाला ही गोष्ट मान्य नसल्याने तिने त्या पुत्राला एका मोठया मजबूत पेटीत बंद करून संरक्षणासाठी तीन मुलींच्या ताब्यात दिला. त्या मुलींना सक्त ताकीद दिली की, ती पेटी त्यांनी उघडून पाहू नये. कदाचित तिचा हेतू असा असावा की, याप्रमाणे ठेवल्यावर ते बालक मृत होऊन जाईल. पण परमेश्वरी लीला आगाध आहे.

काही दिवसानी त्या मुलींची उत्कंठा वाढून, दोघीजणींनी मोठा हिय्या करून ती पेटी उघडताच, आतील दृश्यामुळे त्या बेभान झाल्या. पेटीतील मुलाचे पोषण दोन सर्प करीत असल्याचे त्याना दिसले, आणि त्यामुळे त्या भयचकित झालेल्या होत्या. अथेना देवीला हे वृत्त समजताच आणि मूल जिवत आहे हे कळताच तिने त्याला आपला मानले आणि आपल्याच मंदिरात स्थान दिले. यावरून तिला पुत्र होता असे दिसून येते. शिवाय अथेन्स आणि इलिस शहरी या देवीचे माता म्हणूनच पूजन होत असे.

देवीस्वरूप

साहित्य, चित्रकला अगर शिल्प यामध्ये तिचे जे स्वरूप रेंगाटलेले आढळते, ते डौलदार, उग्र चेहरा, धारे डोळे व शक्तिमान शरीरयष्टी असे आहे. साधारणत: अंगावर उंची कपडे व चिलखत, हातात लांब भाला व ढाल आणि त्यावर गॉरगनदेवींची प्रतिमा, मस्तकावर लहानसा किरीट आणि पायाखाली दैत्यासारखा प्राणी दाबून ठेवलेला आहे. युद्धप्रसंगाच्या देखाव्यात ती कोणा राक्षसाबरोबर युद्ध खेळत असल्याचे दाखवितात. यावरून ती रणदेवताही मानलेली दिसते.

अथेन्स शहराच्या मध्यभागी ॲक्रा-पोलिस नावाच्या टेकडावर अनेक मंदिरे बांधलेली होती. सनपूर्व पाचव्या शतकात येथील शिल्पकला जरी सर्वत्र विखुरलेली असली, तरी तिचा परमोच्च बिंदू येथील मंदिरात दृग्गोचर होत होता. शिल्पात विलक्षण ओज दिसत असे. पार्थेनॉन अथेना देवीचे येथील मंदिर हे त्यापैकीच एक होय. डोरिक पद्धतीचे भव्य खांबानी ते सुशोभित होते. लाकूड, सुवर्ण आणि हस्तिदंत यांनी बनविलेला देवीचा प्रचंड पुतळा येथे तळपत होता. हे मंदिर इक्टिनस याने बांधले, तर देवीचा पुतळा फिडियस या शिल्पकाराने तयार केला. देवीच्या हातातील भाल्याची लांबी ३० फूट होती. दर्यावर्दी नाखव्यांना या देवीच्या पुतळ्याचे दर्शन सहज घडत असे. यावरून तो 'किती भव्य होता याची कल्पना करता येईल.

या देवीला युद्धदेवता मानल्यावर, इतर आनुषंगिक गोष्टी तिच्या ठायी असल्याच पाहिजेत. अश्वविद्या या देवीने सैनिकांना दिली, तशाच रथाचा उपयोग कसा करावा याचेही शिक्षण दिले. यासंबंधीची कथा अशी की, मेडुसा नावाच्या राक्षसिणीच्या शरीरातून पेगॉस नावाचा उत्कृष्ट घोडा निघाला होता, पण त्याच्या-वर स्वार होणे कोणालाच शक्य होईना. शेवटी एका रात्री बेलेरेफोन नावाच्या योद्ध्याच्या स्वप्नात अथेनादेवी येऊन त्याच्या हाती घोड्याचा लगाम दिला. जागा होऊन पाहतो तर फक्त लगाम हातात आहे, पण देवता नाही. शेवटी त्याने देवतेची इच्छा समजून, त्या अवखळ पेगॉस घोड्यावर मांड ठोकली. त्याला पुरता दमविला आणि ताब्यात आणला.

अथेनादेवी ही संगीतकलेचीही देवता मानली जात होती. आरगस प्रांती तर तुतारीवाद्याचे देवतास्वरूप पूजन होई. बासरी वाद्य हे तिचीच निर्मिती मानतात. यासंबंधी कथा अशी की, सततच्या बासरी वादनाने तिला एक प्रकारचा तिटकारा उत्पन्न झाला, कारण तिचे वादन करणाराला तोंड वेडेवाकडे करावे लागे अथवा होत असे. मर्सियस (Marsyas) ही इटालियन लोकांची रणदेवता होय. एके वेळी त्याने बासरी वाजविण्यास सुरुवात करताच, या देवीचे भान हरपले आणि त्याला यथेच्छ चोप दिला, तरी बासरीवादन थांबले नाहीच. एवढेच नव्हे तर त्या कलेत त्याने प्राविण्य मिळवून अपोलो देवाला वादनाचे आव्हान दिले. त्या दोघांमध्ये असे ठरले की, जो कोणी जिंकील, त्याने दुसऱ्याचे वाटेल ते करावे. शेवटी अपोलो देवाने पैज जिंकल्यावर त्याने मर्सियसची कातडी सोलून काढली. त्याचा परिणाम असा झाला की, त्याच्या अंगातील वाहणाऱ्या रक्तामुळे म्हणा अगर इतर देवतांना हा प्रकार सहन न झाल्याने त्यांच्या नेत्रांतून होणाऱ्या अश्रुपातामुळे म्हणा, एक नदी वाहू लागली. तीच पुढे मर्सियस नावाने प्रसिद्ध झाली.

या देवीचे स्वरूप उग्र आणि तापट स्वभावाचे. अशी कथा प्रचलित आहे. की, लहानपणी ती ट्रिटन देवाजवळ रहात असे. ट्रिटनची मुलगी पॅलस योद्ध्याजवळ अनेक युद्धप्रसंगाची तालीम घेत असे. एके दिवशी या मुलीचे आणि अथेनाचे भांडण होऊन, ती मुलगी अथेना देवीवर शस्त्र फेकणार, इतक्यात झ्यूस देव तेथे प्रकट झाला आणि आपले शस्त्र उपसून तिचा प्रतिकार करू लागला. पण पॅलसला ही गोष्ट आवडली नाही आणि त्याने झ्यूसवर हल्ला चढविला. हे दोघे वीर युद्धात गुंतले आहेत, असे पाहून अथेना देवीने आपल्या शत्रूवर वार करून त्याला यमसदनास पाठविले. पण नंतर तिला आपल्या कर्माचा पश्चाताप झाल्याने, तिने त्या मुलीची मूर्ति तयार करून बसविली.

ॲटिक येथील उत्खननात एक प्राचीन मूर्ति मिळाली आहे. एका गोल विटेवर ती मूर्ति कोरलेली आहे. तिच्या एका बाजूला ग्रीसह व दुसऱ्या बाजूला ॲफ्रिट्रीट देवता आहेत. आजूबाजूला जलामध्ये मत्स्य फिरत असून, पायाखाली एक दैत्य दाखविला आहे. सनपूर्व ४३८ साली फिडिअन्स लोकानी सुवर्ण आणि हस्तिदंतमिश्रित तयार केलेला या देवीचा एक पुतळा पर्थेनॉन शहरी बसविलेला होता. पुढे रोमन लोकानी याचीच प्रतिकृती अथेन्स शहरी बसविली. सबब या देवीला पारथेनॉन–अथेना असे नाव पडले. येथली या उत्तर ग्रीसमधील नाण्यांवर अथेना देवीची स्वरूपे कोरलेली होती. होमरच्या काव्यातही या देवीचा उल्लेख आहे. हेलेनिक संस्कृतीत ही देवी कला आणि कलोत्पादन याची देवता होती. शहाणपणा, कलाकाराला सहाय्यक, घरे–किल्ले–शहरे यांची रक्षण करणारी देवता मानली गेल्याने, ती एक मातृशक्ति म्हणूनच ओळखली जात असे. विकास-विस्तारकार्यातही ही एक शक्तिदेवता मानलेली आहे.

## ५. अना पेरिना (Anna Perenna)

या देवतेचा वार्षिक उत्सव दिनांक १५ मार्च रोजी साजरा केला जातो. या देवतेसंबंधीची कथा अशी की, मार्स या देवाला मिनर्व्हा देवीबरोबर विवाह करण्याची इच्छा झाली. हा विवाह घडून यावा म्हणून त्याने अना पेरिना देवीला मध्यस्थी करण्यास सांगितले, पण तिने अनेक खोटी कारणे सांगून हा विवाह लांबविला. मार्सने फारच लकडा लावल्यावर, एके दिवशी मिनर्व्हा विवाहाला तयार आहे, असे त्यास कळविले. सर्व तयारी झाली, नवरदेव बोहल्यावर तयार झाला, मंगलाष्टके झाली आणि अंतरपट बाजूला झाल्यावर नवरदेवाने पाहिले, तेथे मिनर्व्हाऐवजी एक म्हातारी अना असल्याचे दिसून आले सर्व वऱ्हाडी मंडळींना तो रहस्यमय विषय हसण्यास कारणीभूत झाला.

## ६. ॲफ्रोदिता

स्पार्टा व सायप्रस येथील ही युद्धदेवता होय. झ्यूस व डायोनी यांची मुलगी आणि हेफायस्टॉस या अग्निदेवाची पत्नी होय. होमरच्या काव्यात हा जरी पती दाखविला असला तरी प्रत्यक्षात तो तिचा प्रियकरच होता. काहींच्या मते भारतीय संस्कृतीमधील लक्ष्मीदेवीप्रमाणे या देवतेचा जन्म सागराच्या फेसातून झाला असे मानतात. सायप्रस बेटातून ती ग्रीसमध्ये गेली, म्हणून तिला 'कॅप्रिस' हे नाव प्राप्त झाले.

प्रणय देवता म्हणून या देवीला मोठे स्थान आहे. स्त्रियाना विवाहकार्यात सहाय्य करणारी, त्यांना मोहकता देणारी, प्रेमसंबधात यशस्वी करणारी इत्यादी

कार्ये ती करते. तसेच तिचा जन्म सागरातून झाला असल्याने, ती खलाशांना संरक्षण देणारी, वृक्षसवर्धन करणारी, युद्धात सहाय्य करणारी इत्यादी गुण तिजमध्ये आहेत. चिमण्या, बगळे हे तिचे आवडते असून, इतर प्राण्यांत मेंढा, कासव, राजहंस हेही तिला आवडतात.

पौराणिक कथांवरून असे दिसते की, या देवीचा अडोनिस (Adonis) बरोबर संबंध आलेला होता. वास्तविक अडोनिस हा सेमेटिक वंशाचा देव असून त्यालाच तामुज असेही म्हणतात. असिरियाचा राजा थेईस याची कन्या स्मर्ना ( Smyrna ) हिला या देवीने मारले. याचे कारण असे दिले जाते की, ती या देवीला मानावयाला तयार होईना. शेवटी ती मुलगी दाईच्या मदतीने, अंधाराच्या पांघरुणात पळून गेली. हे वृत्त उघडकीस आल्यावर, इतर देवांनी मध्यस्थी करून, ॲफ्रोदिताचा तिला त्रास न व्हावा म्हणून त्या मुलीचे रूपांतर एका वृक्षामध्ये केले. काही दिवसांनी त्या वृक्षातून एक तरुण जन्माला आला.

या तरुणाबाबत दोन मतप्रवाह आहेत. एक प्रवाह असा की, ॲफ्रोदिताने त्या तरुणाला एका पेटीत बंद करून ती पेटी पर्सेफेनजवळ दिली. पण कालांतराने जेव्हा तो मोठा झाला आणि मोहक दिसू लागला, तेव्हा पर्सेफेनने त्याला परत करण्याचे नाकारले. शेवटी देवांचा राजा झ्यूस याने निकाल दिला की, ४ महिने त्याने ॲफ्रोदिता, ४ महिने पर्सेफेन आणि ४ महिने त्याला योग्य वाटेल त्या ठिकाणी त्याने रहावे. या निर्णयामुळे पर्सेफेनजवळ तो आठ महिने राहू लागला. कालांतराने शिकार करीत असताना त्याला अस्वलाकडून मृत्यू आला. पण पूर्व द्वेषामुळे हे अस्वल ॲफ्रोदिताने मुद्दाम पाठविले असले पाहिजे असे मानण्यात येते.

या देवीचा संबंध अँचीसेस ( Anchises ) बरोबरही दाखविला जातो. ट्रॉयमधील इडा पर्वतावर या दोघांची भेट झाली, प्रेमसंबंध वाढले आणि त्यातून पुत्ररत्न प्राप्त झाले. होमरच्या काव्याप्रमाणे अँचीसेसला आपल्या पत्नीचे सत्य-स्वरूप प्रथम समजलेच नाही. मात्र ते समजल्यावर तो गर्भगळित झाला, त्याचा शक्तिपात झाला. हेफायस्टॉस हा ॲफ्रोदिताचा पती समजला जातो, हे आपण वर पाहिलेच आहे. पण आपल्या पत्नीचा संबंध एरीस या युद्धदेवतेबरोबर आहे, असे त्याला समजल्यावर, त्याने आपल्या पत्नीपासून दूर राहण्याची त्याला समज दिली, तरी त्याचा उपयोग झाला नाही. एरीसबरोबर समोरासमोर दोन हात करण्याची पतीची हिंमत झाली नाही, तेव्हा त्याने एक युक्ती योजली. ती दोघे प्रणयात दंग असताना त्याने एक भक्कम जाळे त्यांच्यावर टाकले आणि सर्व देवांना ते हिडीस वर्तन पाहण्याला पाचारण केले. या प्रकारानंतर अग्निदेव अतिशय संतापला आणि काडीमोड देण्यास तयार झाला, पण सागरदेवता पोसेडन याने मध्यस्थी करून त्याची समजूत घातली. काही नुकसानभरपाई

एरीसने करावी यासाठी पोसेडन स्वतः जामीनही राहिला आणि नंतरच ती दोघे एकत्र नांदू लागली.

एका छायाचित्रात ती हंसावर आरूढ झालेली दाखविली आहे. काही ज्ञाते लोकांचे मत असे की, तिच्या वैषयिक भावनेच्या पूर्ततेसाठी तिने जी वर्तणूक केली, ती मानवाला नाशाकडे नेणारी अशीच आहे. सनपूर्व पाचव्या शतकातील सायप्रस बेटातील एका चित्रात तिच्या हाती डाळिंब दिलेले असून, मूर्ति दिसावयास कलापूर्ण आहे.

## ७. आर्टिमिस

मिनॉन संस्कृतीची मूळची ही देवता आणि झ्यूसची मुलगी. टिटानवंशीय लेटोबरोबर झ्यूसचा संबंध आल्याने ती गरोदर राहिली. तिला दोन मुले होतील असे अनुमान करण्यात आले, पण बाळंतपणासाठी तिला कोठे जागा मिळेना. होमरच्या काव्यातील वर्णनाप्रमाणे असे दिसते की, अपोलो देव जन्माला येणार म्हणून सर्वत्र भीतीचे वातावरण निर्माण झाले असल्याने, हिला कोणी स्थान देत नव्हते. कारण हिच्या बाळंतपणातूनच अपोलो देवाची कदाचित् उत्पत्ती व्हावयाची. यापेक्षाही आणखी एक सबळ कारण होते. ते असे की, सवतीमत्सर जागृत झाल्याने हिरादेवीने आपला पुत्र एरीस याला आसमंतात पाठवून ताकीद दिली होती की, लेटोला कोणी जागा देऊ नये. इतकेच नव्हे, तर मत्सर इतका पराकोटीला गेला होता की, लेटोला तिने आज्ञा केली की, सूर्यप्रकाशात तिने बाळंतही होऊ नये. शिवाय पियान नावाचा सर्प तिच्या पाळतीवर सोडलेला होता.

अशा बिकट परिस्थितीत ती जागा शोधीत शोधीत एका बेटावर आली असता तेथील राजा डेलॉस याने तिचे स्वागत करून प्रसूतीला जागा दिली. या ठिकाणी सागरदेवता पोसेडन तिच्या मदतीला आली. बाळंतपणाच्या वेळी त्याने सागराला प्रचंड भरती आणून, ते बेट लाटांनी काही वेळ झाकून टाकले. यामुळे सूर्यप्रकाश नसतानाच तिने दोन मुलांना जन्म दिला. या बाईचे बाळंतपण कोणी केले असा प्रश्न कोणी विचारल्यास, त्याचे उत्तर असे की, प्रथम आर्टिमिस मुलगी जन्माला आली आणि आपल्या मातेला मागाहून आलेल्या भावाच्या वेळी मदत केली. या तिच्या सेवाभावामुळेच प्रसूतीसमयी अडलेल्या स्त्रिया या देवीची आराधना करतात. सुखरूप सुटका करणे हा तिचा गुणच मानला जातो.

होमरच्या म्हणण्याप्रमाणे प्रसूतीसमयी इतर अनेक देवस्त्रिया तेथे उपस्थित होत्या. अशी एक दंतकथाही आहे की, वेदना असह्य झाल्यावर, लेटोने एका जुनाट ताड वृक्षाला घट्ट मिठी मारली आणि प्रसूतीवेदना सहन करण्याचा प्रयत्न केला.

जन्मतःच या देवीने अचाट कृत्य करण्यास प्रारंभ केला. सागरदेवतेचा ओरिअन नावाचा एक पुत्र असून त्याला पाण्यावरून चालत जाण्याची किमया अवगत होती. पण तो स्त्रैण असल्याने त्याने अनेक स्त्रियांबरोबर संबंध जोडलेले होते. शेवटी ओपिस नावाच्या स्त्रीवर तो बलात्कार करीत असताना, त्याच्या पापाचे घडे भरले असल्याने आर्टिमिस देवीने बाण मारून त्याला ठार केले. होमरच्या म्हणण्याप्रमाणे आकाशातील कृतिका नक्षत्राबरोबर या गोष्टीचा संबंध असावा.

सायप्रस बेटावरील दिक्टे पर्वतावर या देवीचे स्थान होते, यास्तव हिला दिक्टेयानी असे नाव मिळाले आहे. इफेसिअन येथील मंदिरात या देवतेचा जो पुतळा मिळाला आहे, त्यामध्ये देवीला अनेक स्तनाग्रे असल्याचे दाखविले आहे, त्यावरून ही देवता फलोत्पादनाला सहाय्य करणारी आहे, असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. यासाठी या देवीला इलिथिया असे नाव देण्यात आले. वरील अनेक कार्यास्तव या देवतेचे कार्य विकास विस्तार स्वरूपाचे आहे.

आर्टिमेन या शब्दाचा अर्थ कत्तल करणे असा मिळतो, त्यावरून तिला हे नाव प्राप्त झालेले असावे. अटिका युबाइआ प्रदेशात या देवतेला जो पशुबली अर्पण करतात, त्याचे अवयव आधी खची केलेले असतात. आर्टिमिस हेकेटी असे नाव असलेल्या एका छायाचित्रात, ती अनेक पिलांना दूध पाजीत आहे, तर नग्न स्वरूपात योनीभाग दिग्दर्शित करणारी लांडगी स्वरूपात दाखविली आहे. सनपूर्व पाचव्या शतकातील, इटलीमधील एका पुतळास्वरूपात, या देवीचे मस्तक छाटलेले असून, दोन्ही बाजूला पंख, मजबूत शरीरबांधा आणि दोन्ही हातांनी पुढेच पाय वर उचलून कमरेजवळ घट्ट धरलेले असे चित्र रेखाटलेले आहे. सनपूर्व ७४० वर्षापूर्वीची स्पार्टामध्ये या देवतेची हस्तिदंतावर कोरलेली एक मूर्ति आढळली असून, त्यामध्ये ती झाडाड, पशूंची अधिष्ठात्री, पृथ्वी, आप, अंतरिक्ष यांवर सत्ता गाजविणारी दाखविलेली असून, त्याचे प्रतीक म्हणून मासा, लांडगा व पक्षी याना जवळ बाळगणारी दाखविली आहे. (वरील सर्व प्रकारची छायाचित्रे न्यूमन यांच्या ग्रंथात दिलेली आहेत.)

ऑलिंपियामध्ये या देवीला कुमारी, शूर स्वभावाची, चंद्राबरोबर मैत्री असणारी, शिकार-देवता मानीत असत. रोमन लोक हिला डायनासदृश मानीत असत. तिच्या प्रथम अवस्थेत ती तळी, विहिरी, जंगले व त्यातील वन्य प्राणी, डुकरे, असले यांची देवता मानली जात असे. यास्तव होमरच्या काव्यात तिला अमोटेस असे संबोधिले आहे. ॲथिनिअन गोष्टीवरून असे दिसते की, पूर्वी या देवतेला नरबली अर्पण करित असत. पण कालांतराने तिने जंगली स्वरूपाचा त्याग केल्यावर ती लहान मुलांची प्रसूतीसमयीची देवता बनली. कुमारिकांना विवाहात

सहाय्यकर्ती झाली. कालांतराने हेकेटीबरोबर हिचा संबध आल्यावर, तिचा जादु-टोणा आणि पाताळातील दुष्ट देवताबरोबर संबंध जोडण्यात आला.

या देवीला लोचिआ ( Lochia ) असेही एक नांव होते. ग्रीक पुराणात जरी हिला अपोलो देवाची बहीण मानलेले असले तरी हिचे स्वागत ग्रीसप्रमाणे इतर संस्कृतींमध्येही होत असे. क्रेटनमधील ब्रिटोमार्टिस ही तिची सेवक म्हणून मानतात. यावरून हेच सिद्ध होते की, ती मूलतः ग्रीक-देवता नव्हे. एका युद्ध-प्रसंगी हिरा देवीने आपल्या धनुष्याने हिला मारले असून, रडतओरडत तिला रणांगणातून हाकलून दिलेले आहे.

८. आयो ( Io )

ऑरग्रस प्रांतीचा राजा इनाकस याची ही कन्या होय. हिरादेवी हिला गुरु-स्थानी मानीत असे. सृष्टिकर्ता झ्यूसने हिजवर प्रेम करताच हिरादेवीचा मत्सर जागृत झाला. हिरादेवीचे कटकटीतून सुटका करून घेण्यासाठी आणि तिची पाळत टाळण्या-साठी झ्यूसने आयोला गाय बनविले आणि तिचे प्रेमाराधन करू लागला. हिरादेवीच्या चाणाक्ष दृष्टीतून झ्यूसची ही क्लृप्ती सुटली नाही. तावडतोब त्या गायीला तिने आपल्याजवळ घेतले आणि सर्वांगावर हजारो नेत्र असलेल्या पॅनोप्टस देवाला तिच्या हालचालींवर लक्ष ठेवण्यास नियोजित केले. हर्मिस हा झ्यूसचा मित्र असल्याने त्याने पॅनोप्टवर मोहनी अस्त्र टाकून त्याला ठार केले. आयोने तेथून पळून दूर देशी जावे म्हणून शेवटी हिरादेवीने तिच्या अंगावर अनेक गोमाशा उत्पन्न केल्याने तेथे रहाणे तिला अशक्य झाले आणि वैतागाने पळत पळत ती इजिप्त देशात पोहोचली.

झ्यूसने तिचे प्रेमाराधना चालविले असता त्याचा हस्तस्पर्श तिला झालेला असल्याने, तेवढ्यानेच ती गरोदर झालेली होती.[1] यामुळे इजिप्तमध्ये पोहोचल्यावर,

१. टीप—तेजापासून देहाची उत्पत्ती होते. तसेच सीता, द्रौपदी आदि स्त्रिया या अयोनिसंभवा आहेत, याचे कोडे अनेकांना आकलन होत नाही. कारण "योनेः शरीरम्" म्हणजे योनीपासून देहाची उत्पत्ती हा सर्वसाधारण नियम आपण नेहमी पाहतो. वैशेषिक दर्शनात योनिज व अयोनिज असे शरीराचे दोन प्रकार सांगितले आहेत ( वै. सू. ४–२–५ ). जरायुज आणि अंडज असे ते प्रकार होत. म्हणजे पहिले मानव अगर पशूचे शरीर मानले, तर दुसरे पक्षी अगर सरपटणारे प्राणी हे होत. त्यांची उत्पत्ती अंड्यातून होते. या दुसऱ्या प्रकारात आणखी पोटभेद सांगितले. ते असे की, उवा-लिखांप्रमाणे घामटपणातून निर्माण होणारे स्वेदज प्राणी; वृक्ष, तृण यांसारखे जमिनीतून वर येणारे उद्भिज प्राणी आणि. मनु, सप्तर्षींसारखे मानसभावातून निर्माण होणारे अदृष्टविशेषजन्य प्राणी. अर्थात सीता, द्रौपदी, मीनाक्षी यांचे जन्म याच प्रकारात मोडतात.

दिवस भरलेले असल्याने ती प्रसूत होऊन जो पुत्र झाला, त्याचे नाव इपाफस (Epaphas) ठेवले गेले. कालांतराने इजिप्तमध्ये गायरूपी आयोदेवीचे पूजन ईसीया नावाने प्रचारात आले.

नवनाथांपैकी गोरखनाथ हा विभूतीमधून जन्म पावला, तर महिषासुर हा आपल्या मातेच्या चितेच्या राखेतून उत्पन्न झाला. शंकरानी मदनाला जाळल्यावर त्याच्या राखेतून गणपतीने स्वत ला खेळण्यासाठी एक बाळ बनविले, अशा कथा आहेत चंद्रहास राजाला अयोनिसंभवा अर्थात बिनभोगाची पत्नी पाहिजे होती, ती मिळाली अशी कातकरी लोककथा आहे. पार्वतीने आपल्या अंगावरचा मळ काढून गणपती बनविला हे सर्वश्रुत आहे. गोंड राजा शालवृक्षाच्या फुलातून जन्म पावला, तर काहींची उत्पत्ती कुश तृणापासून झालेली आपण पाहतो.

याबाबतीत म. म. गोपीनाथ कविराज असे विवरण देतात की, जेव्हा इथेतील परमाणू शुद्ध संकल्पाने आकृष्ट होऊन यथास्थानी स्थिर होतात, तेव्हा ते योनीसंभवविनाही देह उत्पन्न करू शकतात. याचे उदाहरण म्हणजे प्रलयानंतर, सृष्टीच्या प्रारंभी जी उत्पत्ती असते व देहनिर्मिती होते, ती अयोनीसंभवा असते. सृष्टिकर्त्याच्या संकल्पानेच ते परमाणू एकत्र होत असतात. ऊर्ध्वरेता पुरुषाच्या अंत शक्तीचा प्रवाह ऊर्ध्वगतीत वाहत असतो. काही वेळा ऊर्ध्वरेता योगी स्त्रिया-बरोबर शरीरसंबंध न करता केवळ नाभी, हृदय अगर मस्तक याला स्पर्श करून तिच्या ठिकाणी गर्भसंभव करू शकतो. ग्रीक पुराणात झेऊसच्या या प्रकारच्या अनेक कथा आहेत

आद्यशक्ति ही पुरुषसंबंधाविनाच या सकल सृष्टीची उत्पत्ति करते, हे या ग्रंथात इतरत्र आलेलेच आहे. सारांश, यज्ञकुंडातून देहाची निर्मिती होणे, अगर भूगर्भातून सीता उत्पन्न होणे, म्हणजे महान योगीपुरुषाच्या केवळ संकल्पाने भौतिक कारणे एकत्र येऊन देह निर्माण होतो, त्याला स्त्रीपिंडाची आवश्यकता नाही, असेच मानले पाहिजे.

(भा. सं. को. ४/४९८–९९, आधारांकित.)

९. एम्फीट्रीट (Amphitrite)

सागरदेवता पोसेडन याची ही सहचारी होय काही ठिकाणी या देवतेचे पूजन 'नायडस' या जलदेवतेबरोबर होत असे, कारण ती सुद्धा एक जलदेवताच मानलेली होती. असे असले तरी काही ठिकाणी या देवतेला 'नायडस' या जल-देवतेची माता मानलेली आहे. पोसेडन देवाने तिला पळवून आणून आपल्या घरी जबरदस्तीने ठेवलेले होते, यामुळे ती त्याजवळ राहण्यास नाखूष होती. दुसरे कारण असे की, ही जरी पोसेडनजवळ सतत असली तरी पोसेडन हा चोरून दुसरीकडे

आणि स्कायला या दोघींची भेट घेत असे आणि अर्थात हे एम्फीट्रीटाला मान्य नव्हते. तेव्हा या सर्व त्रासातून मुक्त होण्यासाठी एक दिवस ती पोसेडनच्या घरातून पळून गेली आणि ॲटलसच्या घरी जाऊन राहिली.

पण ॲटलस आणि डेल्फी यांचे काही प्रेमसंबंध असल्याने डेल्फीला तिचे येणे आवडले नाही. तेव्हा आपली सवत एम्फीट्रीट आणि ॲटलस यांचा काटा काढण्यासाठी, तिने एक जादूचे औषधी झाड त्यांच्या घरात टाकले. त्याचा परिणाम असा झाला की, ती दोघेही विद्रूप झाली. कमरेच्या वरील भाग राक्षसाप्रमाणे तयार होऊन गळ्यात कुत्र्याच्या पट्ट्याप्रमाणे एक पट्टाही आला. खलाशी अथवा सागरावर काम करणाऱ्या लोकांना ॲटलसचे हे रूप भयंकर वाटून ते त्यापासून दूर राहू लागले. याप्रमाणे जलदेवता असूनही ती जलावर काम करणाऱ्या भक्तांना अंतरली.

## १०. आटार गाटिस

ही मूळ सिरिअन संस्कृतीमधील एक देवता. कालांतराने ती ग्रीसमध्ये गेली म्हणून तिला डी. सिरिया, डी. असुरिया अशी नावे प्राप्त झाली. ह्या देवीचा एक ब्रॉंझ धातूचा पुतळा रोममध्ये आहे व त्याची छायाचित्रे पुस्तकातून छापलेली आढळतात. ह्या पुतळ्याची बनावट फार प्राचीन नसावी असे तज्ज्ञांचे मत आहे. ही मूर्ति पाय जोडून उभी असून अंगावर वस्त्रे व मस्तकावर टोप आहे. गळ्यात अलंकार असून पायापासून छातीपर्यंत सर्व शरीर सर्पवेष्टित असे दाखविले आहे. मुखाचे सूक्ष्म अवलोकन केले तर एखाद्या विषयाच्या चिंतनात मग्न असलेले असे स्वरूप दिसते. ॲफ्रेदितासारखा कंबरपट्टा असून हातात राजदंड घेऊन ती सिंहासनावर उभी राहिलेली आहे (न्यूमन चित्र ५९, जेम्स पान १८४). ही सेमैटिक वंशाची फलोत्पादक देवता असावी असे दुसरे एक मत आहे. काही ठिकाणी तिचा उल्लेख व्हीनस म्हणून केला जातो. काही ठिकाणी तिला अस्टार्टेचे स्वरूप मानतात; पण ते चूक असावे, असे वाटते. रोम व त्याच्या वसाहतीमध्ये ही देवी डी. सिरिआ म्हणून पूजली जात असे. डेरेसोटो हे ह्या देवीचेच स्वरूप होय. (वेबस्टर डिक्शनरी)

## ११. एलेथिया ( Eileithyia )

सृष्टिकर्ता झ्यूस व हिरादेवी यांच्या संबंधातून या देवीचा जन्म झालेला आहे. यासंबंधीची पौराणिक कथा अशी की, एके काळी अर्केडिअन जमात ऑलिंफियावर स्वारी करण्याच्या विचारात होती. ऑलिंफियाच्या रक्षणासाठी एलिन जमात तयारी करीत असताना एक स्त्री अकस्मात त्यांच्यामध्ये प्रगट झाली आणि

त्या पुढारी लोकांना म्हणाली, " दृष्टान्ताप्रमाणे हे मूल मी तुमच्या स्वाधीन करू इच्छिते, कारण प्रत्यक्ष युद्धाच्या वेळी याचा तुम्हांला चांगला उपयोग होईल." त्यांनी मुलाचा स्वीकार केला व बाई गुप्त झाली.

प्रत्यक्ष लढाई चालू झाल्यावर युद्धातील म्होरक्यांनी त्या मुलाला उघड्या-नागड्या स्थितीत एका गाडीत ठेवले आणि आपल्याबरोबर घेतले. शत्रुपक्षाची चढाई सुरू होताच या मुलाने एक महाभयंकर सर्पाचे रूप धारण करून शत्रु-सैन्यात शिरकाव करताच सर्व सैन्याची दाणादाण उडाली. एवढे दैवीसामर्थ्य पाठीशी असल्यावर एलिन सैन्याला जोर चढला आणि त्याने शत्रुसैन्याचा पाठलाग करून त्याचा पूर्ण पराजय केला. त्वरितच तो सर्प अंतरधान पावला.

ज्या ठिकाणी तो अंतरधान पावला, त्या ठिकाणी त्याची स्मृति म्हणून एक मंदिर उभारण्यात आले आणि देवताच्या मूर्तीचे नाव सोसी पॅलिस ( राज्याचे रक्षण करणारा देव ) असे ठेवण्यात आले. तसेच त्या मंदिरात ऐलिथिआ देवीचा पुतळाही उभारण्यात आला. कारण याच देवीने त्या मुलाला जन्म दिलेला होता, आणि स्त्रीरूपाने एलिन जमातीला अर्पण केलेला होता. असे मानले जाते की, ही कथा ग्रीक पुराणात क्रीटनमधून आलेली असावी. कारण त्या देशात लुसिना ( Lucina ) नावाची बालरक्षक देवता होती.

## १२. कलिस्टो ( Calisto )

ही एक प्राचीन ग्रीक देवता आहे. या देवीच्या संबंधात 'ओव्हिड' ग्रंथकार म्हणतो की, सृष्टिकर्त्या झ्यूसने या देवीवर प्रेम केले पण फसवून केले. तो स्वतः आर्टिमिस देवीचे स्वरूप घेऊन सिच्याजवळ रहात असताना एके वेळी दोघींनी एकत्र स्नान केले असता, कलिस्टो गर्भवती राहिली. खऱ्या आर्टिमिस देवीला आपल्या पतीचे हे कृत्य समजताच, सवतीमत्सरामुळे तिने कलिस्टोची हकालपट्टी केली. कालांतराने तिला पुत्र झाला. त्याचे नाव अरकस ठेवण्यात आले आणि पुढे हाच अर्केडियन वंशाचा मूळपुरुष बनला.

हिरा देवीला झ्यूसचे हे कृत्य समजताच, तिने कलिस्टोचे रूपांतर एका अस्वलिणीमध्ये केले. त्या स्वरूपात तिने पंधरा वर्षांचा काळ काढल्यावर, एके दिवशी तिचा मुलगा आरकस हा शिकारीसाठी फिरत असताना ( त्या स्वरूपात मातेला न ओळखल्यामुळे ) तिच्यावर बाण सोडणार, इतक्यात झ्यूसने स्वर्गातून दोघांनाही वर उचलून घेतले आणि अंतरिक्षामध्ये अदलपद दिले. तोच उर्सी मेजर (ursi majar ) हा तारकासमूह होय.

याप्रमाणे कलिस्टो देवीचे भूमीवरून उच्चाटन झाल्यावर, आर्टिमिस देवीने क्रिमियामधील तौराय प्रांताच्या लोकांना स्फूर्ती देऊन तिची मूर्ति तेथे स्थापन करविली आणि त्यांची ती प्रमुख देवताही बनली. अस्वलिणीच्या स्वरूपात तिचे स्वर्गारोहण झाले असल्याने तिचे पूजनही साधारणतः रानटी पद्धतीनेच होत असे. तिला नरबलीही अर्पण करीत असत. या देवतेचा भाऊ तिला भेटण्यासाठी आला असता गावकन्यांनी त्याला पकडून, बळी देण्यासाठी तिजपुढे आणला, पण नंतर ओळख पटून देवीनेच त्याची सुटका केली. कालांतराने ग्रीसमध्येही या देवीचे पूजन प्रचारात आले.

१३. किबिली (Kybele)

या देवतेचा जन्म भारतीय संस्कृतीमधील सीतादेवीप्रमाणे भूमीमधून झाला. या देवीला कोणी अगदिस्तीस असेही म्हणतात. ती ज्या वेळी भूमीतून वर आली, तेव्हा तिचे स्त्री वा पुरुष स्वरूप ठरविता येईना. शेवटी देवांनी शस्त्रक्रिया करून तिचे स्त्रीरूप कायम ठेवले आणि पुरुषस्वरूप काढून टाकले.

या देवतेचा पुजारी नपुसक वर्गातील असतो. त्याचे कारण असे की, देवांनी जो पुरुषभाग काढून टाकून दिला होता, त्यामधून उत्तम बदाम वृक्ष तयार झाला. सगरीस नदीची कन्या नाना हिने त्या वृक्षाचा सुवासिक मोहर तोडून आनंदाने आपल्या वक्षःस्थळाजवळ धरला. पण चमत्कार असा झाला की, काही वेळाने त्या मोहराचे रूपांतर एका सुंदर मुलामध्ये झाले. पण हे मूल पाहताच नाना दचकली आणि हे लफडे आपल्या गळ्याला लागेल, या समजुतीमुळे तिने त्याला खाली टाकून दिले. नंतर एका बोकडाने त्या मुलाचे पालनपोषण केले. या मुलाचे नाव ॲटिस असे ठेवण्यात आले.

किबिला देवीला हा मुलगा पाहताच मोह उत्पन्न झाला आणि त्याच्या ठिकाणी ती अजानामुळे अनुरक्त झाली. पण ॲटिस प्रेमसंबंधाला तयार होईना. याचे खरे कारण असे होते की, ॲटिसचे प्रेम दुसऱ्याच एका मुलीवर जडलेले होते. शेवटी हरप्रयत्नाने तो वश होत नाही असे पाहून, किबिली देवीने त्याला वेडा बनविले. आपणाला पाहिजे ती स्त्री न मिळाल्यामुळे आणि वेडेपणाच्या लहरीमुळे त्याने स्वतः पुरुषलिंग छेदून टाकले व नपुसक बनला. त्याच स्थितीत तो मरणही पावला.

कालांतराने किबिली देवीला आपल्या कृतीचा पश्चात्ताप झाला आणि ती झ्यूसला शरण गेली. झ्यूसने तिला वरदान दिले की, ॲटीसचे शरीर नाश पावणार नाही, त्याचा केशकलाप वाढत राहील व बोटे हलत राहतील, पण

तो पूर्ण पुरुषस्वभावात असणार नाही. त्याला सदैव पाहण्याचे भाग्य देवीला लाभेल, त्याची बोटे तिच्या शरीरावरून फिरतील, पण ती पुरुषाची असणार नाहीत. यामुळेच की काय, किबिली देवीचा पुजारी नपुंसक वर्गातील असतो.

एके काळी फ्रिजिआ, किडिया आणि मिसिया या प्रदेशात या देवतेचे फार प्राबल्य होते. कालांतराने ग्रीक लोकांनी या देवीला क्रीट बेटातील ऱ्हिआ देवीप्रमाणे मानल्यामुळे हिला 'ऱ्हिआ किबिली' असे जोडनाव प्राप्त झाले. सर्व देवतांची माता म्हणून या देवीला फार मान होता. सनपूर्व २०४ व्या वर्षी, रोमन लोकांनी आशियामायनरमधून हिला आपल्या देशात नेली. आशिया मायनरमधील फ्रिजियन लोकांची ही प्रमुख देवता होती, तिला ते अम्मा म्हणजे माता असे म्हणत. पेसिनस शहराजवळ मौंट अगडसच्या पायथ्याशी, या देवतेचे मोठे मंदिर असून, तिच्या सेवेला अनेक पुजारी असत.

## १४. कार्नो ( Carna )

ही देवता आपल्या प्रियकराला फसविण्यात फार तरबेज होती. एखादा नवीन प्रियकर भेटला म्हणजे त्याला भेट देण्यासाठी ती एका गुहेची जागा दाखवी आणि त्याला पुढे पाठवून देई. पण प्रियकर त्या दिशेला निघाला म्हणजे आपण मात्र मागच्या मागे पळून जात असे. जानूस या प्रियकराच्या बाबतीत मात्र तिची ही मात्रा चालली नाही, कारण जानूसला दोन मस्तके असल्याने मागचेपुढचे त्याला पाहता येत असे. या दोघांचे संबंध जुळल्यावर, जानूसने तिला एक दैवी शक्ति दिली, ज्याच्या योगाने ती वटवाघुळाप्रमाणे पाठलाग करणारा प्राणी स्ट्रिज ( Strige ) याजबरोबर मुकाबला करून, अलबेनिआच्या राजपुत्राचा प्राण वाचवू शकली.

एकदा रोम शहरावर साबीन लोकांनी हल्ला केल्यावर, जानूसने शत्रूच्या मार्गात अनेक गरम पाण्याचे फवारे उत्पन्न करून त्याचा मार्ग रोखून धरला. यामुळेच की काय, सांप्रतही रोम शहराच्या एका भागाला "जानूस दरवाजा" म्हणतात. प्राचीन काळी या भागात गरम पाण्याचे झरेही होते. त्यावरून ही कथा आली असावी. दिनांक १ जून रोजी या देवतेचा उत्सव साजरा केला जातो.

## १५. काकस ( Cacas )

काकस आणि त्याची बहीण काका या दोन्ही अग्निदेवता होत. प्रत्येक घरी यांचे पूजन होत असे. अव्हेंटाईन पर्वतावर एक गुहा असून, मंदिराप्रत जाण्यासाठी खडकातूनच एक दादर खोदलेले आहे. या ठिकाणी या देवतांची

पूजा मंदिरात होत असे. कालांतराने या देवीचे रूपांतर व्हेस्टा ( Vesta ) नावामध्ये झाले.

या देवतेसंबंधी अशी कथा प्रचलित आहे की, मंदिरातील अग्निकुंड विझले असता, ते देवीच्याच अशुद्ध वर्तनामुळे विझले अशी शंका भक्ताना आली. वास्तविक यज्ञकुंडाचे रक्षण करण्यासाठी जी नवशिकी पुजारीण नेमलेली होती, तिच्या हलगर्जीपणामुळे ते कुंड विझलेले होते. भक्तानी देवीला विनंती करून ते यज्ञकुंड पुन्हा प्रज्वलित करून आपला प्रभाव दाखवावा अशी इच्छा प्रदर्शित केली. देवी भक्ताच्या हाकेला जागली आणि आपले अंगावरील रेशमीवस्त्र अग्निकुंडात फेकून, अग्नि प्रज्वलित केला. भक्ताची शंका निरसन झाली आणि भक्तिभाव अधिक वाढीस लागला. या देवीचे वाहन गर्दभ आहे, त्याचे कारण असे देतात की, एके वेळी प्रियापोस नावाच्या माणसाला ही देवता गाढ झोपलेली आहे असे वाटून, तिला शिलभ्रष्ट करण्यास तो उद्युक्त झाला. त्याच वेळी मंदिरात एक गाढव उभे होते, त्याने हा प्रकार पाहताच, मोठयाने भोकाड पसरले, देवता जागृत झाली आणि अतिप्रसंग टळला. गाढवाच्या या उपकाराबद्दल देवीने त्याला आपले वाहन बनविले आणि श्रेष्ठता वाढविली.

## १६. कोरा ( Kora )

ही डिमिटर देवतेची मुलगी. ती वयात आल्यावर सिसली येथील फुलबागेत फुले तोडीत असताना, प्लूटो तेथे आला आणि तिला पाताळात पळवून घेऊन गेला. मुलगी नाहीशी झाल्यावर आईला वाईट वाटले. शोध घेता घेता पाताळातील पूर्ण अंधारात तिने मुलीला हाक मारली. त्याबरोबर त्या मर्त्य लोकांचा स्फोट झाला आणि पलिते पेटवावेत त्याप्रमाणे खूप प्रकाश पडला. आतून मोठा आवाज झाला "देवीला मुलगा झाला आहे." पुन्हा एकदा प्रकाश पडला. सूज्ञ लोक ह्याचा हेत्वार्थ असा घेतात की, मुलगी वयात आल्यावर पतीबरोबर सासरी गेली, तिला मूल झाले आणि तीही आई झाली. मुलीचा शोध लागल्यावर डिमिटरने तिला आपल्या घरी आणले (न्यूमन पा. ३१८।१९). कोरा व परसेफोन ह्या सर्वांचे एकत्रीकरण त्यांनी इस्टार ह्या देवीमध्ये केले. सुमेरिअन इनान ह्या देवीचे मंदिर एरच् येथे होते. म्हणून ह्या देवीला एरची इस्टार असे सबोधू लागले. उत्तर बॅबिलोनमधील अगडे ( Agade ) अथवा अक्कडमधील सुमेरिअन देवता अनुनित, त्या देवीला अक्कडची इस्टार म्हणू लागले. तसेच निपूरमधील ह्या मूर्तीला निपूरची इस्टार असे नाव पडले. असिरियाची राजधानी असूर शहरी होती. तेथे ह्या देवीची पूजा होई. म्हणून तिला असूरची इस्टार म्हणत. अरबेला येथे ह्या देवीची पूजा होई, म्हणून तिला अरबेला नाव प्राप्त झाले. वर म्हटल्याप्रमाणे

यश बदलल्याने ज्या देवतांचे महत्त्व कमी झाले. अशांपैकी एक उदाहरण म्हणून गुला 'बुद्धिदेवता' ह्या देवीचे देता येईल. इस्टार देवीचा लौकिक व इभ्रत वाढली तरी गुलादेवी तशीच राहिली; आणि तिने कनिष्ट कार्य म्हणजे रोगराईचे निर्मूलन करणे हे हाती घेतले. पण ह्यामुळे तिची पातळी खाली आली. (ज्ञा. को. २, २१६ व जेम्स को. ७/४३४)

अनेक ठिकाणच्या उत्खननात ह्या देवीचे अवशेष सापडले आहेत. रोमन बादशहा गार्डिअन (३ रा) ह्याच्या वेळची काही नाणी सापडली आहेत. त्या नाण्यावर ह्या देवतेचे चित्र असून तिच्याजवळ एक मुलगी उभी आहे. त्या दोघाच्या मागून धान्याची लोंबरे वर येत आहेत असे दाखविले असून पुजारी तिच्यापुढे हात पसरून उभा आहे. हे चित्र अर्केडिअन संस्कृतीमधील आहे. ह्या देवीचे पाताळरूप म्हणून विंचूचे रूप दाखवितात (न्यूमन पा. २१६). मेसापोटेमिया येथे ही भूमिमाता मानली गेली आहे, कारण ती पृथ्वीवरील चारी ऋतूमध्ये वावरत असल्याने भूमीतून वर येणे, फलोत्पादन करणे, उष्ण ऋतूत पालापाचोळा खाली पाडून त्याचा नाश करणे आणि नवीन उत्पत्ति करणे ह्या कारणास्तव तिला भूमिमाता म्हटले आहे (इ. ओ. जेम्स पा. २३३). ही पूर्वीची जलदेवता मानली गेली असून नामू व इस्टार ह्यांनी 'अनु' व 'की' ह्यांना जन्म दिला. नतर 'की'–'एनलिल' ह्याच्या संयोगाने 'नाना' ही चद्र देवता उत्पन्न झाली अशा रीतीने अनु + एनलिन + एनकी ह्या तीन देवतांची त्रिमूर्ति तयार झाली (जेम्स पा. २३४).

ह्या देवता म्हणजे मातृदेवतांचे संपूर्ण स्वरूप मानावयास पाहिजे. वर सांगितलेच आहे की, असिरियामध्ये ह्या देवीचे प्रमुख स्थान होते. व्हीनसबरोबर तिचा संबंध होता. कोणी असे मानतात की, दोन्ही देवता एकच होत. कारण परसेफोनचे लग्न प्लूटोबरोबर त्याच रीतीने झालेले आहे. पण चेरनेरच्या मताप्रमाणे परसेपोन ही सेरेजची मुलगी होय, इतकाच फरक आहे. कोरा ही हेडस्ची सम्राज्ञी होती (जेम्स पा १५४). ग्रीसमधील एका चित्रात ह्या देवीचे सुंदर चित्र रेखाटले आहे. दोन्ही हात जोडलेले, मस्तकावर मोगल बादशहासारखे पागोटे, त्याच्यावर तुरा, दोन्ही बाजूंना दोन माणसे हातात काही घेऊन उभी आहेत, असा देखावा आहे. ज्या ठिकाणी डिमिटर व कोरा ह्यांची चित्रे एकत्र आहेत, त्यांत आई कोण व मुलगी कोण हे ओळखणे जड जाते. ज्या स्वरूपाच्या हातात फळ आहे ती आई व फूल आहे ती मुलगी असे समजतात.

(न्यूमन, पा. ३०७)

१७. गॉरगन

ग्रीक पुराणातील ह्या तीन बहिणी स्थेनो, मेडुसा आणि युराले होत. फोरकस व कीटो ह्यांच्या ह्या मुली. त्यांची शरीरे अभेद्य पापुद्ऱ्यांनी झाकलेली असून त्यांचा केशकलाप सर्पांनी वेष्टित आहे. ह्या तीन बहिणींमध्ये फक्त एकच नेत्र असल्याने ज्या माणसावर त्यांची दृष्टी पडेल, त्याला त्या दगड बनवू शकत असत. किंबहुना असेही म्हणता येईल की, त्यांच्या अत्यंत उग्र व विचित्र स्वरूपाकडे पाहताच मनुष्य दगडासारखा थिजून जात असे ( वेबस्टर–वेरनेर ). त्या मृतांच्या जगताच्या व दुष्ट दैवगतीच्या अधिष्ठात्री देवता मानल्या आहेत. इनोदिया देवीप्रमाणे ती चन्द्राट्यावरील देवता होय. हेकेटीप्रमाणे केशपाश सर्पवेष्टित अशी चंद्रदेवता होय. ज्याप्रमाणे आर्टेमिस ह्या शिकारी देवतेला धेरून टाकीत, त्याप्रमाणे अनेक कृत्या ह्या देवीला वेढीत असत. कुत्रा हा तिचा आवडता प्राणी. तो रात्रभर ओरडणारा, मार्गदर्शक आणि ग्रीस व इजिप्तमधील समजुतीप्रमाणे तो मृतांचा सोबती होय. (जेम्स पा. १७०). [भारतीय पुराणप्रमाणे धर्मराजाबरोबरही एक कुत्रा स्वर्गाच्या वाटेचा मार्गदर्शक अगर सोबती होता].

ग्रीक पुराणात अशी कथा आहे की, पर्सिउस नावाच्या योद्धयाने या राक्षसिणीवर हल्ला चढवून, तिचे शीर धडापासून वेगळे केले. तिच्या शरीरातून जो रक्ताचा पाट वाहिला तो समुद्राच्या पाण्यात गेला. सागरदेवता नेपच्यून याने त्या रक्तमिश्रित पाण्यापासून चांदी आणि वायू मिसळून पंख असलेला पेगॅसस नावाचा घोडा उत्पन्न केला. हा घोडा पुढे अति बलवान व तेजस्वी झाल्याने त्याला तारा-मंडलात स्थान मिळाले. पूर्वा-भाद्रपदा व उत्तरा-भाद्रपदा नक्षत्र-समूहाला भारतीयांनी महाश्व संबोधिले आहे, तो हाच तारासमूह होय. देवयानी, शर्मिष्ठा तारेही जवळच आहेत. भारतीय पुराणात, समुद्रमंथनाच्या वेळी सात डोकी असलेल्या घोड्याची प्राप्ती झाली असे सांगितले आहे, ते याच संदर्भात असावे.

या देवीची जी प्रतीके उपलब्ध झालेली आहेत, ती पण फार गमतीदार आहेत. इ. स. पूर्व ६०० वर्षांचा एक पुतळा कोफू येथे मिळाला आहे. त्याचे स्वरूप अतिशय भव्य व उग्र असून वटवटीत डोळे, पसरलेले विक्राळ मुख, जोरजोराने चालताना पडावीत तशी लांब पावले, कमरेभोवती झगा व त्यावर तीन सर्पांचे वेष्टण, तसेच गळ्याभोवती सर्प असे रूप आहे ( न्यूमन चित्र ७० ). दुसऱ्या एका छायाचित्रात ती पाय पसरून बसलेली असून योनीभाग प्रामुख्याने समोर दर्शित करीत आहे. विवस्त्र, दोन्ही बाजूंना सिंहाची नरडी हातानी धरलेली, शरीराला सर्पाचे वेष्टण, घोडा-बगळा इत्यादि प्राणी जवळ बाळगणारी असे क्रूर

रूप दाखविले आहे (न्यूमन चि. ८०). आणखी एका चित्रात तिच्या मुखाचा एक भव्य दिवा केला असून त्याच्या पाळ्याला सोळा वाती लावण्याची सोय सोळा मुखांनी केली आहे. दिवा उत्तम नक्षीदार असून इसवी सनाच्या सुरवातीच्या काळाचा इट्रुरिआमधील ब्रॉझ धातूचा असावा (न्यूमन चि. १००). दाताचे सुळे, बाहेर लोंबत असलेली जिव्हा, योनीभागाचे विदारक दृश्य, दाढीचे केस वाढलेली व सर्पवेष्टित शरीर असे रूप पाहिले असता लोकांना लांबूनच भीति न वाटली तरच नवल म्हणावयाचे (न्यूमन चि. १७०).

## १८. डिडो (Dido)

डिडो व अना या इटालियन देवता होत. डिडो ही फोनेशियातून इटलीमध्ये आली, तर अना ही सेमेटिक वंशातून आली. डिडोही एलिस या नावानेही ओळखली जाते, पण एलिस हे नावही सेमेटिकच आहे. डिडो आणि तिचा प्रियकर यांनी प्रार्थना करून परमेश्वराकडून एक बैलाचे कातडे भूमीवर अंथरून जेवढी जागा व्यापली जाईल, तेवढी मागून घेतली आणि त्यावर एक किल्ला बांधून त्यामध्ये ती सुखाने रहात होती. अनादेवी फिरत-फिरत तेथे आली आणि त्यांच्याच आश्रयाने राहू लागली. डिडोला अनाच्या वर्तणुकीचा संशय आल्याने व तिचा सवतीमत्सर जागा झाल्याने तिच्याविरुद्ध तिने कारस्थाने सुरू केली. डिडोच्या त्रासाला कंटाळून तेथून ती निघून नदीदेवता न्यूमिस याच्या आश्रयाखाली गेली.

ग्रीसमधील विख्यात ट्रॉजनचे युद्ध सनपूर्व ११९० साली झाले असून त्यानंतर सुमारे चारशे वर्षांनी रोम शहराची स्थापना झालेली आहे.

## १९. डायोनी (Dione)

डायोनी नावाची झ्यूसची एक सहचरी होती. ॲफ्रोदिता देवीचेच हे स्वरूप असावे असे मानले जाते. डोडोना शहरी या देवतेचे पूजन होत असे. भूदेवतेचे एक स्वरूप मानले जात असे. कालांतराने झ्यूस आणि हिरादेवी यांचे प्रेमसंबंध अधिक वाढल्यावर या देवतेचे महत्त्व कमी झाले.

## २०. डायनादेवी

इटली देशात अल्बन डोंगराच्या रांगेत नेमी नावाचे एक सुंदर, रम्य असे सरोवर असून त्याच्या उत्तर बाजूला एका तुटलेल्या डोंगराच्या कड्याच्या पायथ्याशी या देवीचे एक स्थान आहे. नेमी नावाचे एक गावही सांप्रत आहे. आसमंतातील सर्व प्रदेश घनदाट अरण्याने वेष्टिलेला होता, यास्तव त्याला 'डायनोदेवीचे जंगल' असेच नामाभिधान प्राप्त झालेले होते.

या छोट्याशा मंदिराला एक पुजारी असे, पण ते पुजारीपण मिळविण्यास एक आगळीच कृती त्याला करावी लागे. अर्थात ही फार प्राचीन काळची गोष्ट आहे. देवीच्या पूजेशिवाय, रात्रंदिवस, जंगलातून, झाडाझुडपांतून, हाती शस्त्र घेऊन त्याला सतत हिंडावे लागे, देवीचे व स्वतःचे रक्षण करावे लागे. तो जर गाफील राहिला तर देवीचे पुजारीपण घेऊ इच्छिणारा दुसरा कोणी उमेदवार त्याचा खून केव्हा करील आणि पुजारीपण बळकावील याचा नेम नसे. याच एका रीतीने दुसरा कोणी पुजारीपण मिळवू शके. जाणकारांच्या मताप्रमाणे ही परिस्थिती सुमारे अडीच हजार वर्षांपूर्वीची असावी.

डायना देवतेचे स्थान वन्य प्रदेशांतच असल्याने ती वृक्षवल्ली, रानटी पशुपक्षी यांची देवता मानली गेली तर नवल कसले ? तेव्हा ज्या वस्तूवर तिचा ताबा चालतो, ती वस्तू कोणाला पाहिजे असेल तर तिची आगाऊ परवानगी घ्यावयास पाहिजे. वास्तव त्या अरण्यातील नतर पर्यायाने इतरही अरण्यातील जनावरांची शिकार करण्यापूर्वी, देवतेची आगाऊ परवानगी घेण्याची प्रथा रूढ झाली. परवानगी मागताना ते प्रार्थना करीत, " एखादी मनासारखी शिकार लवकर मिळावी, फार वेळ शोधण्यात जाऊ नये अगर वाट पाहण्यात लागू नये. मी चालत असलेल्या रस्त्यावरच ती मिळावी म्हणजे मी उत्तम रीतीने पूजन करून तुझी सेवाचाकरी करीन. " ही रूढी या देशात होती, तशी सुमात्रामध्येही होती. जगलरक्षक देवाला ते गायो (Gayos) म्हणत. शिकारी या देवासमोर सुपारी ठेवून एका ठराविक पद्धतीने तिची दोन शकले करी व प्रार्थना करी की, उत्तम शिकार मला मिळावी. केल्टिक जमात याप्रमाणे वर्षातून एकदा आर्टेमिस देवीला बळी देऊन सततची परवानगी काढून ठेवीत. (भारत अगर अन्य देशातही हीच रूढी आजही आचरणात येते. यावरून मानवस्वभाव सर्वत्र सारखाच कसा असतो हे उत्तमपणे समजते.)

प्रजोत्पादन अथवा फलोत्पादन याला ही देवता सहाय्यकर्ती मानली असल्यामुळे हिला पुरुषजोडीदार असला पाहिजे, या समजुतीमधून वीरबायस (Virbius) याची स्थापना तेथे करण्यात आली. स्त्रीशक्तीला पुरुषशक्तीची नेहमीच आवश्यकता असते. मानवी प्रजोत्पादनाला जसा विवाह-समारंभ घडवून आणतात, तद्वत् यांचा विवाह समारंभ घडवून आणला जात असे आणि कालांतराने देवताचे प्रतीक म्हणून कुमार-कुमारींचा विवाह त्या समयी घडवून आणले जाऊ लागले.

बॅबीलोनियन संस्कृतीमधील बेल हा प्रमुख देव होय. त्याचे मंदिर उंचावर असे आणि रात्री मदिरात राहण्यास कोणाला परवानगी नसे. देवाची मूर्तीही

काही वेळा नसे. या देवाच्या वार्षिक विवाहाच्या दिवशी तेथील पुजाऱ्याने निवडलेली एक सुंदर मुलगी रात्री मंदिरात एकटी ठेवीत. त्यांची अशी श्रद्धा होती की, रात्री बेलदेव तेथे येऊन तिचा उपभोग घेईल.

अथेन्समध्ये डायोनिस देवाचा विवाह तेथील राणीबरोबर लावीत असत, पण विवाह सोहाळ्याची संपूर्णता येण्यासाठी देवाची मूर्ति उभी करीत अगर देवाच्या प्रतीकासाठी एकादा भक्त उभा करीत. याबंबंधी माहिती उपलब्ध नाही. आकाशदेवता झ्यूस याचा विवाह धान्यदेवता डिमिटरबरोबर घडवून आणीत. भारतामध्ये बंगालमधील ओरियन जमात याप्रमाणे सूर्यदेवता धर्मी आणि भूदेवता यांचा विवाह साळवृक्ष फुलानी बहरला म्हणजे घडवून आणीत. जमातीचा धर्मगुरू आणि त्यांची पत्नी याचाच तो विवाह असे. खाणेपिणे, धार्मिक विधी व विवाह-सोहाळा सर्व घडवून आणीत. या सर्वांच्या मागे पवित्र कल्पना इतकीच की, देवताचा विवाह घडवून आणला म्हणजे फलोत्पादन व प्रजोत्पादन उत्तमरीतीने होऊन, मानव सुखी राहील. शंकर-पार्वती अगर राम-सीता विवाह आजही भारतामध्ये अनेक गावी दरवर्षी लावण्यात येतात.

पण बोओिशिया ( Boeotia ) देशातील हा एक समारंभ पहा. तेथील प्लॅटाई ( Plotaea ) प्रांतात काही ५–७ वर्षांच्या क्रमाने लहान डिडाला ( Little Deadala ) या देवीचा उत्सव व लग्न-समारंभ करीत. प्रत्येक वेळी पवित्र वृक्ष पाडून, त्यामधून देवतेची मूर्ति तयार करून मिरवणुकीने असोपस नदीपर्यंत वाजतगाजत मिरवणुकीने नेत. विवाह होई आणि शहरात परत आणून ठेवीत. साठ वर्षांनी अशा १४ मूर्ति जमल्या म्हणजे मोठा उत्सव करून या १४ मूर्ति लाकडाच्या ताटीवर ठेवून असोपस नदीवर नेत. तेथून मिरवणुकीने सिथेरन पर्वतमाथ्यावर नेऊन त्याचे दहन करीत. झ्यूस आणि हिरा यांच्या विवाह-समारंभाच्या वेळी हिरा देवीची मूर्ति ओक लाकडाची असे. त्यातूनच ही रूढी उद्‌भवली असावी.

ही ज्युपिटर व लॅटोना यांची मुलगी. मूळची ही इटालियन देवता. रोम प्रांतात सर्व ठिकाणी ह्या देवीची उपासना होत असे. अल्बन पर्वतावरील सरोवराच्या काठी एका लहानशा झुडुपात ह्या देवीचे मूळ स्थान होते. वनदेवता आणि प्रसूतिसमयीची मदतगार म्हणून ह्या देवतेची पूजा होई. इगेरिया व व्हीर्बिअ ह्या दुसऱ्या दोन जलदेवता तिच्या सख्या होत्या. टारक्किसने ह्या देवीची मूर्ति आणि पूजा प्रथम रोम शहरात आणली. पुढे इ. स. पूर्व ३९९ वर्षांच्या सुमारास ग्रीक देवता अपोलो व आर्टेमिस ह्यांचे आगमन जेव्हा रोममध्ये झाले, तेव्हा लोक ह्या देवीलाच आर्टेमिससमान मानू लागले. आर्टेमिस ही मूळ

शिकारदेवता आणि त्यामुळे डायनासुद्धा शिकारी पोषाखात मिरवू लागली. कालांतराने डायना-इफेसर व डायना-कॉसवेज अशी नावे तिला मिळाली.

(वेबस्टर डिक्शनरी)

उत्खननात ह्या देवीची जी चित्रे मिळाली आहेत त्यांची स्वरूपे पाहू. रोमन नाण्यांवर डायना अगर रोमा देवीची रथात बसलेली चित्रे आहेत (ग्रा० को० न/१६७). इ. स. पूर्व २००० वर्षांचा ब्रॉझचा एक पुतळा रोममध्ये आढळून आला आहे. त्यामध्ये ह्या देवीचे भव्य स्वरूप मातृशक्तिरूप दाखविले आहे. पायघोळ झग्यावर खालपासून वरपर्यंत अनेक पशु-पक्षी दाखविले असून वक्षस्थळावरील अनेक स्तनाग्रांनी ती सर्वांचे पोषण करते असे भासविले आहे. तिच्या मस्तकावर किरीट आहे. ह्या देवीला इफिसस्ची डायना असे म्हणतात (न्यूमन चि. ३५). रोममधील ह्या देवीच्या पाषाणाच्या पुतळ्याला दोन हात दाखविले असून उजव्या हातात पलिता आहे, अंगात झगा आहे, असे साधारणपणे आधुनिक धर्तीचे स्वरूप आहे (न्यूमन चि० १६०). अशा रीतीने शिकार, लग्नसंस्था, पावित्र्य, प्राण्यांची राणी व अधिष्ठात्री देवता असे ह्या देवीचे स्वरूप आहे.

## २१. डिमिटर

इजिप्तमधील देव ऱ्हीआ (सूर्य) आणि क्रोनोस ह्यांची मुलगी. कोरा ऊर्फ परसेफोन ह्यांची माता. इ. स. पूर्व ७०० वर्षे होमरचे जे काव्य प्रसिद्ध झाले आहे त्यामध्ये ह्या देवीचा उल्लेख आहे. ही ग्रीक लोकांची धान्य, भाजीपाला, फळफळावळ देणारी देवता मानली गेली आहे (इ. ओ. जेम्स पान १५६). इल्युशिअन पुराणात असे वर्णन आहे की, हेडस् ह्याने तिची मुलगी पळविली. त्या रागाने तिने सर्व पृथ्वी उजाड करून टाकली; पण इतरांच्या मदतीने मुलगी जेव्हा परत आली तेव्हा तिने असे ठरविले की, वर्षांतून $\frac{1}{3}$ काळ आईजवळ घालवावा. ह्या ठरावानंतर ती पुन्हा धान्य पिकवू लागली. ह्या कारणास्तव तिला शेतकी व वैवाहिक संस्थेची देवता मानू लागले. (वेबस्टर डिक्शनरी)

उत्खननात जी छायाचित्रे उपलब्ध झाली आहेत त्याचाही विचार करण्यासारखा आहे. इ. स. पूर्व ५०० वर्षांचे जे दगडी व संगमरवरी पुतळे ह्या देवीचे आढळले आहेत त्यांमध्ये आई व मुलगी ही नेहमी एकत्र दाखविली आहेत. स्वरूपे ओबडधोबड असून काही ठिकाणी हातात पेटलेले पलिते अगर लांब काठी दाखविली आहे. विकास-विस्तारकार्यात ह्या देवतेचे कार्य मोडते.

ह्या देवीला डुक्कर बळी देत असत ( न्यूमन चि. १४७,४८,४९ ). धान्य उत्पन्न करणारी, सर्पवंशाशी संबंध असलेली, हाती गुलाबाचे फूल घेतलेली असे रूप काही ठिकाणी दाखवितात. ती मधमाशीसारखी शुद्ध व पवित्र असल्याने ह्या देवीची पुजारीणसुद्धा कुमारी असावी लागते. आई व मुलांचे प्रेमाचे नाते व्यक्त करणारी, आध्यात्मिक उन्नति दाखविणाऱ्या देवतांच्यापैकी एक असे हे स्वरूप आहे. डिमिटर देवींच्या उपासक म्हणून वृद्ध स्त्रिया तर कोरा देवीच्या उपासक तरुण मुली, अविवाहित स्त्रिया असतात. स्वर्ग, पाताळ, पृथ्वी ह्यांची देवता असल्याने ती एक आद्यशक्ति मानली गेली आहे ( जेम्स पा. ३०७,३१० ).

## २२. डी मात्रेस

ही केल्टिक व जर्मन प्रदेशातील देवता. ह्या देवीला मात्रोनी, मात्रेस, मात्री, मात्रबस, मातर, मात्रा असे संबोधीत. माता म्हणजे आई ह्या शब्दाचीच ही सर्व रूपे आहेत हे उघड आहे. किंबहुना आर्यांचा मूळ शब्द मात्र हाच त्यांनी कायम ठेवला आहे. ( वेरनेर )

## २३. जुनो ( Juno )

ही शनी व आप्स यांची कन्या असून ज्युपिटरची भगिनी व भार्या होय. प्लेटो व नेपच्यून ही तिची भावंडे असून ही सर्व देवांची राणी समजली जाते.

अथेना देवीचा जन्म वडिलाशिवाय झाला हे तिला आवडले नाही. आपणंही असा काही जन्माच्या बाबतीत अद्‌भुत चमत्कार करावा आणि प्रसिद्धीला यावे अशी तिची अंतरीची इच्छा. फ्लोरा देवीला तिची मैत्रीण पुष्पाने काही सांगितले. व तिला एक दिव्य पुष्प दिले, त्याच्या स्पर्शानेच ती गरोदर झाली, आणि कालांतराने तिला मुलगा झाला, तोच मार्स ( Mars ) होय.

या देवीचे स्वरूप दाखविताना सुवर्णाचे सिंहासन, हातात सुवर्णाचा राजदंड, त्यावर कोकीळ पक्षी आणि मागील बाजूस मयूर असे दाखवितात. जन्म, विवाहसंस्था यांची ही अधिष्ठात्री असल्याने, स्त्रीवर्गाचे ती उपास्य दैवत बनलेली आहे. स्त्री वर्गाचे रक्षण करणे हा या देवतेचा प्रमुख गुण आहे. या देवीची वार्षिक यात्रा मार्च महिन्यांत मार्नोलिया गावी भरते.

## २४. नायड्स ( Naids )

भारतीय संस्कृतीमध्ये सात अप्सरा या जलदेवता म्हणून दाखविलेल्या आहेत, त्यापैकीच हा प्रकार आहे. या देवतांचे राहण्याचे ठिकाण म्हणजे सार्वजनिक पाणवठे, तळी, विहिरी, नदी इ० जलाशय होत.

या देवता दिसण्यात स्वरूपसुंदर असून, नृत्यसंगीतात तरबेज व शौकीन आहेत. त्यांची वैषयिक इच्छा प्रबळ असल्याने, तरुण मुलींप्रमाणे पुन्हा पुन्हा प्रकट होऊन इच्छापूर्तीसाठी तरुणांना शोधीत असतात. ह्या स्वरूपात त्या भविष्यकथनही करतात आणि साहजिकच जे तरुण भविष्याच्या मागे लागलेले असतात, त्यांना त्या आकर्षित करून आपले दास बनवितात. अप्सरा देवतांप्रमाणे त्या मर्त्य माणसावरही आपला प्रभाव पाडू शकतात. त्या नऊ या संख्येने फिरतात, त्यामध्ये म्युझेस ही बुद्धिदेवता मानली जाते. यांना जरी कोणी कुमारी मानीत असले तरी न्हेसॉस व आर्फेमीस या नावाचे त्यांना दोन पुत्र होते, असे वर्णन मिळते.

## २५. पर्सेफोन ( Persephone )

सृष्टीकर्ता देव झ्यूस आणि डिमिटर देवी यांच्या संबंधांतून पर्सेफोनदेवता जन्माला आलेली आहे. काही वेळा हिला कोरे असेही म्हणतात. ती कुमारी स्वरूपात आढळते. होमरने आपल्या काव्यात ही देवता अतिशय देखणी होती असे वर्णन केले असून, पृथ्वीवरील पदार्थांची वृद्धि करणे आणि पाताळलोकातील मृत्यूवर नजर ठेवणे ही तिची प्रमुख कामे सांगितलेली आहेत.

आपल्या कन्येला कोणा पुरुषापासून त्रास होऊ नये, या इच्छेने मातेने जन्मतःच तिला सिसलीमध्ये एका आश्रमात लपवून ठेवली होती, पण पाताळाची अधिष्ठात्री देवता हेडीस याला या देवतेबरोबर विवाह करण्याची इच्छा झाली. मुलीच्या मातेचा या गोष्टीला विरोध होता. झ्यूसदेव हा हेडिसचा भाऊ असल्याने त्याने या विवाहाला त्याची पूर्वसंमती घेतली आणि युक्तिप्रयुक्तीने तिला आपलीशी करून घेण्याच्या उद्योगाला लागला. ती रहात असलेल्या आश्रमाच्या परिसरात हेडीसने एक उत्कृष्ट सुवासिक फुलझाड लावले आणि थोड्याच दिवसात त्याला चांगला बहर आला. पर्सेफोन त्वरितच त्या फुलाकडे आकर्षित झाली व एक फूल तिने तोडले. फूल तोडताच पृथ्वी दुभंगून त्यातून एका दिव्य रथातून हेडीस वर आला, पर्सेफोनला आपल्या रथात घेतले आणि पाताळात निघून गेला.

मुलगी हरविल्यानंतर डिमिटर मातेने तिचा खूप शोध केला, पण काही उपयोग होईना. नऊ दिवस तिने अन्नपाण्याविना घालविल्यावर, सूर्यदेवाला तिची दया येऊन त्याने पर्सेफोनचा ठावठिकाणा दिला. पाताळदेवता हेडिस यांनी आपल्या पतीच्या संमतीने तिला नेली आहे, असे समजताच तिला झ्यूसचा खूप राग आला, पण त्याच्याविरुद्ध काही करता येत नव्हते.

मुलीच्या शोधात फिरत असता शेवटी ती एलिसुस गावी एका विहिरीजवळ आली आणि म्हातारीचे रूप घेऊन बसली तेवढ्यात त्या शहराचा राजा केलिअस याच्या मुलीने तिला पाहिले व आपल्या घरी नेले. राणी आणि मुले यांची ती देखभाल करीत होती कामात व्यग्र झाल्याने कालांतराने तिचे दु ख थोडे कमी झाले ज्या मुलांचा ती सांभाळ करीत होती, तो मुलगा अमर व्हावा, युद्धात जखमा झाल्यावरही मृत्यू येऊ नये, यासाठी दररोज रात्री अग्नीवर ठेवून त्याचा मृत्यू ती जाळीत असे एके दिवशी राणीच्या नजरेला हे दृश्य येताच ती घाबरली, किंकाळी फोडली आणि भुईवर पडली आपले कृत्य इतरांनी पाहिले, हे समजताच देवीरूप दाईने मूल जमिनीवर फेकून दिले आणि आपले खरे स्वरूप प्रकट करून, त्या गावी आपले मंदिर बांधण्याची आज्ञा केली

इतर काही देवतांच्या मदतीने तिने आपली मुलगी पर्सीफोन हिला परत मिळविण्याची खटपट चालू ठेवली होती पण नतर मातेला समजले की, हेडिसचे सहवासात ती अनेक दिवस राहिली असल्याने आणि तेथील डाळिंबही खाल्ले असल्याने, आता ती भूतलावर रहाण्यास लायक नव्हती, शुद्ध नव्हती शेवटी झ्यूसने तडजोड करून असे ठरविले की, पर्सीफेनने ६ महिने पाताळात हेडिस कडे रहावे आणि दुसरे सहा महिने भूतलावर मातेजवळ रहावे

डिमिटर आयसॉन ( Iasion ) याच्या प्रेमसबंधातून प्लूटो या सपत्ति देणाऱ्या देवाचा जन्म झाला या सबंधाच्या वेळी आपल्या पतीसह डिमिटर भूगर्भात राहिलेली होती, त्यामुळे जमिनीचा कस वाढण्यास मदत झाली

## २६ फार्चूना ( Fortuna )

प्रसिद्ध रोमशहरी या देवतेचा पुतळा होता, पण तो नेहमी आच्छादित असे तो खराब होऊ नये म्हणून ही व्यवस्था केलेली होती, असे जरी वरवर सांगितले जाते, तरी त्याचे प्रमुख कारण असे की, ही सपत्तिदेवता असल्याने सपत्ति मिळविण्यासाठी भक्त जी अनन्वित कृत्ये करीत, त्याबद्दल तिला लाज वाटत असे अशा भक्तापासून दूर रहावे, त्याचे दर्शनही होऊ नये, यासाठी इस्लाम स्त्रियांप्रमाणे ती मुखावर व शरीरावर बुरखा घेत असे ती आंधळी आहे असे मानले जात असे जो भक्त सन्मार्गाने वर्तन करी त्याला ती सपत्ति दान करीत असे एका छायाचित्रात ती चार सिंहांनी ओढलेल्या गाडीत बसलेली दाखविली असून शरीरावर काळ्या रंगाचा पायघोळ झगा, मस्तकावर मुकुट, एका हाती मोर व दुसऱ्यात त्रिशूलांकित टोकाची काठी असे स्वरूप आहे

## २७. ब्रिटो मार्टिस ( Brito martis )

ही एक प्राचीन देवता असून क्रेटन पुराणकथाप्रमाणे ती एक मोहक मुलगी होती. आर्टिमिस व ब्रिटोमार्टिस याना दिक्तयाना या नावाने ओळखत असत. क्रीट बेटात किडोनिया शहरी तिचे प्रमुख स्थान होते. झ्यूस व कार्मेदेवी याची ती कन्या होय. ती विवाहयोग्य झाल्यावर मिनोस देवाने तिला मागणी घातली, पण तिला ते स्थळ पसंत नसल्याने ती पळून गेली आणि नऊ महिने-पर्यंत लपून राहिली. पुढे तिचा पाठलाग सुरू झाल्यावर पळता पळता तिने एका डोंगरकड्यावरून सागरात उडी मारली. खाली आकस्मिकपणे ती एका कोळ्याच्या जाळ्यात पडल्याने तिला जखम वगैरे काही झाली नाही. नंतर आर्टिमिसदेवीने तिला सहाय्य दिल्याने ती सुखरूप राहिली.

पण दुसरे एक मत असे की, कोळयाच्या जाळयाच्या छत्राखाली ती एजियन सागराच्या परतीराला गेली. मिनोस देवाने तेथेही पाठलाग सुरू केल्यावर ती आर्टिमिसदेवीच्या आश्रमात शिरली. त्या ठिकाणी नतर तिचे पूजन अफिआ ( Aphaia ) नावाने सुरू झाले.

ही एक भूदेवता मानलेली असून वृद्धीचे कामही करते. ग्रीष्म ऋतूमध्ये तिचा भक्तगण दर्शन घेण्यासाठी समूहाने जातो आणि ' मेपाले ' नावाचा उत्सव साजरा करतो. या उत्सवसमयी शेतीचे पीक उत्तम यावे म्हणून प्रार्थना केली जाते. ग्रीक पुराणात अनेक व्यक्तींनी पर्वताच्या कड्यावरून खाली उड्या घेऊन आपल्या जीवाचे सार्थक व्हावे म्हणून प्रयत्न केलेला आढळून येतो. याचा अर्थ असा घेता येईल की, आत्मशुद्धीसाठी हवेत उड्डाण करून प्रायश्चित्त घेऊन अंती मोक्ष मिळविणे ही भावना असावी ( भारतीय पुराणातही ही आत्मशुद्धीची कल्पना रूढ झालेली होती, हे पाण्डवाचे हिमालयाच्या कड्यावरून बलिदान अगर देवीकोश प्रथातील इतर काही उदाहरणाने सिद्ध करता येईल ).

## २८. बोना-डी ( Bona Dae )

*ही फौना देवीची कन्या होय. मोठी झाल्यावर तिच्या वडिलाचीच* वक्रनजर तिच्याकडे वळली. तिने नकार देताच, तिला भरपूर मद्य पाजून अनुकूल करून घेण्याचाही प्रयत्न झाला पण तोही फसला. एका सुगंधी वृक्षाच्या काठीने मारून आकर्षित करण्याचा प्रयत्नही सफल झाला नाही. शेवटी वडिलानी स्वत: सर्परूप धारण करून ती निद्रावस्थेत असता आपली कामिक इच्छा पूर्ण करून घेतली.

या देवतेच्या पुजाऱ्याजवळ हर्क्युलसने एकदा पाणी पिण्यास मागितले असता त्याला मिळाले नाही. त्या वेळी क्रोधाने संतप्त होऊन हर्क्युलसने असा दडक घातला

की, कोणीही पुरुषाने या देवतेचे पूजन करू नये. या कथेच्या आनुषंगाने ड्रामिया शहरी जेव्हा देवतेचा वार्षिक उत्सव होतो, तेव्हा अशी रूढी आचरण्यात येत असे की, कोणी पुरुषाने समारंभात भाग घ्यावयाचा नाही, सुगंधी द्रव्ये वापरावयाची नाहीत आणि मद्याचा वापर करावयाचा नाही. पण जर कोणी मद्य घेतलेच तर त्याला वेळी दूध समजावयाचे आणि मद्याच्या पेल्याला मधाचा पेला समजावयाचे.

हर्क्युलसने आणखी एक बंधन घातले की, रोम शहरी, अरामक्झिमा विभागात जेव्हा देवीचा उत्सव साजरा होत असे, त्या वेळी महिलावर्गाने त्यामध्ये भाग घ्यावयाचा नाही. यावरून असे दिसते की, बोनाडी या बाईच्या मरणोत्तर तिला देवत्व प्राप्त करून दिलेले दिसते.

याला पोषक दुसरी कथा अशी की, हर्क्युलसच्या मंदिरातील एक पूजक आपला वेळ फासे टाकून घालवीत असे. एक डाव देवाचा आणि दुसरा डाव आपला, याप्रमाणे त्याचा क्रम असे. पूजक जर डाव हरला, तर तो एखाद्या वेश्येबरोबर भोजन घेई आणि प्रणयचाळे करीत असे. असाच एकदा डाव हरल्यावर त्याने गावातील प्रख्यात वेश्या अक्का लॉरेंटाला मंदिरात आणले आणि रात्रभर ती पूजकाबरोबर राहिली. रात्री तिला हर्क्युलसने दृष्टान्त दिला आणि सकाळी मंदिर सोडल्यावर जो मनुष्य प्रथम भेटेल त्याची मैत्री करण्यास सांगितले. हर्क्युलस हा भाग्य देणारा देव आहे, अशी तिची भावना असल्याने तिने त्याप्रमाणे वर्तन केले.

दैवयोगाने तिला भेटलेला मनुष्य चांगला गर्भश्रीमंत निघाला. त्याच्या संगतीत तिने अनेक दिवस सुखात घालविले. पुढे तो धनपति मरण पावल्यावर त्याने आपली सर्व मालमत्ता अक्का लॉरेंटाबाईच्या नावे करून दिली. पण बाईही तितकीच घरंदाज आणि उदार असली पाहिजे. कारण तिने ती सर्व मालमत्ता राष्ट्राला अर्पण करून टाकली. तिच्या या अलौकिक वर्तणुकीमुळे मृत्यूनंतर तिला देवत्व प्राप्त झाले व तिचे पूजन सुरू झाले.

या देवतेप्रमाणे कारमेंटा, डी टॅसिटा, पाताळदेवता लावंडा, फलदेवता पोमोना इ० देवतांच्या कथाही प्रचारात आहेत.

## २९. मेतीस ( Metis )

मानवप्राण्यांना ज्ञान आणि उत्तम सल्लामसलत देणारी देवता म्हणून ही प्रख्यात आहे. सृष्टिकर्ता झ्यूसची ही सहचरी. या देवीच्या पोटी गर्भ राहिल्यावर झ्यूसला असे वाटले की, सर्व देवावर वर्चस्व गाजविणारा असा पुत्र या गर्भातून

उत्पन्न व्हावा. पण काही अघटित घटना घडविल्याविना त्याला देवत्व प्राप्त होणार नाही आणि मातेच्या उदरातून नेहमीप्रमाणे बाहेर आला, तर अलौकिकत्व प्राप्त होणार नाही. या विचारधारातून झ्यूसने मेतीसचा गर्भ गिळून टाकला आणि आपल्या मस्तकातून त्याला बाहेर पडण्याचा मार्ग दिला. तीच कन्या अथेना आणि देवता होय. यासाठीच ती सर्व देवांवर सत्ता गाजवीत असे.

क्रिजिअन पुराणात अशी कथा आहे की, झ्यूसने आपली मुलगी पर्सेफेन हिचा सर्परूप धारण करून उपभोग घेतला व त्या संबंधातून जे मूल जन्माला आले त्याचे नाव झमेअस ठेवण्यात आले. यालाच डायोनिसस असेही म्हणतात. पण ही संतती अनौरस असल्याने व पर्सेफेनची माता डिमिटर तिला हा संबंध कळू नये म्हणून, उपजतच पुढील मुलाचे तुकडे तुकडे करण्यात आले आणि गिळण्यात आले. अथेना देवीला या मुलाची वार्ता समजताच ती त्वरित तेथे आली आणि फक्त मुलाचे हृदय तेवढे वाचवू शकली.' झ्यूसला या कृत्याची खबरबात नसावी, यासाठी अथेनाने हृदय आणून दिल्यावर त्याने तेही गिळून टाकले. या हृदयगर्भातून जी संतती झाली, तिचे नाव सिमिली ( Semile ) असे ठेवण्यात आले.

सृष्टिकर्त्या झ्यूस देवाचे वर्तन मानवांना कसे अगम्य आहे ते पहा. त्याने कालांतराने थेमिस ( Themis ) या आकाशदेवतेबरोबर संबंध जोडले आणि त्यातून अपत्यरूपी चार ऋतू उत्पन्न झाले. झ्यूस आणि डिमिटर यांच्या प्रेम-संबंधातून पर्सेफेन अगर कोरे देवीची उत्पत्ति झाली. त्याने मेमोसिन (स्मरणशक्ति देवता ) बरोबर विवाह केला आणि नऊ बुद्धिदेवता-( धृति, मेधा, स्मृति. इ० ) उत्पन्न झाल्या. या देवींनाच म्युझेस ( Muses ) म्हणतात. लेटोबरोबरच्या संबंधात अपोलो व आर्टिमिस यांचा जन्म झाला. शेवटी झ्यूसने हिराबरोबर संबंध जोडला. हिरा ही ऑरगॉस प्रांतीची देवता असून, तिच्या पडक्या मंदिराचे अवशेष काही ठिकाणी दिसून येतात. काही वेळा हिरा ही झ्यूसची बहीण मानली जाते. याचे कारण असे दिले जाते की, शत्रुपक्षाकडील ही त्यांची देवता आत्मसात करताना तिला कोणताही कमीपणा नसावा, म्हणून बहिणीचे श्रेष्ठ नाते दाखविलेले असावे.

वरील विवरणावरून सारांश निघतो तो इतकाच की, सृष्टिकर्ता देव झ्यूस याचे प्रेमसंबंध सर्व देवतांबरोबर दाखविलेले आहेत. ग्रीस लोकांच्या इतिहासा-प्रमाणे तो साक्षात मानवाचा राजा होता आणि त्याला अनेक राण्याही होत्या. वास्तव वरील वर्णन सत्य असो वा लाक्षणिक अर्थाने असो, रुचीला गौणत्व प्राप्त करून देणारे आहे असे म्हटल्यावाचून रहावत नाही. देवतांचे आचारविचार

रेखाटताना ते रुचीला सोडून रंगविणे आणि अद्‌भुतपणा आणणे हे खासच उचित ठरणार नाही.

## ३०. मेडुसा ( Medusa )

ग्रीक पुराणातील ही एक राक्षसीण होती. या बाईसंबधी कथा फार गमतीची असल्याने मुद्दाम उद्धृत केलेली आहे.

ॲरगॉस प्रांतीचा राजा आर्किसिअस नामे असून त्याला डानी ( Danae ) नावाची कन्या होती. भविष्य असे होते की, डानीचा पुत्र आपल्या आजोबाचा खून करील. याला उपाय म्हणजे डानीला मूलच होऊ न देणे. याकरिता राजाने तिला एका पेटीत कोंडून तिजवर सक्त पहारा ठेवला. ज्यूसला हे वर्तमान समजताच आणि विधिलिखित खरे करण्यासाठी त्याने त्या पेटीवर सुवर्ण वर्षाव करून त्या स्वरूपात पेटीत शिरकाव करून घेऊन डानीची भेट घेतली. कालांतराने डानीला पुत्र झाला.

राजाला हे वृत्त समजताच त्याने मुलगी आणि नवजात बालक यांना पेटीत बंद करून, ती पेटी समुद्राच्या प्रवाहात सोडून दिली. वाहत वाहत ती पेटी सेरीफोस बेटाच्या किनारी लागली. तेथील राजा दिक्तस याच्या नजरेला ती पेटी पडताच त्याने उघडून पाहिली, तेव्हा त्यातून माता व बालक सुखरूप बाहेर पडली. राजाने त्यांचे पालनपोषण केले, मुलगा चांगला कर्तासवरता झाला. पण मातेचे पुन्हा दुर्दैव ओढवले.

राजाचा भाऊ त्याजवळ रहात असे, त्याची वक्र नजर डानीवर गेली नकार मिळत गेले, तरी त्याने प्रेमाराधन चालूच ठेवले. राजाचीही त्याच्या कृत्याला मूक संमती असावी. यासाठी त्यांनी अचाट उपाययोजना केली. मुलगा पार्सिउस याला मार्गातून दूर केल्याशिवाय हेतू साध्य होणार नाही, यासाठी त्यांनी उपाययोजना केलेली होती. अनेक सरदाराकडून नजराणे घेण्याचा त्याने सपाटा चालविला. पण पर्सिउसजवळ काहीच नसल्याने, त्याने मेडुसा राक्षसिणीचे शीर कापून आणून नजराणा म्हणून द्यावे असे ठरले. यामध्ये राजाचा अंतस्थ हेतू असा होता की मेडुसाच्या तावडीतून याची सुटका होणे नाही व तो पुन्हा परत येणे शक्य नाही.

पण या वेळी अथेना देवी पर्सिउसच्या साह्याला आली व इतर देवतानाही मदत केली. मायनी देवीकडून असा एक दिव्य नेत्र त्याला मिळाला की, ज्यामधून राक्षसणीचा ठावठिकाणा बरोबर समजू शकेल. आसमंतामधील पऱ्यांनी त्याला एक

जादूची काळी टोपी दिली, त्यामुळे अदृश्य स्वरूपात तो वाटेल तेथे हिंडूफिरू शकेल. जल्द पळण्यासाठी कोणी एकाने बुटाची जोडी दिली, तर कोणी एकाने एक पिशवी दिली, की ज्यामध्ये लुटीचा माल ठेवला असता कोणाला त्याचा ठावठिकाणा मिळणार नाही.

वरील सर्व दिव्य साहित्यानिशी तो देवतेच्या कृपेने राक्षसिणींचे राहण्याच्या ठिकाणावर गेला. तिन्ही बहिणी दारादूर झोपलेल्या दिसल्या. मेडुसाच्या बाबतीत एक विशेष गोष्ट अशी होती की तिची दृष्टि ज्यावर पडेल, ती वस्तु तावडतोब पाषाण होत असे आणि हीच मोठी भीती तिची शिकार करताना पर्सिउसला होती. समोरून युद्ध करून तिला ठार करणे अशक्य होते. पण देवतानी त्याची सोय दिव्य नेत्र देऊन केलेली होती. तो दिव्य नेत्र हातात धरून उजव्या हाती तरवार घेऊन, नेत्राच्या आरशात पहात पाठीमागे सावकाश पावले टाकीत, तो मेडुसा झोपली होती तेथे गेला आणि पाठ फिरवली असतानाच तरवारीचा वार करून तिचे शीर उडवले. काहींचे मत असे की, ढालीच्या चकचकीतपणाकडे आरशाप्रमाणे पाहून त्याने धाव घातला.[1] मस्तक छेदल्याबरोबर त्याने जादूच्या पिशवीत ते भरले. या गडबडीत अर्थातच इतर दोघीजणी जागृत झाल्या आणि पाठलाग सुरू झाला, पण पर्सिउसच्या डोक्यावर काळी जादूची टोपी असल्याने तो दिसू शकला नाही आणि जादूच्या पायातील बुटामुळे तो त्वरित सुखरूप पोहोचला.

परत येत असताना मार्गावर अंड्रामिडा युवराज्ञीला खडकाला गच्च बांधून ठेवलेले त्याने पाहिले. इथोपिआचा राजा केफिअस याची ती मुलगी असून सागरदेवतेकडून येणाऱ्या संकटाच्या निवारणार्थ तिला राजाने बळी म्हणून अर्पण केलेली होती. सागरदेवता पोसेडन याच्या रागाचे कारण असे होते की, अँड्रामिडाला अहंकारामुळे असे वाटले की, जगात सर्वांगसुंदर मीच एकटी आहे. त्या गर्वामुळेच तिने सागरदेवतेचा अपमान केलेला होता. तेथे पहाऱ्यावर असलेल्या राक्षसाचा पर्सिउसने प्रथम नाश केला आणि तिची सोडवणूक केली. आपल्याला प्राणदान करणारा हा पुरुष तिला परमेश्वराप्रमाणे वाटला आणि

---

१. टीप—मागाहून जाऊन वार करणे अशक्य नाही. ही अस्त्रविद्या पूर्वी होती आणि आजही आहे अर्जुनाने खाली जलात पाहूनच वर मत्स्यभेद केला सन १९६७ साली ग्रेट बॉम्बे सर्कस पाहत असताना एक बंदूकधीराने असा प्रयोग करून दाखविला. पूर्वेकडे तोंड करून समोर आरसा धरून त्यात पडलेले लक्ष्याचे पश्चिमेकडील (मागील बाजूकडील) प्रतिबिंब पाहून त्याने लक्ष्यभेद केला. सारांश, समोर आरशात पाहून मागील बाजूकडील लक्षभेद करणे अशक्य नाही. ते एक कौशल्य आहे, सराव आहे, इतकेच.

दोघांचा विवाहही झाला. तेथील राजाला पुत्र नसल्याने राज्याला वारस नव्हता. तेव्हा पर्सिउसला जो पुत्र झाला, तो तेथे राजाजवळ वारस म्हणून ठेवून हे जोडपे ॲरगॉस प्रांती परत आले.

घरी येताच मातेची चौकशी करताना त्याला दिसले की, राजा आर्किसिआस व त्याचा भाऊ यांनी डानीची स्थिती अत्यंत दारुण केलेली होती. तिला एका यज्ञवेदीसमोर विपन्न अवस्थेत बसलेली पाहताच पर्सिउसला वाईट वाटले आणि राजाचा व त्याच्या भावाचा सूड घेण्याचा त्याने निश्चय केला. मेडुसा राक्षसिणीचे शीर त्याने पिशवीतून बाहेर काढून असे ठेवले की, तिची दृष्टी राजाच्या भावावर पडली आणि तो पाषाण बनला. राजाने एक मोठा मेळावा भरविला होता, त्यामध्ये थाळीफेकीचा प्रयोग होता. पर्सिउसने आपला प्रवेश त्या मेळाव्यात करून घेऊन थाळीफेकीच्या प्रयोगात, आर्किसिआस राजाला ठार केले. याप्रमाणे पूर्वीचे भविष्य खरे झाले[1].

## ३१. मिनर्व्हा

रोमन लोकांची ही बुद्धिदेवता. ह्या देवीची उत्पत्ति बहुधा ज्युपिटरने आपल्या कल्पनेप्रमाणे केलेली असावी. संस्कृत- लॅटिन व ग्रीक 'Mind' ह्या अर्थी शब्दावरून उत्पत्ति होणे शक्य आहे. एट्रुरिआ प्रांतातून ह्या देवीची पूजा रोममध्ये आली असावी. प्रथम ती कलाकौशल्याची देवता होती व त्याच कारणास्तव रोममधील तिचे मंदिर म्हणजे कलेचे एक केन्द्रस्थान मानले जात होते. सर्व जनतेचे आरोग्य सांभाळणे हे तिचे प्रमुख कार्य होते. ह्या देवीला ज्युपिटर व जूनो ह्यांची संगत मिळाल्याने राजकारण व समाजकारण ही कामे सुद्धा ती करू लागली. ग्रीक संस्कृतीच्या प्रभावामुळे तिला पुढे अथेना म्हणू लागले. दिनांक १९ मार्च रोजी अव्हेंटाईन येथील तिच्या मंदिरात पूर्वी मार्सच्या निमित्ताने मेजवानी होत असे; पण पुढे ती ह्याच देवीप्रीत्यर्थ आहे असे लोक समजू लागले व आनंदोत्सव करू लागले. (वेबस्टर डिक्शनरी)

## ३२. फ्रेया अगर फ्रेजा

स्कँडेनेव्हियन लोकांची आकाशातील एक देवता. नोर्स पंथातील प्रीति आणि सौंदर्य ह्यांची देवता. युद्धात कामास आलेल्या वीरांना, ती आपले राज्य

---

१. टीप—कृष्ण व कंस याची कथा तुलनात्मकदृष्ट्या येथे पाहणे योग्य होईल. तेथे भाच्याने मामाचा शेवट केला, तर येथे नातवाने आजोबाना वध केला, एवढाच फरक आहे.

फोकवांग (Folkrang) सेस्रीग्मीर (Serrsigmia) ह्या ठिकाणी त्यांची सरबराई करते. ती नाजरोथची मुलगी व फ्रियची बहीण होय. ह्या देवीचा सर्वांत उत्तम अलंकार म्हणजे गळ्यातील सुवर्णाचा हार होय. तो हार पळविण्याचा प्रयत्न लोकी ह्याने केला, पण हेमिदालने सरक्षण दिल्याने त्याचा बेत फसला. फ्रिगा देवीचा ह्या नावाशी काही संबंध नाही. ती एक निराळीच देवता होय. प्रणय, नववधू व लग्नसंस्था त्यांची तिला अधिष्ठात्री देवता मानीत असत.

(वेबस्टर डिक्शनरी)

## ३३. मायसीन अगर मायन देवता

क्रीट द्वीपामध्ये पूर्वी मिनॉन मायसीन नावाचा राजा होऊन गेला. इ. स. पूर्व ३००० वर्षांचा तो काळ होय. हा राजा अतिशय न्यायप्रिय होता. त्याच्या कारकीर्दीमध्ये देवीची काही मंदिरे तेथे बाधली गेली. ह्या काळानतर आर्यलोकांनी तेथे जाऊन वस्ती केली. त्या राजकालीन संस्कृतीला मायसीअन संस्कृति म्हणतात (जेम्स पा. १४०). उत्खननातील एका हस्तिदंती पेटीच्या झाकणावरील चित्रात 'रसद्रायरा' देवीचे स्वरूप दाखविले आहे. ह्या देवीच्या हातात धान्याच्या कणसाची जुडी असून उड्या मारीत असलेले मेंढे दोन्ही बाजूला त्या जुडींवर तुटून पडत आहेत, पण देवीने त्याना थोपवून धरलेले आहे असे दाखविले आहे. उघडे वक्ष-स्थळ, मस्तकावर मुकुट, उत्तम नक्षीदार पायघोळ झगा व मागील बाजूस एक सर्प लोळत आहे अशा फलोत्पादन करणाऱ्या देवीचे चित्र दाखविले आहे (न्यूमन चि. १२३). दुसऱ्या एका छायाचित्रात पृथ्वीरूप राक्षसाच्या पसरलेल्या जबड्यात आकाशदेवता अडकली आहे असे दाखविले आहे. हे पाषाणशिल्प आठव्या शतकातील असावे. हे शिल्पात अतिशय कल्पनापूर्ण असून ह्या शिल्पात व आर्यांच्या शिल्पात एकतन्हेचे अपूर्व साम्य आढळून येते. ह्या शिल्पातील मूर्ति बसलेली, एका हातात शस्त्र, मस्तकावर सुंदर मुकुट, अंगावर नक्षीदार अंगरखा असे स्वरूप आहे. आकाशदेव हा पिता, त्याचे वसतीस्थान भूमातेच्या वरील बाजूस आहे. (न्यूमन चि. पा. १७९–२१०).

## ३४. सेरेज

ही सिनेले व शनी ह्याची मुलगी. शेतकी, वनस्पती, भाजीपाला ह्याचे सवर्धन करणारी देवता. प्रथम ती टेलूस मदर (एक भूमाता) हिच्याबरोबर असे. इ. स. पूर्व ५०० वर्षे ग्रीसमध्ये डिमिटर, कोरा व डायोनिसस ह्याचे प्राबल्य

झाल्यावर ह्या देवीचीही त्याच्यावरोवर तुलना होऊ लागली ह्याच कारणास्तव गुणामध्ये ती धान्यदेवता झाली आणि भूदेवीचे पद तिला प्राप्त झाले ( वेबस्टर )

ह्या देवीची जी छायाचित्रे व उत्खननात जे अवशेष सापडले आहेत, त्यावरून पाहता असे दिसते की, हेलेनिक संस्कृतीच्या काळातील पाषाणचित्रात देवीचे स्वरूप वक्षस्थळापासून वरील भागाचेच दाखविले आहे तिचे दोन्ही हात लांबवर पसरलेले असून त्या हातात तिने धान्याची कणसे घेतलेली आहेत तसेच ते हात सर्पवेष्टित आहेत पाँपींमधील दुसऱ्या एका चित्रात तिच्या सत्कार समयींची छायाचित्रे चितारली असून त्यातही सर्प आहेत तसेच पूजा साहित्य हातात घेतलेले भक्त समोर उभे आहेत असे त्यात दर्शविले आहे त्याच शहरातील आणखी एका चित्रात अंगावर शुभ्र झगा, हातात तलवार आणि डाव्या हातात परडी असे रूप दाखविले आहे (न्यूमन चित्र, ६०–६१–१६२)

## ३५ हिरादेवी ( Heera )

सर्व स्त्रीवर्गावर वर्चस्व गाजविणारी देवता काही वेळा ही भूदेवता, तर काही वेळा चंद्रदेवताही मानतात चित्रकलेमध्ये हिचे स्वरूप डौलदार रेखाटतात ती अलंकारांनी युक्त, मस्तकावर मुकुट अथवा फुलांच्या वेण्या आणि हाती राजदंड असतो पण एखाद्या गुणावरच हे स्वरूप देणे योग्य ठरणार नाही पुराणात वर्णन असे की, " On occassion she is warshipped as Maid, wife and widow ", याचा अर्थ असा घेतात की, जन्मतःच ती कुमारी होती विवाह झाल्यावर पत्नीपद मिळावे व पतीबरोबर भांडण झाल्यावर काही वेळा जर पती तिला सोडून बाहेरगावी गेला अगर घरी येणेजाणे बंद केले म्हणजे तिला जे एकट्याने आयुष्य कंठावे लागे, त्या वेळी ती विधवास्वरूप मानली जात असे

सृष्टिकर्ता झ्यूस हा तिचा पती होय, पण झ्यूसच्या स्वैर वर्तणुकीमुळे त्याची वारंवार भांडणे होत आणि ती एकमेकापासून दूर राहत एके वेळी अशीच ती दूरदेशी निघून गेल्यावर, झ्यूसने तिला परत आणण्यासाठी एक खासी युक्ती योजली तिच्याच स्वरूपाचा एक लाकडी पुतळा त्याने तयार केला आणि त्याला डायडेल असे नाव दिले सगळीकडे त्याने बातमी पसरवून दिली की, झ्यूस व डायडेल यांचा विवाह ठरला असून, अमुक दिवशी तो साजरा होणार आहे विवाहाची सर्व तयारी झाली मुलीला वधूचा पोषाक चढविला व विवाहाची मिरवणूक निघाली या वेळी हिरादेवी आपल्या सख्यांसह किथायरॉन पर्वतावर होती ही बातमी समजताच धावतच ती मिरवणुकीच्या जागी उपस्थित झाली आणि तिने मिरवणूक अडविली पुढा विवाह करण्यास तयार झाल्याबद्दल झ्यूसला खूप दोष

दिला. वधूचीही खरडपट्टी काढण्यास तयार झाली. पण तिच्या अंगाला हात लावल्या-बरोबर खरा प्रकार तिला समजून आला आणि सर्वत्र खूप हशा पिकला. त्यानंतर ती पतीजवळ सुखाने राहू लागली.

वरील विवाहाची स्मृती म्हणून अनेक वर्षे हा विवाह समारंभ भक्तांकडून साजरा केला जात असे. त्या वेळी ओक वृक्षाच्या लाकडापासून हिरादेवीचा पुतळा बनविण्यात येऊन विवाहाची वरात किथायरॉन पर्वतावर नेऊन तेथे हिरादेवी व झ्यूस यांचा विवाह समारंभ साजरा होत असे. मूळच्या प्रकरणात जसा पुतळ्याचा नाश करण्यात आला, तसा या प्रसंगीही विवाह झाल्यानंतर पुतळा जाळून टाकण्यात येई.

## ३६. ऱ्हिआ (Rhrea)

क्रोनोस या देवाची ही पत्नी होय. ही एक भूदेवता मानलेली असून हिचे अस्तित्व अनेक शहरातून असल्याचे पुरावे उपलब्ध झालेले आहेत. आर्केडिआ, पेलोपेनिस, लोकनिया, कॅरिंथ इत्यादी देशांत हिचे अस्तित्व जाणवले आहे. काही वेळा या देवीला किंविलीसमान मानतात. ही एक वृद्धिदेवता होय.

क्रीट बेटात प्रथमतः या देवीचे बहुत काळ पूजन चालत असे. पण क्रेटन युगानंतर ग्रीस, आशिया मायनर भागात काही वेळा ही एकटी, तर काही वेळा अनेक देवताबरोबर दाखविली जात असे. क्रोनोस हा ग्रीक लोकांचा पूर्वकालीन देव असून अथेन्स, ऱ्होड्स् आणि थेब्स् या शहरी त्याचे उत्सव समारंभ धान्याच्या सुगीच्या दिवसात करीत असत. या प्रसंगी उच्च नीच भाव पाळला जात नसे. धनी नोकरसुद्धा एकत्र भाग घेऊन भोजन करीत व देवाला नरबळी अर्पण करीत असत.

क्रोनोस देवाच्या बाबतीत असे भविष्य होते की, त्याचीच मुले त्याची राज्यातून हकालपट्टी करतील. या भीतीमुळे तो मुलाचे गर्भ खाऊन टाकीत असे. पण झ्यूसदेवाच्या वेळी ते जमले नाही. कारण जन्म झाल्यावर राणीच्या उदरी एक दगडच झाला असे सांगून, मुलाला लपविण्यात येऊन, तो दगड क्रोनोसजवळ नेऊन देताच त्याने विचार न करता तो गिळून टाकला आणि झ्यूस जिवत राहिला. झ्यूस मोठा झाल्यानंतर त्याने सैन्य जमा केले आणि ऑलिंपस पर्वतावर मुख्य ठाणे ठेवून दहा वर्षांपर्यंत क्रोनोसबरोबर मोठी लढाई दिली. या युद्धाच्या वेळी पृथ्वी कंपायमान होत असे. शेवटी झ्यूसने वज्राघाताने क्रोनोसला ठार केले. सर्व टिटान सैन्य कैद करण्यात आले.

हेसाइड या ग्रंथकाराच्या मताप्रमाणे व्हिआदेवीला हेसटिया, डिमिटर, हिरा पोसेडन, झ्यूस अशी मुले होती. झ्यूस या देवाचा जन्म क्रीट बेटावच झालेला आहे. ज्या गुहेमध्ये त्याची वाढ झाली, ती गुहा अग्निवर्षाव करी, व तेथील उकळत्या पाण्यामधून त्याचा जन्म झाला असे मानीत असल्याने ती गुहा अत्यंत पवित्र मानलेली होती. या इतिहासावरून एक गोष्ट सिद्ध होते की, झ्यूस हा पूर्वीचा क्रीट बेटातील देव, नंतर ग्रीसमध्ये गेला, आणि तो एक मानवच होता. व्हिआ-देवीला रोममध्ये ऑप्स ( Ops ) मानीत असत.

क्रोनोसची व्हिआदेवीशिवाय दुसरी पत्नी असून तिचे नाव फिलिरा (Phylyra) असे होते. आपल्या पतीच्या वर्तनाचा संशय व्हिआ देवीला आल्यावर ती त्याच्या पाळतीवर राहिली आहे असे समजताच, फिलिरा घोडीचे रूप घेऊन फिरू लागली. क्रोनोसनेही घोड्याचे रूप घेतले व आपली इच्छा पूर्ण करून घेतली.

क्रोनोसची मालमत्ता वाटण्यात आल्यावर झ्यूसकडे आकाश, पोसेडनकडे सागरीसत्ता, आणि हेडिसकडे पाताळभागावरील अधिकार आला, आणि अर्थातच त्यात्या भागाच्या त्या प्रमुख देवता बनल्या. काहींचे म्हणणे असे की, देवताना मरण नाही. वास्तव क्रोनोस वृद्ध–अपंग झाल्याने, त्याने आपले राज्य वाटून दिले व स्वतः निवृत्त झाला. आकाशदेवाने पृथ्वीला आपली पत्नी मानणे सहाजिकच असल्याने, पृथ्वीची जी अनेक रूपे डिमिटर, पर्सोफेन, किबिली, हिरा या झ्यूसच्या स्त्रिया मानल्या जातात. परंतु ग्रीसमध्ये गेल्यावर आणि ग्रीक साधारणतः एकपत्नी व्रताचे असल्याने त्यानी हिरादेवी ही पत्नी मानली व इतरापासून झालेली संतती अनौरस मानली. भारतीय संस्कृतीमधील आकाशदेवता द्यौ हिचे झ्यूसदेवाबरोबर बरेच साम्य आढळते.

शस्त्रांचा खणखणाट, दुंदुभींचे निनाद, रणशिंगाचे गरजणे, सिंह-लांडगे यांच्या आरोळ्या इ० गोष्टींत व्हिआ देवीला फार आनंद वाटत असे.

## ३७. हेकेटी

या देवीचा जन्म करियन प्रांती टिटन-ॲस्टरी अगर कोयस-फोबे या जोडी-पासून झालेला आहे. कोणी हिरा झ्यूस-ॲस्टरी यांची मुलगी मानतात. कोणी-तिच्या मातेचे नाव लेटो अगर नाईट असे समजतात, तर कोणी लेटो ही तिची मावशी मानतात. येसलीन पुराणात या देवीचा बाप एडमेटस व माता फरोई शहरातील एक स्त्री होती असेही मानणारे आहेत. सारांश, या देवीच्या जन्मा-बाबत एकवाक्यता आढळत नाही.

या देवीचे स्वरूप त्रिमूर्ति स्वरूपांत मानतात. पृथ्वी, चंद्र व पाताळ हिच्या स्वरूपात एकत्रित वास करीत असल्याने, ही त्रिमूर्ति झाली. हिला सहा हात असून त्रिशूळ, मशाल, रांजीर, परशू इ० हिची आयुधे आहेत. हेसाइडच्या मते ही देवता प्रथम टिटन वंशात जन्माला आली, पण कालांतराने झ्यूसने पृथ्वीवरील राज्यात वाटणी दिली व ऑलिंपिसमध्ये स्थान दिले. पूर्वकालात ही देवता रणसंग्राम, खेळ, शिकार यांत सहाय्य देत असे. तसेच, लहान मुलांची हितकर्ती होती. पण कालांतराने तिचे उत्तम गुण नंतरच्या आयुष्यात लुप्त होऊन, ती एक दुष्ट आणि जादुटोणा करणारांची देवता बनली. इतकेच नव्हे, तर रस्त्यावरील तिकटीवरील (तीन रस्ते मिळणारे स्थान) देवता बनली. हीच कल्पना पुढे वाढीस लागून तिला तीन शिरेही दाखविण्यात आली. भुतेखेते आणि राक्षसांवर सत्ता चालते या समजुतीतून तिला शांत ठेवण्यासाठी तिकटीवर जेवण ठेवण्याची प्रथा रूढ झाली. जादुटोण्याची देवता हे तिचे स्वरूप मानल्यावर तिचे स्वरूपही तसेच अद्भुत झाले. तिच्या हाती भयंकर शस्त्रे असून, पायापासून कमरेपर्यंत दोन्ही बाजूंना सर्प उभे असून चावा घेण्यासाठी त्यांनी जबडे पसरलेले आहेत असे दाखवितात. तिकटीवर ठेवलेले अन्न, रात्री आपल्या सख्यांसह येऊन ती भक्षण करते आणि तिच्याबरोबर रक्षक कुत्रेही असतात, अशी भक्ताची भावना होती.

प्राचीन अक्केडिअन संस्कृतीमधील या देवतेचे जे शिक्के मिळालेले आहेत, त्यावर वरीलप्रमाणेच प्रतिमा आहे. अमेनिअन संस्कृतीमधील चित्रात या देवीचे स्वरूप लांडगीप्रमाणे दाखविलेले असून, तिने आपला योनीभाग पुढे दिग्दर्शित केलेला दाखविलेला आहे (न्यूमनकृत मदरगॉडेस, चित्रे ५१ व १६९ पहा). कदाचित पशुकालातील जीवउत्पत्ती तत्त्व त्यायोगे विशद करून दाखविण्याचा प्रयत्न असावा.[1]

## ३८. हेस्टिआ (Hestia)

ही एक ग्रीक देवता होय. सुंदरता आणि मोहकपणा यांसाठी ती प्रसिद्ध होती. ती अग्निदेवता असून दैनंदिन जीवनात आणि धार्मिक पूजनाच्या वेळी

---

१. टीप—फ्रिजिअन लोकांच्या चार शेतकीप्रधान देवतांच्या एका समूहाला 'साबावरी' असे नाव असून, त्या स्वरूपाची पूजा सोमोथ्रेस, लेमनॉस, इंब्रोस व थेबस या शहरी होत असे. हेकेटी, व्हिझा, पर्सोफेन या देवतांबरोबर याचे उत्तम संबंध होते. इजिप्तमध्येही याचे पूजन होई.

(वेबस्टर शब्दकोश)

अग्नी पुरविण्याचे काम हिच्याकडे असे. या देवतेसंबंधी विशेष कुतुहलाच्या कथा प्रचलित नसल्याने पुराणकारांना हिच्यासंबंधी विशेष उत्सुकताही नाही. क्रोनोस व न्हिआ यापासून हिचा जन्म झालेला असून ती आमरण कुमारीच राहिली. अपोलो व पोसेडन यांनी विवाहाची बरीच खटपट केली, पण त्यांना यश आले नाही, कारण विवाह न करण्याचा मानस तिने बदलला नाही. तिच्या या अती पवित्र वर्तनामुळे, या देवीचे पूजन राजवाड्यापासून तो रंकाच्या झोपडीपर्यंत होत असे.

---

संदर्भ ग्रंथ—

१. Handbook of Greek Mythology by H. J. Rose.

२. प्राचीन ग्रीक संस्कृति लेखमाला—प्र. ल. सासवडकर, जीवन-विकास.

३. ग्रीक तत्त्वज्ञान लेखमाला—डॉ. बाबासाहेब खापर्डे, प्रसाद मासिक इ० इ०

# पश्चिम गोलार्धातील देवतांचे स्वरूप

## भाग २ रा

### माओ संस्कृति

माओ ही संस्कृति सनपूर्व आठव्या शतकात अस्तित्वात होती. पश्चिम मृतसमुद्र व जॉर्डनदेश यामधील भूप्रदेशास पूर्वी माओ हे नाव होते. या प्रदेशाच्या उत्तर व पूर्व सरहद्दी वारंवार बदलत गेल्याने त्याबद्दल निश्चित माहिती मिळत नाही. अमान व इसराईल वंशांप्रमाणेच हा वंश मानला जातो. माओ या शब्दाची व्युत्पत्ति अशी दिली जाते की, 'माझ्या आईपासून जन्म पावलेले लोक.' अर्थात सर्व मानवजातीचा जन्म मातेच्या पोटीच होतो. परंतु कदाचित मातांची महती वाढावी आणि मातृवंश म्हणून आपण वावरावे यासाठी त्या वंशाने हे नाव मुद्दामच धारण केलेले असावे. इसराईल धर्मीय अब्राहम याचा लोट या नावाचा पुतण्या होता. त्याच्या मुलीपासून हा वंश उत्पन्न झाला असे मानले जाते आणि याच कारणास्तव त्या वंशाला काही वेळा 'लोटची मुले' असेही संबोधिले जाते. या वंशाची भाषा हिब्रु हीच होती. इस्टर व कोमेश या देवतांचे पूजन हा वंश करीत असे. — (जेम्स धर्मकोश, ८।७६१).

### इराणी संस्कृति

इराणचे साम्राज्य सनपूर्व सहाव्या शतकात स्थापन झाले, म्हणून या संस्कृतीचा क्रमांक या ठिकाणी लागलेला आहे. या साम्राज्याचा संस्थापक झरतुष्ट्र याचा जन्म अझरबैजान या प्रांती, सनपूर्व ६४० च्या वर्षी होऊन ५६३ साली तो मृत्यु पावला. वास्तविक ही संस्कृति आहे त्याहीपेक्षा प्राचीन असली पाहिजे, हे अनेक ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध होण्यासारखे आहे. काहींचे मत असे की, भारतामध्ये येण्यापूर्वी आर्य या प्रांतात वस्ती करून होते. दुसरे असे म्हणतात की, आर्यांच्या काही टोळ्या इराणकडे आल्या आणि काही भारताकडे वळल्या. आणखी एक मत असे की, भारतामध्ये काही काळ वास्तव्य केल्यानंतर यज्ञयाग व त्यातील पशूंची हिंसा यामध्ये मतभेद होऊन पशुहत्या न व्हावी या मताचे लोक इराणमध्ये जाऊन स्थायीक झाले. या सर्वांपासून बोध एकच घेता येतो की, इराणमधील जनसमुदाय हा आर्यांचाच एक भाग होता. या संस्कृतीचा प्रमुख

धर्म अवेस्ता ग्रंथातील मंत्रामध्ये आणि वेदातील मन्त्रामध्ये खूपच साम्य असल्याचे आढळून आले आहे.

आता उदाहरणार्थ त्याच्या ग्रथामधील 'हप्तहेंदु' हा शब्द घेतला तर आपणाला दिसून येईल की, या शब्दाचा अर्थ सप्तसिंधु असा होतो. बारा सहस्र वर्षांपूर्वी मरुत नावाचे सार्वभौम राजे होऊन गेले आणि वैदिक मंत्रामध्ये त्याच्या स्तुतिपर सूक्ते आहेत. 'समुद्रपर्यंताया एकराळिति' ही वैदिक ऋचा दैनंदिन प्रार्थनासूक्तात असल्याचे प्रसिद्धच आहे. आता हा सप्तसिंधु देश कोणता याबद्दल निरनिराळी मते आहेत. एका पक्षाचे मत असे की, सध्या रशियन अंमलाखाली तुर्कस्थानामधील एक भूप्रदेश आहे. इराणी संस्कृति त्या प्रांताला 'एदेनवोजो' असे म्हणे. आर्य भारतामध्ये आल्यावर ते सिंधुनदीच्या दोन्ही तीरावर वस्ती करून राहिले. या सिंधु नदीच्या पूर्व बाजूला गगा, यमुना, सरस्वती, शतद्रु, परुष्णी (रावी), असिक्नि (चिनाब), वितस्ता (झेलम) या नद्या होत्या, तर पश्चिम बाजूला तुष्टया-सुसर्तु, रस्ता, श्वेती, कुंभा, क्रुमु, मेहन्तु व गोमति या नद्या होत्या. वरील कोणत्याही बाजूला सिंधु ही नदी मिळविली तर आठ ही सख्या होते. तेव्हा सप्तसिंधु प्रदेश तो हाच असावा की काय अशी साहजिकच शका उद्भवते. कदाचित आपल्या पूर्वीच्या मायभूमीची आठवण राहावी, या उद्देशाने पंजाब प्रांतालाही त्यानी हे नाव दिले असावे. जसे, पवित्र गंगानदीचे स्मरण राहावे म्हणून दक्षिणेत कोल्हापूर भागात गंगानदी नसतानाही तेथील पाच नद्यांच्या समूहाला पचगंगा असा शब्दप्रयोग केलेला आपण पाहातो.

आता इराणी अथवा पारशी संस्कृति ही आर्यसंस्कृतीच कशी आहे याचे एकाच मुद्याचे किंचित विवरण करू. झरतुष्ट्र हा या संस्कृतीचा संस्थापक मानला जातो. याच्या वंशावळीचे निरीक्षण केले असता असे दिसून येते की, त्याच्या आठव्या पूर्वजाचे नाव हरिद्रवेय असे आहे आणि कृष्णयजुर्वेदाच्या एका पोटशाखेचे नाव हेच आहे. या वेदाच्या मुख्य शाखा ८६ असून त्यापैकी चरक ही एक होय. या चरकशाखेच्या बारा उपशाखा असून पैकी श्वेताश्वतर व मैत्रायणी या दोन आहेत. या मैत्रायणी उपशाखेच्या ज्या आणखी सात उपशाखा आहेत, त्यापैकी हरिद्रवेय ही एक आहे. याचाच अर्थ असा होतो की, पारशीवश हा आर्यांचाच एक पोटभाग आहे आणि तो कृष्णयजुर्वेदीय आहे.

ऋग्वेद व यजुर्वेदामध्ये यज्ञांचे जे अनेक छंद आहेत त्यामध्ये आसुरीछंद या नावाचा एक प्रकार आहे. असुर हे अग्नि व वरुणाचे उपासक, यज्ञोपवित धारण करणारे. परंतु पुढे सगुण-निर्गुण उपासना याबरून आणि यज्ञातील पशुहत्या यावरून त्या दोन समाजात तेढ उत्पन्न होऊन त्याची परिणती युद्ध होण्यात

झाली. या युद्धानंतरच असुरवंशी इराण देशात कायम वस्तीसाठी गेले असावेत. संशोधक श्री. करंदीकर यानी मागे एकदा पुण्याच्या केसरीत लिहिलेल्या एका लेखात म्हटले आहे की, 'असुरांची उत्पत्ति या प्रदेशात झाली व त्यांची वाढही तेथेच झाली. याच असुराना पुढे दैत्य अथवा राक्षस म्हणूनही संबोधू लागले. दशशीर रावणाचा पिता पौलोमही हा याच प्रदेशातील होय आणि आजही तेथील एका भागाला असुर-दर्शक नाव आहे.'

डॉ. आर. पी. मसानी यांनी या धर्माविषयी एक पुस्तक प्रसिद्ध केले आहे. त्यामध्ये ते असे म्हणतात की, 'या संस्कृतीमध्ये स्त्रीदेवतांची पूजा केली जात नाही. किंबहुना त्या नाहीतच.' फक्त अनाहिता या देवीच्या नावाचा उल्लेख त्यांच्या ग्रंथामध्ये मिळतो. आर्द्वि-असुरा ही एक जलविषयक देवता असून तीच अनाहिता होय. परंतु वरील मत तितकेसे खरे मानता येत नाही. कारण असे की, आर्यांचे मंत्र व त्याची सूक्ते त्यांच्या ग्रंथामध्ये असल्याने त्याच्या स्त्री-देवताची पूजाही त्या संस्कृतीमध्ये अपरिहार्यच आहे. या संस्कृतीचे संशोधन करण्यासाठी 'कामा इन्स्टिटयूट, मुंबई' या नावाची एक संस्था आहे. काही वर्षांपूर्वी प्राध्यापक मे यानी इंग्लंडमध्ये या संस्कृतीविषयक एक व्याख्यानमाला गुंफली होती. ती व्याख्याने ग्रंथरूपाने त्या संस्थेने प्रसिद्ध केली आहेत. त्या ग्रंथामध्ये वैदिक देवतांप्रमाणे अनेक संस्कारांसाठी पंचमहाभूतात्मक देवता दिलेल्या आहेत. त्यापैकी काही प्रमुख देवतांची नावे आपण पाहू या. या संस्कृतीचे विवरण करताना प्राध्यापक मजकूर म्हणतात की, या संस्कृतीत स्थित्यंतरे होत गेलेली आहेत. पर्शिअन धर्म हा आदि होय. त्यानंतर गाथिक, पुढे अवेस्ता आणि शेवटी पेहलवी अशी नावे त्याना प्राप्त झाली.

पंचमहाभूतात्मक पुरुषदेवता

| कार्य | वैदिक नाव | इराणी संस्कृतीदर्शक नाव |
|---|---|---|
| आकाश | द्यौस | झेउस |
| सूर्य | मित्र | हेलिओस |
| चन्द्र | चन्द्र | माहसलेनी |
| पृथ्वी | पृथ्वी | गी ( GE ) |
| अग्नि | अग्नि | पीर |
| पाणी | आप | हायडॉर |

पंचमहाभूतात्मक स्त्रीदेवता

| | | |
|---|---|---|
| पर्जन्य | वरुणानी | अहुराणी |
| अमावास्या | अमवासी, राका | अतरेह् माह् |
| पौर्णिमेचा चद्र | पूर्णमसी, कुहू | पोरेनो माह् |
| पविन नदी | सरस्वती | अरेद्वी |
| प्रभातसमय | उषा | याम्य |
| पृथ्वी | पृथ्वी | झम |

या संस्कृतीमध्ये देवताच्या स्वभावानुसार व त्याच्या निरनिराळ्या कार्यानुसार निरनिराळ्या विभागात त्याची माडणी केलेली आहे. ती येणेप्रमाणे.

सृष्टिनिर्मिती करणाऱ्या—अहुरमज्दा, स्पेन्टा, मैन्यू वगैरे.

पृथ्वीविषयक—सोम, आरमैती, झम, अहुराणी, अरेद्वी इत्यादि.

मानवी जीवनविषयक—अर्यमाण, त्रीता, कुड, ताप, वायु वगैरे.

राजकीय—दहयुमा, दात, विस्य, दहाक इत्यादि.

युद्ध व शांतताविषयक—वेरेत्रन्य, अमा, उपरतात, अक्षीती, दवी वगैरे

गृहविषयक—अरताई, मवशी, रामन, नियाझ इत्यादि.

शेतीविषयक—अयनिमा, वेरेज्य, सावझी वगैरे.

कालवाचक—असन्य, आयर, माह्य, उसहिना इत्यादि.

सद्गुण, दुर्गुण—अरस्तात, सिस्ती, अरायटी वगैरे.

पशुविषयक—झॅव्ह (Xav) इत्यादि.

त्याचा धर्मसंस्थापक अहुरमज्दा (उर्फ शहाणा देव) ह्याला एकूण नऊ नायका होत्या. त्याची नावे अशी—

(१) आशा, (२) इझा, (३) यावस्ती, (४) फरेस्ती, (५) आरमैती, (६) अषी, (७) इज्, (८) उष्ठती, (९) पोरडी.

या संस्कृतीमध्येही त्रिमूर्तीची कल्पना आहे. अहुरमज्दा + अनाहिता + मित्र ही एक आणि ज्युपिटर + अपोलो + डायना ही दुसरी जोडी होय.

वर जो स्त्रीदेवताचा उल्लेख आला आहे, त्यातील काही प्रमुख व ठळक देवताचे स्वभाववर्णन करणे अनाठायी होणार नाही.

## १. आरमैती

आरमैती याचा अर्थ ईश्वरनिष्ठा असा केला जातो. ही देवता प्राणिमात्रांची वाढ करणारी, मानवांची पापे नाहीशी करणारी, संभ्रमावस्थेत उत्तम मार्गदर्शन करणारी, इच्छापूर्ती करणारी आणि सहनशक्ति देणारी आहे. ही अहुरमज्दा ह्याची पत्नी असून, हिच्यामार्फत काही वेळा त्या देवाची प्रार्थना केल्यास फलप्राप्ति लवकर होते. ती एक पृथ्वीदेवता असल्याने सर्वांना खाद्यपदार्थ पुरविणारी व अनेकांना जन्म देणारी आहे असे मानतात. या देवतेजवळ सहस्रावधी औषधी असून विवाह-विषयक अडचणींचे ती निवारण करते. या देवतेचे साम्य इतर देवतांबरोबर दाखविले जाते. सिथीअन संस्कृतीमधील ही आपिया, मॅसिडोनियनची आना, मंगोलियनांची अबेया आणि वैदिक आरमती होय. या सर्वांचे सार असे सांगता येईल की, वैदिक देवतांमधील द्यौस व पृथ्वी ही जोडी म्हणजेच अहुरमज्दा आरमैती होय.

## २. अरेद्वी

ही एक जलदेवता होय. ही अंतरिक्षामध्ये रहाणारी असल्याने भूतलावर येण्यासाठी अहुरमज्दा तिला मार्ग करून देतो आणि ती चार घोड्यांच्या रथात बसून प्रवास करते. मानवांची उत्पत्ति करून त्यांना अन्नधान्य पुरविते. तिच्या शरीराचा बांधा सुडौल असून दिसायला ती अतिशय मोहक आहे. ही देवता सुवर्णाची कर्णभूषणे घालणारी, कंठामध्ये शंभर नवरत्नांचा हार असलेली, उत्तम वस्त्र नेसलेली आणि सुवर्णाची पादत्राणे घालणारी आहे. या देवतेच्या मूर्ति बनवून त्यांची स्थापना केली जाते. या देवतेची तुलना आर्टिमिस, अफ्रोदिता, हीरा, इस्टर व नानिआ यांच्याबरोबर केली जाते. तसेच भारतीयांची सिनीवाली अथवा अनुमती या चंद्रदेवतांबरोबर जरी हिची तुलना केली जात असली, तरी जलविषयक सरस्वती अथवा गंगा हिच्याबरोबर तिचे साम्य जास्त आहे.

## ३. असी ( ASI )

ही अहुरमज्दा व आरमैती यांची कन्या असून अमेसा पेन्टा, रासनु, मित्र, डायना यांची भगिनी होय. ती मित्राच्या रथाचे सारथ्य करणारी असल्याने तिचा प्रवास सदैव रथातूनच घडत असतो. होम-हवनामध्ये तिला आहुती मिळते. मानवांना मातृसुख देणे हा तिचा स्वभावधर्म आहे. पशु व वृक्ष यांचे संवर्धन ती करते. ती सौंदर्यवती असल्याने, जवाहर या देवाशी तिचे कडक वैर आहे. इंडो-सिथिअन नाण्यावर तिचा शिक्का असून ती राजसिंहासनावर बसलेली आणि

हातात भाला व दंड धारण केलेली आहे. भारतीय संस्कृतीत या देवीशी तुलना होऊ शकेल, अशी कुठलीही देवी नाही.

४. डायना

ही अशी, सरोश, रासनु याची बहीण होय. पारेंडी व ह्रम याच्या सहकार्याने ती सकल जीववर्गाला सुखी ठेवण्याचा आटोकाट प्रयत्न करते. मित्राच्या रथाचा मार्ग ती मोकळा करून देते. अहुरमज्दा याच्याबरोबर तिचे घनिष्ठ संबंध आहेत. तिच्या शत्रूचे नाव दैत्य, झूट-डाखगी हे होय. वैदिक संस्कृतीमधील प्रजापतीची कन्या द्यौ, ती हीच असावी.

५. पारेंडी

डायना व अशी या देवताची ही मैत्रीण असून रथावर बसल्यानतर ती मित्राच्या कार्यात मदत करते. वस्तूंचे संवर्धन करणारी ही देवता असल्याने, स्त्रियाच्या ऋतुकाली उत्तम फल यावे म्हणून हिची प्रार्थना करतात. वैदिक संस्कृतीमधील पुरंध्री हीच असावी.

( The Foundation of Iranian Religion by Prof. L. H. Gray, Published by D. B. Taraporewalla & Sons, Bombay )

६. अनाहिता

इ. स. पूर्व ३००० वर्षे इराणच्या पठाराख एलम् पठार म्हणून संबोधीत असत व ह्यावरूनच तेथील देवताना एलामिल दैवता असे नाव पडले. काल-क्रमाने तेथे निनि, शाला, किरिरिशा व नानई ह्या देवताचे स्वामित्व इ. स. पूर्व २५० वर्षांपर्यंत चालत होते. उत्तम कुलोत्पन्न, फलोत्पादनक्षम, जलदेवता व युद्धदेवता अशी ही वायु, पर्जन्य, ढग व गारा ह्या चार घोड्यानी ओढलेल्या रथातून निघत असे. ती कुमारी असून मजबूत बाध्याची, सुंदर, सुगात्री, पवित्र व मस्तकामागे वलय असणारी अशी असे. शभर ताऱ्यानी चमकणारा मस्तकावर किरीट, सोन्याची कंठी, सुदर बाकी, कमरपट्टा, सुवर्णाचे कपडे व पादत्राणे असे तिचे अलंकार होते. ससेनियन काळात ( इ. स. २२९ ते ६५१ ) अस्ताखर येथे ह्या देवतेचे मदिर होते. नाकशी–रुस्तुम ह्या गावी राजा नरसेह ( इ. स. २९३ ते ३०२ ) ह्याने आपले राजवस्त्र ह्या देवीच्या हस्ते घेतले, असे शिल्प-कलाकृतीतून दाखविले आहे.

स्वर्गात सर्वात उत्तम जलसंचय आहे असे मानतात. अरद्वी-सुरा-अनाहिता ही जलदेवता अहूर देवाची कन्या म्हणून भूतलावर अवतरली. अहूरमज्दा म्हणजे वरुण. आर्य व इराणियन संस्कृतीत फरक असा आहे की, ज्यांना आर्य देव म्हणतात, त्यांना इराणमध्ये असूर म्हणतात व ज्यांना आर्य असूर म्हणतात, त्यांना तिकडे देव मानले गेले आहे. वरुण हा आर्यांचा देव असून तो इराणमध्ये असूर झाला आणि पुढे त्याचेच नामांतर अहूरमज्दा झाले. आर्यांची सरस्वती व गंगा ह्या नद्या जशा स्वर्गातून अवतरल्या त्याचप्रमाणे अरद्वी अनाहिता ही भूतलावर अवतरली. वेदामध्ये तिचा उल्लेख असुराणी असा आहे, तर अवेस्ता ह्या पार्शी धर्मग्रंथात तिला अहूराणी असे म्हटले आहे. आपल्याकडे जसे सरस्वती नदीचे नामांतर देवीस्वरूपात होऊन ती ब्रह्म्याची पत्नी झाली तद्वतच अरद्वी–सुरा–अनाहिता ह्या नदीचे नामांतर अनाहिता ह्या देवी स्वरूपात झाले आहे.

श्री. आर. पी. मसानी ह्यांनी आपल्या ग्रंथात ( The Religion of the Good Life of Zoroastrians ) असे स्वच्छ म्हटले आहे की, इराणियन वंश एका अहूरमज्दा ह्या देवाशिवाय अन्य कोणत्याही देवाची उपासना करीत नाही. कोणीही असे समजू नये की, इराणमध्ये मूर्तिपूजा चालत होती. झोरोस्ट्रियन धर्मीयांचा कोणत्याही स्वरूपाच्या मूर्तिपूजेला विरोध होता. इतकेच नव्हे तर इराणी राजे व योद्धे यांनी मूर्तिपूजेविरुद्ध मोहीमच उघडली होती. प्राचीन इतिहासकार हिरोटोडस् हा आपल्या ग्रंथातून मूर्तिपूजेसंबंधी असेच मत प्रदर्शित करीत असे.

" It must not be supposed, however, that image worship was common in Iran. Idolatry in any form was repugnant to orthodox Zoroastrians and Iranians; and Kings and Heroes, waged a crusade against Idol-worship. " ( Page 89-90 )

या संस्कृतीसंबंधी श्रीयुत आर. पी. मसानी यांचा दृष्टिकोन कसा वेगळा आहे हे दर्शविण्यासाठी वरील वाक्य उद्धृत केलेले आहे.

श्री. मसानी यानी जरी वरीलप्रमाणे विचार प्रदर्शित केले असले तरी आर्किमिनिअन काळात अनाहिता देवीचे पुतळे बॅबिलोन, सुसा, परसेपोलीस, बॅक्ट्रिआ, दमास्कस, सार्डिस इ० इ० ठिकाणी उभारले गेले होते व ते लोकप्रियही होते. ह्या सर्व ठिकाणी झोरोस्ट्रीयन पंथीयानी त्याची पूजा केली किंवा काय, हे जरी नक्की सांगता येत नसले तरी प्रत्यक्ष अहूरमज्दाने मात्र ह्या देवीची पूजा केल्याचा उल्लेख मिळतो. झरथुष्ट्राने भूतलावर तिचा दूत म्हणून काम करावे ह्यासाठी

पूजा केली होती. इतकेच नव्हे तर प्रत्यक्ष झरतुष्ट्रानेसुद्धा 'हौमा' विधीने या देवीला आळविले आहे. दुसऱ्या अनेक भक्तांनी ह्या देवीला १०० घोडे, सहस्र बैल, दशसहस्र मेंढ्या बळी दिल्याचा दाखला मिळतो.

(मसानी, पृ. ८९–९०)

ही देवी श्रेष्ठ, बलिष्ठ व पवित्र असून हिला पर्जन्य व वसंत ऋतूंची अधिष्ठात्री देवता मानतात. सुलभ प्रसूतीसाठी स्त्रिया ह्या देवीची आराधना करतात. वीरांना ती युद्धसामग्री पुरविते व जय मिळवून देते. फलोत्पादन करणारी म्हणून प्रथम अहूरमज्दाबरोबर ती सिबेले देवींची सहचरी होती. पण पुढे अनाहिताचे श्रेष्ठत्व कायम न राहू शकल्याने अधिक स्त्री-देवता इराणियन धर्मात झाल्या नसाव्यात. अहूर हा ह्या संस्कृतीमधील एकटाच वंदनीय म्हणून राहिला आहे. झरतुष्ट्र हा प्रेषीत व त्यानेच वरुणाला अहूरमज्दा असे नाव दिले. ह्या नावाचा अर्थ 'शहाणा देव' अगर 'एकमेव सर्व सत्ताधिश शास्ता' असा आहे.

(इ. ओ. जेम्स, ९४–९८) (ज्ञा. को. ६/२७३)

सांप्रत ज्या भागाला आपण टर्की या नावाने ओळखतो, तो भाग चवथ्या शतकापर्यंत इराणी साम्राज्यातच मोडत असे. परंतु त्यानंतर काही सैबेरियन, टारटर व याकुती या टोळ्यांनी चढाई करून तो भाग आपल्या अमलाखाली आणला. इस्लाम संस्कृतीचा उगम झाल्यावर या टोळ्यांनी या धर्माचा स्वीकार केला, आणि आता तेथे इस्लामी संस्कृति नांदत आहे. तत्पूर्वी या भागात उमाई, अलताई या देवता विश्वजननी व सृष्टिउत्पन्नकर्त्या म्हणून पूजिल्या जात होत्या. वरील टोळ्यांपैकी काही लोक या देवतांचेही उपासक होते. ईश्वर हा परमात्मा आणि मानव-समाज यांच्यामध्ये मध्यस्थी करणारा कुडई हा देव होता. तसेच प्रमुख देवता युलगेन व दुष्ट सैतानी देवता एलरिक ही होती.

## टयुटानिक संस्कृति

सनपूर्व ५८ साली ज्युलियस सीझर या नावाचा एक अतिशय पराक्रमी आणि महत्त्वाकांक्षी राजा होऊन गेला. या राजाच्या कारकीर्दीपासून साधारणतः या संस्कृतीची माहिती उपलब्ध आहे. तत्पूर्वी जरी ती कोठे तुरळकपणे चालू असली तरी नोंद घेण्याइतपत ती ज्ञात नाही. युरोपमधील ऱ्हाईन व विस्तुला या दोन नद्यांच्या खोऱ्यात या संस्कृतीची प्रथम उत्पत्ति झाली असे मानण्यात येते. त्यानंतर क्रमाक्रमाने ती संस्कृति हंगेरी, डेन्मार्क, नॉर्वे, स्वीडन, बाल्कनप्रदेश, फ्रान्स, स्पेन, इंग्लंड, रशिया या देशातून पसरली गेली. ती साधारणतः पाचव्या

शतकापर्यंत. याच संस्कृतीला कित्येकदा हिथिअन संस्कृति म्हटली जात असे. कारण यांमध्ये कुंडातून बळी देण्याची रूढी चालू होती.

इसाई धर्माची स्थापना येशू ख्रिस्ताने केल्यानंतर अनेक शतके तो बाल्यावस्थेतच होता. पाचव्या शतकात रोमन साम्राज्याची चलती सुरू झाली आणि या संस्कृतीच्या वाढीस सुरुवात झाली. रोमन जनता प्रथम या संस्कृतीच्या अंमलाखाली गेली आणि गोथ वंशाने त्याचा स्वीकार केला. पुढे हंगेरीमधील गिपिडीवंश, ऑस्ट्रेलियातील रुगीवंश, फ्रान्समधील गॉलवंश आणि शेवटी ब्रिटनमधील जनतेने या संस्कृतीचा स्वीकार केला. हे सर्व धर्मांतर अंदाजे सातव्या शतकापर्यंत पूर्ण झाले. डेन्मार्क सन ९७३, रशिया सन ९८८, नॉर्वे सन १००० आणि स्वीडन सन ११०० पर्यंत या संस्कृतीच्या अंमलाखाली आले आणि त्या प्रांती अस्तित्वात असलेल्या हिथिअन संस्कृतीचा संपूर्ण नाश झाला.

(जेम्स धर्मकोश, १२–२४६)

## थोर व ओडीन देवता

संशोधक ओल्डनबर्ग म्हणतो की, 'ऋग्वेदातील सूक्ते, म्हणजे गद्यपद्यात्मक इतिहास असून, एडा (Edda) व नॉर्स या आख्यानाप्रमाणे आहेत. या काव्यातून थोर व ओडिन या देवताची अचाट कृत्ये वर्णन केलेली असून ती ऋग्वेदातील बृहस्पति अथवा ब्रह्मणस्पति यांच्याबरोबर साम्य दर्शवितात. थोर देवाचे हत्यार अजस्र हातोडा हा इंद्राच्या वज्राप्रमाणे दिसतो. ह्या देवतेचा शत्रु बाल्डर (B1lder) याचे वृत्रासुराशी साम्य आहे. यावरूनही ही संस्कृति आणि प्राचीन भारतीय संस्कृति एकाच उगमस्थानातून आलेली असावी.

(ज्ञानकोश, प्रस्तावना खंड, ३२८)

सहाव्या शतकापर्यंत हिथिअन संस्कृतीची मंदिरे इंग्लंडमध्येही होती. परंतु त्यानंतर इसाई धर्मगुरूंनीच त्याचा नाश केला. आईसलंडमध्येही ट्युटॉनिक वंशाच्या वेळी थोर देवीची मंदिरे असून मंदिराच्या पुजारीवर्गात सर्व स्त्रियाच होत्या! देवालयामधील सर्व कामे त्याच करीत असत. वानगीदाखल आपण एकदोन मंदिराची व्यवस्था पाहू या. एका देवालयातील थोर देवीची मूर्ति एका भव्य लाकडी खांबावर कोरलेली होती. मंदिराचे दालन भव्य होते; परंतु त्यामानाने प्रवेशद्वार मात्र अतिशय खुजे होते. (भारतातही काही ठिकाणी प्रवेशद्वाराची मांडणी अशीच आढळते). संरक्षणाच्या दृष्टीने विचार करता ही पद्धत योग्यच समजली जात असे. सांप्रत नरसोबाची वाडी (कोल्हापूर) येथील दत्ताच्या पादुकाचे दर्शन घेण्यासाठी अतिशय लहान दरवाजा आहे. एके वेळी केवळ

एकच मनुष्य मोठ्या मुश्किलीने आत शिरू शकतो. या थोर देवीच्या समोरच 'स्थली' नामक अग्निकुंड असून त्यामध्ये सतत अग्नि पेटता राही. कुंडाच्या वेदीवर २१ औंस वजनाचे सुवर्णाचे गोल कडे असे. सर्व शपथविधि या धगधगत्या कुंडासमोर होत. धार्मिक बाबतीतील समाईं या कुंडासमोरच होत असत. अशा समारंभाच्या वेळी प्रमुख धर्मगुरु, वेदीवरचे ते कडे आपल्या हातात घालीत असे. वेदीवर एक लहानसा पेला 'लवूत' ने (म्हणजे बळी दिलेल्या माणसाच्या किंवा जनावराच्या रक्ताने) भरलेला असे. मुख्य मूर्तीच्या मागे इतर मूर्तींची मांडणी करीत. या मंदिराच्या खर्चासाठी प्रत्येक घरटी द्रव्य द्यावे लागे. धार्मिक मिरवणुकीच्या वेळी सर्व भक्तगण धर्मगुरूंच्या पाठीमागे चालत असे. असे हे भव्य मंदिर थोर नदीच्या तीरावर वसलेले होते.

दुसऱ्या एका मंदिराचे वर्णनही वरीलप्रमाणेच आहे. ते मंदिर जालरनेस (KJALARNES) या गावी होते. मंदिराची लांबी ६० × १०० फूट अशी होती. यज्ञकुंड थोरदेवीच्या समोरच होते. या देवीला नरबळी दिला जाई व त्याचे रक्त ऊर्फ लवूत वेदीवर एका पेल्यात ठेवण्यात येई. ज्या माणसाला बळी द्यावयाचा असेल त्या माणसाच्या अंगावर प्रथम या पेल्यातील पवित्र रक्ताचे सिंचन करून नंतर त्याला मंदिराबाहेरील तळ्यात बुडविण्यात येई. देवालयासभोवार उंच लाकडी कुंपण असे. प्रवेशद्वार कुलूप लावून बंद करण्याची प्रथा होती. मंदिराची बांधणी लाकडी असल्याने छतावरील वहाले उत्तम कोरीव शिल्पाची असत. या शिल्पाची कल्पना थोरोल्फर मास्टर या गृहस्थाने नॉर्वेजिअन मंदिरातून या ठिकाणी आणली असे मानण्यात येते. नॉर्वे देशातही थोर-देवीची मंदिरे होती, व त्या मंदिरांतून हिथिअन संस्कृतीप्रमाणे नरबळी दिले जात. भारतामध्ये ज्याप्रमाणे इतरधर्मीयांनी राजसत्तेच्या जोरावर हिंदूंची अनेक मंदिरे उध्वस्त केली, त्याचप्रमाणे हिथिअन संस्कृतीची मंदिरे या टयुटॉनिक धर्मगुरूंनी उध्वस्त करून त्यांतील मूर्ति फोडून टाकल्या. इतकेच नव्हे तर भारतात तुळजापूरच्या देवीची मूर्ति जशी अफझुलखानाने जात्यात भरडून तिचे पीठ पीठ केले, त्याप्रमाणे याही लाकडी मूर्ति जाळून टाकण्यात आल्या. ओलाफ ट्रिगवसन या धर्मगुरूने ही मंदिरे उध्वस्त केली. या सर्वांचा सारांश एकच की, त्या लोकांचे मत असेच होते जणू की, आपल्या नवीन संस्कृतीचा प्रसार करताना जुनी संस्कृति 'जाळूनि किंवा पुरूनि टाका' या अवस्थेलाच आणावयाची. मूर्तींचा सत्यानाश करावयाचा आणि नवीन नवीन प्रतीके त्या ठिकाणी स्थापन करावयाची. हा नियम सर्वच आक्रमक संस्कृतींनी साधारणतः अंमलात आणलेला दिसतो. मग ती संस्कृति कुठलीही असो.

स्वीडनमध्ये उपसाला शहरी थोर-देवींचे एक भव्य मंदिर होते. या मंदिराचा बहुतेक भाग सुवर्णाने मढविलेला होता. आतील गर्भागृहात थोर, वोडन, फ्रिको या देवतांच्या मूर्ति होत्या. देवाल्याच्या उच्च भागी कळसाभोवती एक सोन्याची विशाल साखळी बांधलेली होती. या साखळीची चकाकी भक्तगणाना फार दूरवरून दिसली तरी ते त्यात समाधान मानीत असत या क्षेत्राबाबत एक अशी कथा प्रचलित आहे की, मंदिराबाहेर एक अतिविशाल वृक्षराज होता. त्याची पाने सर्व ऋतुमध्ये हिरवीगार राहात. या वृक्षाच्या मुळातून एक छोटासा निर्झर उगम पावून जवळच एक डोह तयार झालेला होता हिथिअन संस्कृतीप्रमाणे मुक्ति मिळविण्यासाठी भक्तगण या डोहात बुडी मारत असे आणि आश्चर्य असे की, पाण्यात पडल्यावर जर तो इसम वर आला नाही तर देवाने त्यांची प्रार्थना ऐकून त्याला मुक्ति दिली असे समजण्यात येई.

या संस्कृतीमधील इतर देवता म्हणजे ओडीन ऊर्फ सृष्टिकर्ता मोठा देव, असगार्ड हा या स्वर्गलोकीचा राजा. बाल्डोर हा त्याचा पुत्र आणि बाल्डोर म्हणजे तेजाची देवता (रा. दीक्षित या देवालाच बलराम असे संबोधतात) डोनर ही मेघगर्जनेची देवता होय. झिनिटर युद्धदेवता होय. फ्रिज अथवा फ्रिजा ही ओडीनची पत्नी होय. ही देवता सर्व देवतांची माता मानली असल्याने पुत्रप्राप्तीसाठी स्त्रिया या देवतेचीच आराधना करतात. मॉरगॉन ही देवता डगड ह्याची पत्नी व नेत या देवतेची नात होय. मॅश व बॅडब याही युद्धदेवताच होत्या बॅडब-कथ म्हणजे 'ल्ढाऊ कावळा' होय. यालाच 'आयरिश कावळा' असेही म्हणतात. सारांश, ट्यूटॉनिक वंशाच्या देवता म्हणजे ओडिन व इडा त्यांचे पुत्र बाल्डर, वली, विथ्यर, नार्थर आणि मुली फ्रिजिया, थोरगेथर इ० याच होत. (जेम्स धर्मकोश, १२, पृष्ठ २४५–२५७)

## इसाई संस्कृति

या धर्माचा संस्थापक येशूख्रिस्त याचा जन्म इस्रायल वंशात झाला. परंतु त्या धर्मातील मूर्तिपूजा त्याला न आवडल्याने त्याने निराळ्या धर्माची स्थापना केली येशू हा स्वतःला ईश्वराचा प्रेषीत मानीत असल्याने या ठिकाणी स्त्रीदेवतेचा निर्देश आपल्याला आढळून येत नाही समोर देवतेचे प्रतीक नसल्याने त्या धर्माला तितकीशी गति प्रथम मिळाली नाही आणि शेवटी स्त्रीपुरुषांना या धर्माकडे आकर्षून घेण्यासाठी त्याना मेरी ही स्त्रीदेवता निर्माण करावी लागली रोमन साम्राज्याच्या वेळी या संस्कृतीचा विकास झाला, तो प्रसार कसकसा होत गेला ते आपण वर पाहिलेच आहे आणि धर्मप्रसारासाठी पूर्वीच्या हिथिअन संस्कृतीतील

मंदिराचा विध्वंस धर्मगुरूंनी कसा केला हे आपण पाहिलेच आहे. या संस्कृतीत मूर्तिपूजा नाही असा कितीही कठरव केला तरी जागोजागी असणारे मेरीचे पुतळे आणि त्याखाली लिहिलेला मजकूर ( मला शरण या, मी तुमचा उद्धार करीन, तुमचे दारिद्य, दु:ख दूर करीन इत्यादि ) हा पुरावा मूर्तीपूजानिदर्शकच होय. जगभर मेरीच्या पुतळ्याच्या भव्य मिरवणुका काढल्या जातात आणि हातात पेटत्या मेणबत्त्या घेऊन सहस्रावधी भक्तगण शांततेने त्यामध्ये भाग घेतो. या सर्व प्रकाराला मूर्तिपूजेशिवाय दुसरे काय नाव द्यावयाचे ? सारांश, याही संस्कृतीने आदिशक्तीचे स्वरूप मेरीच्या स्वरूपात आपल्या संस्कृतीत समाविष्ट करून घेतले आहे.

## येशू म्हणजे शिवभक्त ईशनाथ होय

'येशू तेरा वर्षांचा होताच त्याच्या आप्तांनी, त्याच्या विवाहाची तयारी केली, पण त्याच्या मनात ब्रह्मचारी रहावयाचे होते. यास्तव घर सोडून व्यापारी तांड्याबरोबर तो सिंधु नदीजवळ आर्यावर्तात आला. काही जैन साधूंच्या संगतीत राहून फिरत फिरत तो जगन्नाथपुरीस आला. त्याने ब्रह्मचारी व्रत आचरून तेथील विद्वान ब्राह्मणाकडून वेद शिकण्यास प्रारंभ केला. स्मृतींचेही अध्ययन केले. एवढे होईपर्यंत तो २० वर्षांचा झालेला होता. यानंतर साधुसंतांबरोबर समागम व परिचय व्हावा म्हणून त्याने राजगृह, वाराणसी, प्रयाग वगैरे तीर्थक्षेत्रांची यात्रा केली बौद्ध धर्माचा अभ्यास करण्यासाठी सहा वर्षे तो बुद्धविहारात राहिला त्यानंतर त्याने नेपाळ व तिबेटचा प्रवास केला. याप्रमाणे वयाच्या तीस वर्षांपर्यंत आर्यावर्तात राहून अध्ययन करून, बौद्धभिक्षू बनून इराणमार्गे आपल्या देशात जाऊन भारतीय तत्त्वज्ञानाचा प्रचार करण्यास प्रारंभ केला.' ( खिस्ताचे अज्ञात चरित्र, ले. डॉ. नोटोविच. )

'येशूने १४ व्या वर्षी भारतात येऊन शिवाची उपासना चालविली, त्या वेळी त्याचे नाव ईशनाथ असे होते. भारतात विद्याध्ययन केल्यावर याच शैव विद्येचा त्याने आपल्या देशात प्रचार केला, पण तेथील चमत्कारिक वृत्तींच्या धर्मलंडांना ही शिकवण न आवडून त्यांनी ईशनाथाला सूळावर चढविले. त्याच्या नाथसंप्रदायी गुरूंनी त्यास सुळावरून काढून नेऊन नंतर त्याला जिवंत केले. गुरू आणि ईशनाथ यांनी नंतर हिमालयाच्या उतरणीवर मठ स्थापन केला या ठिकाणी ईशनाथाने तीन वर्षे कडक तपाचरण करून त्याचे शैव संप्रदायामध्ये वयाच्या ४९ वे वर्षी निधन झाले. त्याची समाधी काश्मीर प्रांती श्रीनगरमध्ये इशासाहेबाची समाधी म्हणून अजूनही दाखविली जाते. ईश या नावाचे येशूमध्ये रूपांतर झालेले आहे.'

नाथ नामावली

वयाच्या ३० वर्षी तो नाथपंथी शैव झाला. विटेकोनच्या राजवाड्यात त्याचे शैवपंथीय चित्र आहे. त्यामध्ये येशूला शेंडी दाखविलेली असून धोतर नेसलेला व उपरणे पांघरलेला शैव भिक्षूच दिसतो. अर्थातच हे चित्र सांप्रत ख्रिस्ती धर्मियाना आवडत नाही व भारतामधील १७ वर्षांच्या काळाचा त्याचा इतिहास त्याना नकोसा झालेला आहे.

भविष्य पुराण, प्रतिसर्ग पर्वखंड ३, अध्याय २, श्लोक २१–२३ यामध्ये येशूसंबंधी खालीलप्रमाणे माहिती आहे. विक्रमाचा नातू शककर्ता शालिवाहन राजा दिग्विजयार्थ हिमालयावर गेला असता एका शुभ पुरुषास तपाचरण करताना त्याने पाहिले. धर्मतत्त्वासंबंधी त्याजबरोबर चर्चा झाली. "मन निर्मळ करून सत्य वाणीने, ऐक्य भावाने व ध्यायाने सूर्य-मंडळामध्ये स्थित होऊन ईश्वराचे मी पूजन करतो, यास्तव लोक मला ईशापसी म्हणतात" असे त्याने उत्तर दिले. याचा निष्कर्ष असा निघतो की, शालिवाहन आणि येशू हे समकालीन होते.

डॉ. नोटोविच हे प्रख्यात रशियन विद्वान असून येशूचे वय १३ ते ३० पर्यंतचे आयुष्य शोधण्याचा त्यानी ४० वर्षे फार प्रयत्न केलेला आहे. यासाठी त्यानी इजिप्त, तुर्कस्थान, अरबस्तान येथील सर्व ग्रंथालये पालथी घातली. त्यावरून त्याना समजले की, 'एस्सेन' पंथाचा हा असून, दोन सहस्र वर्षांपूर्वी हा पंथ पूर्वेकडे कोठेतरी होता. यास्तव पूर्वेकडे प्रवास करून एगर्डाच्या जंगलात या लोकाना भेटून, दंतकथा जमा करून, नंतर पुढील चौकशीसाठी तो भारता-मध्ये आला. तिबेटमध्ये शोध करताना हिमिस गावी लामानी त्याना येशूच्या चरित्राचे पुस्तकच दिले. येशूचे हस्ताक्षरही त्यात होते. डॉक्टर महाशयानी सर्व पानांची छायाचित्रे घेतली व मूळ पुस्तक लामाना परत दिले. स्वदेशी गेल्यावर डॉ. नोटोविच यानी छायाचित्राच्या तीन प्रती तयार करून त्यापैकी एक प्रत भाषांतरासह रोम येथील पोप महाशयांना पाठविली. सहा महिन्यानी धर्मगुरूंचे उत्तर आले की, 'तुम्ही दिलेली कागदपत्रे जाळून टाकण्यात आलेली आहेत व ती तुम्ही प्रकाशित करू नयेत. अशी धर्मगुरूंची आज्ञा आहे.' अर्थात या धर्माज्ञेचा काहीही उपयोग अगर परिणाम झाला नाही आणि डॉ. नोटोविच यानी 'ख्रिस्ताचे अज्ञात चरित्र' म्हणून पुस्तक प्रसिद्ध केले, आणि जगाला ख्रिस्ताच्या अज्ञात जीवनाची माहिती करून दिली.

(श्री. त्र्यं. व. अभ्यंकर यानी ही माहिती पुरुषार्थ मासिक, फेब्रुआरी १९३८ व केसर-इ-हिंद साप्ताहिक २३–१–३८, यांचे आधारे स्वराज्य, पुणे, २५–१२

१९६५ यात प्रसिद्ध केली आहे. तसेच डॉ. बाबाराव सावरकर यांनी सन १९४७ मध्ये त्याचे चरित्र प्रसिद्ध केलेले आहे.)

वरीलप्रमाणे सविस्तर महत्त्वाचा उतारा देण्याचा हेतु इतकाच की, येशूने १७ वर्षे भारतात तत्त्वज्ञानाचा अभ्यास करूनच, बायबलचे तत्त्वज्ञान इसाई पथियांना दिले. अर्थातच त्या तत्त्वज्ञानाचे मूलस्थान भारत आहे. तो शैव पंथी भिक्षू होता. त्याची समाधीही काश्मीर प्रांती आहे, ही गोष्ट भारताला भूषणभूत आहे. मग वर म्हटल्याप्रमाणे त्याचे शैव वेशातील छायाचित्र अगर १७ वर्षांचा भारतामधील इतिहास इसाई पंथियांना आवडो अगर नावडो.

## मॅडोना

इसाई पंथाचा उगम हा पूर्वीच्या ज्यू पंथापासून झाला आहे. ज्यू लोकांत त्रिमूर्तीची कल्पना ही एक देवता असल्याप्रमाणे होती. त्यामुळे इसाई धर्माचा उदय झाल्यावरही पूर्वीच्या दैवी शक्तींवर भर दिला गेला व काही देव व देवी त्या नवीन धर्मात घेतल्या गेल्या. पूर्वीच्या देवता आणि संस्थापक येशू ह्यांच्यामध्ये त्याच्या श्रेष्ठपणाबद्दल वाद सुरू झाल्यावर येशू हाच देवाचा मुलगा, मॅडोनाचा मुलगा असे मानले (सहस्रबुद्धे) ह्या देवतेची जी छायाचित्रे उपलब्ध आहेत त्यावरून ही गोष्ट सिद्ध होण्यासारखी आहे. इ. स. १४३७ मधील एका चित्रात मॅडोना ही दयेची देवता दाखविली असून, तिच्याभोवती एकत्रित झालेल्या अनेक भक्तांना ती आपल्या हातांनी आशीर्वाद देत आहे असे दृश्य आहे (न्यूमन चि., १७८) दुसरी कृति क्रीट बेटातील सतराव्या शतकामधील असून अनेक प्रतीकांच्या मेळाव्यात ती मध्यभागी आहे (न्यूमन चित्र, १६४). आणखी एका चित्रात ती सिंहाकृति सिंहासनावर असून एक मूल तिच्या मांडीवर आहे. दुसऱ्या एका चित्रात ती व मूल एका नावेत बसलेले दाखविले आहे. एका ब्राँझ पुतळ्यामध्ये मूल घेतलेलीच कृति आहे. बव्हेरियामधील चित्रात हातात धान्याची कणसे घेतलेली व दोन्ही बाजूंना परी उडत आहेत असा देखावा आहे. ह्या सर्व चित्रांवरून तात्पर्य हेच निघते की, मॅडोना हीच मेरी होय. सतामरिया, मॅगीओर सतामरिया, ट्रास्टेव्हीरू सतामरिया इ० स्त्रीदेवतांची चौथ्या शतकापासून पूजा होत आहे (जेम्स, पा. २५४).

## मेरीची मिरवणूक

येशू ख्रिस्ताची माता मेरी आणि तिचे हातातील नवजात बालक म्हणजे येशू ख्रिस्त, असे समीकरण ख्रिस्ती प्रचारकांनी ठरवून टाकले आणि उत्सव-समारंभ सुरू केला. पण मागे अद्‌भुत इतिहास आहे हे फारच थोड्यांना माहीत आहे.

इसवीसन ही कालगणना खिस्ताच्या जन्मापासूनची मानली जाते, पण प्रत्यक्षात मात्र तशी ती नाही. ही कालगणना चालू करण्याचे एका खिस्ती सन्याश्याच्या मनात सहाव्या शतकात आले. तोपावेतो रोमन अथवा इजिप्शियन कालगणना चालू होती. पण सन्याशाचे उलट्या कालगणनेमध्ये सहा वर्षांची चूक राहून गेली, आणि यासाठीच खिस्ती धर्मगुरूना मान्य करावे लागते की, खिस्ताचा जन्म इसवी सनाच्या सहा वर्षे आधी धरला पाहिजे. याला पुरावा म्हणून असा देतात की, खिस्ताचा जन्म हेरॉल्ड राजाच्या वेळी झाला. हा राजा सनपूर्व ४ थ्या वर्षी मरण पावला, म्हणून सहा वर्षांचा काळ धरतात तसेच इजिप्तमधील शिरगणतीत तीच नोंद मिळते.

असे असताना खिस्ताचा जन्म २५ डिसेंबर रोजी कसा धरला जातो, हे पाहणेही उद्बोधक आहे. बायबलमध्ये असे नमूद आहे का, हा जन्म मेंढवाड्यात रानात टेकड्यावर मेंढ्या चरण्यासाठी नेल्या असता झाला बायबलमध्ये कोठेही खिस्त जन्मदिनाची अगर उत्सवाची नोंद नाही. ज्यू परपरेमध्ये संताच्या अगर पुण्य पुरुषाच्या पुण्यतिथि अगर जन्मतिथि साजरा करण्याची रूढी नव्हती. मग हा दिवस कसा धरला?

खिस्ताच्या जन्मानतर सुमारे तीनशे वर्षे रोममध्ये सूर्यादि देवताची उपासना चालू होती, आणि विशेष म्हणजे खिस्ती धर्माचाराना बदी होती चौथ्या शतकात रोमन बादशहा कॉन्स्टटाईन याने खिस्ती धर्म स्वीकारला, धर्म प्रसाराला त्याने मुभा दिली आणि थोडक्याच वेळात हजारो लोकाना खिस्ती धर्माची दीक्षा दिली गेली. मिथ्रास = मित्र = सूर्य याची उपासना चालू असताना रोमन ज्योतिषी २५ डिसेंबर हा दिवस मकर सक्रातीचा मानून, त्या दिवसा पासून सूर्यप्रकाशकाल क्रमश वाढत जातो असे मानीत. हा दिवस म्हणजे नवीन सूर्याचा जन्मकाल कल्पून, त्या दिवशी रोममध्ये मोठा उत्सवसमारभ साजरा करीत त्यामध्ये एका स्त्रीच्या हाती नवजात बालक सूर्य देऊन मोठी मिरवणूक काढीत असत. भारतीय सक्राती दिनाप्रमाणे या दिवशी मिष्टान्न भोजन, आणि एकमेकाना भेटी देत असत. हजारो रोमन जरी राजाच्या आज्ञेवरून खिस्ती झाले, तरी मानव हा उत्सवप्रिय असल्याने, आपली पूर्वापार रूढी त्याला सोडवेना आणि ती त्याने चालू ठेविली खिस्ती धर्मप्रचारकानी यावर तोड काढली आणि डिसेंबर २५ हाच खिस्ताचा जन्मदिवस आहे, असे नवजात खिस्ती प्रजाजनाना भासवून तो सर्व उत्सवसोहाळाच आत्मसात केला खिस्तमस पुडिंग, खिस्तमस केक इत्यादि मिष्टान्ने प्रचारात आणली, रगीबेरगी भेट पत्रिका चालू केल्या, भेटीदाखल वस्तूची देवाण-घेवाण सुरू केली, व्यापारी वर्गाचीही या निमित्ताने चगळ झाली.

नवीन वर्ष मात्र पुढे सहा दिवसांनी म्हणजे १ जानेवारीपासून धरले. म्हणजे यांतही कशी विसंगती आहे ती पहा, २५ डिसेंबर जन्मदिवस धरावयाचा, १ जानेवारीपासून नवे वर्ष मोजायचे, सहा दिवसांची तफावत तशीच चालू ठेवायची आणि खिस्ताच्या जन्मदिवसापासून मात्र कालगणना मोजायची. ही सर्व विसंगती आजवर चालत आलेली आहे आणि ती काढून टाकण्याची कोणतीही तीव्र इच्छा नाही. ज्याच्या धर्मतत्त्वाला स्वतःची बैठक नाही आणि दुसऱ्या संस्कृतीच्या उसनवारीवरच उत्सव समारंभ साजरे करावयाचे, तेथे अशी विसंगती न दिसली तरच नवल. सारांश २५ डिसेंबरची मेरीची मिरवणूक म्हणजे भारतीय संस्कृतिसदृश्य सूर्य देवाचीच मिरवणूक होय असे मानावे लागते. (ग. वि. केतकर, केसरी २२-१२-६८)

## इस्लामी संस्कृति

इस्लामी संस्कृति ही महंमद पैगंबराच्या जन्मानंतर स्थापन झाली. इ. स. ५७० साली या थोर पुरुषाचा जन्म कोरेशी वंशात झाला. मक्का या शहरी पूर्वापार प्रसिद्ध असलेल्या काबा मंदिराची व्यवस्था याच घराण्याकडे होती. या मंदिराचा इतिहास अतिशय प्राचीन आहे. नबीटिअन अगर नववंश सनपूर्व सुमारे तीन सहस्र वर्षे या प्रदेशात होता आणि त्याच्या प्रमुख देवता म्हणून अलाट, मनुथू (नशीबदेवता) यांचे पूजन होत असे. प्रमुख देव दुशारा हा डायोनिसस अथवा बॅकस या देवतांप्रमाणे मानला जाई. काही संशोधकांचे म्हणणे असे आहे की, तो आर (AARA) या नावाचा देव असावा आणि आर हा हरचा अपभ्रंश असावा. त्या वेळी आणि नंतरही अनेक शतके अरबस्थानामध्ये 'हर' या देवतेचे पूजन असे. भारतीय देवता 'रुद्र' या शब्दाचा तो अपभ्रंश असावा हे उघडच दिसते. मक्का या पवित्र स्थानाच्या नावाची व्युत्पत्ति सांगताना एक पंजाबी पंडित मला म्हणाले की, 'मख म्हणजे यज्ञ असा जरी संस्कृत शब्द असला तरी त्यांच्या भाषेत त्या शब्दाचा उच्चार "मख्ख" असा केला जातो आणि 'मख्ख' चा 'मक्का' असा अपभ्रंश होणे असंभवनीय मुळीच नाही. अनेक शतकापूर्वी आर्यांच्या टोळ्या जशा भारतात आल्या तद्वतच त्या इराण, अरबस्थान येथेही गेल्या आहेत. तेव्हा ज्यू, खिश्चन अथवा इस्लामी संस्कृतीचा प्रसार या भागात होण्यापूर्वी तेथे आर्य संस्कृतीमधील काही देवतांची पूजा होत असावी आणि काबाचे शिवमंदिर त्या काळचे असावे असे अनुमान सहज निघते.

श्री. विनोदतोष भट्टाचार्य ह्यांनी सन १९४७ साली, 'ओरिएंटल इन्स्टिट्यूट, बडोदे' यासाठी 'शक्तिसंगमतंत्र' या नावाचा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. त्यामध्ये या क्षेत्राचा उल्लेख खालीलप्रमाणे आहे.

लंकाप्रदेशमारभ्य मक्कान्तं परमेश्वरि ।
सैंधवाख्यो महादेशः पर्वते तिष्ठति प्रिये ।। पटल–७–७१ ।।

वारुणाख्यं तथा देवी कथ्यते शृणु सांप्रतम् ।
मक्केश्वरः पश्चिमायामुत्तरे हिंगुळ्या भवेत् ।। पटल-८–१० ।।

या दोन्ही श्लोकाचा अर्थ अगदी सरळ आहे की, 'लंका प्रदेशापासून मक्केच्या अंतापर्यंत सैंधव महादेश (समुद्र) आहे. ज्याला सध्या वारुणाख्य देवी म्हणजे अबूच्या पहाडावरील देवी म्हणतात, त्याच्या पश्चिमेला मक्केश्वर आहे व त्याच्या उत्तरेला हिंगुळादेवी आहे. तेव्हा तंत्रकाराच्या मते हे क्षेत्र म्हणजे मक्केश्वर असे होते, ते शंकराचे होते. आज दिसणारा हज्‌चा विधि पाहिला म्हणजे वरील म्हणण्याला पुष्टीच मिळेल.

ब्रह्मीभूत परमहंस पावसकर महाराज आपल्या ग्रंथात मक्का, अल्ला इत्यादि शब्दाच्या व्युत्पत्ति देताना म्हणतात की, प्राचीन काळी आरभू नावाचा राजा यद या नगरीमध्ये राज्य करीत होता. शेजारीच असलेल्या कार्पण्य देशात कार्मण्य नावाचा राजा राज्यधुरा सांभाळीत असे. एकदा कार्मण्याने यद राज्यावर स्वारी करून आरभूला पराजित केले आणि त्याच्या सैनिकांसह त्याला अरण्यात घालवून दिले. राज्याची पुनः प्राप्ती व्हावी म्हणून आरभूने तपःसाधना आरंभिली. शेवटी महादेव त्याला प्रसन्न झाले आणि त्याच्या मनाजोगता वर देऊन अदृश्य झाले. त्या वेळी राजा आणि इतर सैनिक यांनी, 'आमचा कैवारी आला, आला, आला' असा निवार घोष केला. पण त्या 'कैवाऱ्या' चे नाव त्यांना कुठे माहीत होते? त्यामुळे ते नुसते 'आला', 'आला' असेच त्याला संबोधू लागले. या 'आला' चा अपभ्रंश पुढे 'अल्ला, अल्ला' असा झालेला आहे. ज्या ठिकाणी त्यांनी तपसाधनेस्तव 'मुक्काम' केला त्या जागेलाच पुढे मक्का हे नाव प्राप्त झाले.

शंकराच्या आज्ञेवरून पुढे मच्छिंद्रनाथ व गोरक्षनाथ त्या ठिकाणी आले आणि त्यांनी राजा आणि त्याच्या सैनिकांना गनिमीकाव्याचे शिक्षण दिले. याच्या स्मरणार्थ तेथे एक शिवलिंग स्थापन झाले, त्याचे नाव 'काबा' म्हणजेच पुढे अपभ्रंश होऊन "काबा" असे पडले. राजा व त्याच्या सैनिकांना लढाई-मध्ये दुरापती होऊ नयेत म्हणून त्या लिंगासमोर त्यांना जो मंत्र शिकविला त्यालाच "कल्मा" असे म्हणतात. त्या मंत्राचे सुरुवातीचे हे शब्द पहा—

नवीन वर्ष मात्र पुढे सहा दिवसांनी म्हणजे १ जानेवारीपासून धरले म्हणजे यातही कशी विसगती आहे ती पहा, २५ डिसेंबर जन्मदिवस धरावयाचा, १ जानेवारीपासून नवे वर्ष मोजायचे, सहा दिवसाची तफावत तशीच चालू ठेवायची आणि खिस्ताच्या जन्मदिवसापासून मात्र कालगणना मोजायची. ही सर्व विसगती आजवर चालत आलेली आहे आणि ती काढून टाकण्याची कोणतीही तीव्र इच्छा नाही. ज्याच्या धर्मतत्त्वाला स्वत ची बैठक नाही आणि दुसऱ्या सस्कृतीच्या उसनवारीवरच उत्सव समारभ साजरे करावयाचे, तेथे अशी विसगती न दिसली तरच नवल. साराश २५ डिसेंबरची मेरीची मिरवणूक म्हणजे भारतीय सस्कृतिसदृश्य सूर्य देवाचीच मिरवणूक होय असे मानावे लागते (ग. वि. केतकर, केसरी २२-१२-६८)

## इस्लामी संस्कृति

इस्लामी सस्कृति ही महमद पैगंबराच्या जन्मानतर स्थापन झाली. इ. स. ५७० साली या थोर पुरुषाचा जन्म कोरेशी वशात झाला. मक्का या शहरी पूर्वापार प्रसिद्ध असलेल्या काबा मदिराची व्यवस्था याच घराण्याकडे होती. या मदिराचा इतिहास अतिशय प्राचीन आहे. नबीटिअन अगर नववश सनपूर्व सुमारे तीन सहस्र वर्षे या प्रदेशात होता आणि त्याच्या प्रमुख देवता म्हणून अलाट, मनुथू (नशीबदेवता) याचे पूजन होत असे. प्रमुख देव दुशारा हा डायोनिसस अथवा बॅकस या देवताप्रमाणे मानला जाई काही सशोधकाचे म्हणणे असे आहे की, तो आर (AARA) या नावाचा देव असावा आणि आर हा हरचा अपभ्रश असावा. त्या वेळी आणि नतरही अनेक शतके अरबस्थानामध्ये 'हर' या देवतेचे पूजन असे. भारतीय देवता 'रुद्र' या शब्दाचा तो अपभ्रश असावा हे उघडच दिसते. मक्का या पवित्र स्थानाच्या नावाची व्युत्पत्ति सागताना एक पजाबी पडित मला म्हणाले की, 'मख म्हणजे यज्ञ असा जरी सस्कृत शब्द असला तरी त्याच्या भाषेत त्या शब्दाचा उच्चार "मख्ख" असा केला जातो आणि 'मख्ख' चा 'मक्का' असा अपभ्रश होणे असभवनीय मुळीच नाही. अनेक शतकापूर्वी आर्यांच्या टोळ्या जशा भारतात आल्या तद्वतच त्या इराण, अरबस्थान येथेही गेल्या आहेत. तेव्हा ज्यू, खिश्चन अथवा इस्लामी सस्कृतीचा प्रसार या भागात होण्यापूर्वी तेथे आर्य सस्कृतीमधील काही देवतांची पूजा होत असावी आणि काबाचे शिवमदिर त्या काळचे असावे असे अनुमान सहज निघते

श्री विनोदतोष भट्टाचार्य ह्यांनी सन १९४७ साली, 'ओरिएटल इन्स्टिट्यूट, बडोदे' यासाठी 'शक्तिसगमतत्र' या नावाचा ग्रथ प्रसिद्ध केला आहे. त्यामध्ये या क्षेत्राचा उल्लेख खालीलप्रमाणे आहे.

लंकाप्रदेशमारभ्य मक्कान्तं परमेश्वरि ।
सैंधवाख्यो महादेशः पर्वते तिष्ठति प्रिये ॥ पटल–७–७१ ॥

वारुणाख्यं तथा देवी कथ्यते शृणु सांप्रतम् ।
मक्केश्वरः पश्चिमायामुत्तरे हिंगुळा भवेत् ॥ पटल–८–१० ॥

या दोन्ही श्लोकांचा अर्थ अगदी सरळ आहे की, 'लंका प्रदेशापासून मक्केच्या अंतापर्यंत सैंधव महादेश (समुद्र) आहे. ज्याला सध्या वारुणाख्य देवी म्हणजे अबूच्या पहाडावरील देवी म्हणतात, त्याच्या पश्चिमेला मक्केश्वर आहे व त्याच्या उत्तरेला हिंगुळादेवी आहे. तेव्हा तंत्रकारांच्या मते हे क्षेत्र म्हणजे मक्केश्वर असे होते, ते शंकराचे होते. आज दिसणारा हज्चा विधि पाहिला म्हणजे वरील म्हणण्याला पुष्टीच मिळेल.

ब्रह्मीभूत परमहंस पावसकर महाराज आपल्या ग्रंथात मक्का, अल्ला इत्यादि शब्दांच्या व्युत्पत्ति देताना म्हणतात की, प्राचीन काळी आरभू नावाचा राजा यद या नगरीमध्ये राज्य करीत होता. शेजारीच असलेल्या कार्पण्य देशात कार्मण्य नावाचा राजा राज्यधुरा सांभाळीत असे. एकदा कार्मण्याने यद राज्यावर स्वारी करून आरभूला पराजित केले आणि त्याच्या सैनिकांसह त्याला अरण्यात घालवून दिले. राज्याची पुनः प्राप्ती व्हावी म्हणून आरभूने तपःसाधना आरंभिली. शेवटी महादेव त्याला प्रसन्न झाले आणि त्याच्या मनाजोगता वर देऊन अदृश्य झाले. त्या वेळी राजा आणि इतर सैनिक यांनी, 'आमचा कैवारी आला, आला, आला' असा निनाद घोष केला. पण त्या 'कैवाऱ्या'चे नाव त्यांना कुठे माहीत होते? त्यामुळे ते नुसते 'आला', 'आला' असेच त्याला संबोधू लागले. या 'आला' चा अपभ्रंश पुढे 'अल्ला, अल्ला' असा झालेला आहे. ज्या ठिकाणी त्यांनी तपसाधनेस्तव 'मुक्काम' केला त्या जागेलाच पुढे मक्का हे नाव प्राप्त झाले.

शंकराच्या आज्ञेवरून पुढे मच्छिंद्रनाथ व गोरखनाथ त्या ठिकाणी आले आणि त्यांनी राजा आणि त्याच्या सैनिकांना गनिमीकाव्याचे शिक्षण दिले. याच्या स्मरणार्थ तेथे एक शिवलिंग स्थापन झाले, त्याचे नाव 'कावा' म्हणजेच पुढे अपभ्रंश होऊन "काबा" असे पडले. राजा व त्याच्या सैनिकांना लढाई-मध्ये दुखापती होऊ नयेत म्हणून त्या लिंगासमोर त्यांना जो मंत्र शिकविला त्यालाच "कलमा" असे म्हणतात. त्या मंत्राचे सुरुवातीचे हे शब्द पहा—

टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे.
ग्रंथसंशोधनप्रकाशनमंडळ-प्रकाशन: १२ वे

[ महाराष्ट्र-राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अनुदान मिळालेला ]

# आदिशक्तीचे विश्वस्वरूप

अर्थात्

# देवीकोश

खंड ४ था

लेखक
प्रल्हाद कृष्ण प्रभुदेसाई



ह्या ग्रंथाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाने अडीच हजार रुपये अनुदान दिले आहे

चंपाषष्ठी; शके १८९४ ] [ १२ डिसेंबर १९७२

टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे ३०.



दिनांक १५ ऑक्टोबर १९७१ रोजी दैविकोश-संपादक श्री. म. द. प्रभुदेसाई कृष्ण चेतना समाज सत्संगसमयी अमेरिकन साधकांकडून माहिती घेत आहेत.

# प्रकाशकाचे निवेदन

टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या ग्रंथसंशोधन प्रकाशन मंडळाचे चारावे प्रकाशन–देवीकोश चवथा खंड–मराठी जनतेच्या हाती देताना विद्यापीठाला आनंद होत आहे. ऑगस्ट १९६७ मध्ये पहिला भाग प्रसिद्ध झाला. आज चवथा व शेवटचा भाग प्रसिद्ध होत आहे व ह्या कार्याची सांगता होत आहे, त्यामुळे विशेष समाधान वाटते. ह्या कोशग्रंथाचे संपादक श्री. प्र. कृ. प्रभुदेसाई यांनी ह्या ग्रंथाच्या स्वरूपासंबंधी माहिती पहिल्या भागाच्या विस्तृत प्रस्तावनेमध्ये दिलेली आहे, त्यावरून देवीभक्तांप्रमाणेच देवी-उपासना परंपरेसंबंधी संशोधनात्मक अभ्यास करणाऱ्यांनाही हा ग्रंथ फार उपयोगी पडेल असा विश्वास वाटतो.

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाने ह्या चवथ्या भागाच्या प्रकाशनासाठी अडीच हजार रुपये अनुदान दिले आहे. मंडळाच्या या साहाय्याबद्दल प्रकाशक ऋणी आहे.

ग्रंथ-संपादक श्री. प्र. कृ. प्रभुदेसाई यांनी ग्रंथ संपादनासाठी फार परिश्रम घेतले आहेत. ग्रंथामध्ये संकलित केलेल्या विविध माहितीवरून वाचकाना ह्या विधानाची सत्यता पटून येईल. देवीसंबंधी इतकी विविध माहिती कोणत्याही ग्रंथात एकत्र केलेली नाही. ह्या परिश्रमपूर्वक संपादनाबद्दल विद्यापीठ त्यांना संतोषपूर्वक धन्यवाद देत आहे.

ह्या ग्रंथामध्ये मांडलेली मते व इतर ग्रंथांतून घेतलेली अवतरणे इत्यादींबाबतची सर्व जबाबदारी ग्रंथ-संपादकांची आहे. प्रकाशकावर त्यासंबंधी कसलीही जबाबदारी नाही.

प्रतिभा मुद्रणालयाने मुद्रणाची जबाबदारी योग्य प्रकारे पार पाडली. त्याबद्दल मुद्रणालयाचे व्यवस्थापक व इतर संबंधी सेवकवर्ग यांचे आभार मानून हे निवेदन पूर्ण करीत आहे.

विजयादशमी
शके १८९४
१७ ऑक्टोबर १९७२

प्रकाशक,
ग्रंथसंशोधन प्रकाशन मंडळ,
टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे ३०.

## अनुक्रमणिका

नवीन वर्ष मात्र पुढे सहा दिवसांनी म्हणजे १ जानेवारीपासून धरले. म्हणजे यातही कशी विसंगती आहे ती पहा, २५ डिसेंबर जन्मदिवस धरावयाचा, १ जानेवारीपासून नवे वर्ष मोजायचे, सहा दिवसाची तफावत तशीच चालू ठेवायची आणि ख्रिस्ताच्या जन्मदिवसापासून मात्र कालगणना मोजायची. ही सर्व विसंगती आजवर चालत आलेली आहे आणि ती काढून टाकण्याची कोणतीही तीव्र इच्छा नाही. ज्याच्या धर्मतत्त्वाला स्वतःची बैठक नाही आणि दुसऱ्या संस्कृतीच्या उसनवारीवरच उत्सव समारंभ साजरे करावयाचे, तेथे अशी विसंगती न दिसली तरच नवल. साराश २५ डिसेंबरची मेरीची मिरवणूक म्हणजे भारतीय संस्कृतिसदृश्य सूर्य देवाचीच मिरवणूक होय असे मानावे लागते. (ग. वि. केतकर, केसरी २२–१२–६८)

## इस्लामी संस्कृति

इस्लामी संस्कृति ही महंमद पैगंबराच्या जन्मानंतर स्थापन झाली. इ. स. ५७० साली या थोर पुरुषाचा जन्म कोरेशी वंशात झाला. मक्का या शहरी पूर्वापार प्रसिद्ध असलेल्या काबा मंदिराची व्यवस्था याच घराण्याकडे होती. या मंदिराचा इतिहास अतिशय प्राचीन आहे. नबीटिअन अगर नबवंश सनपूर्व सुमारे तीन सहस्र वर्षे या प्रदेशात होता आणि त्याच्या प्रमुख देवता म्हणून अलाट, मनुथू (नशीबदेवता) याचे पूजन होत असे. प्रमुख देव दुशारा हा डायोनिसस अथवा बॅकस या देवताप्रमाणे मानला जाई. काही संशोधकाचे म्हणणे असे आहे की, तो आर (AARA) या नावाचा देव असावा आणि आर हा हरचा अपभ्रंश असावा. त्या वेळी आणि नंतरही अनेक शतके अरबस्थानामध्ये 'हर' या देवतेचे पूजन असे. भारतीय देवता 'रुद्र' या शब्दाचा तो अपभ्रंश असावा हे उघडच दिसते. मक्का या पवित्र स्थानाच्या नावाची व्युत्पत्ति सागताना एक पंजाबी पंडित मला म्हणाले की, 'मख म्हणजे यज्ञ असा जरी संस्कृत शब्द असला तरी त्याच्या भाषेत त्या शब्दाचा उच्चार "मख्ख" असा केला जातो आणि 'मख्ख' चा 'मक्का' असा अपभ्रंश होणे असंभवनीय मुळीच नाही. अनेक शतकापूर्वी आर्यांच्या टोळ्या जशा भारतात आल्या तद्वतच त्या इराण, अरबस्थान येथेही गेल्या आहेत. तेव्हा ज्यू, ख्रिश्चन अथवा इस्लामी संस्कृतीचा प्रसार या भागात होण्यापूर्वी तेथे आर्य संस्कृतीमधील काही देवताची पूजा होत असावी आणि काबाचे शिवमदिर त्या काळचे असावे असे अनुमान सहज निघते.

श्री. विनोदतोष भट्टाचार्य ह्यांनी सन १९४७ साली, 'ओरिएंटल इन्स्टिट्यूट, बडोदे' यासाठी 'शक्तिसंगमतंत्र' या नावाचा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. त्यामध्ये या क्षेत्राचा उल्लेख खालीलप्रमाणे आहे.

लंकाप्रदेशमारभ्य मक्कान्तं परमेश्वरि ।
सैंधवाख्यो महादेशः पर्वते तिष्ठति प्रिये ॥ पटल–७–७१ ॥

वारुणाख्यं तथा देवी कथ्यते शृणु सांप्रतम् ।
मक्केश्वरः पश्चिमायामुत्तरे हिंगुल्या भवेत् ॥ पटल–८–१० ॥

या दोन्ही श्लोकांचा अर्थ अगदी सरळ आहे की, 'लंका प्रदेशापासून मक्केच्या अंतापर्यंत सैंधव महादेश (समुद्र) आहे. ज्याला सध्या वारुणाख्य देवी म्हणजे अवूच्या पहाडावरील देवी म्हणतात, त्याच्या पश्चिमेला मक्केश्वर आहे व त्याच्या उत्तरेला हिंगुलादेवी आहे. तेव्हा तंत्रकारांच्या मते हे क्षेत्र म्हणजे मक्केश्वर असे होते, ते शंकराचे होते. आज दिसणारा हज्‌चा विधि पाहिला म्हणजे वरील म्हणण्याला पुष्टीच मिळेल.

ब्रह्मीभूत परमहंस पावसकर महाराज आपल्या ग्रंथात मक्का, अल्ला इत्यादि शब्दांच्या व्युत्पत्ति देताना म्हणतात की, प्राचीन काळी आरभू नावाचा राजा यद या नगरीमध्ये राज्य करीत होता. शेजारीच असलेल्या कार्पण्य देशात कार्मण्य नावाचा राजा राज्यधुरा सांभाळीत असे. एकदा कार्मण्याने यद राज्यावर स्वारी करून आरभूला पराजित केले आणि त्याच्या सैनिकांसह त्याला अरण्यात घालवून दिले. राज्याची पुनः प्राप्ती व्हावी म्हणून आरभूने तपःसाधना आरंभिली. शेवटी महादेव त्याला प्रसन्न झाले आणि त्याच्या मनाजोगता वर देऊन अदृश्य झाले. त्या वेळी राजा आणि इतर सैनिक यांनी, 'आमचा कैवारी आला, आला, आला' असा त्रिवार घोष केला. पण त्या 'कैवाऱ्या'चे नाव त्यांना कुठे माहीत होते? त्यामुळे ते नुसते 'आला', 'आला' असेच त्याला संबोधू लागले. या 'आला'चा अपभ्रंश पुढे 'अल्ला, अल्ला' असा झालेला आहे. ज्या ठिकाणी त्यांनी तपसाधनेस्तव 'मुक्काम' केला त्या जागेलाच पुढे मक्का हे नाव प्राप्त झाले.

शंकराच्या आज्ञेवरून पुढे मच्छिंद्रनाथ व गोरखनाथ त्या ठिकाणी आले आणि त्यांनी राजा आणि त्याच्या सैनिकांना गनिमीकाव्याचे शिक्षण दिले. याच्या स्मरणार्थ तेथे एक शिवलिंग स्थापन झाले, त्याचे नाव 'कावा' म्हणजेच पुढे अपभ्रंश होऊन "काबा" असे पडले. राजा व त्याच्या सैनिकांना लढाई-मध्ये दुखापती होऊ नयेत म्हणून त्या लिंगासमोर त्यांना जो मंत्र शिकविला त्यालाच "कलमा" असे म्हणतात. त्या मंत्राचे सुरुवातीचे हे शब्द पहा—

रसुले खुदाके सुनो हदीस, फर्जे हयं मसले एकसोतीस
चार खुशी बोले वुज, महंमदबीन अब्दुला बुज,
अब्दुलबीन मुतलीव जान, मुतलीबबीन हासमाजान,
..................वाजेत करना तनकु तर
वरसलातो सलाम आलेकुम हम मुवुल,
गुरू गोरखनाथकी द्वाही, मच्छिंद्रनाथकी द्वाही

या मत्रपालनाचा सविस्तर विधि राजाने आत्मसात केल्यावर आणि आपण जखमी होणार नाही अशी खात्री झाल्यावर आरभू राजाने परत कार्पण्य राज्यावर स्वारी करून आपला मुलुख परत घेतला. तेव्हापासून त्या प्रदेशाला आरभू या नावावरून अरबस्तान हे नाव आले आणि त्याच्या वंशाला अरब हे नामाभिधान प्राप्त झाले.

याच ग्रंथकाराने ब्रह्मा, विष्णु व महादेव यांची भूमंडळावरील मृत्यु-स्थाने निरनिराळ्या प्रदेशांतील दिलेली आहेत. महादेवाचे स्थान अरबस्थानातील मक्का आणि अबेसिनेयामधील जबल-अल्-कमर म्हणजेच चंद्रगिरीपर्वत असा निर्देश आहे.

(आत्मज्ञान ग्रंथ, ले. ब्र. प्र. विष्णु नारायण पावसकर, १९३३, पृष्ठ ३९९.)

आधुनिक युगांतील एखाद्या चिकित्सकाला इस्लामसंस्कृतीमधील वरील शब्दाची व्युत्पत्ति एकदम पटण्यासारखी नाही. हे जरी वरवर खरे असले तरी जोपर्यंतो त्याला दुसरी पर्यायी व्युत्पत्ति देता येणार नाही आणि वरील व्युत्पत्ति साधार खोडून काढता येणार नाही. तोपावेतो ग्रंथकाराने दिलेली व्युत्पत्ति खरी मानून चालण्याशिवाय गत्यंतर नाही. असो.

काबांतील ही काळी शिळा अब्राहमला देवदूत गॅब्रिअल याने दिली होती आणि त्यानेच तिची स्थापना तेथे केलेली आहे. महंमदाच्या बालपणी प्रलयाने वा अन्य कारणाने काबाचे देवालय पडले आणि पुनः बांधणी झाल्यावर काबाची स्थापना कोणी करावी असा प्रश्न उपस्थित झाला असता, पंच समितीने असे ठरविले की, स्थापनेच्या दिवशी जो भक्त प्रथम मंदिरात येईल, त्याच्या हातून स्थापना करण्यात यावी. म्हणतात ना, नशिबात योग असला म्हणजे सारे कसे मुरळीत घडून येते! महंमदाच्या नशीबानेच त्याला मंदिराकडे खेचून आणले जणू! त्या दिवशी महंमद पहिल्याने मंदिरात आल्यामुळे त्याच्याच हस्ते काबाची स्थापना झाली. महंमद थोडासा मोठा झाल्यावर त्याला मूर्तिपूजा आवडेनाशी झाली. यानंतर त्याने निरीश्वरवादी धर्माची स्थापना करण्याचे ठरविले. सुरवातीस

त्याला चार शिष्य मिळाले. त्यामध्ये त्याची वयस्कर स्त्री खादिजा, यहीद नावाची दासी, अबूबकर नावाचा व्यापारी आणि ओमर नावाचा एक योद्धा होता. आपल्या या शिष्याना तो नेहमी सागे,

' The motionless stone idols in the holy temple
of Makka have not created this World. '

म्हणजे ' मक्का येथील पवित्र मदिरातील अचल दगडी मूर्तींनी हे विश्व निर्माण केलेले नाही. पूर्वीच्या अरबी चालीरितींप्रमाणे अधार्मिक विधि करण्याची मुळीच गरज नाही. काबा हे देवाचे माहेरघर खरे आणि ते धर्मक्षेत्र आहे, हेही तितकेच खरे. परतु अल्लाच्या प्रेरणेने ते इब्राहिम ह्याने स्थापन केलेले आहे. ' हे काबाचे मदिर हिथिअन संस्कृतीनिदर्शक असल्याने आणि या ठिकाणी मूर्तिपूजा चालत असल्याने तेथे खऱ्या देवाला मुळीच स्थान नाही.

( Religious Leaders by H. Thomas, Page 107 )

त्याला मूर्तिपूजा न आवडण्यास कारणेही तशीच जबरदस्त घडली. तेथील मूर्तिपूजेने विकृत स्वरूप धारण केले होते. धर्माच्या नावावर तेथे भयकर अत्याचार चालत होते. लूटमार व तटे झगडे हे तर नित्याचेच होऊन बसले होते. स्त्री वर्गाला गुलामगिरीत पिचावे लागत होते आणि त्याचे जीवन असह्य झालेले होते. एखादाच्या घरी मुलगी जन्माला येणे ही गोष्ट अशुभ व आपत्ती-कारण मानली जाऊ लागल्यामुळे कित्येकजण जन्मत.च त्या निष्पाप अर्भकाचा जीव घेत अगर जिवत गाडून टाकीत असत. एक पुरुष अनेक स्त्रियाबरोबर विवाह करून त्याना निर्दय वागणूक देऊन, ती फक्त भोग्य वस्तु आहे, या कल्पनेतच वावरत असे.

या प्रकारची महंमदला चीड येत होती आणि हे अत्याचार कसे नष्ट करावेत, याविषयी तो नेहमी विचारमग्न असे. धर्माचे हे घाणेरडे स्वरूप त्याला थाबवावयाचे होते. इतिहासकार सर विल्यम् मूर या सबधाने म्हणतो की, वरील गोष्टीमुळे तो नेहमी गभीर व चिंतामग्न असे. एकान्तवासात राहून तो मननशील बनला होता. खरा धर्म काय असावा याचे तो चिंतन करीत असे. यासाठी तो जवळच्या निर्जन पहाडावर जाऊन बसे. जाताना सातूचे पीठ व पाणी बरोबर घेऊन जाई आणि ते खाद्य सपेपर्यंत तेथेच मनन करीत असे. जसजसे त्याचे चित्त एकाग्र झाले, तसे वयाच्या ४० व्या वर्षी त्याला सदेश मिळू लागले. एका रमजानच्या अठराव्या दिवशी रात्री हजरत जिब्रिल सदेश घेऊन आला की, ' घोषणा कर. ज्याने सृष्टीची रचना केली, ज्याने घट्ट झालेल्या मासापासून

मानवाला बनविले त्याची घोषणा कर. ज्याने मानवाला लेखणीच्या द्वारा ज्ञानदान केले तो तुझा भगवान कृपाळू आहे. तू घोषणा कर[1] ( सुरेअलक १-५ )

याप्रमाणे महंमदाचे अंतरंगात पहिली ईश्वराची वाणी प्रकट झाली आणि पुढे पुढे त्याचे प्रमाण वाढतच गेले. ( भा. सं. को. २/४१६ )

या त्याच्या शिकवणुकीचा परिणाम असा झाला की, इतर धर्मगुरूंनी त्याला काबा मंदिरात येण्यास मनाई केली. तेव्हा तो मदिना या शहरी आपल्या शिष्यासह राहावयास गेला. काही काळाने त्याच्या म्हणण्याला पुष्टी देणारे पुष्कळ लोक त्याला मिळून त्याचा अनुयायी वर्ग वाढला. सन ६२२ मध्ये त्याने आपल्या शिष्यासह मक्केमध्ये घुसण्याचा प्रयत्न करताच मूळ रहिवाशांनी त्याला कडवा प्रतिकार केला, त्यामुळे हुदियाबिया या शहरी त्याचा पराभव झाल्याने तो परत गेला. परंतु दोन वर्षांनी त्याने पुन्हा प्रयत्न केला आणि या वेळी तो यशस्वी झाला. लढाई संपल्यावर महंमद स्वतः एका पांढऱ्या उंटावर बसून मक्का शहरात शिरला, काबा देवालयाच्या पायऱ्या चढून वर गेला, स्वतः स्थापन केलेल्या काळ्या शिळेला सात प्रदक्षिणा घातल्या आणि त्या शिळेव्यतिरिक्त त्या मंदिराच्या परिसरात असलेल्या सुमारे ३६० मूर्ति फोडून टाकल्या. इतकेच करून तो थांबला नाही, तर असे करण्याला त्याला विरोध करणाऱ्या अधार्मिक लोकांचा त्याने शिरच्छेद केला.

( Religious Leaders by Thomas, Page 119 )

मूळ मूर्ती त्याने न फोडण्याचे कारण असे संभवते, की ती त्याने स्वतःच स्थापन केलेली होती.

दिनांक १६ फेब्रुवारी १९६० च्या 'केसरी' ( पुणे ) या वर्तमानपत्रात दादुमिया नावाच्या गृहस्थांनी 'अरब देशातील महंमदाची चित्रे' या शीर्षकाखाली एक पत्र प्रसिद्ध केले आहे. त्यामध्ये ते म्हणतात, 'इस्लाम धर्मीयांची काशी जी हज्, तेथील सर्व गोष्टींचे रंगीत फोटो आर्टपेपरवर अमेरिकेच्या जिऑग्रफिकल मॅगेझिनमध्ये अतिशय सुंदर तऱ्हेने छापलेले आहेत. काबाचा दगड, जे पूर्वी शिवलिंग होते असे म्हणतात, त्याचाही उत्कृष्ट रंगीत फोटो त्या मासिकात छापलेला आहे.' 'धर्मसंस्थापकांची आत्मचरित्रे' या नावाचा इंग्रजी भाषेतील ग्रंथ श्री. थॉमससाहेबांनी लिहिलेला आहे. त्यामध्ये देखील महंमदाचे सुंदर रंगीत चित्र छापलेले आहे, असे म्हणतात. तो ग्रंथ अजूनही भारताबाहेर विकला जातो, पण या ग्रंथाच्या आधारे श्री. कन्हैय्यालाल मुनशी यांनी लिहिलेल्या एका पुस्तकात ते छायाचित्र छापले असता, मुस्लीम जनतेच्या विरोधामुळे सरकारला ते पुस्तक जप्त करावे लागले. परदेशीय लोकांनी महंमदाचे

चित्र पाहिले असता मुस्लीम लोकांच्या भावना दुखावल्या जात नाहीत, पण भारतीयांनी मात्र ते चित्र पाहिले असता, 'मुस्लीम लोकांच्या धार्मिक भावना दुखावल्या जातात!' हा विचित्रच न्याय नव्हे काय?

मुस्लीम संस्कृतीत हज् करणे आणि मक्का व मदिना या पवित्र क्षेत्रांना भेट देणे अतिशय पुण्यकारक मानतात. साहजिकच आहे, जेथे धर्माच्या प्रेषिताचा जन्म झाला आणि धर्माच्या संस्थापनेचे पहिलेच सलामीचे शिंग फुंकले गेले ह्या स्थळापेक्षा इतर कोणते स्थळ पवित्र असू शकेल? आणि त्या स्थळाना भेट देणे यापेक्षा दुसरी कोणती गोष्ट पुण्यकारक असू शकेल? या यात्रेचा विधि कुराण-ग्रंथामध्ये (२/१५४-१६१) वर्णिलेला आहे तेथे गेल्यावर खालीलप्रमाणे धार्मिक विधि करावे लागतात.

(१) हज्ची वस्त्रे परिधान करणे.
(२) अरफान नामक मैदानात मुक्काम करणे.
(३) मिना येथे खडे फेकणे.
(४) काबाला प्रदक्षिणा घालणे.
(५) साफामारव्हा या पर्वतावर दौड मारणे, इत्यादि.

काबाभोवती हॅरम नावाचा पवित्र परिसर दर्शविणारा भाग पाषाणांनी सीमावेष्टीत असून ह्यामध्ये होणाऱ्या सर्व धार्मिक विधींना 'ओम्रा' अथवा 'उमराह' असे म्हणतात. यात्रा सुरू होण्यापूर्वीच्या कपडे बदलण्याच्या विधीला 'मीकात्' असे म्हणतात. कपडे बदलणे म्हणजे पाचसहा हात लांबीचे पंचे नेसणे होय. नेसणीच्या वस्त्रास 'इजार' तर पांघरण्याच्या वस्त्रास 'रिज्' असे म्हणतात. 'रिज्' अंगावरून घेताना डावा खांदा झाकून व उजवा खांदा मोकळा ठेवून जानव्यासारखे अंगावर घेतात (भारतीय संस्कृतीत उपरणे देखील याच पद्धतीने घेतले जाते). हॅरममध्ये प्रवेश झाल्यावर यात्रेकरू 'तावफ' (म्हणजे काबाला प्रदक्षिणा घालणे) करतो. मंदिरात आल्यावर काळ्या शिळे पासून विधीला सुरवात होते. या काळ्या शिळेला (जी बरीच जाड व उंच आहे) 'संगे अस्वद' असे म्हटले जाते या 'संगे अस्वद' चा सरळ अर्थ 'संगमरवरी पाषाण' असा होतो. (संगे = संगमरवरी आणि अस्वद = अश्मा = पाषाण).

काबा या शब्दाचा अरबी भाषेतील अर्थ, सहा बाजूंसारखी असलेली घन आकृति असा आहे आणि येथील मशीदीत त्या आकाराची आकृति आहे, म्हणून त्याला काबा म्हणतात. त्यांची लांबी, रुंदी, उंची सुमारे ३० फूट असून

तो मोठमोठ्या राखी रंगाच्या पाषाणानी बांधून काढलेला आहे. पायाला दोन फूट उंचीचा चौथरा आहे. या चबुतऱ्यामध्ये पूर्व बाजूला 'हजरूल अस्वद' नावाचा काळा पाषाण बसविलेला असून दक्षिणेकडील कोपऱ्यात दुसरा एक साधा पाषाण दीड फूट लांब व दीड इंच उंच उभा ठेवलेला आहे. या दुसऱ्या खांबाला 'यमन स्तंभ' असे म्हणतात. काबाभोवती वायव्य बाजूच्या भिंतीत एक सुवर्णाची तोटी असून तिला 'मिझाबूर रहिमा' (दया मुख) म्हणतात. काबा शिळेवर पडणारे पावसाचे पाणी या तोटीतून खाली येऊन इस्माईलच्या कबरीवर पडते.

(भा. सं. को., २/२४५.)

या शिळेला सात प्रदक्षिणा घालीत असता प्रत्येक वेळी 'बोसा' (पाषाणाचे चुंबन) घ्यावे लागते. परंतु जास्त गर्दीच्या वेळी हे प्रत्येकालाच शक्य होत नाही. अशा वेळी शिळेला स्पर्श करणे, हातातील काठी लावणे, किमानपक्षी त्याकडे नुसता नेत्रकटाक्ष टाकणे एवढे केले तरी चालते. पंढरपूर (भारत) या क्षेत्री आषाढी कार्तिकीच्या वारीच्या वेळी जेव्हा भक्ताना प्रत्यक्ष विठ्ठलाचे दर्शन घेणे अशक्य होते, तेव्हा नुसत्या शिखराचे दर्शन घेऊन ते समाधान पावतात आणि यात्रा सफल झाल्याच्या आनंदात घरोघर परततात.

(जेम्स धर्मकोश, १० / १०–११.)

काळ्या शिळेसमोर 'आबेझमझम' या नावाची पाण्याची विहीर आहे, त्यातील पाणी अतिशय पवित्र मानले जाते. ते पाणी डोळ्याना लावणे, पिणे अथवा घरी नेणे या गोष्टी भक्त मोठ्या श्रद्धेने करतात. काळ्या पाषाणाच्या मागील बाजूस भिंतीमध्ये एका कोनाड्यात एक तुपाचा दिवा जळत असतो, त्या दिव्याची ज्योत शिळेवर पडलेली पाहणे अतिशय पवित्र मानले जाते. तसेच पूजेच्या वेळी बहुधा लाल व पांढरी फुले वाहिली जातात. (शंकराला पांढरे फूल आणि शक्तिदेवतेला लाल फूल वाहण्याची रूढि भारतात आहे). या शिळे-समोर एक चक्र आहे, ते बहुधा श्रीचक्र असावे असा संशोधकाचा दावा आहे. या चक्राकृतीच्या प्रतिकृति 'बडा तावीज' म्हणून इस्लामधर्मीय मोठ्या श्रद्धेने वापरतात. (भारतामध्ये अनेक शक्तीपीठामधून देवतेसमोर श्रीचक्राची आकृति काढलेली असते, हे अनेकांनी पाहिलेली आहे.)

दहा दिवसांपर्यंत तवाफ करणे आणि साफा व मारव्हा या टेकड्याना प्रदक्षिणा घालणे हा कार्यक्रम चालतो. काबाच्या मंदिरापासून या टेकड्यापर्यंत यात्रिक आपले खांदे हलवीत सात प्रदक्षिणा घालीत असतो. पूर्वी या टेकड्यावर लहान लहान मंदिरे होती, असे सांगतात. सांप्रत या टेकड्यांची उंची फारशी राहिलेली नाही.

(जेम्स धर्मकोश, १०।१०)

सातव्या दिवशी खुतबा, आठव्या दिवशी ( ८ मैल अंतरावरील ) मीना दरीत मुक्काम करणे, नवव्या दिवशी अरफाट टेकडीवर नमाज पडणे इत्यादि कार्यक्रम असतो. दहावा दिवस 'यौ-मु-न-न-ह' म्हणजे यज्ञाचा दिवस मानतात. त्या दिवशी मीनादरीत सैतान खांबावर पाषाणवृष्टि करून त्या ठिकाणी मेंढी, बकरी, गाय, उंट यापैकी एकादे जनावर बळी द्यावयाचा विधि करतात. हा दहा दिवसांचा विधि पूर्ण झाल्यावर मगच यात्रिक हाजी बनतो. ( भारतात नवरात्रात नऊ दिवस पूजन झाल्यावर दहावा दिवस यज्ञाचा असतो. )

या दहा दिवसांत त्याला अतिशय व्रतस्थ रहावे लागते. इजार व रिज याच वस्त्रावर रहावयाचे; दुसरे घालावयाचे नाही, तळहाताने चोळावयाचे नाही, खाजवावयाचे नाही, स्त्री-संभोग करावयाचा नाही, मांस-भक्षण करावयाचे नाही अगर कोणतेही कामिक वा वाचिक कुकर्म करावयाचे नाही, इत्यादि बंधने असतात.

( श्री. रमेश सहस्रबुद्धे, प्रजामित्र, दि. २।१।१९६१ )

महंमद पैगंबराच्या जन्मापूर्वी अरब संस्कृतीमध्ये मूर्तिपूजा सर्रास चालू होती. गीतेमधील ' हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं । जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ॥ ' या उपदेशाप्रमाणे तो भक्तांना उपदेश करी, जो अन्य धर्मांचा उपदेश ऐकणार नाही, त्यास युद्ध करून जिंकावे. युद्धात जय मिळाल्यास शत्रूची दौलत मिळेल व मृत्यु आल्यास स्वर्ग मिळेल. सन ६२४ साली त्याने मक्का काबीज केली व मूर्ती फोडून टाकल्या. ( मराठी वाङ्मयाचा इतिहास, ले. पांगारकर, खं. १, पृ. ९ )

श्री. पु. ना. ओक, भारतीय इतिहास पुनर्लेखन संस्था दिल्ली, हे पुणे येथील दि. १५-२-६६ केसरीच्या अंकात लिहितात की, तुर्कस्तान देशातील इस्तंबूल शहरी मख्तब-ए-सुलतानिया नावाचे भव्य ग्रंथालय आहे. त्यामध्ये सयार-उल्-ओकूल नावाचा अरबी भाषेतील एक ग्रंथ अबू अमीर अबदुल असमाई याने लिहिलेला आहे. त्यामध्ये त्याने जिर्हम् बिनतोई कवीने केलेली 'विक्रम-प्रशस्ती' ही कविता दिलेली आहे. बिनतोई कवि महंमद पैगंबराच्या पूर्वी सुमारे १६५ वर्षे होऊन गेला. त्या प्रशस्तीमध्ये असे वर्णन आहे की, 'ते लोक धन्य होत की, जे विक्रमाच्या कारकीर्दीत जन्माला आले. दुर्दैवाने आम्ही अरबी लोक त्या वेळी ईश्वराचे अस्तित्व विसरून विलासी जीवनात धुंद होतो. लांडग्याच्या पंजातील कोकराप्रमाणे आम्ही तडफडत होतो. अमावस्येच्या अंधारात देश बुडाला होता. अशा परिस्थितीत विक्रमाने आमच्या देशात ज्ञान, सुधारणा यांचा सुखद उषःकाल आणला. त्याचा पवित्र धर्म आमच्या देशात प्रसृत केला. त्यांनी विद्वान धार्मिक आमच्याकडे धाडले आणि आम्हांला सत्याचा मार्ग दाखविला इ० इ० ' विस्तृत मजकूर आहे. ही सर्व प्रशस्ती एका सुवर्णाच्या

पत्र्यावर कोरलेली होती आणि काबा मंदिराच्या आतील भिंतीवर टांगलेली होती. इतर अनेक वचने शेळी व उंटाच्या कातड्यावर बाहेरील बाजूस होती. महंमदाने मक्का काबीज केल्यावर ही वचने हसन बिन सादिक याच्या हाती लागली. द्रव्यलोभामुळे त्याने ती खलिफा हसन-अल्-रशीदच्या दरबारी विकली आणि त्या राजाच्या पदरी असलेल्या अबूअमीर अबदुल असमाई याने आपल्या ग्रंथात त्यांची नोंद केली आहे. या वृत्तान्तावरून श्री. ओक यांनी अनेक निष्कर्ष काढले आहेत की, महंमदापूर्वी तेथे भारतीय संस्कृति होती, काबा मंदिरात पूर्वी दुर्गेची मूर्ति होती, अल्ला हा संस्कृत शब्द दुर्गावाचक आहे, उज्जयनीच्या महाकाळाप्रमाणे तेथे शिवलिंग स्थापन केलेले होते. तेथे चंद्र व शनी मूर्ति होत्या, काबाला सात प्रदक्षिणा व इतर विधि भारतीयच आहेत इ० इ०.

असे सांगतात की, इजिप्तच्या खेदिवाकडून दरवर्षी एक सुंदर उत्तम गालिचा काबा मंदिरासाठी भेट म्हणून येतो. तो ऐसपैस पसरल्यावर मुद्दाम राखून ठेवलेल्या एका खिडकीवजा भोकातून भक्तांना काबाचे दर्शन घेता येते.

(जगातील धर्मपंथ, ले. द. ल. सहस्रबुद्धे, पृष्ठ ४२–४५)

सन ६३२ साली महंमद पैगंबरवासी झाला आणि मक्का येथेच त्याची कबर बांधण्यात आली. कबरेवर उत्कृष्ट काळ्या रंगाची संगमरवरी पाषाणाची शिळा आहे. सभोवार उंची सोनेरी कलाबतूचे पडदे नेहमी सोडलेले असतात. हजयात्रिक त्या कबरीपुढे डोके टेकून प्रार्थना करतात. वरील वर्णनाचा आणि संस्कृतीचा विचार वाचकांनीच करावा आणि कोठे साम्य आढळते किंवा काय ते पाहण्याचे करावे.

या संस्कृतीमध्ये स्त्रीदेवता का नाहीत, हे कुराणाच्याच भाषेत पाहण्यासारखे व समजण्यासारखे आहे.

(१) स्त्रिया म्हणजे देवींच्या मूर्ति. अरब लोक पूर्वी लात्, इज्जा व अलात या देवता परमेश्वराच्याच मुली समजून त्यांची भक्ति करीत. ही किती अविचाराची व कमीपणाची गोष्ट ! ज्या स्त्रिया पुरुषापेक्षा दर्जाने कमी प्रतीच्या त्यांना परमेश्वरासमान कसे मानले जावे ! (कुराण, ४/११७)

(२) मुलींच्या जातीचे पालनपोषण, राहणी वगैरे लहानपणापासून शृंगारात केले जाते आणि एकदा कज्जाचा प्रसंग आला तर त्या वेळी ती चांगला अर्थबोध करू शकत नाही. (कुराण, ४३/१८)

(३) लात्, इज्जा व अलात् या अरबवंशाच्या स्त्रीदेवता इस्लामधर्मापूर्वीच्या होत. (कुराण, ५३/१९–२०)

कुराणामध्ये जर स्त्रियाना हा दर्जा दिलेला आहे, तर मग त्या संस्कृतीमध्ये स्त्रीदेवता असण्याची सुतराम शक्यता नाही हेच खरे. पैगंबराची माता आमदा, त्याच्या चार बायका खातिजा, सौदा, सारा, हाजरा, त्याची कन्या रुक्विया, तशीच एक स्त्रीसाधु राबिया याची नावे शुक्रवारी 'खुदवा' होतो त्या वेळी उच्चारली जात असली तरी त्या पुण्यपुरुषाच्या मान्यवर स्त्रिया म्हणून. देवता म्हणून नव्हे, हे ध्यानात घ्यावयास हवे.

मुस्लिमसंस्कृति एक जातीय संस्कृति आहे आणि तिच्यात पोटभेद नाहीत असे मात्र मुळीच नव्हे. इस्लामच्या उदयाबरोबर अनुयायानी पहिली गोष्ट केली, म्हणजे इराणमधील सासाणी साम्राज्य धुळीला मिळविले ( सन ६५२ ) त्यामुळे इराणी जनता कालांतराने अरबांची विरोधक बनली आणि या तिरस्कारामुळेच अली या शियापंथाचे ते अनुयायी झाले. शियापंथ म्हणजे अरबविरोधी पंथ असेच रूपक तयार झाले. या पंथाची श्रद्धा अशी की, आपला परित्राता पैगंबर अजून अवतार घेणार आहे, तर सुनीपंथीय म्हणतात, पैगंबराचा जन्म झालेला आहे. या दोन पंथात हाच मूलतः फरक आहे. सुफीपंथ हा शिया पंथाचाच एक पोटभाग होय.

श्री. वि. दा सावरकर एके ठिकाणी म्हणतात की, शिया व सुनी या दोन प्रमुख भेदाबरोबर खालील अनेक पोटभेद आहेत.

हनिफाई, मालेकी, हानबाली, मोटाझली, नोधेमियन,
हेयिटिअन, मोझदरी, वाशेरी, घमामी, कादेरिअन,
सेफेशिअन, मुशाबेही, केरामिअन, खारेजायी इ० इ०.

आणि या अनेक पोटभेदाचा परिणाम असा झाला आहे, मूळच्या एका कुराणमथाची आता सातशेंवर कुराणे तयार झालेली आहेत.

( किर्लोस्कर मासिक, जुलै १९३५ )

## इस्लाम धर्मातील अंधश्रद्धा

इस्लाम हा एक सत्यधर्म असून हिंदु, इसाई, बौद्ध, जैन इ० पंथीया-प्रमाणे अंधश्रद्धा त्याच्यामध्ये नाही असे इस्लामधर्मीय मानतात, पण ते पूर्णांशाने खरे नव्हे.

## शुक्रवार पवित्र का ?

या पंथाचे मत असे की, परमेश्वराने एका विशिष्ट प्रकारे या जगाची निर्मिती केलेली आहे. शनिवारी परमेश्वराने पृथ्वी निर्माण केली, रविवारी पर्वत निर्माण

केले. सोमवारी वनस्पती व मगळवारी अंधार निर्माण केला, बुधवारी उजेड निर्माण केला, तर गुरुवारी सर्व प्राणिमात्र निर्माण केले, शेवटी शुक्रवारी मानव निर्माण केला, यासाठी हा दिवस शुभ मानला जातो. याव्यतिरिक्त सूर्यही प्रथम याच दिवशी उगवला. एक दिवशी सर्व जग बुडणार आहे व त्यानतर सर्व प्रेतात्मे जिवंत होऊन उठतील तो दिवसही शुक्रवाच्च असेल. यासाठी हा दिवस पवित्र होय. शुक्रवारचे शेवटचे तीन तास परमेश्वर सर्वांच्या इच्छा तृप्त करण्याच्या इरायाने बसलेला असतो. यासाठी त्या वेळी केलेली प्रार्थना जास्त फलदायी होते.

### बाबा आदम पहिला मानव :

परमेश्वराने मातीपासून हा पहिला मानव बनविला व जिवात्म्याला आज्ञा केली की, याच्या शरीरात प्रवेश कर. पण आत्मा म्हणाला, 'मला आत प्रवेश करण्याची भीती वाटते, कारण तेथे फक्त अधारच आहे.' यासाठी परमेश्वराने आदमच्या शरीरात उजेड तयार केला, आणि नतर आत्म्याने शरीरात प्रवेश केला. प्रथम हा मानव स्वर्गात तयार झाला, व नतर स्वर्गच्युत होऊन शुक्रवारी पृथ्वीवर आला. त्याजबरोबर त्याची पत्नी हव्वा हीसुद्धा स्वर्गातून खाली आली. त्याचे आडनाव अबुल बशर होते. येथे आल्यावर त्याला तीन मुले झाली. हाबील काबील आणि शिस ही त्याची नावे होती. हा पहिला प्रेषित असून परमेश्वराने याप्रमाणे अनेक प्रेषित पाठविले आहेत. मोझेस, येशू, हेही प्रेषितच होते. सन ५७१ पर्यंत याप्रमाणे मानवजातीच्या उद्धारासाठी एकूण १२४०५९ प्रेषित होऊन गेल्यावर त्या सर्वांत शेवटचा प्रेषित महंमद पैगंबर आल्यावर ती पूर्ण सख्या १२४०६० झाली आणि प्रेषित येण्याचे कायमचे बंद झाले.

### स्वर्ग व नरकाची कल्पना आहे

परमेश्वराने पृथ्वीच्या निर्मितीबरोबर काही फरिस्ते निर्माण केले आणि त्यांना स्वर्ग व नरक ओढण्याचे काम वाटून दिले आहे.

दारूल जलाल मोत्यानी मढविलेला स्वर्ग, दारूल सलाम (स्फटिकाचा), जन्नतुल माना (पाचूचा), जन्नतुल खुलद (पिवळ्या रत्नाचा), जन्नतुल नईम (चांदीचा), जन्नतुल फिरदोस (ताम्रवर्णी सुवर्णाचा), जन्नतुल अदन (रत्नाचा).

याप्रमाणे सात स्वर्गांची कल्पना आहे. सात नरक आहेत आणि त्यांची योजना काही विशिष्ट वर्गासाठी आहे.

जहनुम–हिवुच्यासाठी, लिजा–इसाई पंथासाठी, हुतमा–ज्यू लोकांसाठी, सायरिर–सबियासाठी, सकर–अग्नीपूजकासाठी, जाहिमा–देववादी मूर्तिपूजकासाठी, हाविया–दांभिकासाठी.

प्रेषितांचे चमत्कार—प्रेषितांच्या जीवनात खूप चमत्कार असतात आणि हे चमत्कार-सामर्थ्य परमेश्वराच्या आज्ञेमुळे त्यांच्यामध्ये आलेले असते. परमेश्वराच्या आज्ञेने कुमारी मेरीला गर्भ राहिला आणि मुलगा झाला. परमेश्वर मातीच्या गोळ्यावर फुंकर घालून मानव बनवू शकतो, त्याला हे अशक्य नाही. शेवटचा प्रेषित महमंद याचा चमत्कार तर फारच विलक्षण आहे. परमेश्वराने एके दिवशी आपला दूत गॅब्रियल याला महंमदकडे पाठविला. येताना तो आपला घोडा बुराक याच्यासह आला. काहींच्या मते बुराकचे तोंड स्त्रीचे होते, तर काहींच्या मते ते पुरुषाचे होते. त्याची मान हंसाची, कंबर सिंहाची आणि पंख व शेपटी मोराप्रमाणे होती. याच घोडयाचा उपयोग करून, महमंद पैगंबर एका रात्रीत आकाशाचे जे निरनिराळे तांब्याचे, लोखंडाचे गंधकाचे इ० इ०. सात भाग आहेत, त्यांचा प्रवास करून आला. प्रेषिताच्या जीवनातील केवढा मोठा चमत्कार हा आहे.

या समाजामध्ये वरील प्रकारच्या कथांना कुराण, हादीस किंवा महमंद पैगंबराचे चरित्र यामध्ये आधार आहेत, केवळ ऐकीव भाकडकथा नव्हेत. इतके असूनही आमच्या धर्मात अंधश्रद्धा व भाकडकथा नाहीत असे ज्याला म्हणावयाचे असेल, त्याला कोण विरोध करणार !

(केसरी, दि. १३–११–६९, आर. डी. देशपांडे यांच्या लेखाधारे.)

## रशियन-सैबेरियन संस्कृति

सांप्रतकाळी रशियन प्रदेशात 'स्वरोम' नावाचा एक प्रमुख देव असून त्याच्या नावाने निवासस्थान ओळखले जाते. पूर्वी त्यांचा 'व्होलेस' या नावाचा पशुपाल देव होता. त्यांच्या एका देवाचे नाव 'योगुस' हा 'भग' या शब्दाचा अपभ्रंश आहे. खाडा या अर्थी YMA असा शब्द असून त्याचा उच्चार 'ईम्' असा केला जातो आणि हाच आपला कृतांतकाळ यम होय. तात्पर्य, सुमारे दहा सहस्र वर्षापूर्वी या भागात भयंकर हिमवर्षाव झाल्यामुळे आर्य पुन्हा दक्षिणेकडे खाली सरकले. सांप्रतच्या सैबेरियामधील हस्तीदंतांच्या खाणी म्हणजेच त्या वेळी हिमवर्षावाखाली गाडले गेलेले सहस्रावधी हत्तींचे कळपच होत. (श्री. अ. ज. करंदीकर, 'महाराष्ट्र टाईम्स', १–८–६३)

रशियन अथवा स्लाव संस्कृतीमध्ये त्याच्या आसपासच्या प्रदेशांचा म्हणजे कॉकेशस, सैबेरिया, लॅपीश इत्यादींचा समावेश करावा लागेल. रशियाचा भूप्रदेश अवाढव्य असल्याने त्यामध्ये अनेक संस्कृति होऊन गेल्या, असे इतिहास सांगतो. आपण त्यांतील काही नमुन्यादाखल पाहूया.

(अ) इरझा व मोक्ष या दोन वंशांची मॉर्डविन ही जमात होती. पूर्वी जरी यांची संस्कृति निराळी असली तरी सन-१७५० पर्यंत रशियन स्लाव लोकांनी

या जमातीचे पूर्णतः इस्लामीकरण करून टाकले. सन १४४६ साली एक इटालियन प्रवासी जी बॉरबरो ह्याने एका जमातीचे संक्षिप्त वर्णन आपल्या प्रवासवृत्तात केलेले आहे सन १७८३ साली रशियाने या भागातील जमिनीची मोजणी केली त्या वेळी जमीनमोजणीदार मिलग्नोव्हीकू ह्याने त्या जमातीच्या संस्कृतीबद्दलची बरीच नोंद करून ठेवली आहे. त्यावरून त्याच्या अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झालेल्या आहेत वरील नोंदीवरून या जमातीबद्दलची जी काही माहिती मिळते, ती पुढीलप्रमाणे आहे.

या जमातीमध्ये आदिशक्ति अनेक स्वरूपात पूजिली जात असे.

१. **निस्के अव्हा** अथवा **माता निस्के** : घरांमध्ये स्त्रियांकडून दैनदिन पूजिली जाणारी देवी.

२. **स्कबास अव्हा** : मोश वंशातील आकाशदेवता, स्काज् ह्याची ही पत्नी.

३. **अझेर-अव्हा** : इसरा व मोश वंशीयांची आकाशदेवता. हीच भूतलावर पर्जन्यवृष्टी करून धान्य पुरविते, अशी समजूत. कोर्टकचेऱ्यात शपथविधि होताना या देवतेला साक्ष ठेवले जात असे.

४. **वर्मा अव्हा** : ही एक वायु-देवता. शेतातल्या धान्याची नासाडी न व्हावी आणि धनधान्य उत्तम पिकावे म्हणून या देवतेचे पूजन केले जात असे.

या प्रमुख देवतांव्यतिरिक्त इतरही काही छोट्यामोठ्या देवता होत्या. त्यांची नावे येणेप्रमाणे :

देवतेचे रशियन नाव व त्या नावाचा मराठी अर्थ

१. मास्टर अव्हा–पृथ्वीदेवता
२. पाज्स् अव्हा–क्षेत्रदेवता
३. अझेर अव्हा–क्षेत्रमाता.
४. नोराव्ह अव्हा–धान्यदेवता.
५. वीर अव्हा–अरण्यदेवी
६. कव्हटो अव्हा–वृक्षदेवता.
७. वेद अव्हा–जलदेवता.
८. टोल अव्हा–अग्निदेवता
९. कुद अव्हा–गृहदेवता.
१०. जर्त अव्हा–राहण्याच्या जागेची देवता.
११. केकस अव्हा–दरवाज्यावरील देवता.
१२. कलदास अव्हा–गुराच्या गोठ्याची देवता.
१३. बन अव्हा–न्हाणीघर देवता.
१४. कोव्ह बावस–चंद्रदेवता.
१५. निस्केपर अव्हा–मधमाशांच्या पोळ्याची देवता.
१६. वेल अव्हा–ग्रामदेवता.
१७. वेलन पस–ग्रामदेव.

याप्रमाणे लहानसहान गोष्टींसाठी ह्या संस्कृतीमध्ये देवता होत्या असे दिसून येते. (जेम्स धर्मकोश, ८/पृष्ठे ८४६–८४७.)

(आ) रशियाच्या पूर्व भागात सॅमाईड जमात राहाते. न्हायबॉय ही त्यांची देवता होती. ती वेसाकोट्ट याची पत्नी आणि न्यट्टदु याची माता होय. ही जमात अशी आहे की, प्रत्येक माणसाला तीन आत्मे असतात असे ती मानते. (१) बुद्धिवादी आत्मा, ज्याने मनुष्य विचार करतो आणि समजतो. (२) शारीरिक अथवा देहात्मा. (३) छायात्मा, जो शरीराबरोबर सदासर्वदा फिरतो. देहात्म्यालाच इंदाद म्हणतात आणि प्राणवायुग्रहण व श्वासोच्छ्वासही तोच करतो.

(जेम्स धर्मकोश, ११/पृष्ठ १७६.)

(इ) स्लाव वंशात खिस्तीकरणापूर्वी देवतापूजन अस्तित्वात होते आणि त्याचे वार्षिक उत्सव होत असत. सेमर्गळा–शीत व धुक्याची देवता; झोळोटगा-बाबा–सुवर्णदेवता, उडबोग–संपत्ति व यश देणारा देव, स्ट्रीबोग–वायु अगर युद्ध देवता; मोकोश–व्यापारवृद्धीची देवता, इत्यादि. देवता या संस्कृतीत होत्या. या संस्कृतीमधील काही देवता ग्रीकरोमन संस्कृतीमधील देवतासमान होत असे काहींचे मत आहे. जसे, झिझीलिया–ही देवता व्हीनस या देवतेसमान, पोगोडा–ही डायना या देवतेसमान, मर्झना–ही सिरीज या धान्यदेवते समान, इत्यादि, इत्यादि. या देवताच्या मूर्ति अस्तित्वात होत्या. त्याची पूजा होत असे. तसेच त्याची मंदिरे व त्याचा पुजारी वर्गही होता. वार्षिक यात्रेच्या वेळी याना पशुबळी देत. तसेच लढाईच्या वेळी युद्धवैदीही नरबळी म्हणून देत. इसाई धर्म स्वीकारल्यानतरही पाचशे वर्षापर्यंत हे धार्मिक उत्सव जुन्या चालीरितीनुसार चालत असत. (जेम्स धर्मकोश, ११/पृष्ठे ५९३–५९५.)

आपले प्राचीन वसतिस्थान सोडून आर्य खाली सरकत सरकत व्होल्गा नदीपर्यंत आले आणि नंतर पूर्वेकडे बैकुल सरोवरासन्निध असलेल्या अगारा नदीपर्यंत पसरले. व्होल्गा नदीला पूर्वी न्हा नदी म्हणत असत आणि वैदिक 'रसा', या शब्दाचा तो अपभ्रंश आहे. अंगारा नदीकाठी राहणारे हे लोक भारतामध्ये अंगिरसकुल म्हणून प्रसिद्ध झाले, आणि मिडियामध्ये अंगिरस म्हणून ओळखले गेले. बैकुलच्या पश्चिमेस वाल्कश सरोवर आहे. त्याच्या दक्षिणेला आणि काश्गरच्या उत्तरेला सेमिरेचिन्स्क नावाचा प्रांत सांप्रत आहे. हाच सप्तसिंधु प्रदेश होय. वेदकाळातील पणी संस्कृतीची वस्ती सैबेरियामधील ओबी नदीच्या मुखापासून लॅपलँडच्या हिमाच्छादित प्रदेशापर्यंत पसरलेली होती.

(श्री. अ. ज. करंदीकर)

(ई) पूर्व सैबेरिया व रशियन सरहद्दीवर बैकुल प्रदेशात, अंगारा नदीच्या किनाऱ्यावर बुरिआट नावाची एक जमात राहात असे. ती आपल्या देवतांना टेंगरी या नावाने संबोधित असे. शराखोसर या देवतेला तीन मुली होत्या. भूतलावर सहल करण्यासाठी त्या एकदा खाली उतरल्या. परंतु येताना राजहंसाच्या चामड्याचा पोषाख घालून त्या आल्या. त्यांनी कमळांनी प्रफुल्ल झालेली सरोवरे अवलोकिली आणि त्या प्रमुदित झाल्या. साहजिकच त्या तळ्यात जलविहार करण्याची इच्छा त्यांच्या मनात उत्पन्न झाली. आपल्या अंगावरील पवित्र कपडे त्यांनी तळ्याकाठी उतरवून ठेवले व त्या जलक्रीडा करू लागल्या. थोड्याच अवकाशात बुरिआट जमातीचा प्रमुख देव खोरिदाई याने तो प्रकार पाहिल्यावर त्या वस्त्रविहीन विलासिनींना पाहून तो कामवेडा झाला. त्यांपैकी एका मुलीचे कपडे त्याने लपविले. त्यामुळे जलक्रीडा झाल्यावर ती कपडे शोधत राहिली. इतर दोघी उशीर होईल म्हणून निघून गेल्या. त्या निघून गेल्यावर खोरिदाईने त्या मागे राहिलेल्या मुलीला आपल्याबरोबर आणून तिच्याशी विवाह केला. त्या स्त्रियेपासून–तिचे नाव **खोबाशी**–जी संतती उत्पन्न झाली तीच ही बुरिआट जमात होय. कालांतराने खोबाशीला आपले खोरिदाईने लपविलेले राजहंस चामड्याचे कपडे सापडले आणि ती ते अंगावर चढवून पुन्हा आपल्या स्वगृही गेली. अशा या स्वर्गीय देवतेपासून त्या वंशाची उत्पत्ती झाली असल्यामुळे तिलाच आद्यदेवी असे मानतात. त्याच्यामध्येही स्वर्गाची कल्पना असून सखिडाइ-मोईन हा तेथील अधिकारी पुरुष व सरबेला-खातुम ही त्याची पत्नी होय असे मानतात. (जेम्स धर्मकोश, भाग ३, पृष्ठ १)

(उ) सैबेरियाच्या वायव्य भागात राहणाऱ्या जमातीला 'ओस्त्याक-वंशीय' असे मानतात. त्याच्या तीन उपशाखा असून त्यांपैकी एकाचे नाव 'योनिसियन' आहे. **तोमन-मदर** ही त्यांची कुलदेवता आहे. ती दक्षिणेकडील खडकांत राहते आणि वसंतऋतूमध्ये जलक्रीडा करण्यासाठी खाली उतरते. ती अतिशय सुस्वरूप व दयाळू आहे. जलक्रीडा करीत असताना ती आपले हात खाली झटकते. त्यामुळे तिच्या अंगावरील पिसे खाली गळतात. आश्चर्य असे की, त्या पिसांपासून हंस, बदके तयार होतात आणि परत जाताना ती याच प्राण्यांचा वाहन म्हणून उपयोग करते. प्राणिमात्रांचे जीवन हीच देवता सुखद व सुलकर करते.

'खोदासम' ही त्यांची दुसरी देवता असून ती दुष्ट प्रवृत्तीची आहे उत्तरेकडील अंधाऱ्या प्रदेशांत तिचे वसतीस्थान आहे. अल्था हा देशरक्षक देव या दुष्ट देवतेवरोवर नेहमी भांडत असून सत्प्रवृत्तीच्या सज्जनांचे रक्षण करतो. एके वेळी सप्तआकाशात राहणाऱ्या 'एस' देवाची ही पत्नी होती. पण

त्याच्याशी भांडण करून ती त्याला सोडून चंद्राकडे राहावयास गेल्यावर ऐसने तिला पृथ्वीवर अंधारात लोटून दिली. अंधःकार व शीत यांमध्ये ती स्वतः काळ कंठीत असल्याने रोगराई उत्पन्न करते आणि उत्पादनाच्या आड येते. या दुष्ट प्रवृत्तीच्या स्त्रीच्या संपर्कात आल्याने कलेकलेने क्षीण होत जाण्याची शिक्षा चंद्रालाही मिळाली. भूदेव अल्वा यानेच या दुष्ट देवतेला दूर लोटीत लोटीत उत्तरेकडे मृत बेटापर्यंत नेल्याने आता जलातील मात्स्याव्यतिरिक्त कोणावरच तिचा अधिकार चालत नाही.

त्या संस्कृतीच्या मतानुसार पृथ्वी ही सपाट असून सप्तसागराने वेष्टित आहे. वरील बाजूस सप्तआकाश आणि खालील बाजूस सप्तपाताळ आहेत. प्रत्येक आकाशात सूर्यरूप अग्निदेव सदैव तळपत असतो. भूतलावर मृत्यु कसा अस्तित्वात आला यासंबंधीची त्याची समजूत खूपच रम्य आहे. त्याच्या समजुतीप्रमाणे अतिप्राचीन काळी भूतलावर मनुष्य मृत्यु पावत नसे. पण एकदा चुकून तसे झाले खरे! ऐस या स्वर्गातील देवाला ही बातमी समजताच एका कुत्र्याबरोबर त्याने त्या इसमाच्या नातेवाईकांना निरोप पाठविला की, 'त्या मृताला गवतामध्ये गुंडाळून वृक्षावर ठेवून द्या, म्हणजे कालांतराने तो जिवंत होईल.' पण त्या कुत्र्याचा एक स्क्रू ढिला होता की काय देव जाणे! त्याने निरोप दिला, 'त्या मृताला गवतात गुंडाळून भूमीमध्ये गाडून टाका.' याप्रमाणे त्याला भूमीमध्ये गाडल्याने तीच प्रथा रूढ झाली आणि मृत्युरूपी यमानेही आपले पाय भूतलावरील ओसरीवर बेलाशक पसरले. कुत्र्याला परत स्वर्गात जाता आले नाही आणि शाप मिळून तोही भूतलावर राहून आपली उपजिविका विष्ठा खाऊन करू लागला.

(जेम्स धर्मकोश, ९/पृष्ठे ५७९–५८१)

(क) काळा समुद्र आणि कॅस्पिअन समुद्र याच्यामधील भागाला कॉकेशस असे संबोधिले जाते. इरानियन, तुर्को-टारटर, अर्मेनिअन, आवार, किरिआन, लाझेस, अजार इत्यादि अनेक वंश व संस्कृति तेथे होत्या. चवथ्या शतकापर्यंत तेथे इसाई संस्कृतीचा प्रवेश झालेला नव्हता. सन ६४६ नंतर केव्हातरी इस्लामी-संस्कृति तेथे आली आणि अनेक जमाती तिने आपल्या अमलाखाली आणल्या. प्रत्येक वंशाचे धर्मपंथ वेगवेगळे असून धर्मपीठाचे नाव 'खाती' असे होते. हे धर्मपीठ एखाद्या टेकडीवर, वृक्षराजींच्या एखाद्या दाट छायेत असे. ह्या ठिकाणी एक चांदीचा लहानसा पेला ठेवण्यात येई आणि नैवेद्याचे मद्य त्यातून प्राशन केले जाई.

गुदानीखाती, खाकमती आणि करतीस-ज्वरी या तीन शक्तिदेवतांची पूजा येथे होत असे. गुदानीखाती हा खेवसूर जमातीचा मठ असून त्यामध्ये सर्व

देवतांचा वास असे. यातील पूजनाने चोर-चिलटांपासून त्यांना वाटणारी भीती नष्ट होई. शिकार अथवा लुटालूट करण्यापूर्वी या मठात जाऊन देवाचा कौल घेण्यात येई, कारण तसे केल्याने काम यशस्वी होतेच अशी त्यांची निष्ठा होती. रोगराईचे निवारण होण्यासाठी, अथवा जमिनीचा कस सुधारण्यासाठी अथवा एखाद्या माणसाचे वेड जावे म्हणून या मठात देवतेची प्रार्थना केली जाई. सैतान अगर अनिष्ट ग्रहापासून त्रास न व्हावा म्हणून करतीस-ज्वरीची आराधना केली जाई व त्यानिमित्त बकऱ्याचा बळी दिला जाई. खाकमती देवतेच्या मंदिरात अशी, सिमेन व समदंसी या तीन लहान देवता मदतीस असत. एखाद्या लहान मुलाने अपराध केला आणि गुन्हा नाकबूल केला, तर या लहान देवता येऊन त्याला आजारी पाडून शिक्षा करीत, अशी त्यांची समजूत होती.

(जेम्स धर्मकोश, ११/पृष्ठ ४८५)

(ए) स्कँडेनेव्हिया द्वीपकल्पाच्या उत्तरेकडे, आर्क्टिक प्रदेशात लॅप नावाचा एक वंश राहात असे. या संस्कृतीमध्ये अक्का हा देवतावाचक शब्द वापरीत असत आणि त्या त्या पदार्थाचे नाव त्यामागे लिहीत असत. 'जसे, सरअक्का–इंद्रधनुष्यावर सत्ता गाजविणारी एक वृद्ध देवता. या देवतेचे कार्य म्हणजे प्रसूतीसमयी स्त्रियांना मदत करून त्यांना संकटमुक्त करणे. जुलुसअक्का–घराच्या दरवाज्यावर असणारी देवता. ही लहान मुलांची देवता असून रोगराईपासून मुलांना वाचविणे, हे तिचे प्रमुख कर्तव्य आहे.

(जेम्स धर्मकोश, ७/पृष्ठ ७९१)

## आफ्रिका खंडातील काही संस्कृति

भारतीय संस्कृतीमध्ये भूतलाची विभागणी नवखंड पृथ्वीमध्ये केलेली आहे. तसेच ती 'सप्तद्वीप वसुंधरा' या शब्दातही केलेली आहे. या सप्तद्वीपांपैकी शाल्मलद्वीप (सावरी), कुशद्वीप (दर्भ, लव्हाळे) व क्रौंचद्वीपाचा काही भाग मिळून, म्हणजेच उत्तरेकडील अल्जिरिया, मोरोक्को व बार्बरी संस्थाने यांचा ह्याच अफ्रिकाखंडामध्ये समावेश झालेला आहे. यातील भूभाग अतिशय प्रचंड असल्याने आजही राजकीय दृष्ट्या त्याचे अनेक स्वतंत्र प्रांत बनलेले आहेत आणि गोऱ्या राष्ट्रांची तेथील मालकी संपुष्टात येत असल्याने सांप्रत त्या खंडात सुमारे २५ स्वतंत्र राष्ट्रे उदयाला आली आहेत, असे म्हटले असता वावगे ठरणार नाही. अर्थात अमाप भूभागाबरोबरच अनेक वंश व अनेक संस्कृति तेथे नांदत असल्या पाहिजेत हे उघडच आहे. स्थलाभावी आपल्याला सर्वच संस्कृतींचा परामर्ष घेता येणे शक्य नसल्याने विषयमांडणीसाठी केवळ मोजक्याच संस्कृतींचा आढावा घ्यावयाचा आहे.

या खंडातील आद्य रहिवाशियांपैकी झुलू ही एक प्रख्यात निग्रो संस्कृति आहे. अकुलुकुलु ही या संस्कृतीमधील प्रमुख शक्तिदेवता मानतात. मुलुंगु या आदिशक्तीने प्रथम पृथ्वी व मनुष्यप्राणी यांची उत्पत्ति केली. म्हांवे या देवीने पर्जन्य उत्पन्न केला आणि झांथिसी या भूतलावरील मातेने या सर्वांचा उपयोग करून पृथ्वी समृद्ध केली. या भूतलावर जे इतर लहानसहान देव व देवता आहेत त्या सर्वांची उत्पत्ति झाविशी या देवीपासूनच झालेली आहे. या संस्कृतीमध्ये देवी टुग्गा ( ' दुर्गा ' या शब्दाचा अपभ्रंश असावा ), कारथेज व चंद्र या देवतांची पूजा होत असे. एरोर-रॅहन हा पुरुषवर्गाचा, तर त्याची बायको मोरेयबा ही स्त्रीवर्गाची आवडती देवता होती. देवतांची ही जोडी, फेरद्वीपातील देरेयंगा पर्वतावर राहात असे. या पर्वताला सांप्रत सॅटीलोस-डी-अँटीकोस असे नामाभिधान आहे. ( भारतामध्ये शंकरपार्वती कैलास पर्वतावर राहातात असे मानतात. ) अथेनी ट्रीगोजेम्स ही एक जलदेवता होय. परंतु अथेनी या नावावरुन ती ग्रीकरोमन संस्कृतीमधील देवता असल्याचा संशय येतो.

मसाईवंश हा निओटिक निग्रो असून बारिंगापर्वत व केनियापर्वत या दोन पर्वतांनी वेष्टित अशा मध्यपूर्व आफ्रिकेतील नांदी पठारावर प्रामुख्याने वस्ती करून आहे. आकाश व त्याखालील भूभागाची सत्ताधारी देवता म्हणून ती संस्कृति ऐनॉय या आदिशक्तीची पूजा करते. पण काही वेळा या स्त्रीस्वरूपाला ' काळादेव ' म्हणूनही संबोधिले जाते. या संस्कृतीमध्ये त्रिमूर्तिकल्पना होती आणि ऐनॉय, काळादेव व पर्जन्यदेवता लालदेव मिळून त्रिमूर्ति मानली जात असे. ऐनॉय व काळादेव हे पृथ्वीचे संवर्धन व्हावे म्हणून पीकपाणी उत्तम होण्यास मदत करतात. परंतु लालदेव हा स्वभावतःच दुष्ट असल्याने तो या संवर्धनाच्या कार्यात अडथळा आणीत असतो. विशेषतः दक्षिणेकडील म्हणजे विषुववृत्ताच्या दक्षिणेकडे राहणाऱ्या प्राणिमात्रांचे पाण्यावाचून हाल करण्याचा प्रयत्न हा देव करतो. त्याने तसे करू नये म्हणून ऐनॉयचे नि त्याचे नेहमीच भांडण होते. त्या भांडणाच्या परिणामाने मोठमोठे ढग देखील गडगडतात नि गर्जना करतात असे मानले जाते. ऐनॉय या आदिशक्तीला कोणी कोणी प्रेमाने ' पासई-देवी ' असेही संबोधतात. त्या भागात राहणाऱ्या या संस्कृतीव्यतिरिक्त जमाती या देवतेला ' काई ' अथवा ' गाई ' या नावाने ओळखतात.

ईस्ट आफ्रिका भागात बॉर्नीवंश हा प्रमुख वंश आहे. त्या संस्कृतीमधील एक प्रमुख, एका गोऱ्या प्रवाशाला म्हणाला की, ' वांका ' हा त्यांचा प्रमुख देव होय. तो आदिपुरुष असल्याने भूतलावर वृक्ष, नद्या व पर्वत हे सर्व त्यानेच

उत्पन्न करून ते बॉनीवंशाच्या उन्नतीसाठी दिलेले आहेत. तो उच्च आकाशात राहात असल्याने लोक त्याला पाहू शकत नाहीत. पण तो मात्र सर्व प्राणिमात्राची हालचाल बारकाईने पाहू शकतो. एखाद्या वेळी एखाद्याने चूक केली तर तो खाली उतरून त्याला मारतो देखील, अशी त्यांची भावना आहे. या भीतीमुळे या जमातीत कोणी पापकर्मे करीत नाहीत. मानव मृत्यु पावल्यावर त्याला पुरण्याची रूढि या लोकांमध्ये आहे. त्यासाठी खोल खड्डा खणावा लागतो. परंतु प्रेत त्या खड्ड्यात ठेवल्याबरोबर बरेचसे लोक तो खड्डा बुजविण्यापूर्वीच तेथून पळ काढतात. कारण त्यांना अशी भीती वाटते की, वाकादेव खाली उतरून आपल्याला धरील-मारील. हा देव अतिशय करारी स्वभावाचा असल्याने प्राणीमात्रांना त्याची सदैव दहशत असते आणि त्याला सदैव संतुष्ट ठेवण्यासाठी प्रत्येक पदार्थाचा उत्कृष्ट भाग प्रथमत त्याला अर्पण करून मगच बाकीचा खाल्ला जातो. त्याला अर्पण करण्याचा भाग आहुति म्हणून यज्ञात टाकतात आणि तसे केल्याने तो त्याला पोहोचतो अशी त्याची समजूत आहे. (आर्यसंस्कृतीमध्ये होमहवन करून हविर्भाग अर्पण करण्याचा मूळ उद्देश तोच आहे.) गाय-म्हैस व्याली अथवा मधमाशाचे पोळे झाडावरून काढले तर ते वाकानेच आपल्याला मुद्दाम दिलेले आहे, या श्रद्धेने प्रथम काही भाग त्याला अर्पण करतात, म्हणजे तो वर आकाशाकडे उडवितात. असा भाग अर्पण करताना प्रत्येक वेळी वाकाची प्रार्थना केली जाते, 'वाका, भूतलावरील सर्व वस्तु मानवासाठी उत्पन्न करून तूच आम्हाला दिलेल्या आहेस म्हणून तुझा भाग प्रथम तुलाच अर्पण करीत आहे. याच रीतीने तू आम्हाला सदैव वस्तूंचा पुरवठा करीत राहा आणि आमच्या मुला-बाळांचे रक्षण कर.' बॉनी ही जरी वन्य अशिक्षित जमात असली तरी प्राणिमात्र उत्पनकर्त्या ईश्वराबद्दल केवढी अपार श्रद्धा त्यांच्या ठायी होती हेच यावरून दिसून येते. ही श्रद्धा होती म्हणून प्राणिमात्र निदान दोन वेळा पोटभर खात होते आणि सुखाने कालक्रमणा तरी करीत होते. याच आरशात आजच्या श्रद्धा विहीन विश्वाचे प्रतिबिंब किती पुसट आणि भेसूर दिसत आहे हे आपण पाहातच आहोत जसो.

नझांबीदेवी ही दुसऱ्या एका ओजोगो संस्कृतीची देवता होय. पश्चिम बाहूम विभागात ही संस्कृति नांदत होती. ही शक्तिदेवता आकाशात रहाते आणि मेघ-गर्जना करून लोकांना सावध करते की, 'आता पर्जन्यवृष्टि होईल. तेव्हा सावध रहावे.' सर्व विश्वाची उत्पन्नकर्ती व संहारकर्ती देवता हीच असल्याने मानवाने इहलोकात केलेल्या पापपुण्याच्या संचयाप्रमाणे ती त्यांना पुनर्जन्म देते अथवा अग्नीत जाळून टाकते. मानवाच्या उत्कर्षासाठी तिची ही क्रिया सतत चालू असते. 'नजमे' या नावाची एक जमात याच देवीची उपासक आहे. त्यांच्या मतानुसार

पृथ्वी, आकाश, चंद्र, सूर्य, तारे इत्यादि सर्व काही या नझांवीदेवीनेच उत्पन्न केलेले असून मानवाचे पालनपोषण हीच शक्तिदेवता करीत असते. युरेंडीमधील 'वात्वा' ही जमात मात्र 'इंद्रागार' (बहुधा आर्यांचा इंद्रदेव असावा) या देवाने सर्व काही उत्पन्न केले असे मानते. पश्चिम आफ्रिकेमधील 'योरुबस' या निग्रो लोकांचे म्हणणे असे की, पुरुषप्रकृतीचा 'ओलोरन' हाच सर्वेश्वर असून त्यानेच पृथ्वी व इतर देव निर्माण केलेले आहेत. ओदुदुवा व ओबताल या मायावी प्रकृतीच्या जोडीपासून अंगजू हा पुत्र आणि येमझ ही कन्या झाली. या बहीणभावाचा विवाह झाला आणि त्यांना ओंगरून नावाचा पुत्रही झाला. हा पुत्र अतिशय दुष्ट नि हीन प्रवृत्तिचा निघाला. त्यामुळे येमझला अतिशय दुःख झाले आणि त्यामध्येच तिचा अंत झाला. ज्या ठिकाणी तिचा मृतदेह पुरला गेला, त्या ठिकाणी एक सुंदर शहर बसविण्यात आले. त्याचे नाव 'इंफे'. या शहराला पुढे तीर्थक्षेत्राचे पावित्र्य प्राप्त झाले. अंगजूच्या मृत्युनंतर त्याच्या शरीरातून पंधरा देव व पंधरा देवता निर्माण झाल्या.

येमझ ही वाहत्या पाण्याची देवता मानली गेली. ती पीतवर्णाची, नीलमणी धारण करणारी आणि शुभ्रवस्त्र परिधान करणारी असे तिच्या स्वरूपाचे वर्णन करतात. अंगजूच्या शरीरातून जे पंधरा देव व पंधरा देवता उत्पन्न झाल्या म्हणून सांगितल्या त्यापैकी शिंगो व ओंगूर या जोडीची पूजा आजही होत आहे. ओया, ओशुन, आलोकून, ओलोसा, ओशिसी, ओरून, ओशु इत्यादि त्या देवदेवताची नावे असून प्रत्येकाचे कार्य निरनिराळे आहे. काही भागात असे मत आहे की, पृथ्वी व देवांचे वसतिस्थान यामध्ये पूर्वी एक उंच शिडी लावलेली होती. भूतलावरील एखादा मानव वृद्ध झाला, त्याला काम करणे अशक्य झाले अगर तो लुळापांगळा झाला तर देव त्याला या शिडीवरून वर स्वर्गात नेत असत. पण एकदा चमत्कार झाला! एक लहानगे मूल नकळत ती शिडी चढून वर गेले आणि त्याला धरण्यासाठी त्याच्या आईनेही पाठलाग केला. अर्थात त्या दोघांची पळापळी थेट स्वर्गात पोहोचल्यावर संपली. अकाली त्या दोघांचे स्वर्गात आगमन झालेले पाहून देव कोपला आणि त्याने ती शिडी कायमचीच भूतलावर फेकून दिली. यामुळे वृद्ध व पंगु लोकांचे अतोनात हाल आता या भूतलावर होत आहेत.

दहोमन निग्रो संस्कृतीमध्ये सूर्याला लिसा, चंद्राला ग्लेटी या नावाने संबोधतात. आकाशात चमकणारे तारे ही त्यांची मुले होत. त्या दोघांचे भांडण म्हणजेच ग्रहण होय अशी त्यांची कल्पना होती. इवे हा निग्रो वंश एनीन्हव्हो या इंद्रधनुष्याधिष्ठीत देवतेचे पूजन करतो. त्यांच्या मताप्रमाणे इंद्रधनुष्य हा एक अतिविशाल सर्प असून (भारतीयांच्या वासुकी सर्पाप्रमाणे) त्याला जेव्हा तहान

लागते, तेव्हा तो सागरातून वर येतो, शेपटावर उभा राहतो आणि सावकाशपणे आपले मस्तक खाली वाकवून पलीकडील तीरावरील पाणी पिऊन घेतो. सर्पाचा अर्धवर्तुळाकार आकार म्हणजेच इंद्रधनुष्य होय.

वरील संस्कृतीमध्ये त्याचप्रमाणे इतरही काही संस्कृतीमध्ये एक गोष्ट प्रामुख्याने नजरेत भरते की, प्रत्येक संस्कृतीत सूर्य ही पुरुषदेवता तर चंद्र ही स्त्रीदेवता मानली गेली आहे. याचा अर्थ सूर्य हा पुरुषप्रकृति व चंद्र ही माया असा होतो. भूतलावर अनेक उत्पात करण्यास ही जोडी कारणीभूत आहे. त्याच्या भ्रमणाने काही वेळा अनेक स्थित्यंतरे होतात, हे सत्यही आपणाला दिसतेच. सागराला भरती ओहोटी येणे ही क्रिया चंद्र या स्त्रीदेवतेवर अवलंबून आहे, हे एकच उदाहरण वरील सिद्धांतास पुरेसे आहे.

(जेम्स धर्मकोश, ९/२७५, ९/२८१, ८/४८९.)

**आकाशदेवता** —ही कल्पना अनेक संस्कृतींनी मान्य केलेली आहे आणि या देवतेचे नाव सर्वत्र आढळते. कसे ते पहा—

भारत—वरुणदेवता
जपान—शिंटो
अंदमान—पुलुगु
चीन—टीन
एस्थोनिया—उक्को
आफ्रिकन—इझांबु, फिदी, मुकुरु, कलग, कुकुउलेटीट, रोपी
मेक्सिको—ऐंडिल, टैसडेलप्युगो
लॅपीश—युमल
मोंगोलिया—टेंगरी

**मेक्सिकन पेरू संस्कृति**

'कृत, त्रेता, द्वापार, कलीयुगाप्रमाणे चार युगाच्या कालमापनावर संपूर्ण श्रद्धा ठेवणारे, गुरुकुल संस्था, सोमयाग, इंद्र-गणेशादि देवतांचे पूजन करणारे, भारतीय नृत्यकलेतील अंगविक्षेप नित्यशः कृतीत उतरविणारे; जन्म मृत्यु व विवाहसंस्थेचे भारतीय नियम पाळणारे; सती-देवदासींच्या रूढि आचरणारे आणि भारतीय कथा-पुराणांवर विश्वास ठेवून ते श्रद्धेने ऐकणारा जनसमुदाय दक्षिण अमेरिकेमध्ये पाहिल्यावर कोणत्याही संस्कृतीतील सूज्ञ इसम आपले असेच मत प्रदर्शित करील की, भारतीय आर्यांनी अमेरिका हे खंड प्रथम शोधून काढून तेथे आपली वसाहत स्थापन केली.' बौद्धभिक्षु चमनलाल ह्याने सर्व जगाचा तीन वेळा प्रवास करून, या विषयाचे संपूर्ण संशोधन करून 'हिंदु-अमेरिका' या नावाचा एक ग्रंथ संपादिला आहे. त्यातील प्रस्तावनेत वरील उतारा आहे. ते पुढे असे म्हणतात की, मेक्सिकन सरकारी इतिहासकार, पुराणवस्तु-संशोधनखाते आणि इतर, अमेरिकन व स्पॅनिश इतिहासकारांचे या विषयावरील मतांचे

आलोडन केल्यावर त्यानी केलेल्या वरील विधानास पुष्टीच मिळते.[1] तडीपार झाल्येल्या स्पॅनिश गृहस्थाने मेक्सिकोमध्ये प्रवेश केल्यावर आणि तेथील सूर्यवंशीय राजाला कपटाने ठार करून राजसत्ता काबीज केल्यावर बिशप डाय गो-डी लडा ह्याने मयसस्कृतीच्या अनेक ग्रथांची होळी केली आणि त्यातून जे फक्त तीन नशीबवान ग्रथ वाचले ते अद्यापही ड्रेस्डेन, पॅरीस व माद्रीद येथील ग्रथ-सग्रहालयात अत्यत काळजीपूर्वक जपून ठेवलेले आहेत प्रस्तुत ग्रथाचा लेखक म्हणतो, 'प्रवास करीत असताना मी जेव्हा प्रथम अमेरिकेच्या किनाऱ्यावर उतरलो तेव्हा हनुमानाचा मुखवटा घातलेला आणि भारतीय पद्धतीचे नृत्यगाणे पाहिले आणि ह्या नृत्यनाट्याद्वारे रामरावणाच्या सैनिकांचे युद्ध चाललेले असल्याचे दृश्य प्रथम अनुभवले.' ( हिंदु अमेरिका, पृष्ठ १८९ ). ह्या ग्रथातील अर्वाचीन चित्रे भारतीयाचीच असल्याचा भास प्रथमत होईल, इतकी ती भारतीय सस्कृतीशी निगडित आहेत.

दक्षिण अमेरिकेमधील इतिहाससशोधक क्रिमिच यासवधात म्हणतो, "भारतीय लोक कोटमारन अथवा चीनमधील जहाजाप्रमाणे असणाऱ्या जल वाहतुकीच्या साधनाने पॅसिफिक महासागर ओलाडून टोळ्याटोळ्यांनी इ स. पाचव्या शतकामध्ये प्रथम मार्क्विस व हवाई बेटे यामध्ये आले आणि तेथून सुमारे तीस दिवसाचा प्रवास करून पेरु व मेक्सिको देशात येऊन पोहोचले" ( हिंदु अमेरिका, पृष्ठ २२ )

कर्नल चर्चवुड या सशोधकाने भारत व अमेरिका यामधील प्राचीन नौकानयन शास्त्राचा अभ्यास करण्यासाठी वयाची पन्नास वर्षे खर्ची घातल्यावर त्याचे असे मत झाले की, "वाल्मिकीचे असे मत होते की, मयसस्कृतीमधील लोक हे उत्कृष्ट कलाकुसरीची कामे करणारे आणि नौकानयनी होते त्याची जहाजे पूर्व पश्चिम व दक्षिण-उत्तर सागरामधून स्वैर सचार करीत होती," हे वाल्मिकीचे म्हणणे खरे असेल पाहिजे

सन १४९२ साली कोलबस ह्याने अमेरिकेमध्ये प्रवेश केल्यावर आणि तेथील परिस्थिति, तेथील वैभव, चालीरीति पाहिल्यावर त्याने पहिला उच्चार केला तो हाच की,

"I Discovered India"

तो अमेरिकेचे सशोधन केले असे म्हणत नाही, इतके तेथील सस्कृतीचे भारतीय सस्कृतीशी असलेले साम्य त्याच्या ध्यानात आले होते. परतु वर

१ –टीप याच खडातील पृष्ठे ३ ते १८ वरील उतारे पहा

म्हटल्याप्रमाणे सोळाव्या शतकात एक तडीपार झालेला इसम आपल्या चारशे अनुयायासह तेथे गेला आणि त्याने तेथील राजाला फसवून, त्याला ठार मारून, राजसत्ता आपल्या हाती घेतली. तेथील मंदिरे लुटली गेली, उध्वस्त झाली ग्रंथसंपत्तीची अक्षरशः राखरांगोळी झाली आणि क्रमाक्रमाने इसाई संस्कृतीचा विजय होऊन प्राचीन मय, इंका संस्कृति नष्ट झाल्या. हा सर्व दोष भारतीयाचाच आहे, हे कबूल करावयास लाज वाटत असली, तरी हे न पचणारे कटु सत्याचे जहर आहे, हे मात्र निर्विवाद! धर्ममार्तंडानी त्या सुमारास जी समुद्रबंदी घातली त्यानेच हा सर्व आत्मनाश झाला. मूळ संबंध तुटल्यामुळे प्रेमाचे, धर्माचे आणि त्या धर्माचे रक्षण करण्याचे कर्तव्य भारतीयानी पार पाडले नाही. असो. "अब पछताये क्या होय? जब चिडिया चुग गयी खेत!"

सुरवातीला म्हटल्याप्रमाणे अनेक संशोधकानी अमेरिकेमध्ये भारतीय पाचव्या शतकात गेले असे प्रतिपादिले आहे, पण तेही तितकेसे सत्य दिसत नाही. कारण मयसंस्कृति आणि इंका ही सूर्यवंशीय संस्कृति भारतामध्ये त्या काळापूर्वी अनेक शतके होऊन गेलेली आहे. इतिहासकाराच्या मते, रघुवंशीय श्रीरामचंद्र आणि श्रीकृष्ण पांडवाचा काळ हा सनपूर्व अडीच हजार वर्षांपूर्वीचा आहे. अर्जुनाने पाताळलोक जिंकून मय शिल्पकार आणून मयसभा बांधवून घेतली, असे महाभारत सांगते. ह्या पार्श्वभूमीवरून एक अमेरिकन संशोधक अलेक्झांडर डेलमार काय म्हणतो ते पहा:

(१) त्या देशात आढळून आलेली मातीची धरणे, (२) सर्पाकृति असलेले व एक सहस्र फूट लांबी असलेले एक टेकाड व त्याच्या मुखात १६०×८० फूट आकाराची अंडाकृति, ही दसमास वर्ष मानीत असलेल्या ब्राह्मणकाळाची निदर्शक, (३) अनेक टेकाडातून बुद्ध व श्रीकृष्ण यांच्या मूर्तींचे असलेले अस्तित्व, (४) ४"×२½ व ½' जाड काळ्या रंगाच्या विटेवर रेघा असलेली आकृति (म्हणजेच शामनकालमापनातील पचांग), (५) ब्राह्मणधर्माची इतरत्र आढळणारी सुस्पष्ट चिन्हे इत्यादि, तेथे आढळलेल्या अवशेषांवरून तो असा निष्कर्ष काढतो की, महाभारतीय युद्ध सनपूर्व चौदाव्या शतकात झाले आणि त्या सुमारास उत्तर आशियामधील मंगोलियामधून शामनलोक (सूर्यवंशीय) पॅसिफिक महासागरातून अमेरिकेमध्ये गेले असावेत. याच सुमारास मंगोलियन लोकांची धांगाधांग झाल्याचे पुरावे उपलब्ध आहेत. कालमापन शास्त्राप्रमाणे शामनकालानंतर दसमास वर्षांचा ब्राह्मणकाल येतो. त्यानंतर बारा महिन्यांचा कृष्ण अथवा बौद्धकाळ येतो. बौद्धकाळ हा सुद्धा खिस्ताब्द सहाव्या शतकापूर्वी उदयास आला. (ज्ञानकोश, खेतरर, १/२५६)

वरील उताऱ्याचा नीट विचार केला म्हणजे संशोधक किमिच ह्याचे म्हणणेही टिकत नाही. कर्नल चर्चवुड आपल्या संशोधनात वाल्मिकी ऋषींचा उल्लेख करतो आणि वाल्मिकी ऋषि तर प्रभुरामचंद्र याच्या समकालीन आहेत. वरील सर्व संशोधनांचा कसाही अर्थ लावला तरी एवढी एक गोष्ट निर्विवाद सिद्ध होते की, भारतीयांनी प्रथम अमेरिकेमध्ये जाऊन वसाहती केल्या आहेत. अर्थातच त्यांनी आपल्या देवताही जाताना आपल्याबरोबर नेल्या असल्या पाहिजेत. म्हणूनच गणपतीसारख्या दैवताच्या मूर्ति तेथे आढळून येतात.

मेक्सिकोमधील देवता व मंदिरे यांचे वर्णन मी ज्या ग्रंथाच्या आधारे करणार आहे, तो ग्रंथ श्री. लेविस स्पेन्स[1] या गृहस्थाने लिहिलेला आहे. तोही वरीलप्रमाणेच संशोधनविषयक ऊहापोह न करता फक्त इतकेच नमूद करतो की, 'मॅक्सिको हे राजधानीचे शहर, ॲस्टिक व मय या वंशांनी सन ७८० च्या सुमारास वसविले आणि त्यांची मूळ संस्कृति आशियन होती. पेरु या पश्चिम किनाऱ्यावरील देशात इंका ही सूर्यवंशीय संस्कृति होती. पोपलवूह (Popalvuh) हा मय वंशीयांची पौराणिक माहिती देणारा पुराणग्रंथ सन ७०० च्या सुमारास तयार झाला. त्यामध्ये त्यापूर्वीची सर्व माहिती एकत्रित करण्यात आली आहे.' या ग्रंथातील विधानानेही चमनलाल यांच्या भारतीयांनी प्रथम तेथे जाऊन वसाहती स्थापल्या, या मतास पुष्टीच मिळते. असो.

या भूप्रदेशात प्रामुख्याने तीन संस्कृति नांदत होत्या. एक मयसंस्कृति, दुसरी नहुआवंशाची ॲस्टिकसंस्कृति आणि पेरुदेशातील सूर्यवंशीय इंकासंस्कृति. क्रमाक्रमाने आपण या सर्वांचा त्रोटकपणे विचार करू. ॲस्टिकसंस्कृति ही प्रामुख्याने मेक्सिकोमध्ये चालू होती. ही संस्कृति भारतामधील नागवंशीय संस्कृति होती. जन्मेजयाच्या सर्प यज्ञाच्या वेळी 'अस्तिक ऋषीने' तो वंश वाचविला आणि त्याच्या या कृत्याच्या स्मरणार्थ त्या संस्कृतीने 'ॲस्टिक' हे नाव धारण करून या प्राती स्थापन केलेल्या होत्या. अस्तिक या शब्दाचा पुढे अस्तेक व ॲझटेक असा अपभ्रंश झालेला आहे. (हिंदु अमेरिका, पृष्ठ १९९).

वर आपण म्हटलेच आहे की, ही संस्कृति कृत, त्रेता, द्वापार व कलीयुग मानणारी आहे. मॅकेन्झी या ग्रंथकर्त्याने यासंबंधी मेक्सिकन आणि भारतीय संस्कृतींची तुलना केली असून ती एकच कशी आहे हे पुराव्यानिशी सिद्ध केलेले आहे. भारतीय लोक चार युगाचे प्रतीक म्हणून पांढरा, लाल, पिवळा व काळा रंग मानतात. दोघांची कालगणनेची पद्धत सारखीच आहे. ब्रह्मदेवाचा

[1] Myths of Mexico & Peru by Levis Spence, 1927.

एक दिवस म्हणजे भूतलावरील मानवाची ४३,२०,००० वर्षे हे कोष्टक दोघांना सारखेच मान्य आहे. इतकेच नव्हे तर या ग्रंथकर्त्याने एक कोष्टक तयार केलेले आहे. त्याचप्रमाणे इतर संस्कृतीही चार युगाची कल्पना मानीत होत्या, असे ठाम मत आहे. प्रत्येक संस्कृति क्रमाक्रमाने प्रत्येक युगासाठी एक एक प्रतीकात्मक रंग मानीत असे.

| संस्कृति | कृतयुग | त्रेतायुग | द्वापारयुग | कलीयुग |
|---|---|---|---|---|
| ग्रीक | पिवळा | पांढरा | लाल | काळा |
| भारतीय ( १ ) | पांढरा | लाल | पिवळा | काळा |
| भारतीय ( २ ) | पांढरा | पिवळा | लाल | काळा |
| केल्टिक | पांढरा | लाल | पिवळा | काळा |
| मेक्सिकन | पांढरा | पिवळा | लाल | काळा |

उपरिनिर्दिष्ट ग्रंथकार असा सारांश काढतात—

" The important fact remains that the Greek, Celtic, Indian and Mexican religious doctrines are essentially the same and have evidently been derived from a common source "

( Chamanlal, Hindu America, Pages 42-43 )

सृष्टिउत्पत्तिसंबंधीची या संस्कृतीची कल्पना अशी की, प्रारंभी सर्वत्र अंधारच अंधार होता आणि सागराचे पाणी भूतलावरील चिखल झाकून टाकीत होते. नंतर काही काळाने चिखल हळूहळू वर येऊन त्यामुळे भूभाग तयार झाला या वेळी दोन देवता—एक पुरुष आणि एक स्त्री—भूतलावर अवतरल्या. ओमेटिओटल् ( Ometeotl ) व पत्नी यांनी जीवसृष्टि आणि मानवसृष्टि उत्पन्न केल्या. त्यांची अशीही समजूत होती की, प्रथम सृष्टिकर्त्याने पृथ्वी तारे पर्वत उत्पन्न केले आणि नंतर मानवाची जोडी तयार केली. परंतु तो भूभाग पाणसूर्याने नाहीसा केला. पुन्हा दुसरी सृष्टि निर्माण झाली, ती वायुसूर्याने नाहीशी केली. पण त्यानंतर पुन्हा जी सृष्टि निर्माण झाली, त्या वेळी त्यातील अधःकाररूपी राक्षसाचा मानवांनी नाश केला आणि मगच ती स्थिर, चिरस्थायी राहिली. यहुदी संस्कृती-मध्ये जलप्रलयाच्या ज्या पौराणिक कथा उपलब्ध आहेत, त्याचप्रमाणे याही आहेत. भारतामध्ये चार युगाच्या अंती जलप्रलय होऊन नवीन सृष्टि उत्पन्न होते असेच वर्णन आढळते. या संस्कृतीच्या मते मानवनिर्मिती, मेक्सिको प्रदेशाच्या उत्तरेकडील सात गुहांमध्ये प्रथम झाली. नंतर तिचा फैलाव दक्षिणेकडे झाला. ऐतिहासिक दृष्ट्या हेही खरेच आहे. कारण या संस्कृतीमधील मूळ पुरुष जहाजातून प्रथम उत्तर किनाऱ्यावर उतरले आणि नंतर क्रमाक्रमाने खाली

दक्षिणेकडे व पेरु देशात सरकले. याच ऐतिहासिक सत्य कथेवर त्यांच्या मानव उत्पत्तीच्या पुराणकथा आणि लोकगीते आधारलेली आहेत.

( स्पेन्स, मेक्सिकन पुराणकथा, पृ. १२३ )

## मेक्सिकोमधील वसाहत

' Fossils of the so-called Tepexpan man discovered in 1949 on the edge of an old lake bed, on the high Mexican plateau and some corn doles that develop from a small wild variety, suggest that there were human beings in America 6000 or more years before Christ '

सारांश, सहा हजार वर्षांपूर्वीपासून तेथे मानववस्ती होती. हत्तींची शिकार करून उपजीविका करीत. याच्यामध्ये पुढे सुधारणा होत जाऊन, खिस्तपूर्व १५०० वर्षे मेक्सिकोच्या आग्नेय भागात ते राहू लागले. सुमारे सनपूर्व ८०० वर्षांपूर्वी ते खाली मेक्सिकोच्या दरीमध्ये आले व काही खाली पेरु देशापर्यंत पोहोचले. मयसंस्कृतीचे हे लोक पुढे झपाट्याने कार्यप्रवण होऊन, जीवनक्रमात वाढ करू शकले. साधारण दहाव्या शतकापर्यंत याची चलती होती.

या संस्कृतीनंतर नहुवा ( Nahua ) संस्कृतीवाढ येथे होऊन सनपूर्व दुसऱ्या शतकात त्याच्यासंबंधी इतिहास उपलब्ध आहे. मयसंस्कृतीमध्ये अनेक पोटशाखा होत्या. ओल्मेक, तोतोनेक, झॅपोटेक्स, हुवास्टेक्स, ओटोमिज, तरस्कन, कोरा, हुईचोळ इ० नावे सांगता येतील. यानंतर टोलेक्स ( Toltecs ) वंश प्रगतीपथावर आला आणि काही काळ त्याची चलती होती. शेवटी सन १४ व्या शतकात अस्तिकवंशीय उत्तरेकडून खाली मेक्सिको भागात येऊन त्यांनी आपले वर्चस्व स्थापन केले आणि त्याचा संपूर्ण नाश स्पॅनिश लुटारूनी सन १६९७ साली मयराजा ठार मारून केला.

अनेक इतिहासकाराचे मत असे की, आशियामधून धाडशी प्रवासी प्रथम अमेरिकेत येऊन, क्रमाक्रमाने खाली मेक्सिकोकडे सरकले. भारतीय संशोधक चमनलाल तर निश्चयपूर्वक सांगतात की, जावा सुमात्रा पॉलेनेशिया मार्गे सूर्यवंशीय लोक अमेरिकेत गेले आणि त्यांनी राज्यविस्तार केला.

वसाहती करणाराची ही त्रोटक माहिती देण्याचे कारण इतकेच की, तेथे मानववस्ती केव्हापासून झाली, कोणी केली हे समजावे. कारण देवताचा इतिहास पाहताना निरनिराळ्या संस्कृतींच्या निरनिराळ्या देवता व त्याची नावे दिसून येतात. बारकाईने अभ्यास करणाराला त्याचे सखोल संशोधन करून वर्गवारी

करावी लागेल. या लेखकाने मात्र इतके विश्लेषण केलेले नसल्याने काही देवतांचा इतिहास इकडे तिकडे होण्याचा संभव आहे.

## अटलांटिक महासागरांतील बुडालेला खंडप्रदेश

एडगर केसी नावाचे संशोधकाने अटलांटिक महासागरासंबंधी एक ग्रंथ नुकताच प्रसिद्ध केलेला आहे व तो फार उद्बोधक आहे. त्याच्या पितार्जीनी आत्मज्ञानाच्या सामर्थ्याने आठ सहस्र स्त्री-पुरुषांचे विचारलेखन अगर मनोलेखन करून ठेवलेले होते आणि ती सर्व माणसे त्या बुडालेल्या खंडभागाशी संलग्न होती. या सागराच्या तळाचे भूभागाचे बारीकसारीक नकाशे, नॅशनल जॉग्रफिकल सोसायटीने तयार केले असून ते पाहवयास मिळतात. मानवाच्या अस्तित्वाविषयी लिहावयाचे म्हटले, तर काही वर्षांपूर्वी जेवढी प्राचीनता सांगण्यात येत असे त्यापेक्षा अनेक पटीने कार्बन–१४ या साधनाने सांगता येते. उदाहरण द्यावयाचे तर ली-के या दांपत्याला आफ्रिकेत सापडलेले मानवाचे सांगाडे सतरा लक्ष वर्षांपूर्वीचे ठरविलेले होते. पण कार्बनच्या नवीन सोयींमुळे १॥ ते २ कोटी वर्षांपर्यंत त्याचा काळ मागे नेण्यात आला आहे. तेव्हा वरील संशोधनाचा आणि मनोलेखनाचा सारांश इतकाच की, त्या बुडालेल्या खंडावर अनेक हजार वर्षांपूर्वीपासून सारखे आघात होत होते, पूर्वसूचना निसर्ग देत होता, तेथील मानवी वस्ती क्रमशः सावध होऊन अमेरिका-युरोपकडे पसरत होती व सुमारे दहा सहस्र वर्षांपूर्वी शेवटच्या निसर्गाच्या जोरदार आघाताने उरलासुरला भाग सागराच्या तळाशी गडप झाला. हे खंड बुडण्याचा लेखकाने जो सारांश काढला, तो या आधुनिक वैज्ञानिक जगात बहुमोलाचा आहे. तो सारांश असा :—

(१) त्या खंडावर फार प्रगत अशी भौतिक व यांत्रिक संस्कृति होती व तुलनेच्या मानाने ती साम्प्रतच्या अमेरिकेइतकी होती.

(२) या दोन्ही प्रगतीचा अतिरेक होऊन तेथील जनता केवळ भोगवादी बनली. लढाया, युद्धे, शस्त्रनिर्मिती यांनी बेचैनी झाली व स्वार्थी झाली.

(३) वरील कारणांमुळे, देवधर्म बुडाला, सद्गुणाचा लोप झाला, माणुसकी विसरले, आत्मनिष्ठ बनले आणि नवनव्या शस्त्रांनी खंडनाशाला कारणीभूत झाले. (डॉ. पी. एन्. जोशी, केसरी २९–९–६८)

वरील विवरणावरून एक गोष्ट स्पष्ट होते की अमेरिका-मेक्सिकोमधील मानववसाहत ही दहा हजार वर्षांपूर्वीची तरी निश्चित आहे व ती प्रगतमय अस्तित्व-संस्कृतीप्रमाणे आहे.

हिंदु अमेरिका-भिक्षू चमनलाल ( प्रकाशक, भारतीय विद्याभवन ) यातील भारतीय संस्कृतीचे अमेरिकन, मेक्सिको पेरू देशातील संस्कृतीवरील प्रमुख ठसे—

१. गणेशाचे पूजन तेथे होत असे.

२. इंद्र, यम, शंकर, विष्णु, वृत्र, कूर्म, वराह, वामन याचे पूजन होते.

३. यज्ञकर्मातील अग्नि अरणीमथनाने उत्पन्न केला जात असे.

४. ब्रह्मा-विष्णु महेश या त्रिमूर्ति होत्या.

५. दसरा सण, राम-सीता विवाहाने साजरा करीत.

६. कुझको ( कुश-को ) येथे कोरीकाचन सुवर्णमंदिर होते.

७. सूर्यमंदिर हे प्रमुख उत्तम शिल्पाचे मंदिर होते.

८. ब्राह्मणवंशाची राजसत्ता होती. सूर्याचा राजदीक्षा होता राजदंड सुवर्ण रत्नांकित असून, सूर्याच्या जिभेवर रत्ने बसविलेली होती.

९. कोर्टदरबार व न्यायासनात, राजसिंहासनाच्या समोर प्रथम ओळीत ३० निरनिराळ्या राज्यभागाचे न्यायाधीश बसत, दुसऱ्या ओळीत दुय्यम न्यायाधीश बसत, तिसऱ्या ओळीत फिर्यादी, वादी, आरोपी व साक्षीदार बसत. सर्वांच्या रक्षणासाठी भालदार चोपदारही असत. आरोपीचे छातीवर चिन्ह लावलेले असे.

१०. अयोग्य स्त्रीसंभोग, खून, पुरुषाने स्त्रीवेष व स्त्रीने पुरुषवेष धारण करणे, दारूच्या नशेत वावरणे, वडिलार्जित संपत्ती उधळणे, राजाचे विरुद्ध कोणतीही कारवाई करणे, खोटा इतिहास लिहिणे इ० इ० साठी फाशीची शिक्षा देत असत. तसेच कुमारिकेला अथवा विवाहित स्त्रीला पळवून बळजबरी संभोग करणे, वडिलांचे पालकत्वाखाली असलेली मुलगी अथवा विवाहिता यांच्यावर हल्ला करणे, घरफोडी करणे, यानाही फाशीची शिक्षा मिळत असे. असेही न्यायाचे उदाहरण आहे की, मायावन राजाच्या बंधूने एका कुमारिकेवर बळजबरी केली असता, त्याला फासावर चढविण्यात आले.

११. राजवंशातील कोणी मरण पावल्यावर, मांडलिकांना वृत्त पोचवीत व सर्व एकत्र आल्यावर चार अगर पाच दिवसांनी दफन करीत प्रेतावर १५–२० सुंदर नक्षीदार अंगरखे चढवून त्यावर अनेक सुवर्ण व रत्नजडित हार घालून सजवीत. मृताच्या छातीवर भारी किंमतीचे रत्न ठेवीत मस्तकावरील दोन्ही बाजूचे केस कापून, लहानपणी चौलसंस्काराचे वेळी कापलेल्या झुलपाबरोबर एका कोरीव लाकडी पेटीत बंद करून, ती प्रेताजवळ ठेवीत. यानंतर राजमुगावर एक मुखवटा चढवून, त्याच्या सेवकाचा–जो दैनंदिन व्यवहारात त्याची सेवा करीत

असे-वध करीत ते मानीत की, पुढील जन्मात हा सेवक त्याजबरोबर राहून, राजाला सौख्य देईल. त्या शहरातील प्रमुख देवताचे कपडे त्याचे प्रेतावर घातले जात. प्रेतयात्रा धीर गंभीर वातावरणात चालत असताना देशोदेशींचे राजे, नाते वाईक, मित्र परिवार आणि गतधवा राण्या बरोबर चालत. रडारड चालत असली तरी धर्मगुरु वेदमंत्राचे पठण करीत असे. मंदिराजवळ प्रेत आल्यावर तेथील धर्म प्रमुख प्रेताला सामोरे जाऊन, प्रेतावर सुगंधीत द्रव्य शिंपडून पायऱ्यावर ठेवीत मंत्रोक्त अग्नि दिल्यावर वस्त्रे जळू लागत, सुवर्ण वितळू लागे, अशा वेळी राजस्त्रिया सती जात व काही गुलामही जाळले जात. कारण दुसऱ्या जगात हा वर्ग मृताची सेवा करण्यास उपयुक्त होईल, अशी त्याची भावना होती, श्रद्धा होती

दुसऱ्या दिवशी दहनाच्या ठिकाणची काही रक्षा, न जळलेली हाडे, एकत्र करून, वेशाची झुलपे असलेल्या पेटीत ठेवून, त्यावर राजाचा लाकडी पुतळा उभारण्यात येई चार दिवसपर्यंत या पुतळ्यासमोर सकाळ सध्याकाळ निरनिराळ्या वस्तू ठेवण्यात येत. कारण ते असे मानीत की, मृताचा आत्मा चार दिवस तेथे राहून, या वस्तूंचा उपभोग घेतो आणि नतरच स्वर्गाला जातो. ( भारतामध्येही हा चौथा समारभ काही जातीत साजरा करतात. ) वार्षिक श्राद्धदिनही पाळला जात असे

१२. राज्यारोहण समारंभ— मेक्सिको येथील शेवटचा राजा मोंटेझुमा याच्या राज्यारोहण समारभाचे वर्णन लिहिलेले आढळते मंदिराच्या पायऱ्यांवर धर्मप्रमुख उभा राहून, नवीन निवडलेल्या राजाला सांगे—'सर्वांनी आपणाला राजा म्हणून निवडलेले आहे, आपण पूर्वी सैन्यप्रमुख म्हणून कामगिरी केली असून, राजमंडळाच्या कामकाजाची माहिती करून घेतलेली आहे इ० उपदेश देई.' राजदरबारात नवीन राजाचे आगमन होताच, मानकरी उठून स्वागत करीत आणि सिंहासनावर तो आरूढ होई. राजा शपथ घेत असे—' निर्गुण निराकार देवताच्या साक्षीने मी शपथ घेतो की, माझे पूर्वजाचे रीतिरिवाज व धर्म याचे मी पालन करीन, देशाचे प्राणपणाने रक्षण करीन, प्रजाजनाचे पालन दयेने करीन. '

१३. भारतीयाप्रमाणे चार युगाची कल्पना येथे होती आणि ती एका धर्मचक्रावर साकार केलेली होती. ते चक्र साप्रत उपलब्ध आहे (पृ. ६०).

१४. येथे वर्णाश्रमव्यवस्था होती. प्रत्येक वर्णाची कर्तव्ये ठरवून दिलेली होती आणि त्याप्रमाणे आचरण करणे त्याना भाग पाडले जाई. पिढीजाद धंदे मुलांना शिकविले जात आणि तेही हौशीने करीत (पृ. ६६)

१५. मुले व मुली ५ वर्षांची झाल्यावर, सरकार त्याचा ताबा घेऊन

त्याच्या बुद्धीच्या कसोटीप्रमाणे त्याना शिक्षण देत असे. तो भार आई-बापावर नव्हता ( पृ. १६६ ).

१६. नृत्याचे प्रकार भारतातील कुरुदरीतील संस्कृतीप्रमाणे होते. ते दक्षिणेतील द्रविडाप्रमाणे काही ठिकाणी आढळतात ( पृ. ८२ ).

१७. पुनप्राप्तीसाठी स्त्रिया देवपूजा व आराधना करीत ( पृ. ८२ ).

१८. आकडे लेखनपद्धती पूर्वीच्या भारतीय पद्धतीप्रमाणे म्हणजे रेघा व शून्येमिश्रित होती. जसे महाराष्ट्रात, ।।।≡ हे चिन्ह पधरा आण्यासाठी वापरीत. तेथे ।।। हे चिन्ह अठरा सख्येसाठी वापरीत. याचा अर्थ भारतात ( । ) रेघ चार सख्या दर्शविते तर तिकडे पाच सख्या दर्शवीत असे ( पृ. ८२ ).

१९. प्राचीन भारतीय गुरुकुलसस्था तिकडे होती. गुरुकुलात अनेक वर्षांचा अभ्यासक्रम निरनिराळ्या श्रेणींत विभागलेला असून, प्रत्येक विद्यार्थ्यावर कडक नजर ठेवली जात असे ( पृ ९६ ).

२०. मुलाचा जन्म झाल्यावर दाई त्याच्या कानांत उपदेश देत असे— ' बाळा, तू येथे जन्म घेतलास, ते जग दुःखी आहे, उदास आहे, भरपूर श्रमी आणि दुर्दैवी आहे. येथे दुःखाश्रूंनी दरी भरलेली असून, तू मोठा झाल्यावर, भरपूर श्रमाने आणि अनेक दुःखदायक घटनानी आपले अन्न तुला मिळवावे लागेल. ' या उपदेशानतर मूल मातेच्या स्वाधीन केले जाई. ज्या दिवशी जन्म झाला, तो दिवस अथवा एखादी उत्तम घटना, याच्यावरून मुलाचे नाव ठेवले जात असे ( भारतातही ही रूढि आढळते ) ( पृ. १०१ ).

२१. मुली सरकारने ताब्यात घेतल्यावर, त्यापैकी काही देवस्थानाकडे देवाच्या सेवेला दिल्या जात आणि तेथील कामाबरोबर शिक्षणही दिले जाई. त्याच्यावर कडक निर्बंध असत. विवाहयोग्य वय झाल्यावर त्याना विवाह करण्यास परवानगी दिली जाई ( पृ. १०३ ).

२२. भोजन करण्यापूर्वी अग्नीला अन्नदान करण्यात येई ( पृ १०४ ). ( भारतात यालाच वैश्वदेव म्हणतात. )

२३. वर्णाश्रमधर्माप्रमाणे धदा करून कुभार, बुरुट इ०, वस्तू तयार करून, पाठीवर वाहून, बाजारात आणून विकीत. किंमत ठरविताना घासाघीस करीत असत, तिप्पट चौपट किंमत पहिल्याने सांगत ( पृ. १२१ ).

२४. पान चुना खाणे, कोकेन खाणे आणि त्याच्या धुदीत अनेक मैल चालणे हा नित्याचा व्यवहार चालत असे ( पृ. १२२ ).

२५. खेड्यापाड्यातील रहाणी अत्यंत साधी, झोपडीत कपवशाही नाहीत, मोरी नाही, धुराडी नाहीत, पाण्याचा योग्य पुरवठा नाही, वारवार कपडे बदलणेही नाही. तात्पर्य, अतिशय कमी गरजात रहाणी ठेवीत (पृ. १२३).

२६. भोजनात मक्याची हाताने वळलेली भाकरी, भाजी, डाळी, पालेभाज्या, मिरी साधारणतः हा शाकाहारच असे ( पृ. १२५ ).

२७. देवादिकाना फुलाचे हार घालणे, पाहुण्याचे स्वागत फुलानी करणे, स्त्रियानी वेणींत फुले माळणे, याप्रमाणे वापर होत असे ( पृ. १२८ ).

२८. दैनदिन औषधोपचार, आर्यौषधीप्रमाणेच. औषध देणाराला ते 'गुण्या' नावाने सबोधित. गावात पंचायतराज्य असे ( पृ. १३१ ).

२९. भारतात चरकपूजा, अथवा बगड नवस घेतात, त्याप्रमाणे येथेही पूजन घडे आणि भक्त टागून घेऊन, उच काठीवर फिरविले जात ( पृ. १५ ).

३०. नागपूजन, अहि-वृत्रपूजन या ठिकाणी होते ( पृ. १८ ).

३१. भारतीय सोंगट्याचा खेळ तेथे खेळला जात असे ( पृ. २८ ).

३२. संख्याशास्त्र आणि शून्याचा भारतीय उपयोग तेथे होत असे ( पृ. ३२ ).

३३. चद्र-सूर्य ग्रहणाच्या वेळी त्याची अशी समजुत होती की, त्या वेळी हे देव संकटात असल्याने ढोल-वाजनी वाजवून जल्लोस केल्याने त्याचे शत्रू पळून जाऊन चंद्र-सूर्यांची सुटका त्वरित होईल ( पृ. ५९ ).

३४. तेथील मदिरे पिरॅमिडच्या आकाराची असत. पण ती इजिप्तसंस्कृति नसून, भारतीय आहे. उंच टेकाडावर सपाट जागा बनवून तेथे देवाची स्थापना करीत. इजिप्तमधील पिरॅमिड हीच भारतीय शिल्पाची नक्कल असावी ( पृ. ५९ ).

३५. व्यापारी, सोनार, धार्मिक प्रवचनकार व साहित्यिक सदेश देणारी माणसे प्रथम तिकडे गेली आणि त्यानी वसाहती केल्या ( पृ. ६० ).

३६. वटवाघळाने दारावर पख फडफडावणे म्हणजे घरधन्याला धोका; कोल्हा-सर्प मार्गात आडवे जाणे–अशुभचिन्ह; अन्नाची नासधूस, पानात जिन्नस टाकणे म्हणजे अवर्षण पडेल, इ० त्याच्या समजुती होत्या ( पृ. १२८ ).

३७. योगसाधन करणे, ध्यानधारणा करणे, एकत्र कुटुंबात राहणे, चेटुक करणे, गावात चेटकिणी असणे, हेही प्रकार होते ( पृ. १३० ).

३८. पौराणिक कथामध्ये शकुंतला-विश्वामित्र कथा, इंद्राच्या पराक्रमाच्या कथा, नागाच्या-गरुडाच्या कथा सारख्याच आढळतात ( २०४ ).

३९. अस्तिक ऋषि अगर अस्तिक (देवधर्म मानणारा) यावरून तेथील संस्कृतीला ॲस्टिक नाव आले असावे. ( Astee-Aztee-As'tik ) (पृ. २०५)

४०. सोमयागासारखे याग करणे, मंदिरातील यज्ञकुंडे सतत प्रज्वलित ठेवणे, यज्ञाप्रमाणे हवन करणे. ही कर्मे होत असत (पृ. २३६ ).

४१. महाभयंकर शिक्षा असत. ईश्वरनिंदा महाभयंकर गुन्हा समजून त्यासाठी देहदंडाची शिक्षा होई. त्यातून इंका संस्कृतीचा धर्मगुरूही सुटत नसे. सूर्यमंदिरातील सेवेकऱ्यांनी तेथील नियमाचे उल्लंघन केल्यास, जिवंतपणी पुरले जाऊन ज्या गावचा हा गुन्हेगार असेल, तो गावच उध्वस्त केला जात असे. खून आणि परस्त्रीसंभोग याला देहांत शासन, चोरी विश्वासघात याला डाग देणे, खोटे बोलणारे व कडवा पिकविणारे यांना पहिल्या गुन्ह्यासाठी फटके, दुसरा गुन्हा, गदेच्या मार आणि तिसऱ्या वेळी त्याच्या जिव्हा लाकडी ठोकळ्यावर खिळे मारून जाम करून टाकीत. काही क्षुल्लक गुन्ह्यासाठी गुन्हेगारांना अमुक दिवसपर्यंत तो जेथे जेथे जाईल, तेथे डोक्यावर अमुक वजनाचा दगड घेऊनच हिंडावयाचे ही शिक्षा असे (पृ. ६८)

४२. मेक्सिकोमधील मयसंस्कृतिराज्य सन ५८०–६३० पर्यंत बुडाले. फादर लंडा लिहितो की, या संस्कृतीमध्ये शहर वस्ती मुख्य मंदिराचे भोवती होत असे. जमीन नांगरणे व शेतकापणीचे आधी धरतीमातेचे पूजन केले जाई. (२१४) धरतीमातेच्या नावाने शपथ घेतली जाई आणि शपथ घेतल्यावर मृत्तिका प्रत्यक्ष मुखात घालीत. (पृ. १३७)

४३. मय देवता— Ixchel = इक्सचेल = मुले देणारी देवता.
Kinichahua = किनिचाहुवा = सूर्य देवता.
Kinich Kakmo = किनिच ककमो = अग्निदेवता.
Kukulean Gucumatz = कुकुलीन गुकुमाझ = सर्पदेवता.
Itzamna = इझमा = सर्व देवतांचा बाप इंद्र.
पर्जन्यदेवता. (पृ. २२३ )

भारतातील मायादेवी तिकडे गेल्यावर, तिचेच नावे मयसंस्कृति सुरू झाली.

Tlogue = त्रिलोकनाथ, त्रिमूर्ति, विष्णूचें कूर्मरूप (रत्नमाला), हनुमान (कोपन), यमाची मंदिरें होती असे माइल्स पॉंडेक्स्टर (Miles Pondexter) अमेरिकन वकील सांगतो.

४४ मनको, चक्की, औका आणि निरू टोपा या चार अयर लोकांनी अमेरिकेमध्ये पेरु शहरी इका राज्याची स्थापना केली (पृ १२०)

४५ शिवलिंग पूजन—श्रीमती नटल लिहितात की, सल्कोमहुआ याना असे लिहून ठेवले आहे की, पेरु देशातील इकाराज्याची स्थापना मनको टोपा यानी केली याने सुवर्णकाराकडून अष्टाकृति लववर्तुळ अशी सुवर्णाची आकृति तयार करवून, ती सृष्टिउत्पन्नकर्त्याची म्हणून बसविली या राजाचा नातू मत्या (Matya) याने या मंदिराचा जीर्णोद्धार केला, सुवर्णमूर्ताभोवार अनेक रत्ने बसविली आणि सर्व प्रजेला पहिला मान या देवाला देण्याची आज्ञा केला मूर्तीच्या उजवे बाजूला सूर्य व शुक्र याच्या मूर्ति बसविल्या, तर डावीकडे चद्र व गुरु याच्या मूर्ति बसविल्या लिंगाच्या वरच्या बाजूला स्वस्तिकाकृति पाच तारे बसविले, तर लिंगाच्या समोरील भागावर चार ताराकृति बसविल्या या सर्व मूर्तींना एकत्रित नाव दिले **वीरकोचा पाचा-याचासिक** (Viracocha Pacha yachachic) सर्व जगाला ज्ञानदान करणारा देव (पृ ६८)

४६ **सूर्य मंदिर**—इकासंस्कृतीचे उत्तम शिल्प असलेले सूर्यमंदिर कुझको शहरी होते, साप्रत येथे चर्च बनविले आहे शिल्पशास्त्रदृष्टया सर्व जगातील ही उत्कृष्ट कलाकृति गणली जाते सर्व शिल्प उत्तम घडीव निर निराळ्या आकाराच्या पाषाणाचे असून, सांध्याचा मिलाफ एकजीवपणा दर्शवितो आधुनिक काळातील कलावत स्थापत्यविशारदाला, सर्व साधनसामुग्री अनुकूल असूनही, वरीलप्रमाणे कलाकृति निर्माण करता यावयाची नाही

मंदिराच्या भिंती आतून व बाहेरून सुवर्णाच्या पत्र्यानी मढविलेल्या होत्या बगीच्यातील झाडे, फुले, वेली सर्व सुवर्णाच्या बनविलेल्या होत्या या वृक्षवेलींच्या शाखा पानावर अनेक ठिकाणी रत्नजडित पक्षी, प्राणी बसविलेले असून, पाण्याचे कारंजे आणि बागकामाची हत्यारे ही सुद्धा सुवर्णाची होती या बगीच्यात पाणी जाण्याचे नळ रुप्याचे होते पण या बाहेरच्या बागेपेक्षा, मंदिराच्या आतील भागाची शोभा चित्तलोभनीय व आकर्षक होती आतील समोरील भिंतीवर (जेथे आता इसाई यज्ञकुंड आहे) सूर्य देवाची रत्नजडित दैदिप्यमान भव्य आकृति होती त्यातून बाहेर पडणारा प्रकाश जणू अग्नीच्या ठिणग्या बाहेर उडत आहेत, त्याप्रमाणे भाविकांच्या नेत्रावर आदळत असून, त्यामुळे काही वेळा त्यांचे नेत्र झाकून जात या सूर्यभिंतीच्या समोरच्या बाजूला चद्राची रुप्याची

मूर्ति होती. तसेच या सूर्य-चंद्र मूर्तींच्या आजूबाजूला अनेक तारे बसविलेले असून इंद्रधनुष्याची कमानही रंगविलेली होती.

या सूर्यमूर्तीच्या खाली इंका राजाच्या प्रतिमा ठेविलेल्या असत. त्या प्रतिमा उत्तम सुवर्णालंकारांनी सजविलेल्या, मस्तकावर राजमुकुट सुवर्णाचे झळकत असलेल्या व हाती सुशोभित राजदंड घेतलेल्या असत. दुसऱ्या बाजूला चंद्रदेवताच्या खाली त्यांच्या राण्यांच्या प्रतिमा नटवून सजवून ठेविलेल्या असत. या सर्व प्रतिमा सुवर्णाच्या असत. पुराणानगरीच्या काही देवतांचेही मुखवटे येथे पहाण्यास मिळत. पूजा समारंभासाठी लागणारी सर्व उपकरणे सुवर्णाची असून या सर्व वस्तु ठेवण्यासाठी मजबूत जामदारखाना होता.

स्पॅनिश लुटारू पिझारो व त्याचे सैनिक जेव्हा या मंदिराचे आवारात शिरले तेव्हा प्रथमतः त्यांचे डोळे दिपून गेले. डोळ्यांनी पाहात असतानाही त्यांचा समोरील वस्तूवर विश्वास बसेना. कारण उघडच आहे. इतके सुवर्ण, उत्तम कलाकृति पूर्वी त्यांचे पूर्वजांनीही पाहिली नव्हती. पण त्यांची आवड, यांना नव्हती. कदर नव्हती; त्यांना पाहिजे होते सुवर्ण. म्हणून त्यांनी काय केले याचे इतिहासकारांनी लिहून ठेवलेले मूळ वर्णन आधी वाचा—

Ruthlessly the precious symbols were torn from their places, the regal mummies were thrown down, hacked to pieces and their regalia and ornaments torn off. Holy vessels were battered and smashed Magnificent rugs and textiles, such as the world had never seen before, were cut and hacked to pieces with swords and daggers, and were used as wrappings in which to bundle up the golden loot Fighting among themselves, each striving to gain the lion's share of treasure, the mail-clad soldiers trampled jewels and images, battered and hammered gold utensils into shapeless forms, more easily carried, and stripped the temple and its marvellous garden of every vestige of precious metal and precious stones

Heedless of the beauty, the art, the incalculable value of their loot, the contents of the temple, the golden plates which had covered its walls, the amazingly wrought trees, birds and other

objects in the gardens were cast into the melting pot and transformed into bullion Of that vast treasure all that remains today are a few battered plates of gold that once covered the outer walls ( p 168 )

वरील उताऱ्याचा सारांश हाच की, स्पॅनिश लुटारू सैनिकांनी या सूर्य-मंदिरातील मूर्ति फोडल्या, तोडल्या, मोडल्या, सुवर्णाची भांडी बंदुकींच्या दस्त्यांनी चेचून चेचून काढली, मूर्तीच्या अंगावरील मौल्यवान कपडे फाडून, तोडून, त्याचा उपयोग सुवर्णाची लूट बांधण्यासाठी केला, बगीच्यातील सुवर्णाचे सुंदर पशु-पक्षी, वेली ओढूनतोडून भट्टीत टाकून वितळविल्या, सुवर्णाच्या पत्र्यांनी मढविलेल्या भिंती, स्त्रीच्या अंगावरील वस्त्रे ओढून घ्यावीत त्याप्रमाणे पत्रे ओढून उघड्यानागड्या केल्या, अमानुषपणाचा कळस केला. आज तेथे चर्च उभारले असून, पूर्वीच्या मंदिराचा लवलेशही शिल्लक ठेवलेला नाही. चुकूनमाकून जे काही सुवर्णाचे पत्रे भिंतीवर शिल्लक राहिले, तेच संग्रहालयात दाखविण्यात येतात. देवताचा ऊर्जितकाळ संपला असल्याने, त्याचेही वैभव नष्ट झाले. देवता नामशेष झाल्या. ( भारतामध्ये इतर संस्कृतीयांनी जे केले, तेच येथेही अमेरिकेत भारतीय संस्कृतिनाशाला कारणीभूत झाले, हा दैवदुर्विलास उठावदार दिसतो खरा. पण इतके होऊनसुद्धा धार्मिक ग्लानीतून भारतीय नेते अद्याप जागे होत नाहीत हे आश्चर्य नव्हे काय? वरील प्रकारचे पूर्ववैभव भारतीयांना प्राप्त होण्यासाठी, भारतीय जनतेने भारतीय राजकीय धुरंधराच्या मार्गदर्शनाची आणि कृतीची अपेक्षा केली, तर ते गैरवाजवी ठरेल काय? )

## ॲटिक पंथियांचे शिवमंदिर

मेक्सिको देशात तेनोच्टिलन ( Tenochtitlan ) हे राजधानीच्या शहरी प्रख्यात शिवमंदिर होते. येथील मंदिरे ही पिरॅमिडप्रमाणे दिसणाऱ्या उंच ढिगाऱ्यावर बांधलेली असत. हीच प्रथा भारतात व ग्रीसमध्येही आढळून येते. यांना टिओकली = देव हवेली असे नाव होते. या मंदिराला अनेक प्राकार दक्षिण भारतातील मंदिराप्रमाणे होते. या प्राकारांना खाली उत्तम फरसबंदी होती. अनेक प्राकार ओलांडल्यानंतर मुख्य मंदिराच्या प्रवेशद्वाराजवळ जाता येत असे. ११४ पायऱ्या चढून वर गेल्यावर मंदिरात प्रवेश होई. मंदिरात तीन-चार दालने असून, एक गर्भगृह, दुसरे नरबळीसाठी व काही धर्मगुरूंचे वसतिस्थान म्हणून वापरीत. या उंच ठिकाणावरून शहराच्या वस्तीवर चौफेर नजर टाकता येई. सन १४८३ मध्ये पाया घालून सन १४९० साली राजा अहुइझाल याने ते पुरे केले.

गर्भागृहात दोन मोठी लाकडी यज्ञकुंडे उभारलेली असून एक प्रमुख देव शंकर हुइझिलोपोकिल (Huitzilopochtil) युद्धदेवतेसाठी असून दुसरे नित्याच्या हवनासाठी होते. शिवाची भव्य मूर्ति नखशिखान्त सुवर्णाने मढविलेली असून त्यावर हिरे-माणके जडविलेली होती. अंगावर सुवर्णाचे सर्प रुळत होते. उजवे हाती धनुष्य आणि डाव्या हाती बाणांचा पुंजका धरलेला होता. त्याच्या बाजूला लहान मूर्ति हुजऱ्याची असून त्याच्या हाती भाला व निशाण, ती सुवर्णाने मंडीत होती. शिवाच्या गळ्याभोवती मानवाची सुवर्ण मुंडकी असून, त्याना अमूल्य रत्नांनी सजविलेली होती. मूर्तीसमोर धुपाटण्यात तीन मानवी हृदये व धूप जळत होते. मंदिरातील ढोल भव्य असून तो सर्पाच्या कातडीने मढविलेला होता व त्याचा आवाज अनेक मैल लांब जात असे.

राजवाडेही असेच भव्य असत. कोरा वॉकर हा लेखक म्हणतो की, इंग्लंडमधील आठव्या हेन्रीचा राजवाडा म्हणजे येथील राजाच्या घोड्याच्या तबेल्याप्रमाणे होता. (पृ. २३०)

मेक्सिको शहरातील ब्रह्मदेवाचे मंदिरही असेच भव्य होते. मूर्ति (Tezcatlipoca एझकालीपोका = ब्रह्मदेव) काळ्या पाषाणाची होती. काही अन्य ठिकाणी या देवाची मूर्ति लाकूड कोरून मानवाकृति बनवीत, पण सर्व शरीर काळ्या रंगाने माखून मुख तेवढे लाकडी रंगाचे असे. त्याच्या कानांत सुवर्णाच्या गोलाकृति, खालच्या ओठांत माणिक बसविलेले व मस्तकावर लाल-हिरव्या रंगाचा तुरा खोचीत असत. गळ्यात छातीपर्यंत लोळणारा सुवर्ण कंठा, नाभीवर अमोल रत्न, डाव्या हाती पिसांचा पंखा व आरसा, सर्वत्र दृष्टिक्षेपाने पाहणारा म्हणून त्याला इलाचिया (Itlachia) म्हणत. उजव्या हाती भाला, याने तो गुन्हेगाराना शिक्षा करील ही भीति उत्पन्न होई. डाव्या पायावर २० लहान घंटा तर उजव्या पायाजवळ चार हरणांच्या पायाचे खूर यावरून, तो अत्यंत चपळ आहे, असा बोध घेत, अंगावर उत्तम झगा असे. दर चार वर्षांनी या देवाचे उत्सवाचे वेळी हा सर्वांची पापे क्षमा करतो अशा समजुतीने त्या वेळी त्याची प्रतिमा करून ती प्रसाद म्हणून भक्षण करण्यात येई.

या देवाचे मंदिरही ८० पायऱ्या चढून गेल्यावर भेटत असे. या ठिकाणी माथ्यावर १०×१२ फूट चौरस जागेत गर्भगृह असून अनेक रंगीत उंची कपडे व पडदे याच्या मागे अंधारात मूर्ति असल्याने भीतिदायक भासत असे. फक्त पुजारीच आत देवापर्यंत जात असे. या मूर्तीसमोर भव्य यज्ञकुंडही होते. (पृ. ९२)

### उत्तम शिल्पकार

पेरु-मेक्सिको देशातील सूर्यवंशी लोक हे भव्य मंदिरे, राजवाडे, धर्मशाळा, रस्ते, कालवे बांधण्यात अत्यंत कुशल होते आणि याचे प्रत्यंतर आजही अनेक ठिकाणी घडते. हा वंश जेथे जेथे गेला, मग तो देश रोम असो, पेरु असो, जावा-कंबोडिआ असो, त्या त्या ठिकाणी त्यांनी भारताप्रमाणे भव्य कलाकृति निर्माण करून ठेवलेल्या आहेत. त्यांतही आश्चर्य असे की, शिल्पाचे स्थानापासून शेकडो मैलावरील दगडाच्या खाणींतून, दगड आणून ही शिल्पे उभारलेली आहेत. अशापैकी एक शिल्प ओलंट्री गावाजवळ सायुनिक नावाने प्रसिद्ध आहे. हा एकसंध पाषाण १७ फूट लांब, १० फूट रुंद आणि ३ फूट जाड असून अशी दंतकथा सांगितली जाते की, इक्केडॉरच्या खाणीतून तो आणीत असताना काही माणसे ओझ्याखाली चिरडली गेली आणि त्यामुळेच तो पाषाण तेथे शेंदूर-चर्चित होऊन पडलेला आहे. (पृ. १७०)

याहीपेक्षा मोठा पुतळा विल्का-हौमन (Wilka-Huaman) याचा होता. तो ५० फूट लांब आणि १२ फूट व्यासाचा होता. होता म्हणण्याचे कारण इतकेच की, जेसुइटांनी, तो सुमारे ८० माणसे, सतत तीन दिवस कामावर लावून, त्याचे तुकडे तुकडे करून टाकलेले आहेत.

इतिहासकार प्रेसकॉट, कुझेका येथील दगडी किल्ल्याचे वर्णन करताना लिहितो की, अनेक लहानमोठ्या पाषाणांनी किल्ल्याच्या भिंती बांधलेल्या होत्या. त्यांतील काही पाषाण ३८ × १८ × ६ फूट एवढ्या आकारचे होते. असले अवाढव्य पाषाण आणले कसे आणि भिंतीच्या रचनेत ठेवले कसे याचेच स्थापत्य-विशारदांना आश्चर्य वाटते. इतिहासकार त्या कुशलपणाचे वर्णन करताना म्हणतो–

'Over pathless sierras buried in snow; galleries were cut for leagues, that hung suspended in the air; precipices were scaled by stairways, hewn out of the native bed; ravines of hideous depth were filled up with solid masonry.' (पृ. १४१)

### सगर-सुत

इक्ष्वाकु वंशातील या राजाचे ६० हजार पुत्र म्हणजे कर्नल टॉड याच्या मताप्रमाणे ते सूर्यवंशीय राजांचे ६० हजार दर्यावर्दी खलाशी होते आणि त्यांना प्रचंड नौकांतून सूर्यसंस्कृति जगभर पसरविण्यास सर्व साधने अनुकूल होती. (पृ. ११२).

## अबेसेनिया

अरबलोक याना 'Children of Kush' म्हणत आणि याचा तोंडावळा बंगाल-विहारमधील डोंगरी लोकाप्रमाणे (Pelasa) असून, तोच वंश तिकडे गेला असावा, असे सर विलीयम जोन्स् म्हणतात. (पृ. ११२)

## युद्धापूर्वी हवन

युद्ध सुरू करण्यापूर्वी, शत्रूला राजदूत जाऊन कळवीत असे की, युद्धाला तयार रहा. इंका राजे लढाईला निघाले म्हणजे सर्वप्रथम धर्मगुरु देवमूर्ति घेऊन पुढे असत. त्यानंतर मुत्सद्दी आणि सैन्य, याप्रमाणे रणांगणांवर गेल्यावर प्रथम अग्नि पेटवून हवन केले जाई आणि नंतर युद्ध सुरू होई. (पृ. ११०)

## वेश्याव्यवसाय

पेरुमधील माणसे उत्तम, ध्येयवादी आणि पवित्र होती. स्पॅनिश विजेते मनसिओ, लेजेसामा यानी असे लिहून ठेवलेले आहे की, त्या देशात आम्हाला एकही खोटे बोलणारा आढळला नाही, चोरी दरवडे नव्हते, अगर वेश्याव्यवसाय करणारी कोणी स्त्री नव्हती. (पृ. ११४)

## सुवर्णसाठा

तेथील राजे अगर धनाढ्य मनुष्य मृत पावला असता त्याच्याबरोबर लक्ष लक्ष रुपये किंमतीचे सुवर्ण पुरण्यात येई. टूरुखिलो या गावी थडगी उकरल्यावर लक्षावधी रुपये किंमतीचे सुवर्ण उकरून काढण्यात आले (सन १५७६). या सुवर्णासंबंधी एक किस्सा असा की, एका स्पॅनिश लष्कऱ्याने सुवर्णाची चोरी करून तो ते वजन करीत असताना, एका पेरुमधील हिंदु गृहस्थाने पाहताच, त्याच्या तराजूवर हात मारून म्हणाला, 'तुझी मातृभूमि, सोडून इतक्या दूरवर येऊन अशी प्राणावर बेतणारी कर्मेच करावयाची असतील, तर मी ज्या देशात सर्व लोक सुवर्णाचे पात्रात भोजन करतात व पेये पितात आणि जेथे सुवर्ण म्हणजे तुझ्या देशातील लोखंडाप्रमाणे आहे, असा देश दाखवितो.' (पृ. ११४)

## बहिणीबरोबर विवाह

इंकाराजे आपला वंश शुद्ध राखण्याकरिता स्वतःच्या बहिणीबरोबर विवाह करून राजवंशाचे रक्त शुद्ध राखीत. ही प्रथा त्यानी बौद्धापासून घेतली असावी. कारण पूर्वी इक्ष्वाकु वंशातील एका राजाला अनेक मुली झाल्या. सुना आल्या आणि गादीसंबंधी भाडणे सुरू झाली. तेव्हा हा नियम केला की, राजपुत्राने

स्वतःच्या बहिणीबरोबर विवाह करावा. असा बौद्धपिटीकांत उल्लेख आहे. (पृ. १५७).

## मंदिरातील धर्मगुरूचे शिक्षण

मंदिराची व्यवस्था पाहण्यासाठी प्रमुख धर्मगुरूच्या हाताखाली अनेक दुय्यम पुजारी असत. जोहस नावाचा संशोधक याबंबधीचे वर्णन करताना म्हणतो, मंदिराची देखरेख, देवाची पूजाअर्चा, अग्निहोत्रकुंडाचे रक्षण, यज्ञ-होम-हवन, प्रश्न व शकून सागणे, ज्योतिष वर्तविणे, हस्तलिखिते तयार करणे इ० कामे पूजकाला असत. दिवसातून चार वेळा आणि रात्री तीन वेळा सूर्यदेवाला धुपारती करण्याची रूढि होती.

धर्मगुरूची संस्था चालू रहावी म्हणून वयाचे ७/८ वर्षांपासून नवीन लहान मुलांची निवड करून, मठात ठेवून घेऊन, त्यांना सर्व शिक्षण देणे हेही काम त्याला करावे लागे. या मुलांनी सुरवातीला मंदिर झाडणे, गंध उगाळणे, होमासाठी सर्पण जमा करून आणणे, यज्ञकुंडासाठी विटा तयार करणे, ही कामे करावी लागत. सकाळी उठून स्नानसंध्या करून, वेदपठण व पूजाअर्चा विषयीचे शिक्षण घ्यावे लागे. काही ठराविक वेळी शंखनाद करून सर्वांना वर्दी देणे, एकत्र भोजन करून नंतर सारवासारव करणे, ही कामे करीत. एखादे वेळी रात्री १२ वाजता खास कार्यक्रमासाठी बाहेर पर्वतावर गुरूबरोबर साहित्य घेऊन जावे लागत असे.

मठातील काही भाग मुलींसाठीही राखून ठेवलेला असून त्यांचे शिक्षणही वरीलप्रमाणेच थोड्याफार फरकाने होई, आणि देवाचा सेवाधर्म शिकविला जाई. शिक्षण पुरे झाल्यावर त्यांना विवाह करण्यास परवानगी होती. काही मुली सेवेला मुद्दाम येत, कारण त्यांची समजूत होती की, याप्रमाणे सेवा केल्यावर त्यांना योग्य असा पति लवकर प्राप्त होईल. (पृ. १३८)

## रामसीताविवाह

पेरूमधील इंका हे सूर्यवंशीय असल्याने पूर्वजाची स्मृति म्हणून दर वर्षी ते रामसीताविवाहसमारंभ साजरा करीत. (पृ. ११२)

## कालगणन पद्धति

मय व अस्तिक वंशीयांची कालगणनपद्धति अत्यंत उत्कृष्ट गणली गेलेली आहे. दिवस, महिना, वर्ष यांची गणना एका विशिष्ट शास्त्रीय आधारावर बसविलेली होती. त्यांचे आपण त्रोटकपणे वर्णन पाहू—

कालगणनेवर मनुष्यत्वाचा आरोप केलेला असून केवळ शून्याप्रमाणे मानलेला नव्हता. दिवस, मास, वर्ष याचे स्पष्ट अस्तित्वनिदर्शक शब्द असून, ते कालगणना वाहून नेत असत. या संस्कृतीचा एक अभ्यासक एरिक थॉम्पसन याने असा खुलासा केला आहे की, ३१ डिसेंबर १९६८ हा दिवस घेतला; ३१ क्रमाकाचा देव डिसेंबर महिना वर्षाअखेर वाहून नेतो. एक क्रमाकाचा सहस्राचा अक, ९ क्रमाकाचा शतकाचा अक, ६ क्रमाकाचा दशकाचा अक आणि ८ क्रमाचाचा अक वर्षाचा निदर्शक. याप्रमाणे वाहून नेऊन कालगणना पुरी करतील. पुन्हा १ जानेवारीपासून नवीन रहाटगाडगे चालू होते. शेतकरी डोक्यावर लाकडाच्या मोळ्या घेतो अथवा खाणीतील कामगार माथ्यावर दगड वाहतो त्याप्रमाणे हे देव कालगणनेचे ओझे वाहत असत आणि याप्रकारे निदर्शक अनेक कलाकृति उपलब्ध आहेत.

१८ दिवसाचे एक कालचक्र याप्रमाणे २० चक्रे झाली म्हणजे एक वर्ष होई, १८ × २० = ३६० दिवस. वर्षाशेवटी याला ५ संख्या जोडून ३६५ दिवस करीत. याला हाब ( Haab ) असे म्हणत. हे पाच दिवस नेहमीच्या काळगणनेतील नसल्याने ते देवाचे असे मानीत आणि त्या काळी वागणूक वेगळीच असे. दिवसा झोपावयाचे नाही, भांडणे नाहीत, चालताना वाकडेतिकडे पाऊल टाकावयाचे नाही, कोणत्याही वाईट गोष्टी करावयाच्या नाहीत, शक्य तर घरातच बसून राहावयाचे व दिवस व्यतीत करावयाचे. त्याची अशी समजूत होती की, या देवाच्या पाच दिवसात जे केले जाईल, तेच त्याला इतर ३६० दिवस करावे लागेल.

निरनिराळ्या दिवसाच्या कालगणनेला निरनिराळी नावे होती—

( १ ) ३६० दिवस = तुन ( Tun ) = १ वर्ष.

( २ ) ७२०० दिवस = २० तुन = १ कटून ( Katun ) = २० वर्षे.

( ३ ) १,४४,००० दिवस = २० कटून = १ बक्टून ( Baktun ) = ४०० वर्षे.

( ४ ) २८,८०,००० दिवस = २० बक्टून = १ पिक्टून ( Pictun ) = ८,००० वर्षे.

( ५ ) ५,७६,००,००० दिवस = २० पिक्टून = १ कलबटून ( Calabtun ) = १,६०,००० वर्षे

( ६ ) १,१५,२०,००,००० दिवस = २० कल्बटून = १ किंचिलटून ( Kinchiltun ) = ३२,००,००० = ३२ लक्ष वर्षे.

( ७ ) २० किंचिलटून = १ अलौटून ( Alautun ) = ६,४०,००,००० वर्षे = ६ कोटी, ४० लक्ष वर्षे.

मंदिरव्यवस्था

या संस्कृतीमध्ये देवघर अथवा मंदिराला टिओकली (Teocalli) म्हणत असत. ही मंदिरे उच्च टेकाडावर बांधलेली असत. त्यांची बांधणी साधारणतः पिरॅमिडस्च्या आकाराची असून बाहेरील गोल जिन्याने वर गेल्यावर माथ्यावर देवतेची मूर्ति असे. त्याच्या बाजूच्या खोलीत नरमेधाचा पाषाण असे व तेथे शिरच्छेद केलेल्यांची मस्तके एका कोठारात साठवून ठेवलेली असत. सोळाव्या शतकात स्पॅनिशलोक त्या देशात शिरल्यावर एके ठिकाणी त्यांना अशी १,३६,००० मस्तके आढळून आली. अशा एका युद्धदेवतेच्या मंदिराचा घेर ४८०० चौरस फूट असून चारी दिशांना प्रवेशदरवाजे होते. परिसराच्या मध्यभागी समांतर भुज चौकोनी मुख्य देवालय असून त्याची लांबी रुंदी ३७५ X ३०० चौरस फूट होती. ऊर्ध्वदिशेकडे निमुळत्या होत गेलेल्या अशा सहा टप्प्यांची त्याची बांधणी होती. सर्व बांधकाम दगडी असून बाहेरील गोल जिन्याला ३४० पायऱ्या होत्या. त्याच्या माथ्यावर तीन मजली ५६ फूट उंचीचे असे दोन मनोरे होते. एकामध्ये इष्टदेवतेची मूर्ति आणि दुसऱ्यामध्ये नरमेधाचा पाषाण होता. नरमेधाची दुर्गंधी तेथे अहोरात्र येत असून रक्ताच्या समार्जनाने गाभारा सदोदित माखलेला असे. भिंतीची जाडी १२ फूट, पायाचा घेर १७ फूट तर उंची १८ फूट असलेले दुसरे एक देवघर आढळून आलेले आहे.

मंदिराच्या व्यवस्थेसाठी आणि देवतांच्या पूजनासाठी पुरोहितवर्ग असे वंशपरंपरेने पुजारीपण त्या वंशाकडे राही. नरबली निवडण्याचा अधिकार या वर्गाकडे असे. त्यांच्या उपजीविकेची व्यवस्था मंदिरातर्फे केली जाई. काही वेळा झाडाला प्रथमच आलेली फळे अथवा इतर उत्पादनाचा प्रथम अग्रभाग सर्वांआधी या वर्गाला अर्पण करण्यात येई. राज्याच्या मंत्रिमंडळात त्यांना मानाचे स्थान असे. त्यांचे आचार विचार अतिशय कठोर असत. उपवास करून प्रार्थना चालू ठेवणे, यज्ञयाग करणे, कुंडातील अग्नि सतत प्रज्वलित ठेवणे, समारंभाच्या वेळी अगर नृत्याच्या प्रारंभी धार्मिक मंत्रांचे पठण करणे, रात्रीअपरात्री भक्तगणांनी बोलाविल्यास त्यांच्या घरी जाणे, तिन्हीत्रिकाळ स्नाने करून पूजासमयी पावित्र्य राखणे आणि वेळप्रसंगी या कठोर नियमांचे पालन करण्यात कसूर झाल्यास अथवा खोटे बोलल्यास शिक्षा म्हणून आपली जिव्हा कापून देवतेला रक्ताचा नैवेद्य अर्पण करणे इत्यादि त्यांचे आचार असत.

(मेक्सिकन पुराण, पृ. ११६)

सूर्यदेवता

या संस्कृतीमधील सूर्यासंबंधीची कल्पना फार अद्भुत होती. लोकांना असे वाटे की, सूर्यमाला ही अखंडपणे चालत आलेली नाही. काही ना काही

कारणामुळे अनेक सूर्य अस्तंगत झालेले आहेत. साम्प्रतच्या मानवयुगापूर्वी जलप्रलयाने त्या सूर्याचा नाश केलेला असून प्रत्येक ५२ वर्षांच्या शेवटी सूर्य अस्तंगत होत असल्यामुळे आज प्रकाशात असलेल्या सूर्याची जोपासना मानवानी केली पाहिजे, त्याला त्याचे खाद्य पुरविले पाहिजे, मानवसंख्येचा दहावा भाग नरबळी म्हणून त्याला अर्पण केल्याने तो संतुष्ट व पुष्ट राहील अशी व्यवस्था केली पाहिजे. स्वजातीय नरबळी देण्यापेक्षा परस्पर काम भागवावे म्हणून परप्रांतातील माणसे धरून आणून बळी दिली जात. काही वेळा नरबळी मिळविण्यासाठी शेजारच्या प्रांतावर स्वारी करून जे युद्धकैदी मिळतील ते या सूर्यदेवतेला बळी दिले जात असत.

दिनांक १७ मार्च अथवा १ डिसेंबर या दिवशी एका भव्य सूर्यमंदिरात हा नरबळीचा खास कार्यक्रम होई. मंदिरातील मागील भिंतीवर एक अवाढव्य सूर्याकृति काढीत असत. बळी दिल्या जाणाऱ्या माणसाला स्नान घालून लाल रंगाचा पोषाख व मस्तकावर पांढऱ्या पिसांचा मुकुट घालण्यांत येई. लाल रंग हा सूर्याचा प्रतीक आणि मुकुटाची पिसे ही सूर्यकिरणांचे प्रतीक मानीत असत. त्याच्या हातात पक्ष्यांच्या पिसानी मढविलेली काठी व कापूस भरलेली ढाल देत असत. गरुडाच्या पंखाची काही पिसे आणि लाल रंग एका भांड्यात देऊन पुरोहित त्याला संबोधून गंभीर आवाजात बोलू लागे, ' बळीमहाराज, आपण आकाशात आमच्या पवित्र सूर्यदेवतेकडे जावे आणि तिला निवेदन करावे की, ' आपल्या भूतलावरील भक्तानी आपल्याला नमस्कार सांगितला असून आमची सदैव आठवण ठेवून आपली कृपादृष्टि अशीच सदोदित आमच्यावर रहावी असे त्यांनी विनविले आहे, तसेच ही पिसानी मढविलेली काठी व कापूस भरलेली ढाल आपला प्रवास सदैव सुखकर होण्यासाठी आणि आपल्या भक्तांच्या शत्रूंचा परिहार करण्यासाठी आपल्याला दिलेली आहे त्यांचा स्वीकार करावा. ' याप्रमाणे त्या बळी दिल्या जाणाऱ्या इसमाने, स्वर्गात जाऊन सूर्यदेवतेला सांगण्याचे अश्वासन दिल्यानंतर मगच त्याचा शिरच्छेद करण्यात येई.

हा भव्य समारंभ बहुधा वसंतऋतूमध्ये साजरा होत असे. सूर्यदेवतेची शक्ति क्षीण होऊ नये, यासाठी एक एक नरबळी देण्यांत येई. साधारणत: हा सूर्यजन्माचा समारंभ समजला जात असे. या सूर्यदेवतेचे नांव तोतेक ( Totec ) असे होते.

## देवाचा बळी

मानव देवाला प्रसन्न करून घेण्यासाठी नरबळी, पशुबळी देतात, हे सर्वांना माहीत आहे. पण देवालाही बळी देतात, म्हणजे काय ? असेही काही

देशात घडते. मेक्सिको देशातील हा प्रकार यासाठीच मुद्दाम नमूद करावयाचा आहे[१]

एप्रिल महिन्यात इसाई धर्माचा इस्टरचा सण येतो, त्याच सुमारास हा सण येत असे. अस्तिक वशाच्या पाचव्या महिन्याच्या पहिल्या दिवसापासून या उत्सवाचा प्रारभ होई आणि त्याला टॉक्स कॅटल् (Tox Catl) म्हणत. यामध्ये देवाधिदेव 'टॅक्स कॅटलीपोका' याचे प्राणार्पण होई बळी जाणाऱ्या या देवाची निवड शत्रूकडील कैद्यातून होई व वर्षभर त्याचे उत्तम प्रकारे पालनपोषण केले जाई. एक वर्षानंतर या देवाचा अत होणार असल्याने आणि त्याच्या मरणानंतर पुन्हा दुसरा देव उत्पन्न होणार असल्याने, वर्षभर या देवाला सर्व सुख सपत्तीचा उपभोग करण्यास कोठेच मज्जाव नसे. इसाई धर्मातील इस्टर उत्सवातील खिस्ताचे मरण आणि पुनरुत्थान, याप्रमाणेच हा सण साजरा होत होता.

हा देव कसा असावा याचाही नियम होता. अगाने सडपातळ, खांबा प्रमाणे ताठ, फार उंच नाही, फार ठेंगणा नाही, अगावर कोणतेही व्रण अथवा इद्रियामध्ये विद्रुपता नाही. सुखवस्तुपणामुळे तो जर जाडाजुडा झालेला असेल, तर मिठाचे पाणी पिण्यास देऊन त्याला बारीक करीत. देवासारखे उच्च राहणीमान त्याने जगावे, म्हणून त्याला त्याची शिकवण दिली जाई, त्याने शुद्ध आणि भारदस्त भाषा वापरावी, श्रीकृष्णाप्रमाणे मुरलीवादन करावे, एखाद्या बादशहा प्रमाणे लोडाला टेकून हुक्का ओढावा, अगर अकटबाजाप्रमाणे सुगधी पुष्पांचे गुच्छ हुगीत जावे, इ० इ० प्रकारची शिकवण दिली जाई. एखाद्या मदिरात गाभाऱ्याप्रमाणे असलेल्या खोलीत त्याची राहण्याची व्यवस्था करीत व त्या ठिकाणी भक्तगण देवाप्रमाणे पूजन करून, त्याला उत्तमोत्तम भोजन नैवेद्य म्हणून दिले जात. भरजरी वस्त्रे पाघरून तो त्या ठिकाणी वावरत असे. देवाप्रमाणे त्याला अनेक पुष्पालकारानी भूषीत करण्यात येई. सर्वांग सुवर्णाच्या अलकारानी भरून गेलेले असे.

हा देव रस्त्याने निघाला म्हणजे एका हातात मुरली तर दुसऱ्यात हुक्का. अनेक भक्त त्याला पाहताच साष्टाग नमस्कार घालीत, अश्रूने त्याचे चरण धुऊन काढीत, त्याचे चरणरज मस्तकावर धारण करीत अगर मुखात घालून सेवन करीत. महिला वर्ग आपली घरातील कामे सोडून, त्याच्या दर्शनाला धावून येत

---

१. आत्मबलिदान केल्याने देवाधिदेव प्रसन्न होऊन मानवाची दु:खे दूर करील, ही भावना प्राचीन काळी होती. जुलमाने एखाद्याला बळी देण्यापेक्षा हा प्रकार निश्चितच श्रेष्ठ समजला जात असे.

असे. आपल्या मुलांना त्याच्या चरणावर धाडून त्याचे आशीर्वाद घेत. या देवाच्या आगमनाची पूर्व वर्दी तुतारीच्या नादाने नगरवासियांना दिली जात असे. देवाधि-देव म्हणून सर्वजण त्याचे स्वागत करीत असत. पण ही देवाची स्वारी हिंडत असताना दहा-बारा शिष्यगण त्याने पळून जाऊ नये म्हणून मागे पहारा करीत असे. हा सर्व शिष्यगण, राजसैनिकांप्रमाणे लष्करी वेशात असे.

## देवाचे मरण वीस दिवसांवर आले

म्हणजे त्याच्या राहणीत फरक केला जाई. चार सुंदर उपवर मुली, पुष्प-देवता, मकादेवता, जलदेवता आणि क्षारदेवता या स्वरूपात त्याच्या सेवेला दिल्या जात व त्यांचा उपभोग तो घेत असे. आता फक्त चार दिवस उरले म्हणजे सर्व तऱ्हांच्या दैवी उपभोगांचा त्याच्यावर वर्षाव होई, राजवाड्यातील सर्व व्यक्ति त्याच्या सेवेत रुजू होत. सर्वत्र नृत्य, गाणी सुरु होत. आनंदोत्सव जोरात चालू होई.

## देवपणाची मुदत भरली

शेवटच्या दिवशी ही सर्व मिरवणूक नदीकिनारी आल्यावर देव, त्याचे हुजरे आणि त्याच्या चार बायका एका नावेवर चढत व ती नांव दुसऱ्या तीरावर डोंगराच्या पायथ्याशी जाई. 'निरोप देणारा पर्वत' हेच त्याचे नामाभिधान पडलेले होते. कारण या ठिकाणी त्याच्या चारही बायका त्याला निरोप देत, मागे रहात आणि हा वर्षभराचा वावराणा देवाधिदेव आपल्या इतर संरक्षक हुजऱ्यांसह मंदमंद पावले टाकीत टेकडी चढण्यास सुरवात करी. ज्या मुरलीच्या नादाने लोकांची मने त्याने आकर्षून घेतली होती, ती मुरली पायऱ्या चढत असताना क्रमाक्रमाने तो मोडून टाकी व अत्यंत जड मनस्थितीत वर चढून जाई. मेक्सिकन लोकांची या प्रकारची मंदिरे जरा उंचावरच असत. शेवटची पायरी चढून तो वर पोहोचला म्हणजे मंदिरांतील पुजारीवर्ग त्याच्यावर तुटून पडे. उचलून त्याला तांदळास्वरूप देवासमोर पालथा निजवीत. एक पुजारी छातीवर खोल जखम करी, तर दुसरा आपला हात आतमध्ये खुपसून, त्या देवाचे काळीज बाहेर काढून घेई व सूर्यदेवाला अर्पण करी. त्यानंतर त्याचे शरीर पायऱ्यांचे खाली आणले जाई. मस्तक तोडून एका भाल्यावर खोचले जाई आणि तळ्याच्या पहिल्या तीरावरील लोकांना त्याचे दर्शन देत.

एक वर्षभर ज्याने देव म्हणून वैभव मिरविले, सुखसोहाळे भोगले, अनेकांच्या पूजाअर्चा घेऊन आशीर्वाद दिले, त्या देवपणाची सद्दी संपली म्हणजे त्याचाच बळी दिला जाई. मानवांच्या देवाविषयी काय रूढि आणि अद्‌भुत कल्पना आहेत, त्याचे हे उत्तम उदाहरण आहे.

पुरुषदेवाचे अर्पण होई आणि महिलावर्गाचे नव्हते असे नाही. मका देवता म्हणून एका कोवळ्या तेरा चौदा वर्षांच्या पोरीचेही याप्रमाणे देवाला अर्पण करण्यात येई तो प्रकार सप्टेंबर महिन्यात होई.

या मुलीची निवड अर्थात गुलाम नोकरातून होई. मकादेवताप्रमाणे तिला भरपूर सजवीत असत. गळ्यात दागिने घालीत, केसांची सजावट करून त्यामध्ये हिरव्या मक्याची अपक्व कणसे भरून देवतास्वरूप बनवीत, त्यावर हिरव्या रंगाची पिसे खोवीत. याप्रमाणे सजावटीने घरोघर त्या देवतास्वरूपाची मिरवणूक काढून भक्ताना दर्शन घडवीत. या उत्सवाच्या पूर्वी सात दिवस अनेक भक्तगण कडक उपवास करीत, रात्रौ ज्या मंदिरात या देवीची मूर्ति असेल तेथे उत्सव समारंभ होई. मंदिरात कलिंगडे, मका कणसे, मिरी, गुलाबफुले व इतर प्रकारची धान्ये यांच्या राशी पडत. अशा मंदिरात मोठ्या मिरवणुकीने या सजवलेल्या देवतेला मोठ्या समारंभाने आणली जाई. मकाकणसे व धान्याच्या राशीवर तिला उभे केल्यावर, मंदिरातील एक पुजारी वस्तरा घेऊन तिजजवळ येऊन मस्तकावरील मक्याची कणसे, हिरवी पिसे ही तिच्या केसांसह कापून घेई व देवीला वाहत असे मंदिरातील सर्व माणसे रात्रभर जागी रहात, नाच करीत गाणी म्हणत.

सकाळी पुन्हा तिच्या मस्तकावर मक्याचा मुकुट व इतर सजावट करून धान्याच्या राशीवर उभी करीत. या ठिकाणी ज्यानी उपवास केलेला असून आपल्या कानातून रक्त काढून बशात साठविले आहे, असे भक्त तिच्या समोर येऊन तिला वंदन करीत व वशीतील रक्त तिजपुढे सरकून काढून अर्पण करीत त्याचप्रमाणे महिलावर्गही आपले रक्त अर्पण करी याप्रमाणे लहानथोर सर्वांनी तिला वंदन केल्यावर घरोघर जात आणि सणावाराचे भोजन करीत पण ती देवता मात्र अन्नाविना तशीच मंदिरात तडफडत असे, तिला पाणीही मिळत नसे.

सायंकाळी सर्व भक्त मंदिरात पुन्हा जमल्यावर देवीचा पुजारी या मानवी स्वरूपाची पूजा करी, धुपारती दाखवी आणि नंतर तिला त्या धान्याच्या राशीवर उताणी पाडून तिचे मस्तक तोडण्यात येई खाली गळणारे रक्त एका भांड्यात धरून, मंदिरातील लाकडी देवीच्या मूर्तीवर, धान्यावर आणि इतर भक्तावर शिंपडण्यात येई. याप्रमाणे त्या देवीचा अंत होई. क्षणभराचे देवत्व मिळाले, पण शेवटी देहाची विटंबना काही टळली नाही. देवासाठी देहार्पण झाले, पण देवाने तिला काय फळ दिले, ते अज्ञातच राहिले आहे.

(Golden Bough, A B Vol II, Pp, 772-77၁ by Frazer)

## चंद्रदेवता

या संस्कृतीमध्ये चद्रदेवतेचे नाव मेझेली (Metztli) असे होते या देवतेचे कार्य दोन प्रकारचे मानलेले होते (१) शेते आणि वृक्ष याची वाढ करणे आणि त्याचे संरक्षण करणे व (२) रात्री अपरात्री भूमीवर प्रकाश टाकणे, शात वातावरण निर्माण करणे, भुतेखेते, दूषित वारे याचे निर्मूलन करणे. याचाच अर्थ असा की, चद्र ही आदिशक्ति जीवनसृष्टीची उत्पत्ति करून तिचे संवर्धन करते. या देवतेची सत्ता पाण्यावर चालते व सागराला भरतीओहोटी तिच्याच आज्ञेने येते तेथील एका चद्रदेवतेच्या मदिराचा पाया ४२६ × १३७ फूट असा आढळून आला आहे (स्पेन्स, पृष्ठ १०६)

## यमदेवता

मिकलन (Mitclan) या देवतेचे स्थान उत्तर दिशेकडे असून त्या बाजूला अन्नाचा दुष्काळ असावा आणि त्यामुळे मानव मोठया सख्येने मृत्युमुखी पडत असलेत. या देवतेचे मुख अकालविक्राळ असून नित्यश मृत्युमुखी जाणारे प्राणी याच देवतेच्या मुखात प्रवेश करीत असतात जे मानव युद्धामध्ये मरण पावले, स्त्रियाचे रक्षण करताना ज्यानी आपले प्राण वेचले आणि प्रसगविशेषी जे महापूर तरून गेले ते सर्व वरूणलोकात म्हणजेच स्वर्गात जातात. परतु त्याव्यतिरिक्त मरण पावणारे जीवात्मे याच देवतेच्या मुखात प्रवेश करतात अशा मानवानी या यमलोकातून निसटून जाऊ नये म्हणून त्याच्याभोवती राक्षसाचा जागता पहारा असतो. (स्पेन्स, पृष्ठ ९६)

## वरूणदेवता

चाचीहुर्वोतिकु (Chachihurvatticue) ही टॅलोक या वरुण 'देवतेची पत्नी होय या देवतेचा पोषाख अतिशय आकर्षक होता गळ्याभोवती रत्नाचा हार घालून त्यामध्ये सुवर्णाचा लोल्क लोंबत असे. माथ्यावर निळ्या रगीत कागदाचा मुकुट निळ्या रगाच्या पिसानी मढविलेला असे. पाढऱ्या शुभ्र खड्यानी मढविलेल्या तोरणानी तिचे नेत्र सजवीत असत. अगावरचे वस्त्र नीलवर्णाचे असून त्यावर पाण्यात वाढणारी झाडे अथवा फुले याची कलाकुसर केलेली असे डाव्या हातात एक फूल आणि उजव्या हातात एक पाण्याचे भाडे असे.

(स्पेन्स, पृष्ठ ११०)

टॅलोक या वरुणदेवतेचे मदिर पिरॅमिडरूपी मदिराच्या शिखरावर असे या देवाची मूर्ति हिरव्या रगाची होती नरमेधानतर प्रेत पुरण्याची जागा जवळच होती हा देव पर्जन्याची वृष्टि करून थकून भागून जाई आणि त्यामुळे त्याची

शक्ति क्षीण होते. त्याच्या गेलेल्या शक्तीची भरपाई करण्यासाठी दर आठ वर्षांनी त्याचा उत्सव भव्य प्रमाणात साजरा होत असे. या वेळी पाच सहा कोवळी लहान अर्भके देखील या देवतेला अर्पण केली जात. या वेळच्या नरबळींची रीत तर अधिकच हृदयद्रावक होती. त्या बालकांना ठार मारून त्यांची हृदये काढून घेतली जात आणि त्याचा नैवेद्य देवतेला दाखविण्यात येत असे. तसेच हृदय काढून घेतल्यावर शरीराचा उरलेला भाग पुरून टाकण्यात येई. या उत्सवाचे वैशिष्ट्य असे की, काही भक्तमंडळी देवालयाजवळील तळ्यामध्ये शिरून पाणसर्प अथवा बेडक्या तोंडात धरून विहार करण्याचा चमत्कार करून दाखवीत. इतकेच नव्हे तर कित्येकदा ह्या प्राण्याना ते गिळूनही टाकीत. मक्याची खीर हा या देवतेचा आवडता नैवेद्य होय. तेव्हा उत्सव समयी मक्याची खीर व मद्य याचा नैवेद्य समर्पण करून भक्तगण रात्रभर जागरण करी आणि नाचगाण्यात रंगून जाई. दुसऱ्या दिवशी पुन: मद्यपान करून सर्व लोक विश्रांति घेत असत. (स्पेन्स, पृ. ७८)

## मकादेवता

शिकोमेकोहुल (Chicomecohualt) या शब्दाचा अर्थ सात सर्प असा केला जातो. या भूप्रदेशात मका हे प्रमुख धान्य असल्याने त्या धान्याच्या नावानेच फलोत्पादन करणाऱ्या धान्यदेवतेला हे नांव प्राप्त झाले असावे. एप्रिल महिन्याच्या दिनांक पाच रोजी या देवतेच्या नावाने वसंतोत्सव साजरा करण्यात येत असे. शेतकरी व भक्तगण आपली घरेदारे साफसूफ करून सुशोभित करीत आणि वेळप्रसंगी रक्ताने सडासमार्जनही करीत. घरातील देव्हारे शृंगारले जात शेतकरीवर्ग जमावाने शेतावर जाऊन तेथून मक्याची कोवळी रोपटी उपटून काढून, त्यांची मोळी बांधून मिरवणूकीने त्यांना आपल्या घरी आणि त्यानंतर लुटूपुटूच्या लढाया होत त्यामध्ये त्या रोपाच्या मोळ्या लुटण्याचा प्रयत्न केला जाई. शेतकऱ्याच्या मुली मात मका भरून टोपल्या या देवतास्वरूपापुढे ठेवीत. त्यानंतर त्यांतून सर्वांना प्रसाद वाटला जाई, काही भाविक शेतकरी हा प्रसाद बीवियाणे म्हणून वापरीत व तसे केल्याने उत्तम पीकपाणी येते अशी त्यांची श्रद्धा होती. प्रत्येक घरटी बहुधा या देवतेची मूर्ति असे. कापणी होऊन नवीन धान्य घरांत आले म्हणजे त्याची टोपली भरून आणि शिगेवर शिजविलेले बेडूक ठेवून ती या देवतेपुढे ठेवल्यावर नैवेद्य समर्पण करण्यात येई. बेडूक ठेवण्याचे कारण ते असे देत की, वरुण देवता टॅलोक ह्याची पत्नी म्हणजे बेडकी होय. तिच्याच सहकार्यामुळे वरुणदेव उत्तम पीकपाणी देऊ शकतो. धान्याचे पीक देऊन थकल्या भागलेल्या भूमातेचा थकवा घालविण्यासाठी व पुनरोत्पत्ति जोमाने करण्यासाठी तिची झिजलेली शक्ति

मरून काढणे अत्यावश्यक असल्याने जलाचे प्रतिक जो बेडूक तो तिला अर्पण करण्यात येत असे.

## ह्या निराळ्या रूढि पहा

पेरु देशात अनेक उपयुक्त वृक्षाच्या ठायी एक एक देवता वास करीत असते, अशी श्रद्धा होती. ही देवता त्या त्या वृक्षाची वाढ करून फुले, फळे मानवाना देते असे ते मानीत. मका हे तेथील प्रमुख धान्य असल्याने त्यानी मका देवता मानलेली आहे, तिला ते 'झारा मामा' म्हणत याप्रमाणे क्रिनोआ-मामा, कोका मामा, अक्सो मामा इ० इतर वृक्षदेवताना संबोधित असत. मक्याची काही झाडे उपटून एकत्र बांधून, त्याला मानवाचा आकार देऊन, मिरवणुकीने शेतकरी घरी आणीत असे. उत्तम उंची कपड्यात ती झाडे गुंडाळून, मक्याच्या गुदामात तीन दिवस ठेवून, ही देवता मक्याचे रक्षण करो अशी प्रार्थना करीत. या देवतेला काही वेळा 'पिरुआ' (Pirua) असे म्हणत.

धान्यदेवतेचे पूजन याप्रमाणे अनेक देशात निरनिराळ्या प्रकाराने केले जात आहे. मलाया हा देश तांदूळ पिकविण्याबद्दल प्रख्यात आहे. तेथील मध्य बोर्निओ भागात क्यान जमात रहाते आणि तांदूळ जास्त पिकावा, नाश पावू नये म्हणून ती अनेक प्रयोग करते भाताची लोंबरे एका काठीने बडवून दाणे खाली पाटीत पडले म्हणजे पाटी झाकून, वरून दोरीने बांधून, तांदळाचे कोठारात आणून ठेवतात. त्याची अशी श्रद्धा आहे की, असे केल्याने धान्य-देवता पाटीत बसून कोठाराचे रक्षण करते काही वेळा लाकडाचे दोन हात बनवून, देवता म्हणून ठेवतात या देवतेचा इतका मान राखला जातो की घरातील गृहिणी प्रत्येक वेळी वापरासाठी धान्य बाहेर काढताना या देवतेची प्रार्थना करते, 'हे कोठार सदैव भरलेले राहू दे, किडामुंग्यानी धान्याचा नाश होऊ नये अगर चोरानी लुटू नये.'

ब्रह्मदेशात करेन जमात, उत्तम पीक यावे म्हणून या केलाह (Kelah) देवतेची प्रार्थना करते, 'ये, धान्यदेवते ये, शेतात ये, तांदळाच्या दाण्यात ये, तू खो नदीतून ये अथवा काव नदीतून, अगर त्याच्या संगमस्थानापासून ये, तू पूर्वेकडून ये अथवा पश्चिमेकडून ये, पक्ष्याच्या स्वरातून प्रगट हो, माकडाच्या ओरडण्यातून प्रगट हो अगर गजराजाच्या सोंडेतून खाली उतर, तांदळाच्या कोठारात असलीस तर तेथून ये आणि शेतातील धान्यात प्रवेश कर.'

बाली बेटात भातशेत कापणीच्या वेळी मालक स्वत सुरुवात करून १०८ काड्याच्या दोन पेंढ्या बांधतो त्यातील एक पुरुष व दुसरी स्त्री म्हणून

तिच्या गळ्यात दागिने घालून, मिरवणुकीने कोठारात आणून ठेवतो सर्व धान्य संपले तरी या धान्यदेवता मात्र विकल्या जात नाहीत. धान्यकोठार पुढील वर्षी भरावे म्हणून तोपावेतो, त्या देवता तेथे ठेवल्या जातात

याप्रमाणे धान्यदेवतेची अनेक देशात स्थापना करून पूजन केले जाते

## पुष्पदेवता

सोशिपली हे पुष्पदेवतेचे या संस्कृतीमधील नामाभिधान होय. फुलावर ज्या पाकोळ्या विहरतात, त्याच आकाराचे या देवतेचे स्वरूप होते परंतु तिला मुखे मात्र अनेक दाखविलेली असत. या देवतेप्रीत्यर्थ वार्षिक जत्रा भरत असे नरबली अर्पण केला जाई आणि देवतेला त्याच्या रक्ताचा नैवेद्य समर्पण केला जाई

(स्पेन्स, पृष्ठ २०३)

## विष्ठादेवता

त्लाझोलेओल (Tlazolteotl) हे या देवतेचे या संस्कृतीतील नाव होय भूतलावरील मानवनिर्मित दुर्गंधी पचविणारी आणि तिचे निर्मूलन करणारी ही एक भूदेवता होय एखाद्या मानवाने भयंकर पापे करून त्याला पश्चात्ताप झाल्यास आणि तो या देवतेला शरण गेल्यास त्याची पापे ती नाहीशी करी. ती कोणाला वैभवही देत असे. पापी मनुष्य आपले पाप धुऊन घेण्यासाठी प्रथम पुरोहिताकडे जाऊन शुभदिवस ठरवून घेऊन त्या दिवशी देवतेची शेणाची मूर्ति बनवीत असे समोर अग्निकुंड पेटलेले असून त्यामध्ये धूपाचा धूर व सुवास दरवळत असे नंतर देवता, कुंड आणि पुरोहित या सर्वांसमक्ष तो प्रायश्चित्त घेणारा मनुष्य आपल्या पापाचा पाढा वाचून काढी व त्याने क्षमायाचनेची भीक मागितल्यावर पुरोहित त्याला सांगत असे, 'तुझी पापे मी ऐकून घेतली त्याचा नाश करण्या साठी देवी इट्सिनेम ज्या वेळी पृथ्वीवर उत्सवसमयी अवतार घेईल, त्या वेळी तू उपवास कर आणि अंतिम दिवशी लहानशा काट्याने आपल्या जिभेवर चार पाळण्या ओढ. तसे केल्याने तुझ्या पापांचा त्वरित नाश होईल'

(स्पेन्स, पृष्ठ १०७)

## उंदीरदेवता

ओमेटेकुली (Ome'cocultı) हे या देवतेचे या संस्कृतीतील नामाभिधान होय एखादा मनुष्य किती दुर्व्यसनी आहे हे दर्शविण्याचे प्रतीक म्हणजेच या देवतेचे पूजन होय दुर्गुणांच्या चढत्या क्रमानीप्रमाणे उंदीर स्वरूपाची ती ती संख्या काढली जाई समजा, एखाद्या ठिकाणी चारशे स्वरूपांची पूजा केली जात असेल, तर तो मनुष्य परमोच्च दुर्गुणी समजला जात असे उंदीर हे आपल्या

अगत्या दुर्गुणांनी सर्वत्र नाश आणि घाण करीत असतात म्हणून त्याचे प्रतीक घेतलेले असावे. ( स्पेन्स, पृष्ठ १०४ )

## पिशाच्चयोनी

या संस्कृतीमध्ये या भूतयोनीलाही स्थान होतेच. प्रसूतीनंतर लगेच एखाद्या स्त्रीला मृत्यु आल्यास तिला ही योनी प्राप्त होते. ही पिशाच्चे परद्वेषी असल्याने आणि त्यांचा संचार रात्रीचा होत असल्याने ती चंद्रदेवतेच्या मैत्रिणी समजल्या जात. त्यांचे चेहरे पांढरे फटफटीत असून त्यांचे हातही लांबच लांब व पावडर फासल्याप्रमाणे पांढरे असत भुवयांवर सोनेरी छटा असून त्या अंगावर मौल्यवान वस्त्र परिधान करीत. त्यांची मंदिरे रस्त्याच्या तिठ्यावर अथवा भर चव्हाट्यावर बांधलेली असत. लहान कोवळी अर्भके हे त्यांचे आवडते खाद्य असल्याने त्यांच्या फिरण्याच्या दिवशी अथवा वेळी माता आपल्या मुलांना एकटे बाहेर सोडीत नसत. कारण एखादे वेळी, ती मुले पछाडली जावयाचा संभव असे या पिशाच्च्यांची भूक भागविण्यासाठी पाकोळीच्या आकाराच्या मक्याच्या पिठाच्या भाकरी करून त्यांना अर्पण करीत असत. ( स्पेन्स, पृ. १३० )

वरील देवताव्यतिरिक्त या संस्कृतीत युद्धदेवता, औषधीदेवता, बुद्धिदात्री देवता, आनंदसमारंभाच्या देवता, भरपूर मासे मिळवून देणारी देवता, पारधीच्या वेळी पुष्कळ पशुपक्षी मिळवून देणाऱ्या देवता इत्यादि अनेक प्रकारच्या देवता मानलेल्या होत्या. वरील देवतांचे सूक्ष्म निरीक्षण केल्यास त्यांचे बव्हंशी भारतीय देवतांबरोबर साम्य आहे असे आढळून येईल.

## मयसंस्कृति

मध्य अमेरिकेमध्ये या संस्कृतीची वाढ प्रथम झाली. पेरु देशाच्या उत्तरेला सुमारे दोनशे मैलांवर ही संस्कृति नांदत होती[1] ही संस्कृति बौद्धिकदृष्ट्या सुधारणावादी होती. त्यांच्या बोली भाषेला 'शिआपस' या नावाने संबोधिले जाई. क्विची, पिपल इत्यादि सहा उपभाषांचा यांत समावेश झालेला होता. मय आणि

१. टीप—अर्नोल्ड टायन्बी, येथील संस्कृतीला एन्डिन अथवा अँडियन ( Andean ) असे म्हणतो, मय संस्कृतीचा नाश सातव्या शतकात झाला युकतेन हे राजधानीचे शहर होते. त्यानंतर चारशे वर्षे मेक्सिकन संस्कृतीची भरभराट होती. तिचा नाश कोर्टेझ याने केला. शेवटी इंकासंस्कृति उदयाला आली तिचा नाश स्पेनचा लुटारू पिझारो याने सन १५३० च्या सुमारास केला आणि पोर्तुगीज राजवट सुरू झाली. ( Study of History, P 52 )

नहुआ या दोन संस्कृति वेगवेगळ्या मानल्या जातात. या संस्कृतींच्या धार्मिक व सामाजिक चालिरीतींची सविस्तर माहिती देणारा पुराणग्रंथ म्हणजे 'पोपल वूह' (Popal Vooh) होय. असे म्हणतात की, या ग्रंथाची रचना सातव्या शतकात झालेली असून त्या वेळी ज्ञात असलेल्या प्राचीन चालीरीतींचा त्यामध्ये अंतर्भाव केलेला आहे. सन १८५४ साली एका इसाई धर्मोपदेशकाला या ग्रंथाची मूळ प्रत आढळली. नहुआ हे नामाभिधान राज्यकर्त्या वंशाला लावले जाई, तर सुधारणावादी लोकांना मय म्हटले जात असे. ही संस्कृति नरमेध करणारी असून काही वेळा लहान मुली जलदेवतेला प्रसन्न करून घेण्यासाठी पाण्यात फेकून देत असत.

## सृष्टीची उत्पत्ति

पृथ्वीच्या उत्पत्तीची कथा या पुराणग्रंथाप्रमाणे अशी आहे. एकदा वायुदेवता हुराकन (Huracan) भूलोक अंधःकाराने वेष्टीत असताना, त्यावरून भ्रमण करता करता 'पृथ्वी पृथ्वी' अशी आरोळी मारता झाला. त्याबरोबर सृष्टीसह भूलोक दृग्गोचर झाला. त्यानंतर हुराकन, गुकुमाश, इमुकेन इत्यादि पाच प्रमुख देवतांनी (या पंचमहाभूतात्मक देवता असाव्यात) असे ठरविले की, भूतलावर प्रथम जलसृष्टि निर्माण करावी आणि नंतर मानव व इतर जीवसृष्टि उत्पन्न करावी. जलसृष्टि व प्राणीसृष्टि तर ठरविल्याप्रमाणे तयार झाली. मानवसृष्टि निर्माण करण्यासाठी त्यांनी लाकूड कोरून काही मानवाकृति तयार केल्या आणि त्या इतरांबरोबर भूतलावर नांदू लागल्या. कालांतराने त्या पाच देवांना असे आढळून आले की, या मानवसृष्टीला उपकारकर्त्या निर्मात्याबद्दल मुळीच आदरभाव राहिलेला नाही, तेव्हा मानवसृष्टीचा आपण विनाश करून टाकावा. उपकारकर्त्या देवाचा विसर पडल्यामुळे मानवांना त्यांच्या कृतघ्नपणाची अतीभयंकर शिक्षा मिळाली. कोणती ती पहा.

## उपकारकर्त्याचे विस्मरण म्हणून शिक्षा

वायुदेवाने जलाशयाला उधाण भरती आणून प्रलयाचा समय आणला. पर्जन्य-देवता कोपून एकसमयावच्छेदेकरून जोरदार वृष्टि सुरू झाली. पक्षीगण माणसांवर तुटून पडला. कोणी माणसांचे डोळे फोडले, कोणी मस्तकावर जोराने चंचुप्रहार चालू केले, कोणी मांसाचे लचके तोडण्यास सुरवात केली, तर कोणी शरीरातील अस्थि बाहेर ओढून काढून त्यांचे चूर्ण करण्यास प्रारंभ केला. अशा प्रकारे देवांच्या अनुज्ञेने मानवांचा सूड घेण्यात प्राणीसृष्टीलाही अतिशय कष्ट पडले. गोठ्यातील गाईगुरे आणि घरातील भांड्याकुंड्यासारख्या निर्जीव वस्तूदेखील त्यांची छीःथू करू लागल्या. कोंबडेकुत्रे म्हणाले, 'हे कृतघ्न मानवांनो, तुम्ही आम्हांला

अतिशय अमानुषतेने वागविलेत, म्हणून आम्ही आता त्याचा सूड म्हणून तुमचे चावे घेत आहोत.' रस्त्यावरील मैलाचे निर्जीव दगड उद्गारले, 'तुम्ही मानवांनी रात्रंदिवस रस्त्यांवरून वाहतूक करून आम्हांला फार त्रास दिलात, तुमच्यासाठी, केवळ तुमच्यासाठीच तुम्हांला नीट मार्गदर्शन व्हावे म्हणून अहोरात्र आम्ही येथे वसून आहोत. तुमच्या हितार्थ आम्ही आरडाओरड करून पुढच्या दगडांना नीट सूचना देत असू. आता तुमच्या कृतघ्नपणामुळे आम्ही तुमच्या अस्थि भरडून त्यांचे चूर्ण चूर्ण करून टाकतो.' इतकेच कशाला घरातील भांडी, वाट्या, पेले, कपबशा इत्यादि वस्तु देखील दांतओठ खात किंचाळल्या, 'सर्वकाळ तुम्ही आम्हांला दुःख दिलेत. सर्व दिवस आमच्या वरील बाजूच्या ओठरूपी कडा हुंगीत, फुंकरीत वसून त्याच्यावरोबर प्रेमीयुगुलासारखे ओष्ठमिलन केलेत. घगघगत्या विस्तवावर ठेवून अगर अतिउष्ण पेये आमच्यामध्ये ओतून आम्हांला तुम्ही जाळलेत, भाजलेत, पोळलेत! ही अघोर कृति करताना आम्हा निर्जीव सृष्टीलाही काही भावना आहेत याची कदापि जाणीव तुम्ही ठेवली नाहीत. आता परमेश्वर जागा झाला आहे. जळण्याची पाळी आता तुमच्यावर आली आहे! भोगा आता आपल्या पापाची फळे!' याप्रमाणे मानवसृष्टीची धूळधाण होताच ती सैरावैरा इतस्ततः पळू लागली. पण जाणार कुठे! सर्वांचाच त्यांच्यावर कोप झाला होता. स्वसंरक्षणार्थ माणसे घरांच्या छपरावर चढताच ती छपरेच मोडून खाली पडली! झाडांच्या माथ्यावर चढण्याचा त्यांनी प्रयत्न करताच ते वृक्षच उन्मळून खाली भुईसपाट झाले. पर्वतांच्या गुहेमधून लपण्याचा यत्न करताच, अहो आश्चर्यम्, ते गुहांचे दरवाजेच खडाखडा बंद झाले! याप्रमाणे कोठेही आश्रय न मिळाल्याने त्या कृतघ्न मानवांनी अखेर जंगलातील महाबलाढ्य आणि शक्तिमान पशूंच्या पोटात विसावा घेतला आणि त्यातूनही ज्यांना जगण्याचा मोह सुटला नाही ते अजूनही रानावनात 'माकड रूपाने' संचार करीत आहेत. या परिच्छेदातील तात्पर्य जितके सोपे तितकेच गहन आहे. आजच्या युगातील सर्व मानवांनी ते आपल्या मनोशिळेवर कोरून ठेवल्यास त्यात त्यांचा फायदाच आहे. (मेक्सिकन पुराण, पृष्ठ २०९).

---

१. टीप—भारतामध्ये श्रीमत् भागवतामध्ये (४।३०–११) अशी कथा आहे की, पुरंजन राजाने यज्ञासाठी म्हणून अनेक अनावश्यक पशूंची (गज, सिंह, वाघ, रेडे इ०) शिकार केली. अर्थात यज्ञीय कार्यासाठी त्यांची हत्या हेतुतः झाल्याने ते पावन झाले, पण अनावश्यक हत्या राजाने केली, म्हणून नंतर त्याचे ज्ञातीबांधवांनी राजाचा सूड घेतला. कोणी पोटात शिंगे खुपसली, कोणी शरीरात नखे रोवली, कोणी चावे घेतले इ० इ० आणि राजाला जर्जर केले. दोन्ही ठिकाणी कल्पनासाम्य एकच आढळते.

या संस्कृतीचे अवशेष दाखविणारे मिटला नावाचे शहर मध्य अमेरिकेमध्ये आहे पूर्वीच्या अनेक वस्तूंची जरी नासधूस झालेली असली तरी सांप्रत तीन पिरॅमिडस्वरूपी देवालये आणि सहा प्रेक्षणीय वास्तु अद्याप सारे बरबाद झालेल्या एखाद्या सरयानिसाप्रमाणे आपल्या कपाळाला हात लावून निर्जीवपणे उभ्या आहेत त्या बोलत नाहीत नुसत्या अश्रु ढाळतात व म्हणतात, 'पहा, पाहिलीत आमची अवस्था! तुम्ही तरी आमच्यापासून धडा घ्या नि शहाणे व्हा!' एका राजवाड्याचा अवशेष १३० X १३० चौ फूट असून प्रवेशद्वारावरील चौरटीचा पाषाण एकसंध नि अठरा फूट लांबीचा आहे तेथील शिल्पाची तुलना साधारणत रोमन ग्रीक संस्कृतीबरोबर केली जाते दुसऱ्या एका राजवाड्याचे खांब मानवाकृति असून तेथील तळघरात योद्धे व नरबळी यांची मस्तके फेकून देण्यात येत होती ही वास्तू चार मजल्यांची असून अनेक लहान लहान खोल्यातून शिल्पकाम कोरलेले आढळते एकूण रचना पाहाता हे देवघर असावे असे मत संशोधक देतात या ठिकाणी पहिला मजला मुख्य पुरोहितासाठी राखून ठेवलेला असून इतर पाहुण्यांची ऊठबस याच ठिकाणी होई दुसरा मजला मंदिरातील शिष्यवर्गाला राहण्यासाठी, तर तिसरा मजला फक्त राजेसाहेब व त्यांच्या कुटुंबियासाठी राखून ठेवलेला होता खोल्यांमधून विश्रांतीसाठी मौल्यवान् चटया होत्या आणि त्यावर वन्य पशूंची कातडी अंथरलेली असत तेथील माणसांना जे अन्न पुरविले जात होत, ते प्रामुख्याने वध केलेल्या पशुपक्ष्यांचे अथवा जाळ्यात पकडलेल्या पाखरांचे मांस असे बरोबर खावयास मक्याची भाकरी असे पेय म्हणून दळलेल्या कॉफीमध्ये मक्याची पूड मिसळून व त्यात पाणी टाकून ते तयार करीत असत कधी कधी मद्य देखील प्यावयास मिळत असे

(स्पेन्स, पृष्ठ २०६)

डॉ पॉल शोलास या जर्मन संशोधकाच्या मते या संस्कृतीमधील सर्व देवतांची नावे समजून येणे फार कठीण असल्याने त्यांना 'ए' पासून 'पी' पर्यंत नावे दिलेली आहेत असे जरी असले तरी देवतांच्या कार्यावरून त्यांची नावे समजणे कठीण नाही त्यांची समजूत अशी होती की, माणूस जर आत्महत्या करून मरण पावला तर त्याला स्वर्ग प्राप्त होतो यासाठी गळफासाची देवता म्हणून 'आटॅब' (Ixtab) मानली होती

**हुन हौ** (Hun Hau)—ही मरणाची देवता होती व तिचे वाहन कुत्रा असे यासाठी शिआप येथील जंगलात राहणारी लकंडन जात, माणसाच्या थडग्यावर कुत्र्याची प्रतिमा ठेवीत असत

**वी कुकुल्कन** (Kukulcan)—हा मयसंस्कृतीमधील प्रमुख देव होय त्याच काही गुण टॅलोक देवाप्रमाणे आहेत याचे नाक हत्तीच्या सोंडेप्रमाणे असून

सर्पांच्या विषारी सुळ्याप्रमाणे तोंडात दोन दात असतात. त्याची प्रमुख खूण म्हणजे हाती मशाल अगर अग्नि असणे. असे जरी असले तरी भूमि, पाणी, हवा, दर्शक म्हणून मका कणीस, मासा व घुबड ही चिन्हे म्हणजे देवाचे प्रतीक मानतात. जन्म-मृत्यूला हाच देव कारणीभूत होतो असे मानतात.

सी देव—आकाशातील तारास्वरूप हा देव असून तो दोरीने खाली लोंबत राहिलेला आहे असे मानतात. त्याच्या चेहऱ्यावर भरपूर अलंकार असून बहुधा तो शुक्रतारा असावा.

डी देव—कुकुलक्न समान असून तो अतिशय वृद्ध, गाल खोलगट झालेले, दंतहीन असतो. चंद्र आणि रात्री याचे प्रतीक हा देव आहे. याची प्रमुख खूण म्हणजे हा डोक्यावर शिंपला धारण करतो.

ई देव—याला घनन ( Ghanan ) नाव असून, धान्यदेवता विशेषत: मकादेवता मानतात. हा तरुण देखणा असून मस्तक लंबवर्तुळाकार असते. या मयसंस्कृतीमधील विशेष प्रकार असा की, या देवाच्याप्रमाणे इतरांची मस्तके असावीत म्हणून मूल जन्म पावल्याबरोबर डोक्याच्या दोन्ही बाजूला फळ्या बांधून कोवळे हाड आहे, तोपावेतो त्याला आकार आणीत व मस्तक मक्याच्या कणसाप्रमाणे लांब दिसावे म्हणून प्रयत्न करीत. फलोत्पादन, भरभराट हा देव देतो.

एफ् देव—हा देव ओळखण्याची खूण म्हणजे याच्या मुखावर उभे-आडवे डाग असत आणि झाईपदेवाबरोबर त्याचे साम्य असे.

जी देव—सर्पाप्रमाणे लांब जीभ आणि ती बाहेर लोंबत असलेली ही त्याची प्रमुख खूण होय. कुकुलकन देवातील काही गुण याच्या अंगी आहेत.

एच् देव—याच्या मस्तकावर माशाच्या खवल्याप्रमाणे खूण असते.

आय् देव— आपल्या मस्तकी ती सर्पाची वेटोळे धारण करते व पाणी, पूर इ० दर्शक ही देवता होय.

के देवता— हा बी देवाप्रमाणे असून तो हुनाब-कु देवाचा पुत्र होय. याने लिहिण्याची कला निर्माण केली. याला वैद्यकीय ज्ञान होते.

एल् देवता—याचे नांव एकचुहा ( Ekchuach ) असून तो प्रवासी लोकांना साहाय्यकारी आहे. त्याचा वर्ण काळा आणि तो वृद्ध आहे.

एम् देवता— एक अहौ (Ek Ahau ) त्याचे नाव असून वर्णाने काळा, लाल ओठ असलेला आहे.

एन् देवता—वर्षाचे दिवस ३६० याची निदर्शक आकृतिचे चिन्ह याचे मस्तकावर दाखवितात. यामुळे हा कालदर्शक देव ठरतो.

ओ देवता—स्त्रीदर्शक देवता असून तिच्या डोळ्यांच्या भोवती भयंकर आठया पडलेल्या असतात. या देवीचे स्वरूप अस्पष्ट दर्शवितात.

पी देवता—बेडकाप्रमाणे याचे स्वरूप असते, पण मस्तकावर एन् देवते-प्रमाणे आकृति असते.

याशिवाय इतर देवताही आहेत.

## शिलालेख मंदिर

पालकूं शहरी हे मंदिर आहे. मंदिराचा पाया ४० फूट उंचीचा व दर्शनी बाजू ७४ फूट लांब व २५ फूट रुंदीच्या असून त्या भागावर सुंदर गॅलरी आहे. या मंदिराच्या बाजूला जपानी बांधणीची तीन सूर्यमंदिरे आहेत. मंदिरातील आतील बाजूच्या चारी भिंतींवर शिलालेख कोरलेले आहेत. एका सूर्य-मंदिरात तर इतका अंधार आहे की, जेवढा प्रकाश दरवाज्याच्या फटीतून आत जाईल तेवढाच. मोठमोठया चौकोनी पाषाणांच्या एकावर एक रचून जरी भिंती बांधलेल्या असल्या, तरी बारीकशा सुईचा प्रवेश देखील दोन भिंतीमधील सांध्यामध्ये होणार नाही, इतक्या त्या रचताना एकजीव करून रचलेल्या आहेत.[१]

(स्पेन्स, पृष्ठ १८५)

या संस्कृतीचे वैशिष्टय म्हणजे ह्या ठिकाणी जोगिणींसाठी मठ बांधलेले असत. पेरुदेशीय संस्कृतीमध्येही असे मठ असत. तेव्हा त्यांचे वर्णन त्या ठिकाणी पहावे.

भारतीय देवतांचे जे एकमेव आवडते पेय—सोमरस—तेही या देशात तयार केले जात असे. सोमवेलीला ते ओकूली ( Octli ) असे म्हणत व तिला देवता-स्वरूप मानीत असत. ऋग्वेदामध्ये ( १०–३४–१ ) सूक्तात सांगितले आहे की, सोमवेल ही मोजवान पर्वतावर ( हिमालय पर्वताचे एक शिखर ) वाढते, आणि वायुदेवता तिचे संवर्धन करते. ऋग्वेद ( ९–८६–२४ ) सूक्ताप्रमाणे ही सोमवेल गरूडाने प्रथम आकाशातून आणली. त्याचा रस काढून त्यामध्ये पाणी, दूध, तूप व जवाचे पीठ घालून मिश्रण तयार करून त्याचा देवाला नैवेद्य दाखवीत असत. नंतर पुरोहितवर्ग ते पेय पीत असे. या पेयाची धार जेव्हा एका भांडयातून दुसऱ्यात पडे, तेव्हा ती चांदीसारखी चकाकत असे. ते पेय अतिशय पुष्टिकारक व श्रमपरिहारक असे. सोमवेलीचा रस पूर्वी पिवळ्या रंगाचा असे. एक संशोधक तर असे म्हणतो की, सोमवेलीच्या एकूण चोवीस जाती आहेत.

---

१. टीप— हीच बांधणी पद्धति भारतामधील काही मंदिरातून आणि जावा-सुमात्राकडील शिल्पकला मंदिरातून पाहण्यात येते.

इराणीयन झरतुष्ट्र संस्कृति या सोमाला ह्वोमा या नावाने संबोधिते. ऋग्वेद काळाच्या अंती ही पिवळी सोमवेल चंद्रप्रकाशात तोडून पाणी आणि दूध यामध्ये धुतली म्हणून हिचे चंद्राशी साम्य दर्शवू लागले. म्हणजेच चंद्रदेवता पिवळ्या पिवळ्या कलांनी वर्धन पावते आणि सागरातील जलाला भरती-ओहोटी या क्रियेने शुद्ध करते ( ज्याप्रमाणे सोमवेलींना धुऊन शुद्ध करतात ). यास्तव चंद्रदेवतेला सोम असेही एक नामाभिधान प्राप्त झाले आहे. अशा या सोमवेलींचे अस्तित्व अमेरिकेतील संस्कृतीला माहीत होते. ( जेम्स धार्मिक कोश, ११–६८६ )

या सोमरसासाठी इंद्राने अनेकदा भांडणतंटे उपस्थित करून त्या पेयाचा पहिला मानकरी कोणी व्हावे हे ठरवून घेतले आहे. तो कथाभाग असा : सोमरसाचा पहिला मानकरी कोणी व्हावे, हा प्रश्न स्पर्धा घेऊन सोडवावा असे देवानी ठरविले. वरुण व इंद्र या दोघांनाही सारखीच त्या पेयाची अभिलाषा होती. त्या दोघाची पळण्याची शर्यत लागली. वरुण त्यात सदोदित आघाडीवरच राहिलेला पाहून इंद्राने त्याला हरविण्यासाठी कपटनीतीचा अवलंब करावयाचे ठरविले. अतः त्याने वरुणाला असे सुचविले की, आपण दोघेही एकदमच इच्छितस्थळी जावे व त्या मोबदल्यात वरुणाला सोमाचा दोनतृतीयांश भाग मिळावा व उरलेला भाग इंद्राला मिळावा. परंतु वरुणाला यशाची खात्री असल्याने तो या तडजोडीस मान्य होईना. तो पुढे पुढे पळतच राहिला. शेवटी इंद्राने वरुणाला तीनचतुर्थांश भाग देण्याचे कबूल केल्यावर दोघांमध्ये तडजोड झाल्याने दोघेही इच्छितस्थळी एकसमयावच्छेदेंकरून पोहोचले.

ग्रीक पुराणात सोमसदृश देवाचा उल्लेख सापडतो. बॉकस हे त्या देवतेचे नाव होय. तो लोकांना द्राक्षांचा रस पाजून दुःखीजनाची दुःखे नाहीशी करी. प्रचंड शक्तीची कामे करण्यास या रसाच्या सेवनाने जोम चढतो. लढाईच्या वेळी याच्या प्राशनाने सैनिकांना स्फूर्ति मिळते. त्यांचे बाहू शत्रूच्या नरडीचा घोट घेण्यासाठी स्फुरण पावतात आणि त्यामुळे विजय मिळतोच, अशी त्याची समजूत असल्याने लढाईच्या वेळी त्याचा फार मोठ्या प्रमाणावर उपयोग होई.

वेदाचार्य पंडित श्रीपादशास्त्री सातवळेकर, ' विवेक ' साप्ताहिकाच्या एका अंकात पुण्यातील सन १९६० च्या सुमारास झालेल्या वाजसनीय यज्ञाबद्दल टीका करताना म्हणतात, ' सुमारे ५० वर्षांपूर्वी जर्मन संशोधकांनी भारतीय मर्यांच्या आणि वाङ्मयाच्या मदतीने व मार्गदर्शनाने काश्मीर आणि हिमालय पर्वताचा जंगली भाग धुंडाळून ही सोमवेल शोधून काढली होती. त्यानंतर काश्मीर नरेशा-बरोबर करार करून दरसाल हजारो मण, ही वनस्पति त्यांनी जर्मनीमध्ये आयात रून त्यांपासून रसायने तयार करून, कोटयवधी रुपयाची कमाई केली. या

वेलीच्या रसामध्ये फॉस्फरसचा अंश असल्याने कोणत्याही वस्तूला हे रसायन चोळले असता उत्कृष्ट चकाकी येत असे.'

मेक्सिको प्रदेशाच्या वायव्य विभागात एक वन्य जमात राहात असे त्याच्या देवता पुढीलप्रमाणे.

### तोकोसी-नकवे

धान्य व भाजीपाला देवता. भूप्रदेशाची मालकीण आणि देवताची माता मानली जाई.

### टेटलुलिरिकेता

गर्भधारणा आणि प्रसूतीची देवता या संस्कृतीमधील अनन्यसाधारण समजूत अशी की, पृथ्वीच्या चार मुख्य दिशाना तांबडा, निळा, पांढरा व पिवळा अशा चार रंगाच्या चार सर्पांची वस्ती असून ते त्या त्या दिशेकडून भूतलावर पर्जन्य आणतात. त्यांची नावे अनुक्रमे नालिबामी, वापरियामा, केणीमोका व हौस्टे-ऱुपुरी ही होत. अंतराळामध्ये स्वर्गदेवता वास करीत असून तिचे वस्त्र निळ्या रंगाचे आणि त्यावर तारकांची कलाकुसर केलेली आहे. भूतलावरील सर्व स्थावरजंगम वस्तु ती देवता आपल्या पायाच्या पंज्यामध्ये धरून ठेवते.

### इंकासंस्कृति

या प्रदेशातील तिसरी भारतीयसदृश संस्कृति म्हणजे इंकासंस्कृति होय. या संस्कृतीचा जोरदार प्रसार मेक्सिकोच्या दक्षिणेला असलेल्या पेरु देशात झालेला होता व्हेगा या नावाचा एक स्पॅनिश लेखक म्हणतो की, या संस्कृतीच्या अनुयायांच्या घरी निरनिराळ्या देवताचे पूजन होत असे.

'Their objects of Gods were trees, mountains, flowers caves, large stones, pieces of jasper and animals etc Worship of stone Gods was universal, as in ancient Palestine'

(Spence, page 292)

याचा सारांश असा की, पाषाणाच्या मूर्तिव्यतिरिक्त वृक्ष, वेली, पुष्पे, पर्वत यांची प्रतिरूपेही त्यांच्या पूजनात होती. पर्वताचा एखादा अद्भुत सुळका दिसला म्हणजे त्याला देव मानून त्याचे पूजन होत असे. (भारतामध्येही या प्रकाराने पूजन घडत असे.) त्या जडसृष्टीने जगन्नियत्याची-थोराण्याची अवज्ञा केली, यास्तव त्याला ते तसे पाषाणरूप प्राप्त झाले अशी त्यांची समजूत होती

### गुरुकुल संस्था

या संस्कृतीचे वैशिष्ट्य म्हणजे जोगी व जोगिणींची मठसंस्था हे दाखविता येईल. मुख्य मंदिराच्या आश्रयाखाली या संस्था चालत असत. मठामध्ये फक्त

शुद्ध आचरण करणाऱ्या तापसी लोकांनाच राहाण्यास परवानगी असे. राजाने निमंत्रण केल्यासच ते मठाबाहेर पडत आणि संभाषण करीत. इतर वेळी बाहेर जाण्याची त्याना अनुज्ञा नसे. ते अंगावर काळे कपडे वापरीत व जाडयाभरडया अन्नांवर आपली उपजीविका करीत. त्यांचा दैनंदिन कार्यक्रम अतिशय कष्टमय असे. देवाच्या मूर्तीच्या समोर रात्रभर बसून मंत्रपठण करावे लागे. देवतेसाठी पहारा करावा लागे. काहीजण विद्यार्जनासाठी मंदिराच्या परिसरातील वनश्रीमध्ये जाऊन बसत. भारतीय संस्कृतीमधील ' गुरुकुल ' संस्थांमधून ज्याप्रमाणे लहान मुले विद्यार्जनासाठी पाठवीत, त्याचप्रमाणे या मठातही लहान मुलांची विद्यार्जनाची सोय केलेली असे. अशा शिकाऊ मुलांना ते ' यनौती ' असे म्हणत.

काही लहान मुलीही सूर्यदेवतेच्या सेवेला वाहिलेल्या असत आणि त्याही मठामधून राहात. तेथे राहात असताना स्त्रीव्यवस्थापिकेच्या कडक शिस्तीखाली त्याना आपले आयुष्य कठावे लागे. या मुलींना शिक्षणासह इतरही कामे करावी लागत. त्यामध्ये मठातील अग्निकुंडावर जागता पहारा ठेवणे, मंदिरासाठी लागणारे कापडाचे पडदे तयार करणे, त्यावर उत्तमोत्तम कलाकुसरीची कामे करणे, मुख्य धर्मगुरूचे कपडे तयार करणे इत्यादि कामांचा समावेश केलेला होता. यनौतीप्रमाणेच त्यांचाही आयुष्यक्रम कडक तापसी वृत्तीचाच होता. इतका की, जर एखाद्या तरुण कुमारिकेने तेथील नियमाचा भंग केला तर तिला जिवंत पुरून टाकीत. इतकेच नव्हे तर तिच्या संबंधांत प्रियकराला देखील सुळावर चढवीत असत एवढ्यावरच हे प्रकरण थांबत होते काय ? छे हो ! त्या प्रियकराचा सबंध गावच्या गाव नेस्तनाबूत करून टाकीत. असे होते तेथील धार्मिक मठातील पवित्र वातावरण !

## ख्रिश्चन देवदासी पद्धति

प्राचीन काळी भारतामध्ये ज्याप्रमाणे देवदासी पद्धति रूढ होती, तशी ती अन्यदेशीही होती. ( देवीकोश भाग ३, पृ. २९८–९९ पहा ) खिस्तापूर्वीची ती पद्धति अजून पूर्ण लोप पावलेली नाही, असे सांप्रतच्या खिस्ताच्या ' ननरी ' किंवा ' कॉन्व्हेंट 'मधील व्यवस्था पाहिली म्हणजे म्हणावेसे वाटते. रोमन कॅथॉलिक पथामध्ये आजही प्रत्येक घराणे एक मुलगी देवाला वाहते व तिला नन अथवा जोगीण करण्याची प्रथा रूढ आहे. ननरीमध्ये मुलगी टाकली म्हणजे ती जवळजवळ बंदीवासातच पडते बाहेरच्या जगाबरोबर तिचा संबंध तुटतो आणि तिजवर संन्यासी जीवन लादले जाते. तेथील व्यवस्थापिका ' मदर सुपीरिअर ' हिचा तिजवर अनियंत्रित अधिकार चालतो. लहानशा अपराधाबद्दल, वाटेल तेवढी मोठी शिक्षा देण्यात येते. चांगली वस्तु पाहावयाची नाही, चांगले गाणे ऐकावयाचे नाही, चांगल्या वस्तूचा लोभ धरावयाचा नाही, इ० अनेक निर्बंध

तिजवर लादले जाऊन, स्त्रीसुलभ जीवन खुरटवून टाकण्यात येई. तसे न केल्यास ईश्वरभक्तीमध्ये व्यत्यय निर्माण होतो असे त्यांचे सांगणे असते.

या बंदिवासाचा परिणाम शेवटी स्त्री-जीवनावर होतो आणि अनेकजणी तेथून पळून जातात, बाहेर आल्यावर विवाह करतात आणि शाळा-कॉलेजांमध्ये विद्यादान करतात, पण ते स्वातंत्र्य राखून अशा पळून जाणाऱ्या मुलींची संख्या वाढतच आहे. मग त्यांचे वय २० असो, ३० असो वा ५० असो. सन १९६६ साली एकट्या अमेरिकेत ननरीमधून पळालेल्या स्त्रियांची संख्या तीन हजार सहासे होती व दिवसेंदिवस ती वाढतच आहे.

परक्या मिशनऱ्यांनी पूर्वकाली व आजही भारतीयांच्या अनेक रूढींवर कडक टीका करून, हिंदुधर्माविषयी सुशिक्षितांमध्ये घृणा उत्पन्न करण्याचा प्रयत्न चालू ठेवला आहे, शाब्दिक हल्ले चालू आहेत, पण स्वतःच्या पायाखाली मात्र काय जळते आहे याची दाद कधी मागे घेतली नाही व आजही घेत नाहीत, हेच वरील उदाहरणावरून दिसून येते.

काही ख्रिस्ती धर्मगुरूंना या चालीबद्दल घृणा वाटू लागली आहे. सन १९६३ साली डिसेंबर महिन्यात बेल्जियम प्रीस्ट कार्डिनल स्यूनेन्स याने 'दि नन इन द वर्ल्ड' या नावाचे पुस्तक प्रसिद्ध केले असून त्यामध्ये तो म्हणतो, 'नन्सचा समाज पुष्कळ अंशी एका किल्लेकोटात बंदिस्त असलेला वाटतो. या किल्ल्याभोवती खंदकावर पूल टाकण्याची त्यांना भीती वाटते. तेथे ननचे आयुष्य संकुचित होते. बाहेरच्या आजच्या जगाशी तिचा संपर्क तुटतो व त्यातच धार्मिकता आहे अशी धर्ममार्तंडांची श्रद्धा आहे. त्याबाहेर पडल्या तर मानव-जातीची अधिक सेवा करू शकतील. जगातील सर्व नन्सनी कॉन्व्हेंटच्या बाहेर पडावे व जगात अधिक उपयुक्त आयुष्य वेचावे, असे त्याने शेवटी आवाहन केलेले आहे.'

भारतामधील देवदासीची पद्धति मात्र कायद्याने संपुष्टात आली आणि यांची छुप्यारीतीने चालू रहावी हे आश्चर्य नव्हे काय?

(अमृत, जुलै १९६९ मधील श्री. ग. वि. केतकरांचे लेखाधारे)

नन्सचा समाज किल्लेकोटात बंदिस्त असतो, यास्तव हजारो स्त्रिया तेथून पळून जाऊन वैवाहिक जीवन जगतात हे आपण पाहिले. सांप्रत युरोप-अमेरिकेमध्ये संपन्नतेमुळे उपभोग प्रवृत्तीला बहर आलेला असल्याने संन्यस्त जीवन पत्करण्यास तिकडे मुलीच मिळत नाहीतशा झाल्या असून धार्मिक मठसंस्था बंद पडण्याची भीती निर्माण झालेली आहे. यावर उपाय म्हणून कॅथोलिक धर्मगुरूंनी भारतामधून सुमारे दोन हजार केरळीय मुलींची तिकडे आयात केली आहे. अशी

तक्रार इंडियन नॅशनल चर्चचे अधिकाऱ्यांनी केलेली आहे. आजवर तिकडे भारत सरकार अगर इतरांनी लक्ष दिलेच नाही. पण आता लंडन येथील ' संडे टाइम्स ' या प्रमुख पत्राने आगस्ट १९७० मध्ये याला जाहीर वाचा फोडून एका तेथून पळून आलेल्या मुलीची कहाणीच प्रसिद्ध केली. आश्चर्य असे की, भारतातील कॅथोलिक पंथीय प्रमुख धर्मगुरु कार्डिनल मेढास यांनीच ही निर्यात मान्य केली आहे. आंतरराष्ट्रीय पातळीवर बंदुकांची चोरी करणाराला ' गन रनिंग ' म्हणतात, तर संडे टाईम्सने या प्रकाराला ' नन रनिंग ' असे नाव दिले आहे. 'युरोपातील खिस्ती धार्मिक संस्था जगविण्यासाठी या केरळीय मुलींचे आयुष्य बरबाद होणार आहे. सारांश या प्रकाराने का होईना तिकडे देवदासीची पद्धती चालूच आहे.

(श्री. प. ग. पेंडसे, लंडन, केसरी ४-९-७०, तरुण भारत २०-८-७०).

## इंकासंस्कृतीचे सूर्यमंदिर

या भूप्रदेशावर इंका म्हणजे सूर्यसंस्कृतीचा जास्त पगडा होता. तेव्हा एका सूर्यमंदिराची माहिती आपण करून घेणे इष्ट ठरेल. कुझको (कुश-को) या राजधानीच्या शहरी हे मंदिर ८० फूट उंच टेकाडावर बांधलेले होते. टेकाडावर मंदिरे उभारण्याची चाल भारताप्रमाणे अनेक देशांत आढळून येते. याचे कारण एक तिबेटियन लामा धर्मगुरु असे देतात की, 'The Lord must reside high above his creation, besides only those would visit the temples, who are prepared to undergo the hardships of a steep ascent. The way to the Lord is not a very easy way.'

भावार्थ असा की जग निर्माण करणारा देव त्याच्या निर्मितीपेक्षा उंच भागी राहणेच योग्य होय. अशा देवाचे दर्शन घडण्यापूर्वी पायऱ्यांची चढण चढण्याचे श्रम त्याने घेतले पाहिजेत, कारण परमेश्वरप्राप्तीचा मार्ग हा सोपा नाही, हे भक्ताला उमजले पाहिजे.

मंदिराचा परिसर अतिशय विस्तृत होता आणि त्यामध्ये अनेक लहान लहान महदेवतांची लहान-लहान मंदिरे होती. मुख्य मंदिराची बाहेरील बाजू बगीच्याने सुशोभित केलेली असून त्यामधून हॉटने नावाच्या नदीचा प्रवाह झुळझुळ वाहत होता. पण हा बगीचा कशाचा होता म्हणता आपण? नेहमीच्या फुलझाडांचा आणि वृक्षराजींचा समजता की काय? छे, छे! मेक्सिको ( माक्षिका-सुवर्ण ) या सुवर्णाच्या देशातील प्रमुख सूर्यदेवाच्या सभोवार सुवर्णाची झाडे तयार केलेली होती. त्यांवर रत्नांनी बनविलेले प्राणी, किडे, वेली, फळे, फुले इत्यादींच्या प्रतिकृति लटकत होत्या. इतकेच कशाला? या बागेत कुदळी, फावडी, कात्री इत्यादि बागकामाची अवजारेही होती, ती सुद्धा सोन्याचीच बर का! मुख्य सूर्यमंदिराच्या भिंती अंतर्बाह्य सुवर्णाच्या पत्र्यांनी मढविलेल्या होत्या. या मंदिराची

माहिती, ते स्पॅनिश लोकांनी उध्वस्त केल्यानंतर ज्याने प्रत्यक्ष मिळविली तो स्क्विअर नावाचा प्रवासी लिहितो की, 'मंदिराच्या सुवर्णाच्या पत्र्याचे तुकडे अनेक घरामधून जपून ठेवलेले मी स्वतः पाहिले. कागदाच्या जाडीइतपतच त्या पत्र्याची जाडी होती.' (स्पेन्स, पृष्ठ २६०)

## सूर्यदेवतेचा उत्सव

या सूर्यदेवदेतेचा वार्षिक उत्सव दिवाळा आणि हेमंत ऋतूंमध्ये साजरा करण्यात येई आणि तो वरील सूर्यमंदिराच्या ठिकाणीच होत असे. कुझको या शहराच्या पूर्व बाजूला एक मोठी टेकडी होती. त्या ठिकाणी हा उत्सवाचा कार्यक्रम होत असे, कारण सूर्य या टेकडामागूनच प्रभातकाळी उदय पावत असे. सूर्योपासक भक्तमंडळी पहाटे आपल्या घरातून बाहेर पडून सर्व पूजासाहित्यासह पर्वतराजीकडे चालू लागत. यज्ञीयशस्त्र (चाकू), शेंगडी, लाकुडफाटा, मका आणि कोकाझाडाची पाने (भारतातीय विड्यांच्या पानांप्रमाणे ही पाने चघळली जात असत) उत्तम वस्त्रांत बांधून व या सर्व वस्तु लामा नावाच्या घोड्यावर लादून ते इच्छितस्थळी जात असत. तेथे गेल्यावर लाकडाच्या ढिगाऱ्याचे एक कुंड रचले जाई व सूर्य उगविण्याच्या वेळी ते पेटवून देत. लामा नावाच्या त्या घोड्याला चाकूने ठार मारून त्याच ढिगाऱ्यावर त्याला ठेवण्यात येई. ज्वाला प्रज्वलित झाल्या आणि धुराचा लोट आकाशात गेला म्हणजे सूर्याला झाकून टाकीत. सर्वत्र शांतता असे. अशा वेळी तो देखावा भयानक परंतु रमणीय वाटे. धुराच्या पार्श्वभूमीवर सूर्यबिंब धूसर व मलीन झालेले दिसे, परंतु दृष्टीला मोहक भासे. तेथील शांतता फक्त नाल्याच्या प्रवाहाच्या खळखळाटाने भंगत असे. काही वेळाने सूर्यदेवता वर आल्यावर भक्तमंडळी त्या यज्ञकुंडाला प्रदक्षिणा घालीत व त्या घालताना जळलेल्या लामाच्या कातडीमधून केस ओढून काढून घरोघर घेऊन जात. त्याचे केस तोडताना ते प्रार्थना करीत, 'हे सृष्टिनियंत्या सूर्यदेवा आणि गर्जना करणाऱ्या देवा, तू नेहमी तरुण राहावेस म्हणून हे लामारूपी खाद्य तुला अर्पण केलेले आहे त्याचा स्वीकार कर. मानवाच्या संख्येत नेहमी भर घालीत जा आणि त्यांना शांततामय सुखाचे आयुष्य लाभू दे.' लामाला बळी देण्याची या प्रकारची एकूण २० ठिकाणे होती.

वाढत्या सूर्याचा दुसरा सूर्योत्सव जून महिन्यात साजरा करीत आणि तो नऊ दिवस चालत असे. त्या वेळी सूर्योपासक तीन दिवसाचे कडक उपोषण करीत. त्या तीन दिवस घरात अजिबात विस्तव पेटविला जात नसे. चवथ्या दिवशी सर्व सूर्योपासक कुझको येथील एका मोठ्या चौकात जमून उगवत्या सूर्याचे स्वागत करीत. याप्रमाणे सूर्यदर्शन झाल्यानंतर सर्वजण मिरवणुकीने त्या टेकडीवरील मंदिरात जाऊन त्या ठिकाणी कुंडातील पहिला अग्नि बाहेर काढण्यात येई.

सूर्यभिंगाद्वारे नवीन अग्नि पेटवून ते कुंड प्रज्वलित करीत आणि त्यात लामाची आहुति टाकण्यात येत असे. त्या नवीन अग्नीला धान्य, फुले व प्राणी यांचीही आहुति अर्पण करण्यात येई. धूपदीप जाळून त्याला ओवाळण्यात येई. नंतर प्रसाद घेतल्यावर सर्वजण घरोघरी परतत. (स्पेन्स, पृष्ठ ३१२)

## पेरुदेशातील रोगनिवारणार्थ उत्सव

सप्टेंबर महिन्यात घडणाऱ्या या उत्सव-समारंभाला सितुआ (Situa) उत्सव म्हणतात. गावातील आणि आसपासच्या सर्व रोगराईची हकालपट्टी आणि संकटाचे निवारण व्हावे, हा प्रमुख हेतु या उत्सव-समारंभाचा असतो. साधारणतः या महिन्यात येथे पावसाळ्याला सुरवात होते व रोगराई सुरू होते. त्याच्या निवारणासाठी म्हणून हा समारंभ घेतला जातो. चंद्राच्या पहिल्या दिवशी प्रत्येक घरातील काही माणसे उपवास करतात. रात्री दोन तऱ्हेच्या मकेच्या पेजी तयार करतात, त्यापैकी एक साधी तर दुसरी पाच ते दहा वर्षांच्या मुलांच्या डोळ्या-जवळून काढलेले रक्त मिसळलेली असते. गावातील ज्येष्ठ माणसांच्या घरी रात्री जमल्यावर, उपवास करणारे स्नान करतात आणि रक्ताची पेज, मस्तक, तोंड, छाती, हात व पाय यांना चोळतात. असे केल्याने अंगातील दुबळेपणा अथवा अशक्तपणा निघून जातो, ही भावना असे. घरातील प्रमुख कर्ता पुरुष त्यांतील एक टिळा उंबरठ्याला लावतो. सूर्यदेवतेचा पुजारी याप्रमाणे पहाटे पूजन करून, टिळे लावून सूर्य उगवताच सूर्याची प्रार्थना करीत, 'गावातील सर्व रोगराई आणि संकटे तुझ्या किरणांबरोबर गावाबाहेर जावोत.' नंतर साधी पेज घेऊन ते उपवास सोडीत.

इतके होत आहे तो मंदिरातून प्रमुख पुजारी हातात भाला घेऊन बाहेर येई. या वेळी तो स्वतःला सूर्याचा दूतच समजे. शरीरावरील उंची झगा, कमर-पट्ट्याने बांधलेला असून, हातातील भाला अनेक रंगांच्या पिसांनी मढविलेला आणि सुवर्णाच्या कंकणांनी सुशोभित केलेला असे. भाला फिरवीत फिरवीत हा दूत धावत खाली उतरे आणि मध्यावर दुसरे चार दूत उभे असत तेथपर्यंत जाऊन, भाल्याने त्यांच्या भाल्यांना स्पर्श करी. त्यांना आज्ञा देई की, त्यांनी पुढे पळत जाऊन रोगराईच्या राक्षसाला गावाबाहेर घालवून द्यावे. हे चार दूत चार दिशांनी गावातील प्रमुख रस्त्यांनी जात असता, घरोघर लहानमोठी माणसे आनंदाने ओरडून त्यांचे स्वागत करीत, त्यांच्या झग्याला हात लावीत व म्हणत, 'सर्व रोगराई नष्ट होवो, परमेश्वरा, आमच्यावर पुन्हा दुसरे वर्ष पाहण्याची कृपा कर, तुझे अनंत उपकार आहेत.' झग्याला हात लावल्यावर, देवदूत पुढे गेला म्हणजे ते तोच हात मस्तक, तोंड, हात, पायांवरून फिरवीत (भारतीय भक्त देवाचे तीर्थ घेतल्यावर अगर देवाच्या आरतीवर हात फिरविल्यावर याचप्रमाणे

नंतर कृति करीत असतो, हे साम्य लक्षात घेण्यासारखे आहे ). हे चार देवदूत गावाबाहेर गेल्यावर, तेथे दुसरे तयार असलेले दूत त्यांना भेटत आणि तो दुःखे व संकटे घेऊन गावापासून चारपाच मैल गेल्यावर, तो भाला तेथेच रोवून, नदीवर स्नान करून परत येई. देवदूत गावाबाहेर जात असताना लोक आनंदाने बेहोष झालेले असत. हातात मशाली घेऊन नाचत असत. मशाली एकमेकांना भिडवीत आणि 'आमची सर्व दुःखे नाहीशी होवोत,' अशा आरोळ्या देत असत.

गिनी, गोल्डकोस्ट या भागात सन १८४४ साली एका इंग्रज प्रवाशाने या प्रकारचे उत्सव पाहिल्यावर वरीलप्रमाणे वर्णन लिहून ठेवलेले आहे. दुःख-हरणाचे दोन प्रकार व्यक्तिशः अगर सामुदायिक असतात व वरील प्रकार हा सामुदायिक प्रकारात मोडतो. पेरूमधील जनता सूर्य उपासक असल्याने, आपला भार त्यांनी सूर्यदेवावर घातलेला दिसतो.

संकट निवारणार्थ वरीलप्रमाणे सामुदायिक उत्सव-समारंभ, ( १ ) पॉइंट बरो, अलास्का येथे 'तुना' ( Tuna ) या भूतपिशाच्चाची हकालपट्टी, ( २ ) पश्चिम आफ्रिका भागात टोगोलँड येथील अडकलू पर्वतावरील यात्रा, ( ३ ) क्वीन्सलंडमधील मोलोंगा देवाची यात्रा, ( ४ ) तिबेटमधील ल्हासा शहरातील 'जलनो' देवाची यात्रा इ० प्रमाणे आचरले जातात. उत्सवाचा प्रमुख हेतु हाच की, संकटाची हकालपट्टी व्हावी. ( फ्रेझरकृत गोल्डन बाऊ ग्रंथावरून )

## चंद्रदेवता

एका भव्य मंदिरात चंद्रदेवतेची मूर्ति एका भव्य चांदीच्या पत्र्यावर रेखाटली होती. तिला ते 'कायचा' देवी असे म्हणत. प्रार्थनेच्या वेळी इंका घराण्यातील स्त्रिया त्या मूर्तीच्या सभोवार वर्तुळाकार अशा बसत. इंद्रधनुष्याची सप्तरंगी भव्य कमान तेथे उभारलेली असून सुवर्णरेखांकित छटा सर्वत्र कोरण्यात आलेल्या होत्या. मंदिरातील सर्व पूजासाहित्याची पात्रे सुवर्णाचीच होती. एका दालनात चांदीचे भले मोठे वारा राजण भरून त्यात आहुतीसाठी धान्य होते. जलप्रवाहदेखील आकर्षक वाटावा अशा पद्धतीने इकडून तिकडे खेळविला होता. तो सुद्धा चांदीच्या नळ्यांनी ! अलोट संपत्तीचा या देवमंदिरात कसा वसा सदुपयोग केलेला होता हे खरोखर आजच्या पिढीने पाहण्यासारखे आहे. आजचे 'सेवेकरी' म्हणविणारे अनेक पुजारी आणि मालक देवस्थानचे उत्पन्न कसे गिळंकृत करता येईल याचाच विचार करतात. त्यांनी यातून अवश्य बोध घ्यावा. असो. एक स्पॅनिश प्रवासी पेड्रो पिझारो याने मंदिरातील ही अलौकिक नि अभूतपूर्व दौलत संपदा 'याचि देही याचि डोळा' पाहिल्याचे आपल्या प्रवासवर्णनात

नमूद करून ठेवलेले आहे. पण देवतानाही मृत्यु असतो की! नवीन स्पॅनिश राजवट आल्यावर तेथील संपत्ती लुटली गेली आणि देवताच्या मूर्तीही लंपास झाल्या. आता तेथे पाहावे तो प्रमुख इसाईपंथीय चर्च आपला पाढरा झगा घालून उभे असलेले दिसते. (स्पेन्स, पृष्ठ २६२)

या संस्कृतीचे पंचांग चंद्राच्या गतीवर आधारलेले होते. वर्षाचे ३६० दिवस बारा चंद्रांमध्ये निभागले होते आणि त्यांची नावे पदार्थोत्पत्तीच्या कालावर आधारित होती.

(१) ल्हान वाढता चंद्र......साधारणत: जानेवारी महिना.
(२) मोठा वाढता चंद्र......फेब्रुवारी महिना.
(३) पुष्पवर्धक चंद्र......मार्च महिना.
(४) जुळ्या धान्य वणव्याचा चंद्र......एप्रिल महिना.
(५) मुर्गीचा चंद्र......मे महिना.

याप्रमाणे क्रमाने जमीन फोडणारा चंद्र, पाणीपुरवठा करणारा चंद्र, पेरणीचा चंद्र, उत्सवाचा चंद्र, आणि शेवटी सूर्योत्सवाचा चंद्र अशी अनेक नावे डिसेंबर महिन्यापर्यंत होती. (स्पेन्स, पृष्ठ २६६)

## तितिकाका मंदिर

हे मंदिर काओटी बेटामध्ये असून मुख्य भूमीपासून सहा मैल लांब आहे. इतरांप्रमाणे हे सुद्धा उध्वस्त झालेल्या स्थितीमध्येच पाहावयास मिळते. मार्गावर एक ४०×१०×५ फूट या आकाराचे दगडी बांधणीचे तळे असून त्यातील पाणी झिरपवून त्याचा शेतीला उपयोग करून घेतात. मुख्य मंदिर सात गाळ्यांचे असून १८३ × ८० चौरस फूट आकाराचे दगडी बांधकाम व त्यावर प्लॅस्टर केलेले आहे. त्यामध्ये एकूण ३५ दालने असून फक्त एकच दालन घडीव पाषाणाचे आहे. अंतर्गृहात दोन प्रशस्त दालने असून दरवाज्यासमोरील भिंतीवर लहान लहान कोनाडे आहेत. ह्यामध्ये त्या काळी मूर्ति मांडून ठेवीत असत. चिमु पर्वताच्या पठारावर याप्रमाणेच एक भव्य कलाकृति ८००×४७०×२०० फूट या बांधणीची आढळून आली आहे. (स्पेन्स, पृष्ठ २७१)

## धान्यदेवता

अन्नधान्य आणि वृक्षाचे संवर्धन करणारी ही देवता होय. आजदेखील ब्राझील प्रांती ही देवता मानली जाते व तिची पूजाअर्चा केली जाते. पेरुसंस्कृतीत हिला माता या नावाने संबोधिले जात असे. ज्या जड पदार्थांबरोबर या देवतेचा

संबंध येई, त्या त्या पदार्थाच्या नावापुढे 'मामा' हा देवतावाचक शब्द जोडला जाई. जसे, अकसूमामा–वटाटामाता; सरामामा–मकादेवता; कोकामामा–कोका वृक्षाची देवता इत्यादि. यापैकी सरामामा ही प्रमुख मानली जाई. कारण मका हे त्या देशातील प्रमुख धान्य होय. या सरामामाची मूर्ति खडकात कणीस-रूपाने कोरलेली असे अथवा मक्याच्या कणसाचे ताटवे करून तीच मूर्ति म्हणून पूजीत. नवीन वर्षी पुन्हा नवीन मूर्ति बनविली जाई. अशी मूर्ति तयार झाली म्हणजे तीन दिवसपर्यंत तिच्यावर कडक नजर ठेवण्यात येई आणि नंतर पूजनाच्या वेळी पुरोहित तिला प्रश्न करी, 'वर्षभर राहाणार की नाही?' 'होय' असे उत्तर मिळाले तर तिची राखण केली जाई, पूजन केले जाई आणि नकारार्थी उत्तर मिळाल्यास त्या देवतेचा नाश करून दुसरी मूर्ति तयार करण्यात येई.

(स्पेन्स, पृष्ठ २९५)

## जलदेवता

या संस्कृतीत जलाशय, तळी, सरोवरे यांचेही पूजन होत असे. वर जो तितिकाका मंदिराजवळील तळ्याचा उल्लेख आला आहे, त्याच तळ्याचे पूजन केले जात असे. हे तळे सृष्टिकर्त्यानेच उत्पन्न केले आहे, ही भावना सर्वत्र असल्याने ते अतिशय पवित्र मानले जाई. तळ्याच्या काठावर निळसर पाषाणाची मत्स्याकृति पण मानवी मस्तक असलेली जलदेवतेची मूर्ति होती. दुसरी एक सर्पाकृति होती. या देवता मानवाना भरपूर पाणी-पुरवठा करतात अशी त्यांची श्रद्धा होती. स्पॅनिश लोकानी या मूर्तींचा नाश करून टाकला आणि या 'आयत्या बिळात' मेरीच्या मूर्तीचा 'नागोबा' येऊन बसला. (स्पेन्स, पृष्ठ २८८)

## मयहुएल देवता

ही पूर्वी एका शेतकऱ्याची पत्नी होती. एके वेळी अशी हकिकत घडली की, ती शेतामध्ये बसली असता, तिला एक उंदीर दिसला. त्याला मारण्याचा प्रयत्न करता तो निसटला, पण पुन्हा पुन्हा तिच्याभोवती फेऱ्या मारू लागला. असे करीत असता प्रत्येक वेळी जवळच असलेल्या 'मगे' (Maguey) झाडाला तो कुरतडत असे. तिच्याकडे पाहून हसल्यासारखे करी, जणू काय प्रणयचाळाच तो करीत असावा. त्या बाईने झाडातून बाहेर स्रवणारा रस एका कमंडलूमध्ये जमा करून घरी आली आणि नवरा-बायको तो भरपूर प्याली. त्याचा परिणाम असा झाला की, त्यांच्या काम-भावना प्रदिप्त झाल्या आणि एकमेकाचे एकमेकांना अधिक आकर्षण वाटू लागले. जे आपणांस प्रिय ते देवालाही प्रिय म्हणून तो रस त्यांनी देवालाही अर्पण केला. देव त्यांच्यावर प्रसन्न झाला आणि मयहुएल ही रसायनाची देवता बनविली व पतीला पुष्प देवता बनविली.

या देवतेचे चित्र रंगाटताना नग, मगे वृक्षाखाली सर्प व काळव या-यावर बसलेली, वृक्ष फुलांनी बहरलेला असे असते

## कोटलींक्यू देवता

मेक्सिको येथील नॅशनल म्युझिअममध्ये या देवतेचा सुमारे आठ फूट उंचीचा पुतळा ठेवण्यात आलेला आहे मेक्सिको शहर हे पूर्वी आस्तिक वरियाची राजधानी होती आणि स्पॅनिश लोकांनी तिचा सपूर्ण नाश केला तरी या देवतेचा पुतळा नतर सापडला व साप्रत तो म्युझिअममध्ये ठेवण्यात आलेला आहे. हा पुतळा म्हणजे सर्व देवतांची माता मानलेल्या देवतेचा आहे या पुतळ्याच्या भव्यपणावरून आणि गुहागुहतींच्या अनेक शिल्पाकृतींवरून असे मानण्यात येते की, ही पक्क एकाच देवीची आकृति नसून, विश्वासंबंधीची गती अगर उत्पत्तीची अनुक्रम-पद्धति यामध्ये दाखविलेली आहे मेक्सिकन लेखक फर्नांडिस यांचे वर्णन करतो, ते असे की, 'या देवीचा झगा म्हणजे जणू सर्पांच्या वेटोळ्याचा बनलेला असून मानवाच्या उत्पादनशक्तीचे ते प्रतीक होय तिच्या अगावर मानवाची मुंडकी दाखविली आहेत व जीवन मरणांची जणू ती सागडच आहे. मागील बाजूस शिळांनी मढविलेल्या तेरा चामड्याच्या वाद्या दाखविल्या असून त्या स्वर्गाच्या प्रतीक होत तिच्या गळ्याभोवती मानवी कातडी गुडाळलेली आहेत. त्यावर हाताचे पजे आणि मानवी हृदयाचे ठसे आहेत मानवांनी नेहमी बलीदानाला तयार असले पाहिजे, याचे ते सूचक चिन्ह होय यामुळेच विश्वाची सचलन गती कायम राहील व देनदिन आपली कामे करू शकतील. अगदी वरील बाजूस सृष्टिकर्ता देव आपल्या जोगीदारिणीसह वास करीत आहे सारांश, या देवतेचे हे स्वरूप म्हणजे सृष्टीच्या उत्पत्ति विनाशाचे असून, सर्व काही ही आदिमायाच कारणीभूत होय असे दर्शविले आहे[1] '

( Mexican Mythology by Ireno Nicholson, P 86 )

## तोनतझिन देवता ( Tonantzin )

ही एक मातृदेवता होय पूर्वी तेनामुका गावी आस्तिक वदीय, या देवतेचे पूजन करीत या देवीचे नेत्र मोत्याने मढविलेले असत. अगात शिंपल्यांनी मढविलेला झगा असून त्यावर फुलांच्या माळा असत. हातामध्ये झाडू असे. वैद्यकीय व्यवसाय करणारे, सुईणपणा करणारे यांची ती पुरस्कर्ती होती.

---

१ टीप— या स्वरूपाची तुलना कलकत्ता येथील भारतीय काली देवीच्या मूर्तीबरोबर करता येईल.

### ठिकोमेकोटल देवी ( Chicomecoatl )

माणसाचे पोषण करणारी नागकुळातील एक दयावान स्त्री देवता जल-पुष्पांनी तिला अलकृत करीत व हातामध्ये सूर्य-चिन्हांकित ढाल ही वापरीत असे. हिची तुलना कोटलीक्यू देवीबरोबर करतात. या देवीपेक्षा आणखी कमी प्रतीच्या देवता हिच्या सगतीत असत.

### सिऊकोटल

ही त्यातील प्रमुख असून शुभ्रवस्त्रे धारण करी. असे जरी असले तरी भावी सकटे, दुःखे अगर युद्धे यांची आगाऊ सूचना, ही रात्रौ विलाप करून ओरडून लोकांना देत असे. तिचे तोंड अर्धे लाल आणि अर्धे काळे रंगविलेले असून, मस्तकी पिसाचा मुकुट वापरीत असे. ( ही भारतातील हाकामारी देवी-बरोबर साम्य दर्शविते. )

### टाकोलटेउटल

ही भूदेवता, फलोत्पादन करणारी असून, हिच्या ठिकाणी काही चेटकिणींचे गुणधर्म वास करीत असत. चित्रामध्ये ती झाडूवर बसलेली असून हातात सर्प धरलेला आहे.

### दोरागांठीशास्त्र

स्पॅनिश लोक या प्रदेशात येण्यापूर्वी येथे बरेचसे सख्याशास्त्राचे व्यवहार दोरागाठी पद्धतीने करीत असत. दोऱ्याचे अनेक रग आणि त्यावर अनेक क्रमाकाच्या गाठी मारल्या जाऊन पूर्व संकेतानुसार एकाच्या मनातील हेतु दुसरा जाणू शकत असे. जसे, काळा दोरा घेऊन त्याला चार गाठी मारून तो पाठविला म्हणजे ज्याच्याकडे तो दोरा येई तो समजून चुके की, हा दोरा पाठविणारा गृहस्थ एका गावाहून चार दिवसांनी निघणार आहे. तसेच पाढरा दोरा व त्याला दहा गाठी असल्या म्हणजे दुसरा समजे की, हा दोरा पाठविणारा इष्टस्थळी पोहोचल्यावर दहा दिवसांनी बड सुरू होणार आहे. ज्याला हा खुणेचा दोरा मिळे त्याला जर त्या बडात भाग घ्यावयाचा असेल तर लाल दोऱ्याला एक गाठ मारून तो निरोपाचे उत्तर देई आणि जर तो बडात सहभागी होऊ इच्छित नसेल तर निळ्या दोऱ्याला एक गाठ मारून तो आपला नकार कळवी. या पद्धतीला ते 'क्वीपॉस' असे म्हणत. परतु कालातराने हे दोरे आणि दोरागाठीची पद्धतही स्पॅनिश राजवटीत बंद पडली आणि ती कालरूपी समुद्राच्या अगदी तळाशी जाऊन तिचे नामोनिशाणसुद्धा राहिले नाही.

( स्पेन्स, पृ २७८ )

वरील अनेक देवतांव्यतिरिक्त दुसऱ्याही काही देवता या संस्कृतीत होत्या. हुचाका म्हणजे ग्रुवडदेवता. हिची अनेक स्वरूपांत ग्रामदेवता म्हणून पूजा होई. हिचे स्वरूप म्हणजे लहान लहान गोल पाषाण असत अथवा काही ठिकाणी रेघोट्या काढून वेडीवाकडी मानवाकृति रेखाटलेली असे. या देवतेचा प्रमुख उद्देश शेतीची राखण करणे हाच असल्याने मार्गात अनेक ठिकाणी तिची स्थापना केली जाई. त्यांची अशीही समजूत होती की, या देवतेच्या पूजनाने कालव्यातील पाणी आटून न जाता त्यांच्या शेताला पाणीपुरवठा होईल. हेरनानदिल् ॲर्व्हन्टोना या स्पॅनिश गृहस्थाने या सर्व मूर्ति फोडून टाकल्या आहेत. (स्पेन्स, पृष्ठ २१४)

वरील देवताविवेचनात अशी शंका येणे साहजिक आहे की, भारतातील शक्तिस्थानांची माहिती ज्या विपुल प्रमाणात या ग्रंथात दिली गेली आहे, त्या मानाने या पश्चिमगोलार्धातील माहिती फारच कमी आहे. मला ही गोष्ट कबूल आहे. माझे म्हणणे इतकेच की, प्राचीन काळी आदिशक्तीची स्वरूपे सर्व देशांत मोठ्या भाविकतेने पूजिली जात होती, हे या प्रकरणातील त्रोटक टाचणावरूनही कळण्यासारखे आहे. संपूर्ण वर्णन करणे हा मूलत: हेतूच नव्हता. पण कालांतराने इसाई आणि इस्लाम संस्कृतींचा पगडा जगातील इतर देशांवर पडून ते सर्व देश या ना त्या संस्कृतीच्या अंमलाखाली गेले. भारत हा असा एकच देश आहे की, ज्याने आक्रमकांबरोबर यशस्वी टक्कर देऊन आपली संस्कृति काही प्रमाणात तरी टिकविली! इसाई आणि इस्लाम या दोन्ही संस्कृतीत स्त्रीदेवतांना मान नसल्याने, किंबहुना त्या संस्कृतीत मूर्तीपूजाच नसल्याने त्या त्या देशांतील जुनी शक्तिस्थाने नष्ट झाली आणि नवीन उत्पन्न होऊ शकली नाहीत. भारतात मात्र जुनी स्थाने टिकून राहिली आणि संस्कृतीही मूर्तिपूजक असल्याने नवीन स्थाने उत्पन्न झाली, अजूनही होत आहेत. साहजिकच भारतात शक्तिपूजेचे महत्त्व आज जितके आहे, तितके इतर देशात नसल्याने, त्यांच्या स्थानांची माहिती कमी प्रमाणात असणे स्वाभाविकच आहे.

## अमेरिकेतील हिंदु मंदिर

दिनांक ११ सप्टेंबर १८९३ साली शिकागो येथे भरलेल्या सर्वधर्म परिषदेत कषायवस्त्र विभूषित संन्याशी भारताचा प्रतिनिधी म्हणून बोलावयाला उठला आणि 'अमेरिकेतील माझ्या बंधूंनो आणि भगिनींनो' असे आत्मीय भावनेने ओथंबलेले शब्द मुखातून बाहेर पडताच, सभागृह टाळ्यांच्या कडकडाटाने निनादून गेले. स्वामींचे ते शब्द म्हणजे पूर्वापार चालत आलेल्या भारतीय संस्कृतीच्या विराट अनुभवाचा तो आविष्कार होता.

'भारतीय तुम्हाला पापी म्हणावयाला तयार नाहीत. तुम्ही अमृताचे पुत्र आहात. या जगात पाप म्हणून काही नाही. पाप कोणते असेल तर मानवाला पापी म्हणणे हेच पाप होय. तुम्ही आम्ही सर्वशक्तिमान आत्मे आहोत. नित्य, शुद्ध, बुद्ध महान आत्मे आहोत. उठा, जागे, व्हा, आणि स्व-स्वरूपाचा विकास करण्याचा महान यत्न करा.' पापापासून मुक्त होण्याचे अभयाचे असे आश्वासन आजवर त्याना कोणी दिलेले नव्हते. त्याच्या धर्ममार्तंडानीही असा महान संदेश त्याना ऐकविलेला नव्हता. स्वामी विवेकानंदाच्या या सत्यवेधी वाणीमुळे, त्याच्या धर्मभावना जागृत झाल्या, ईश्वरी शक्तीचे, आत्मशक्तीचे त्याना दर्शन झाले. कान टवकारून ऐकलेले स्वामींचे मधुरशब्द हृदयसंपुटात खोलवर रुजले आणि भारतीय वेदान्त व तत्त्वज्ञान परम आदराचा विषय झाला.

संत ज्ञानेश्वरानी म्हटले आहे,

'इवलेसे रोप लावियेले द्वारी। वेलू तयाचा गेला गगनावरी॥'

तीच स्थिती स्वामींनी रुजविलेल्या शब्दाची झाली. स्वामी विवेकानंद आणि त्याचे गुरुबंधु शारदानंद, अभेदानंद व तुरीयानंद यानी परिषदेनंतरही वेदान्त आणि भारतीय तत्त्वज्ञान याच्या परंपरेवर प्रकाशझोत टाकण्यासाठी, वादळी दौरा करून, अनुकूल वातावरण निर्माण केले. अनेक जिज्ञासूंना जवळ घेऊन त्यांचे शंकासमाधान केले. वेदान्त हा एखादा धर्मसंप्रदाय नसून, तो एक जीवनदर्शन आहे, अशी व्यापक प्रतीती त्याना घडविली. कोणत्याही धर्माचा अनुयायी वेदान्ताचा स्वीकार करू शकतो आणि त्यामध्ये धर्मपरिवर्तनाचा कोणताही संबंध नाही. याची खात्री झाल्यावर, विज्ञान युगात वावरणारे पण आत्मशांतीच्या लाभासाठी अंधारात चाचपडणारे उध्वस्त मनस्क अमेरिकन लोक या मार्गाकडे आकर्षित झाले आणि त्याचा परिणाम अनेक वेदान्त केंद्रे स्थापन करण्यात झाला.

स्वामी विवेकानंदांनी या कार्याला शुभ मुहूर्त म्हणून सन १८९४ साली न्यूयॉर्क येथे वेदांत सोसायटी स्थापन केली. सन १९०० साली सॅनफ्रान्सिस्को येथे दुसरे केंद्र सुरू केले. अभेदानंदाच्या एका युरोपियन शिष्याने कॅलिफोर्नियातील सॅंटाक्लारा काउंटीमध्ये शांति आश्रमासाठी १६० एकर जागा दिली. स्वामी तुरीयानंदानी कामास सुरुवात केली. मौंट हॅमिल्टनच्या पूर्व उतारावर अडीच हजार फूट उंचीवर असलेले हे स्थान गर्द वनराजीने वेढलेले होते. आपल्या बारा शिष्यासह स्वामींनी तेथे दि. २–८–१९०० रोजी कामास सुरुवात केली. अनेक संकटे सोसून, त्या निर्जन भूमीत शांतीचा आश्रम वसविला. ध्यान-चिंतनाच्या द्वारा अनेक अमेरिकन या आश्रमात आत्मिक शांतीचा उपभोग घेत आहेत. स्वामी

निगुणातीतानद यानी पुढे सॅनफ्रान्सिस्को येथे वेदान्त मंडळासाठी तीन मजली वास्तु सन १९०६ साली बाधून त्याचे नाव 'हिंदु मंदिर' असे ठेवले पण दुर्दैव असे की, शाति सदेश देणाऱ्या या स्वामींचा दि. १०-१-१९१५ रोजी एका प्रवचन प्रसगी स्थानिक धर्मवेडयाने बॉब टाकून देहान्त केला. स्वधर्मासाठी स्वामींनी देहार्पण केले असेच म्हटले पाहिजे.

स्वामी अखिलानदानी सन १९२८ साली प्रॉव्हिडन्स (ऱ्होड आयलड) आणि सन १९४१ साली बोस्टन येथे वेदान्तमडळाची स्थापना केली. सन १९३० शनेश्वरानदानी शिकॅगो येथे, सन १९२५ साली स्वामी प्रभावानदानी पोर्टलड (ऑरेगान) येथे, व सन १९३० मध्ये हॉलिवुड येथे केंद्राची स्थापना केली. सन १९३८ साली विविदिशानन्द स्वामी यानी वॉशिंग्टन येथे केंद्र चालू केले. या प्रमुख केंद्राशिवाय इतर ल्हानसहान उपकेंद्रे अनेक आहेत. आपला उद्योग-धदा साभाळून असख्य अमेरिकन जनता या केंद्राच्या मार्गदर्शनाचा लाभ घेत आहे. दैनंदिन कार्यात व्यग्र असणारी ही जनता आश्रमात येऊन साधनेतही व्यग्र होते, हे दृश्य पाहिल्यावर कोणत्याही सत्वसपन्न भारतीयाला आनदाचे भरते आल्या विना राहाणार नाही. भारतीय तत्त्वज्ञानाचे अमरत्व यामध्ये साठविलेले आहे.

अमेरिकन लोकसख्येच्या मानाने हे कार्य अल्प वाटण्यासारखे आहे. पण मानव हा 'अमृतस्य पुत्र' म्हणजे त्याला प्रयत्नाने अमृतत्व प्राप्त करून घेता येते. काही थोडयाच्या आत्मबलावरच, बहुताची जीवन नौका अधर्माच्या तुफान दर्यातून पार नेता येते, असेच भगवान श्रीकृष्णाचे वचन आहे.

'स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्'

## आधुनिक अमेरिकेतील कृष्णशक्तीचा अवतार

हरे राम हरे राम, राम राम हरे हरे।
हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥

अमेरिकेमधील सॅनफ्रान्सिस्कोसारख्या प्रसिद्ध शहरी सांप्रतकाळी वरील हरिधून जर ऐकू येऊ लागली, तर कोणत्या भारतीयाचे अतःकरण प्रेमाने उचबळून आल्याविना राहील? साप्रत अशी धून ऐकू येते हे सत्य आहे. याचे कारणही उघड आहे.

अमेरिकेत विपुल भौतिक समृद्धी असली, नव्हे दिवसेंदिवस ती वाढतच असली, तरी अतर्मन असमाधानीच राहिले आहे. मानसिक समाधान मिळविण्या-साठी एल्. एस्. डी. सारखी मादक पेये, गाजा, भाग, अश्लिल वाङ्मय व चित्रपट जरी नित्य वाढत असले, तरी या सर्वांमध्ये त्यांना ते समाधान मिळत

नाही, हे पूर्णपणे अनेकांना समजून आलेले आहे आणि यासाठी हिप्पी म्हणून ओळखले जाणारे हजारो तरुण-तरुणीही या मार्गाकडे आकर्षिले जात आहेत, हेही सत्य आहे. स्वामी भक्तिवेदांत या नावाच्या भारतीय धर्मप्रचारकाने तेथे 'आंतरराष्ट्रीय कृष्णचेतना समाज' या नावाची संस्था स्थापन केलेली आहे. अनेकजण या संस्थेचे सभासद झालेले असून ते आपल्याला 'साधक' या नावाने संबोधतात.

त्यांची दिनचर्या ब्राह्मणाप्रमाणेच आहे. ते दररोज प्रातःकाळी उठून, पितांबर धारण करून कृष्णकीर्तन करतात. आठवड्यातून तीन दिवस तर हे सायंकाळीही कृष्णकीर्तनात दंग होतात आणि अनेकांनी तो आनंद लुटावा म्हणून उपदेश करतात. कीर्तनानंतर प्रसाद वाटला जातो. प्रत्येक रविवारी प्रीतिभोजन होते. जेवणात भारतीय पद्धतीचे पदार्थ वाढले जातात. त्यांनी विधिपूर्वक वैष्णव धर्म स्वीकारला असल्याने मांस, मदिरा इतकेच काय पण सिगरेट चहा, कॉफी देखील घेत नाहीत. या सभासदांनी नावेही भारतीयच धारण केलेली आहेत. जुलै महिन्यात जगन्नाथपुरीच्या रथयात्रेप्रमाणे एक सप्ताह रथोत्सव करतात. समुद्रकिनारी रथ आणल्यावर त्यातील मूर्ति रथाखाली घेऊन ही भक्तमंडळी, समुद्राच्या वाळवंटात हरिभजनी तल्लीन होऊन नाचू-गाऊ लागतात. याप्रमाणे श्रीकृष्णभक्तीचे महिमान चंद्रकलेप्रमाणे वाढते आहे.

वाचकहो, खरे सांगा, हे वाचल्यावर आपल्या मनात आनंदाच्या गुदगुल्या होत आहेत की नाही ? भारतीय संस्कृतीचे पुनर्जीवन घडत असलेले पाहून मन आनंदाने डोलते किंवा नाही ? गीतेमधील श्रीकृष्णाचे वचन 'यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत' हे सत्य आहे की नाही ! ज्या देशात धर्माची ग्लानी जास्त, तेथेच हा भगवान श्रीकृष्णाचा अवतार आहे किंवा नाही ! या सर्वांचे उत्तर आपण होकारार्थी द्याल, अशी माझी खात्री आहे आणि यासाठीच भारतीय संस्कृति अमर आहे, हे त्रिकालाबाधित सत्य आहे.

गेल्या दहा वर्षांत अमेरिकन सामाजिक जीवनात योगमार्गाने एक महत्त्वपूर्ण स्थान मिळविलेले आहे. कु. मारशिया मूर ही तेथील प्रसिद्ध योगिनी आहे. या विषयावर तिने दोन ग्रंथ प्रसिद्ध केले असून, अशा वाङ्मयाला तिकडे अतिशय मागणी आहे. प्राचीन काळी योगाचरण करणाऱ्या आत्म्यांनी जणू तिच्या शरीरात प्रवेश मिळविला आहे, या भावनेतून तिची भाषणे ऐकण्यासाठी खूप गर्दी उसळते. सात वर्षांपूर्वी या योगिनीने बोस्टन शहरी एक अध्यात्मविद्येचा वर्ग चालविला होता. त्यातील अनेक विद्यार्थी आज स्वतंत्रपणे वर्ग चालवून, कृष्णभक्तीचा प्रचार करीत आहेत. पुनर्जन्म, भविष्य, अध्यात्म या विषयांवरील

पुस्तके लाखोंनी खपत आहेत व सूज्ञ लेखक या वृत्तीचा अभ्यास-विचार करीत आहेत

अमेरिकन जनता आपल्या चर्चमधील औपचारिक जीवनाने उबगली आहे आणि यासाठीच आपल्या पारंपारिक भौतिक मूल्याचा त्याग करून, अध्यात्म जीवनाकडे वळत आहे, हे खरोखर स्पृहणीय आहे योगशिक्षण घेणारी एक अमेरिकन गृहिणी म्हणते—

योगामुळे शरीराला भरपूर व्यायाम मिळतो जप, ध्यान, प्राणायाम यांनी स्वतःवर पूर्ण कबजा प्रस्थापित करता येतो मनावर आणि शरीरावर नियंत्रण ठेवल्यावर, ब्रह्माच्या लहरीवर तरंगत असल्याची आत्मानुभूति येते आपल्या चेतनाशक्तीचा विस्तार होतो, प्रणवादिशक्तींचा विकास होतो आणि अखेर समाधीचे सौख्य अनुभवता येते 'हेच खरे मनाचे समाधान व पूर्ण अक्षय शांति होय' आमचे हे इवलेसे रोपटे विस्तार पावणार आहे, असे निश्चितपणे म्हणता येईल

(सा हिंदुस्थानमधील डॉ हेमेन्द्रनाथ बॅनर्जी यांच्या लेखाधारे)

अथातो धर्मजिज्ञासा । भारतीय संस्कृतीमधील हे एक सूत्र असून हेच सांप्रत आधुनिक अमेरिका म्हणत वाटीस लागत आहे

हार्वर्ड विद्यापीठातील प्रा डोनाल्ड सावत (सप्टेंबर १९६९) भारतात आलेले असून, गुरु नानक यांच्या धर्मतत्त्वाचा अभ्यास करीत असून त्यांचे म्हणणे असे की, 'अमेरिकेतील युवक तेथील धर्मतत्त्वांना कंटाळलेले असून, नव्या धर्माकडे चातकासारखे डोळे लावून बसलेले आहेत भारत हे त्यांचे आशास्थान असून, धार्मिक व अध्यात्मिक आचार विचारासंबंधी ते सारखे प्रश्न विचारीत असतात येथील धर्मासंबंधी त्यांची जिज्ञासा वाढत असून, ती पुरी करण्यासाठीच ते भारताच्या दौऱ्यावर आलेले आहेत'

अशा जिज्ञासू मानवाच्या इच्छा पुऱ्या करणे हेच भारतीय धर्ममार्तंडांचे कर्तव्य असून, ते त्यांनी पार पाडले पाहिजे. भारतीय संस्कृतीची श्रेष्ठता यापेक्षा दुसरी कोणती असणार ?

जय भारत । जय भारतीय संस्कृती ।

---

# पूर्व गोलार्धातील देवतांचे स्वरूप

## भारतीय संस्कृतीचे धाडसी प्रचारक

चीन, ब्रह्मदेश, कंबोडिया, जपान, जावा, सुमात्रा व पॉलिनिशिया इत्यादि भारताच्या पूर्वेकडील भागाचा समावेश या प्रकरणात करण्याचे योजिले आहे भारतीय संस्कृतीचा विस्तार या भागातून होण्यापूर्वी काही स्थानिक संस्कृति तेथे नांदत होत्या यात संदेह नाही असे चीनच्या संस्कृतीचा काल ख्रिस्तपूर्व तीन सहस्र वर्षांचा धरला जातो. एलम अथवा अर्केडिया प्रांतापलीकडील तरीम दरीमधून हा वंश पूर्व तुर्कस्थानमार्गे चीन देशात जाऊन, पीत नदीच्या काठा काठाने पूर्वेकडे सरकून शासी, होनान या प्रांतात स्थायीक झाला भारतीयांप्रमाणेच त्याना पूर्वीच्या तद्देशीय वन्यजमातींबरोबर झगडे करावे लागले संस्कृतिप्रसार करावा लागला आणि मगच ते केंद्रस्थानी सत्ता प्रस्थापित करू शकले.

भारताचा प्राचीन इतिहास श्री आर. के मुकर्जी ह्यानी लिहिलेला आहे व तो विशेषत सांस्कृतिक दृष्टिकोनातून लिहिण्यात आलेला असल्याने भारतीय संस्कृतीचा विस्तार वरील भूप्रदेशातून केव्हा आणि कशाप्रकारे झाला याचे धावते दर्शन त्यानी आपल्या ग्रंथातून घडविले आहे इसवी सनाच्या पहिल्या शतकात माणसाची दाटी झाली असावी आणि चरितार्थाच्या सोयीसाठी अन्य ठिकाणी स्थलांतर करणे जरूर झाल्यामुळे इसवी सन ७५ साली प्रथमच काही भारतीय व्यापार करण्यासाठी या भागात गेले, बंगालमधील टोळ्या ब्रह्मदेश, सिलोनकडे गेल्या अशोकवंशीय लोक व कलिंगदेशीय लोक जावासुमात्राकडे गेले. गुजराथ व दक्षिणेकडील काही लोक ब्रह्मदेशातील इरावती नदीच्या जवळील प्रदेशात गेले आणि व्यापार करून माया जोडण्यास त्यानी प्रारंभ केला सन ७८ साली तर गुजराथमधून वीस सहस्र लोकांनी त्या भागात स्थलांतर केल्याचे इतिहास सांगतो स्थलांतर केलेल्या लोकात अनेक ब्राह्मण कुटुंबे होती क्रमाक्रमाने या 'भटानी' आपले पाय या देशाच्या ओसरीवर पसरले आणि राज्ययंत्रणाही हळुहळु आपल्या हातात घेतली.

याच वेळी बौद्धभिक्षूनी धर्मप्रसारास्तव अनेक देशात प्रयाण करून धर्माचा प्रसार चालू केला त्यांच्या या कार्यात त्याना रूपच यश मिळाल्याने काही काळ तरी या धर्माची चलती अनेक प्रदेशातून होती* तिसऱ्या शतकात

* सन ६५ साली काश्यप मातंग, मिंग-टीचे राजदरबारी प्रथम उपस्थित झाला आणि त्याने अनेक भारतीय ग्रंथ राज्याला भेट दिले. पुढे त्याची भाषांतरे झाली.

# ब्रह्मदेश, सयाम, कंबोडिआ यामधील प्राचीन महत्त्वाची शहरे

१ अलामराव ख्मेरवंशीय राजधानी, ब्राह्मणी राज्य होती

२ अकोरथाम कंबोडिआची राजधानी, स्थापना सन ८०२

३ अकोरवॅट ख्मेरकंबोडियाची राजधानी, सूर्यवर्मन (२ रा) याने सन ११२२-५० मंदिर बांधून त्यामध्ये विष्णूमूर्ति म्हणून स्वतःचीच प्रतिकृति बसविली

४ अयोध्या सन १३५० साली ख्मेरवंशीय राजपुत्र उत्ताग याने या शहराची स्थापना केली अतिशय सुंदर शहर म्हणून वर्णन मिळते सुमारे ४०० वर्षे राजधानीचे वैभव या शहराने उपभोगले

५ कौलालपर गाभूलेणी व हिंदुमंदिरासाठी प्रसिद्ध शहर आहे

६ चेगमाई सयाम प्रदेशातील बुद्धमूर्तीसाठी प्रसिद्ध शहर

७ चेगराई ताइवंशीय मेंगराय याने राजधानीसाठी वसविलेले शहर

८ नागोन (पगाणी) मलायातील राजधानीचे एक शहर

९ नागोन ब्रह्मदेशातील राजधानीचे शहर

१० पलेंबग सुमात्रा बेटातील बुद्धमूर्तींचे ठिकाण

११ प्रबनन जावामधील ब्रह्मा विष्णु महेश मंदिर

१२ पेनाग मलायामधील, सजीव नागाचे मंदिर

१३ प्रविहार अकोरच्या उत्तरेस ७५ मैल अंतरावर २३०० फूट उंचीवरील रमणीय क्षेत्र स्थापत्यशास्त्रातील अप्रतीम कौशल्य येथे प्रगट झालेले दिसते

१४ पापेह सयामी युद्धानंतर सन १४०० नंतरची ख्मेरवंशीयांची राजधानी

१५ प्रोम पियूवंशीयांची राजधानी शहर यालाच श्रीक्षेत्र असेही म्हणतात

१६ बोरोबुदर जावा बेटातील बडाबुद्धमंदिर ठिकाण

१७ बायन मंदिरे कंबोडिअन संस्कृतीतील शिल्पकलेचा उत्कृष्ट नमुना येथे पहावयास मिळतो पूर्वीचे शिवमंदिर, पण बौद्ध आक्रमणाने आता बौद्ध मंदिर झाले आहे

१८. नेलाहनचंडी विष्णुमूर्तीचे मंदिर, पण विष्णुमूर्ति म्हणजे राजा एअरलंग याचीच प्रतिकृति होय.

१९ बेन्तेनश्री ( देवीचा बालेकिल्ला ) अंकोरच्या ईशान्येस १९ मैल अंतरावर राजवर्मन ( ५ वा ) याने सन ९५७ ते ९६१ मध्ये उभारलेले शंकर-पार्वतीचे मंदिर. या ठिकाणी शिल्पामध्ये महाभारतातील अनेक प्रसंग उत्कृष्टपणे चितारलेले आहेत.

२०. लवपुरी सन १००० नंतरची ख्मेरवंशीय ब्राह्मण राजांनी स्थापन केलेले शहर व राजधानी

२१. ठॅपून प्राचीन नाव हरिपंजय सयामामध्ये मोनवंशीय क्षामादेवीने स्थापन केलेले शहर

२२ सिमपिंग हरिहर मंदिर क्षेत्र, पण हरिहर म्हणजे राजा कीर्तिराज यांचीच प्रतिकृति होय

२३ थाटोन यालाच पेगू म्हणतात मोनवंशीय राजांची ब्रह्मदेशातील राजधानी शहर

२४ सुकतोई यालाच सावानका लोक अगर सचनालय असेही म्हणतात ताईवंशीय राजा रामकहँग याने शहर स्थापन करून तेथे राजधानी उभारली

२५. विप्रकेश्वर राजा मूलवर्मा याने 'बहुसुवर्णक' नामे यज्ञ करून २०,००० गाई ब्राह्मणांना दान दिल्या, ते शहर.

---

चीनमध्ये १८० मठ आणि त्या मठात ३७०० भिक्षू होते. तसेच १३ भाषांतरकारही होते. येथे बौद्धधर्माची उपास्थाने वाढ झाल्याने चवथ्या शतकात १७०६८ बौद्ध मंदिरे तयार झाली. याच वेळी २६३ बौद्ध ग्रंथाची चिनी भाषात भाषांतरे तयार झाली होती. तीन सहस्र भारतीय त्या प्रांती स्थायिक झालेले होते. कनिष्क आणि चालुक्य या राज्यकर्त्यांच्या वेळी त्या प्रांती भारतीय वकिलाती होत्या. ह्यु-एन-सांग हा चिनी भिक्षू मध्य आशियामार्गे भारतामध्ये सन ६२९ साली आला. नालंदा विद्यापीठात संस्कृत शिकला आणि सर्व भारत पाहून सन ६४६ च्या सुमारास परत गेला. जाताना त्याने जे ग्रंथ नेले, त्यांची भाषांतरे पुढे त्यानेच केलेली आहेत. दहाव्या शतकापर्यंत ही परिस्थिती होती आणि नंतर तिला उतरती कळा लागली. ब्रह्मदेशात बौद्धधर्माचा खूप प्रचार नि प्रसारही, अशोक राजाचे दूत सोना व उत्तरा यांच्या हस्ते झाला आणि तेथील अनेक लहानमोठ्या राज्यकर्त्यांनी भारतीय नावेही धारण केलेली होती. द्वारावती, श्रीक्षेत्र इत्यादि ठिकाणी अनिरुद्ध राजाने अनेक मंदिरे, पॅगोडे व बौद्धमठ बांधले होते. दहाव्या शतकापर्यंत या धर्माची चलती होती. श्याम भागात दुसऱ्या शतकापासून दहाव्या शतकापर्यंत हिंदु राजे राज्य करीत होते, नंतर कंबोज राजांनी त्याचा पराभव करून राज्यसत्ता हाती घेतली. युनान भागात सातव्या शतकापर्यंत थाईवंशीयानी राज्यसत्ता हाती घेतली आणि सुमारे सहाशे वर्षे राजशकट चालविला. ते भारतीय संस्कृतीचे इतके भोक्ते होते की, ते स्वतःला गाधार म्हणवीत. एका प्रांताला त्यांनी विदेह हे नाव देऊन राजधानीच्या शहराला मिथिला हे नाव दिले होते. तसेच कौशंबी होते, सुवर्णग्रामही होते. सन १२६३ साली मोंगल सरदार कुबलीखान ह्याने हे भारतीय राज्य बुडवून तेथे आपली सत्ता स्थापन केली.

पण एवढ्याने या वंशाने कच खाल्ली नाही व हिंमतही सोडली नाही. तो आणखी पूर्वेकडे सरकला आणि सयामप्रांती इंद्रादित्याने तेराव्या शतकात राज्यसत्ता स्थापन केली. त्याचा मुलगा राम-कहेंगा हा देखील तसाच पराक्रमी निघाला. त्याने अनेक मंदिरे व मठ बांधून त्यांत बुद्धमूर्तींची स्थापना केली. सन १३४७ साली त्याच्या मुलाने ' श्री-सूर्यवंशी-राम-महाधर्म-राजाधिराज ' ही पदवी धारण केली. त्याच्या एका नातलगाने आयोध्या नावाचे नगर वसवून तेथे राज्य स्थापन केले. काही वर्षे ही दोन्ही राज्ये फार प्रबळ होती.

ज्याला सांप्रत कंबोडिया असे संबोधिले जाते, त्या प्रांती कंबुज जयवर्मन ह्याने सन ८०२ साली राज्य स्थापन करून त्याने पन्नास वर्षे राज्योपभोग घेतला. अंकोरथोम हे त्याचे राजधानीचे शहर होते. या राजाने भारतातून बौद्ध पंडित हिरण्यदाय याला खास निमंत्रण पाठवून आपल्याकडे बोलावून घेतले.

आणि त्याच्या सौजन्याने 'देवराज' नावाचा नवीनच धर्मपंथ स्थापन केला सन ८८९ साली यशोवर्मन हा राजा गादीवर आला असता त्याने राज्याचा विस्तार करून साम्राज्य बनविले व सर्वत्र भरभराट केली अनेक मंदिरे, तसेच मठ बांधले आणि संस्कृत शिलालेख खोदविले त्यापैकी बायनचे मंदिर हे कंबोडियन शिल्पाचा उत्कृष्ट नमुना म्हणून दाखविले जाते त्यावर खोदलेला शिलालेख उपलब्ध झालेला आहे त्यावरून असे दिसून येते की, त्या मंदिराचा नोकरवर्ग एकूण ६६,६२५ इसमांचा होता, ३४०० गावांचे उत्पन्न त्या मंदिरासाठी तोडून दिलेले होते, शिक्षणसंस्थेत एकूण ४३९ नोकर सुमारे ९७० विद्यार्थ्यांना शिकवीत असत आणि हा सर्व खर्च मंदिरामार्फत केला जात असे या साम्राज्यामध्ये लहानमोठी ७९८ मंदिरे आणि १०२ सरकारी औषधालये होती आणि १२० धर्मशाळा होत्या चार लक्ष मण तांदूळ संस्थाना मदत म्हणून दिला जाई ताम्रपूर, ध्रुवपूर, ज्येष्ठापूर इत्यादि प्रसिद्ध शहरे असून त्यामध्ये अनेक धर्मशाळा, विद्यशाळा, आरोग्यशाळा आणि अन्नछत्रे असत शैवपंथ व अनुयायांचा यात जास्त भरणा होता सर्वत्र हिंदुमय वातावरण होते परंतु माणसासारखा काळही बदलला आणि त्याने या सर्वांना आपल्या उदरात गत्प केले

प्राचीन चंपादेशाला सांप्रत अनामदेश म्हणतात हिंदुराजा श्री मार याने दुसऱ्या शतकात या भागात वसाहत वसवून राज्य स्थापन केले त्याला म्लेंच्छ अथवा किरात असे संबोधिले जाते, त्या वंशातील हा राजा होता आणि तो स्वतःला चामवंशीय म्हणत असे त्या वंशातील राजा भद्रवर्मन ह्याने मायसन गावी भद्रश्वरस्वामींचे उत्कृष्ट शिवालय बांधले होते भारतीय संस्कृतिनिदर्शक अशी प्रांतविभागाची नावे ठेवली जशी—अमरावती, विजयपांडुरंग इत्यादि एका राजाने तर आपल्याला 'उत्कृष्टराज' ही पदवी राज्याच्या उत्कृष्ट राज्यव्यवस्थेबद्दल बहाल करवून घेतली होती त्या काळची राजभाषा संस्कृत होती या राज्यात अनेक शक्तीची मंदिरे उभारली गेली होती उमा, गौरी, भगवती, महाभगवती, देवीमहादेवी, गणेश, विनायक, कार्तिकेय, लक्ष्मी, पद्मा या सर्व देवता पूजल्या जात होत्या याशिवाय ब्रह्मा, इंद्र, यम, चंद्र, सूर्य, कुबेर, सरस्वती यांच्या मूर्तींचे पूजन होत असे या मंदिरांची बांधणी बदामी, कांजिवरम या दक्षिण भारतातील मंदिरांसारखी आणि विटांची असे सहाव्या शतकात चिनी सरदाराने या प्रांतावर आक्रमण केले, परंतु राजाने ते परतवून लावले शेवटी पंधराव्या शतकात जेव्हा पुन्हा चीनचे आक्रमण झाले त्या वेळी मात्र ते हिंदुराज्य लयाला गेले

जावा, सुमात्रा, बाली इत्यादि बेटांना पूर्वी सुवर्णभूमी म्हणून संबोधिले जात होते मद्रास भागातील ताम्रलिपी, पालुरा व मच्छलीपट्टण या बंदरांतून अनेक

भारतीय या भागात वसाहतीसाठी आले. एका शिलालेखावरून असे दिसते की, या वसाहती या भागात चवथ्या शतकात स्थापन झाल्या मलाया येथील सरकारी संशोधन ग्रथावरून असे दिसते की, वदन नदीच्या खोऱ्यात नाग्नोन, पटाणी, महाग या भागात त्यानी राज्ये स्थापन केली होती त्यापैकी नाखोन येथील राजा प्रमुख व यानीचे माडलिक असावेत एके ठिकाणी एका स्तूपाखभोवार ५० मदिराची उभारणी केलेली आढळून आलेली आहे. विजय नावाच्या राजाने चौथ्या शतकात राज्य करून सर्वत्र भरभराट केली गिरोरमधील शिलालेखावरून असे दिसते की, त्या राजाने चीनबरोबर व्यापारसबधही प्रस्थापित केले होते. बोर्निओमधील चार सस्कृत शिलालेखावरून असे दिसते की, चौथ्या शतकात या प्राती हिंदु ब्राह्मणानी वसाहती केल्या कौडिण्याचा नातू आणि अश्वमाचा मुलगा मूलवर्मा ह्याने 'बहुसुवर्णक' हा यज्ञ विप्रकेश्वर या गावी करून त्यामध्ये विपुल सुवर्ण आणि वीस सहस्र गायाचे दान ब्राह्मणाना दिले.

वरीलपैकी अनेक वसाहती ब्राह्मणवर्गाने स्थापलेल्या होत्या फा हिनान हा चिनी प्रवासी लिहितो की, त्याने ज्या जहाजातून प्रवास केला त्या जहाजात २०० ब्राह्मणवर्गातील व्यापारी होते बौद्ध आणि हिंदुसस्कृतीचा फार जोराचा प्रसार या भागात झाला. अनेक हिंदुमदिरे ब्राह्मणी वर्चस्वाखाली उत्तम स्थितीत होती. भारतामध्ये ज्याप्रमाणे बाराव्या शतकापर्यंत अनेक हिंदुराज्ये भरभराटीत होती, तशी ती या भागात होती भारतामधील राजानी सत्तास्पर्धेचा खेळ माडला. आपसात वैमनस्य वाढवून सर्वत्र दुही फैलावल्याने जशा मुसल्मानी सस्कृतीचा शिरकाव होऊन ती राज्ये पत्त्याच्या बगल्यागत ढसाढसा ढासळली, तद्वत या भागातही शैलेंद्र विरुद्ध चोला घराणे, मजपहित येथील गिरिंद्रवर्धन विरुद्ध रगजीवन याच्यातील वैमनस्यामुळे सन १३८९ साली ही शेवटची हिंदु राज्ये मुसल्मानी सत्तेला बळी पडली परिणाम व्हायचा तोच झाला. भारतामध्ये ज्याप्रमाणे सोमनाथ, काशीविश्वेश्वर इत्यादि हिंदूची प्राणप्रिय मानबिंदु क्षेत्रे छिन्नविछिन्न गेली तद्वत याही भागात त्या आक्रमकानी तेच केले. जावामधील डिआगच्या पठारावर चडी, भीम, श्रीगडी अर्जुना, चडीसेवी, चडीलारो इत्यादि हजारो *मदिराचा नाश करण्यात आला तेथे पाहणाराला आज दिसतात ते फक्त मोडलेले,* तुटलेले देवताचे अथवा शिल्पाचे अवशेष, इतस्तत विखुरलेले आणि सग्रहालयात एकत्र माडलेले ! काळाची गती अगम्य आहे, मानवाला अनाकलनीय आहे. श्रीरामचद्र, श्रीकृष्णभगवान याची देखील राज्ये काळाच्या उदरात गडप झाली. मग ही राज्ये लयाला गेली म्हणून त्यात वाईट वाटून घेण्यासारखे काय आहे ?

( भारताचा प्राचीन इतिहास, लेखक मुकर्जी, पृष्ठे ४९३-५१६ )

तिबेट हा भारताच्या उत्तर सरहद्दीवरील प्रदेश होय. प्राचीन काळी या प्रदेशाला देवाचा आणि ऋषीमुनींचा प्रदेश म्हणून ओळखला जात असे. सांप्रत या देशात लामा धर्माचे प्राबल्य आहे. पद्मसंभव नावाचा एक महाभयंकर महत्त्वाकांक्षी ब्राह्मण उदयान ( स्वॉट ) येथे जन्माला आल्यावर मोठेपणी त्या वेळच्या प्रसिद्ध नालंद विद्यापीठामध्ये त्यांनी विद्यार्जन केले. त्याच विद्यापीठात पुढे शिक्षक म्हणून काम करीत असताना त्याने बौद्धधर्म स्वीकारला आणि धर्माच्या प्रसारार्थ तो नंतर तिबेटमध्ये गेला. इ० स० ७४७ साली त्याने सामयाव या गावी पहिला मठ स्थापन करून आपल्या धर्मप्रसाराच्या कार्यास शुभारंभ केला. तेथील राजा स्त्री स्रोंग ह्याने आणि त्याच्या आणखी काही प्रजाजनांनी यापूर्वीच बौद्धधर्माचा स्वीकार केलेला असल्याने त्याच्या धर्मप्रसाराला अनुकूल वातावरण आपोआपच निर्माण झाले. सन ७४९ च्या सुमारास सामयास गावी पहिला बौद्धविहार बांधण्यात येऊन पद्मसंभवाचा नवु शांतिरक्षित याला तेथे प्रमुख नेमण्यात आले. या विहारातील विद्यार्थ्यांनी संस्कृत भाषेचा उत्तम अभ्यास करून, भारतातील अनेक संस्कृत ग्रंथांची भाषांतरे केली आणि ती या मठातून संग्रहित करून ठेवली. सन ७८३ मध्ये दोन स्तूप उभारण्यात आले आहेत. त्यावरील शिलालेखावरून पद्मसंभवाने लामाधर्म स्थापन केला असे दिसून येते.

( नेम्स धर्मकोश, भाग १, पृष्ठ ५१० )

बौद्धधर्मामध्ये दोन प्रमुख पंथ आहेत. हीनयान आणि महायान. बुद्ध हा मानवप्राण्याचा दयाळू शिक्षक असून, आपले शिष्यगण आणि श्रोतृगण यांच्या सतत सहवासात राहून तो आपली धर्मतत्त्वे आणि धार्मिक विधि त्यांना समजावून देत असतो, असे हीनयानपंथीय मानतात. याउलट, महायानपंथीय लोकांना असे वाटते की, लोकसेवा करणाऱ्या देवता, राक्षस, भव्य मंदिरे व त्यातील मूर्ति, सांस्कृतिक कार्यक्रमांच्या दणदार चालिरीती आणि मोठ्या गडबडीचे उत्सव समारंभ हेच बोधिसत्त्वाचे अथवा अभिताभाचे स्वर्गीय स्वरूप होय. सर्वश्रेष्ठ बौद्धदेव सदैव स्वर्गसुख उपभोगणारा, सुखवती नगरामध्ये अक्षय सुखात राहणारा आणि सर्व प्राणिमात्रांना विपुल प्रकाश देणारा असा आहे. हीनयानपंथाचा प्रसार दक्षिणापथ, सिलोन, यावद्वीप, बाल्द्वीप या भागात झाला, तर महायानपंथाचा प्रसार चीन, जपान, उत्तराखंड, सयामदेश, वंगदेश इत्यादि भागांत झाला. तिबेटात जो बौद्धपंथ सुरू झाला, त्यामध्ये मंत्रयान शाखा प्राबल्याने पुढे आली. कारण पद्मसंभव हा मूलतः ब्राह्मणवर्गीय असल्याने या धर्मातही त्याने आपल्या मूळ संस्कृतीच्या रीतिभाती, बीजन्यास, मंत्रजप, उपचार, अभिषेक, संस्कृत भाषा इत्यादि प्रकार आणले आणि हीच मंत्रयान शाखेची वैशिष्ट्ये म्हणून दाखविता येतील. एक मात्र खरे की, बौद्धधर्माचा कोणताही पंथ असो अथवा

शाखा असो, त्यांमध्ये वज्रवाही, तारा, मणिमेखला, मणिपद्मा इत्यादि शक्ति-देवतांचे पूजन असतेच. (त्र्यं. भि. खरेशास्त्री, मंत्रशास्त्र)

पद्मसंभवाच्या पाच प्रमुख शिष्या होत्या. त्यापैकी खंन्ड्रो-येशा-सौग-चाल या नावाची एक शिष्या होती. आपल्या गुरूचे लिखाण याच शिष्येने प्रसिद्ध केले असून 'सुवर्ण-माला' (Golden Rosary) हे त्याचे नाव आहे. सुमारे पाचशे वर्षांपूर्वी हा ग्रंथ उजेडात आला. त्यामध्ये नऊ भाग असून त्यात लामा-धर्माची तत्त्वे विशद केलेली आहेत. त्यामध्ये एके ठिकाणी मातमरुद्राची मलय पर्वतावरील राहाणी वर्णन केलेली असून बुद्धदेवाचे वर्चस्व दाखविण्यासाठी असे म्हटले आहे की, मलय पर्वतावर जाऊन बुद्धदेवाने शंकरांना जिंकून घेतले. त्या वेळी रुद्राच्या मुली (म्हणजे योगिनी) व राक्षस यांचा संयोग घडून आल्या-मुळे त्यांच्यापासून अष्टमातृकांची उत्पत्ती झाली. त्यांची नावे येणेप्रमाणे—

| | |
|---|---|
| गौरिम्मा (पांढरा वर्ण) | घासमारी (काळपट हिरवा वर्ण) |
| सौरिम्मा (पिवळा वर्ण) | शोनामा (दाट निळा वर्ण) |
| चांडाळी (पिवळसर पांढरा वर्ण) | प्रमो (लाल वर्ण) |
| वेताळी (काळा वर्ण) | पुष्काशी (लालसर-पिवळा वर्ण) |

तिबेटी भाषेत यांचे नाव 'मामो'.असे असून अष्टदिशांना जी मोठमोठी स्मशाने आहेत, त्यांच्यावर देखरेख करण्याचे काम याना देण्यात येते.

(जॉन वुड्रॉफ, शक्ति व शाक्त, पृ. ६६८)

भारतीय संस्कृतीमध्येही अष्टदिक्पालाची कल्पना असून त्याना निरनिराळ्या आठ दिशांवर देखरेख करण्याचे काम नेमून दिलेले असून त्या दिशेकडून येणाऱ्या शत्रूंपासून अखिल प्राणिमात्राचे रक्षण करणे, हे त्यांचे कर्तव्य होते. ते, आपापल्या जागा सोडून जाऊ नयेत म्हणून आणि त्यांच्या वाहानाची गरज भागावी म्हणून सहा हत्तींची तरतूद केलेली होती आणि त्या हत्तींत एक हत्तीणही होती.

(१) पूर्व— इंद्र, मेघांचा राजा, वाहन ऐरावत व इतर सहा हत्ती. ऐरावताची स्त्री अभ्रमू.

(२) अग्नेय— अग्नि, सूर्याप्रमाणे तीन मुखे, आकाशात सूर्य, वायुमध्ये वीज आणि भूतलावर अग्नि. वाहन—मेंढा, हातात शस्त्र—माला, हत्ती पुंडरक आणि कपिला.

(३) दक्षिण— यम, वाहन—महिष, हत्ती वामन आणि पिंगळा, हातात शस्त्र—गदा.

( ४ ) नैर्ऋत्य—निरिती, वाहन–राक्षस, हत्ती कुमुद आणि अनुपमा, हातात शस्त्र–परजणारी तरवार.

( ५ ) पश्चिम— वरूण, वाहन–मकर, हत्ती अजन आणि अजनावती, हातात शस्त्र–त्रिशूळ.

( ६ ) वायव्य— वायु, वाहन–हत्ती पुष्पदंत आणि शुभदत्ती

( ७ ) उत्तर— कुबेर, वाहन–घोडा आणि हत्ती सार्वभौम, हातात शस्त्र–गदा

( ८ ) ईशान्य— ईशान्यदेवता, वाहन–वृषभ, हत्ती सुप्रतिक

( डौसन, हिंदु मायथॉलाजी, पृष्ठ १८० )

अष्टदिक्पालाचे मंदिर दक्षिण भारतामध्ये नागापट्टण येथे आहे या मंदिरातील मूर्ति उभ्या असून, त्या पाषाणाच्या आहेत. या ठिकाणी कायारोहण स्वामींचे मुख्य मंदिर असून त्याची सखी म्हणून नीलायथाक्षी ही देवी दाखविलेली आहे बौद्धधर्मातही अष्टदिक्पालाची कल्पना असून, वज्रयानीपयाचे वज्रोष्णीष, रत्नोष्णीष, पद्मोष्णाष, विश्वोष्णीष, तेजोष्णीष, ध्वजोष्णीष, तीक्ष्णोष्णीष आणि छत्रोष्णीष हे दिक्पाल आठ दिशा रक्षणासाठी नेमलेले आहेत त्याचे वर्ण, मुद्रा याचेही वर्णन मिळते. ( इ. बु इ )

( South Indian Stories by Jagdish, Page, 27 )

## खोन मा

तिबेटातील लोक असे मानतात की, भूतलावर अनेक राक्षस असून ते त्रास देत असतात पण हे सर्व राक्षस खोन मा या जख्खड म्हातारी देवीच्या आज्ञेत वागतात रोमन चर्च ज्याप्रमाणे मनिआ देवीला भजतो, त्याप्रमाणेच हिचे पूजन केले जाते. ती पीतवस्त्रे धारण करते, हातात सोनेरी पाश धरते व एडक्यावर स्वार होऊन सर्वत्र भ्रमण करते राक्षसानी घरात शिरून त्रास देऊ नये यासाठी घरमालक घराच्या उंबरठ्याच्या बाहेर तोरणासारखे बाबूचे झाड बसवितो त्यावर एडक्याचे मुडके, मौल्यवान सुवर्ण अगर रुप्याची पाने अगर मनुष्य, स्त्री, घर याच्या आकृति आणि तादूळ, गहू, डाळी ही धान्ये त्यावर लटकावून ठेवतो या सर्वांचा अर्थ असा की, राक्षसाची गैरमजा होऊन घरावर हल्ला करण्यास आलाच तर माणसाच्या आकृतीवर त्याचा राग व्हावा, धान्य खाऊन शांत व्हावा आणि सोने रुप्याच्या दर्शनाने भुलून जाऊन, त्याने घरात प्रवेश करू नये व त्यातील माणसाना त्रास होऊ नये तसेच सर्व पदार्थांची माडणी तोरणावर झाली म्हणजे कुलोपाध्याय घरमालकाच्या वतीने खोन मा देवीचे पूजन करून

तिची प्रार्थना करतो की, 'तोरणावरील सर्व दुचक्र व आवडीच्या पदार्थांचा स्वीकार करून धरणीतून वर येण्याचे, राक्षसांचे मार्ग बंद करून टाक म्हणजे ते मानवांना त्रास देणार नाहीत.'

(Golden Bough A. E. Vol. II. P. 645 by Frazer).

वरील उदाहरणावरून दैनंदिन जीवनातील एका रूढीचा उलगडा होतो. भारतांत अगर अन्य देशात घराचे प्रवेशद्वारावर, शेतावर, दुकानचे दारावर इत्यादि ठिकाणी अनेक प्रकारची बाहुली अगर मिरची-लिंबू सारख्या वस्तू टांगलेल्या दिसतात. दुष्ट प्रवृत्तींच्या माणसाची नजर घरातील माणसावर, धनधान्यावर, व्यापारउदीमावर पडून नाश होऊ नये म्हणून या गोष्टी करण्यात येतात. नजर पडलीच तर त्या वस्तूंवर पडावी आणि त्याचा नाश व्हावा, पण मूळ वस्तूंना बाधा होऊ नये, याकरिता बाहुल्याप्रमाणे इतर वस्तूही बांधण्यात येत असाव्यात. वायूरूपाने अनेक जीवात्मे इतस्ततः वावरत असतात, खाण्याच्या शोधात असतात. तेव्हा त्यांनी दारावरील त्या वस्तूंचे भक्षण करून संतोष पावून निघून जावे, हाच यामागील हेतु आहे. भारतामध्ये आज ही रूढि अनेक ठिकाणी पाळण्यात येते, असे अनुभवास येते.

बौद्धधर्मात तांत्रिक आचारानुसार अनेक शक्तिदेवताची पूजा केली जाते, परंतु त्यामध्ये ताम्रयंत्र हा एक अपूर्व नमुना दिसतो. हे यंत्र तांब्याचे बनविलेले असून दंडामध्ये बांधण्यासाठी दोन गोल कड्या असतात. याची लांबी-रुंदी साधारणतः ३½" × ४½" असून एका बाजूला देवताशक्तीचे कृशांग स्वरूप, पद्मासन घालून बसलेले, डाव्या बाजूला चक्र, त्याच्या खाली वज्र व घंटा ही चिन्हे दाखविलेली असतात. यंत्राच्या दुसऱ्या बाजूला वज्रचिन्हांकित चारी कोपऱ्यात तिबेटी अक्षरात ओं, आं, हुं, र्‍हीं हा बीजमंत्र खोदलेला असतो. अशा रीतीने तिबेटमध्ये शक्तीची स्वरूपे पूजनात आहेत.

(गोरखपूर, शक्तिअंक १९३४, पृष्ठ ६५९)

कालगतीची चाल ही नेहमीच गतिमान आणि कोणालाही अगम्य, अनाकलनीय असीच आहे. या विशाल्या शतकात पंडित राहुल सांकृत्यायन या नावाचे एक विद्वान कवि भारतात होऊन गेले, मुस्लीम राजसत्तेच्या कालखंडात भारतामधील संस्कृत-ग्रंथसंपत्ती नष्ट झाल्यामुळे, या पंडिताने तिबेटी भाषा आत्मसात करून, अनेक हालअपेष्टा सोसून तिबेटमधील मठातील धर्मग्रंथाच्या नकला स्वतः करून घेतल्या. त्या सर्व नकलांचा भार दोनशे खेचरांवर लादून भारतामध्ये आणून तो पाटणा व कलकत्ता येथील ग्रंथसंग्रहालयात जतन करून ठेवण्यात आला. ही भारतीयांची ग्रंथसंपत्ती योग्य वेळीच परत आली, असेच मानले

पाहिजे, कारण सन १९५८ साली तिबेट, चीनच्या आक्रमणाला बळी पडला आणि मुख्य लामा गुरूलाच परागंदा होऊन भारतामध्ये आश्रय घ्यावा लागला. धर्म न मानणारी नवीन राजवट तेथे सुरू झाली असून ती मूळची मंथसंपत्ती अजून शिल्लक आहे, का मठाप्रमाणेच तीही अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडली हे कळण्यास आज तरी मार्ग नाही. पण सन १९६९ पर्यंत तेथील सर्व धर्ममठाची आणि लामा गुरूंची पूर्ण उचलबांगडी झाल्याचे वृत्त आहे.

बौद्धधर्माच्या प्रसाराने ब्रह्मदेश, सिलोन, कंबोडिया, अनाम, जपान इत्यादि देशाचा संबंध जोडलेला आहे, परंतु आपण तो यथावकाश सविस्तर वर्णनात पुढे पाहू.

प्राचीन यावद्वीप म्हणजे सांप्रतचा जावा-सुमात्रा भाग होय. भारतीय या भागात वसाहतीसाठी कोणत्या प्रकारे आले, याने दिग्दर्शन वर आलेलेच आहे. उत्तर भारतामधून वसाहतीसाठी अगस्तिऋषि दक्षिण भारतामध्ये आले आणि तेथे थोडी स्थिरस्थावर पाहिल्यानंतर, तेथील व्यापारी मंडळींबरोबर या भागातही गेले होते, याचा उल्लेख तेथील पूर्वींच्या संस्कृति अवशेषामध्ये आढळतो. पांडव-कालीन महापुरुषांची स्मारके आजही तेथे पहावयास मिळतात. शहरांतील कित्येक रस्त्यांना त्यांची नावे दिलेली आहेत. वामन अवतारामधील बळी राजाची कथा सर्वांना विदितच आहे. त्रिपाद भूमीचे दान मागून वामनाने बळीला अगदी पाताळापर्यंत पोहोचविले. आर्यांचे संस्कृतिप्रसरण याप्रमाणे सर्वत्र चालूच होते. बाली बेट हे विषुववृत्ताच्या दक्षिणेला असल्याने त्याला पाताळ म्हणून संबोधिले असावे. पाश्चिमात्यही या भागाचा 'डाऊन अंडर' म्हणजे पाताळ असाच उल्लेख करीत होते.

'पंडित सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी प्राचीन कोश या नावाचा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. त्यामध्ये 'सप्तपाताळ' शब्दाची व्याप्ति (अतळ, वितळ, नितळ इत्यादि) जावा, सुमात्रा पासून न्युझिलंड बेटापर्यंत दिलेली आहे (पृष्ठ ६६८). मयासुर, दशमुख रावण यांची वस्ती याच भागात असावी, असे भौगोलिक परिस्थितीवरून दिसते. इतक्या प्रदीर्घ कालानंतर आजही रामायणातील-महाभारतातील कथा मोठ्या तन्मयतेने तेथे वाचल्या जातात आणि त्यावर आधारित नाट्यप्रसंगही दाखविले जातात. पाहुण्यांच्या सत्कार-समारंभप्रसंगी जो सोहळा आयोजित केला जातो, त्यावर भारतीय पद्धतीचा, संस्कृतीचा संपूर्ण ठसा उमटलेला आढळून येतो. याचे आधुनिक उदाहरण म्हणून असे दाखविता येईल की, रशियाचे पंतप्रधान श्रीयुत निकिता ऋुश्चेव्ह, मार्च १९६० साली बाली बेटास भेट द्यावयास गेले होते, त्यावेळी त्यांनी त्या बेटावर पाऊल ठेवताक्षणीच

संस्कृतमध्ये वेदघोष करण्यात येऊन झांजांच्या निनादात त्यांचे सुस्वागतम् करण्यात आले मार्गामध्ये पुष्पवृष्टी करण्यात येत होती, गुलाबपाण्याचे सिंचन करण्यात येत होते. उदबत्त्याचा सुवास सर्वत्र दरवळत होता आणि मंगल वाद्यांचा मंजुळ निनादानेही आसमंत भरून राहिला होता. धर्मगुरूंनी वेदोक्त प्रार्थना म्हटल्यानंतरच त्यांच्या मिरवणुकीला सुरुवात झाली जो देश या भारतीय संस्कृतीचे माहेरघर समजला जातो, त्या ठिकाणी निधर्मी राजसत्तेच्या नावाखाली, पाहुण्यांच्या शुभागमन प्रसंगी जी संस्कृति पाळली जात नाही आणि बाली, जावा, मॉरिशस इत्यादि भारतापासून सहस्रावधि मैल दूर असलेल्या भागात ती आचरलेली पाहून खऱ्या भारतीयाला लाज वाटल्यावाचून राहणार नाही.

सौ० मालिनीबाई देशपांडे यांनी सन १९५२ साली या भागातून सफर केल्यानंतर आपले अनुभव पुण्याच्या केसरी वर्तमानपत्रातून प्रसिद्ध केले होते. त्यानंतर हे सर्व लेख ' आपले पूर्वपार शेजारी ' या पुस्तकात संकलित केले गेले. या बाईंचा हेतु जरी देवताशोधन हा नसला तरी ग्रंथात दिलेली माहिती भारतीय संस्कृति निदर्शकच आहे.

पधराव्या शतकात पाश्चिमात्य लोक ज्याप्रमाणे व्यापारवृद्धीसाठी भारता मध्ये आले त्याप्रमाणे याही भागात मसाल्याच्या जिनसांचा व्यापार करण्यासाठी आले भारतामध्ये ज्याप्रमाणे क्रमाक्रमाने त्यांनी वसाहत वसविले, त्याप्रमाणे याही भागात वसविले आणि मुसलमानी राजसत्ता कोलमडून पडली मुस्लिम राजसत्तेने भारतीय कलाकृतींचा नाश केलाच होता त्यामध्ये या लोकांनी आणखी भर घालून त्यांचा पुरा विध्वंस केला केवळ विखुरलेले अवशेष छिन्नभिन्न स्थितीत पाहावयास त्यांनी ठेवले आहेत ! कलसन् पर्लावरन येथील उत्खननामध्ये चंडीसरी, चंडीसेवू, चंडीजयो, चंडाप्लावसन इत्यादि अनेक शक्तिदेवतांच्या मूर्ति आढळून आलेल्या आहेत. ( जेम्स धार्मिक कोश, ७/४९६ )

भारतीय आर्यांनी या भागात वसाहती केल्या आणि राज्ये भरभराटीस आल्यानंतर कालांतराने येथील दाटवस्तीमुळे म्हणा अथवा धाडसी दर्यावर्दीपणामुळे म्हणा, येथील लोकांनी पुढे सरकण्यास सुरुवात करून क्रमाक्रमाने पॅसिफिक महासागरातील समोआ, टोंगा, सोसायटी, कुक, हवाई इत्यादि द्वीपे काबीज करून त्या ठिकाणी आपल्या वसाहती स्थापल्या.

W H Rivers या संशोधकाने 'The History of Melanesian Society' या नावाने दोन भाग प्रसिद्ध केलेले असून त्यामध्ये तो असा निष्कर्ष काढतो की,

"Migrants moved into Pacific from the islands of Indo-Nesia They had most probably passed into these islands from the earlier home on the main land of India" ( जेम्स धर्मकोश, १०/१०३ )

वसाहतीवाल्याचा लोंढा प्रथम फिजी बेटात गेला आणि नंतर समोआ, टोंगा इत्यादि बेटाकडे सरकून नतर दक्षिणेकडील बेटाकडे वळला असावा वसाहती करताना तेथील मूळ वन्य जमातीबरोबर सस्कृति-सकरही करावा लागला आणि ती त्याना आत्मसात करावी लागली.

तेथील अवशेषावरून हे सिद्ध झाले आहे की, त्या द्वीपसमूहात सूर्य, देवी, विष्णु, शकर इत्यादि भारतीय देवतांच्या कोरीव मूर्तींची पूजा मंदिरामधून होत असे. धार्मिकविधि इसाईसस्कृतिप्रमाणे फक्त रविवारी न करता जन्मकाळापासून मृत्युकाळापर्यंत अव्याहत चालत असत. मग ती वेळ मानवाची कामधदा करावयाची असो अथवा करमणुकीची असो. चद्राची स्थित्यंतरे, आकाशातील तारका व मेघ ह्याच्या हालचाली, धूमकेतूचे उगवणे, इद्रधनुष्याचे दर्शन, मेघ गर्जनेची दिशा, काही विवक्षित पक्ष्याचे दर्शन आणि त्याच्या हालचाली इत्यादि गोष्टींवरून तेही भारतीयाप्रमाणे शुभशकून योग ठरवीत असत. यामध्ये युद्धातील जयापजय, घरातील आजारीपण आणि त्याचे उच्चाटण, मरणकालादिकाचे शकून इत्यादि गोष्टींचा समावेश झालेला होता.

'An account of Polynesian Races', या नावाचा तीन भागातील ग्रंथ A Fornander या गृहस्थाने लिहिलेला असून त्यामध्ये तेथील वसाहती संबधी ते लिहितात की—

'The migrants' traditions and myths point to the West, as the place from which they came The home of their God was a beautiful paradise away to the West, possibly Gods and living heroes of Indonesia, or Pre Indonesian days'

( जेम्स धर्मकोश, १०/१०५ )

या द्वीपसमूहातील भारतीयाची अशी श्रद्धा होती की, देह जरी मृत झाला तरी मनुष्य-आत्मा हा अमर आहे. देहत्याग केल्यावर आत्मा स्वर्गाला जातो आणि हा स्वर्गलोक ( Heaven ) कोठे तरी पश्चिम दिशेला आहे. इतकेच नव्हे, तर स्वर्गाला जाण्याचा मार्ग पश्चिम दिशेकडे आहे. ( भारतीय संस्कृतीचा स्वर्ग उत्तर दिशेला, हिमालय पर्वताच्या बाजूला आहे, अशी श्रद्धा आहे ). या श्रद्धेचा आविष्कार त्यांनी कसा सुदर रीतीने केला आहे, तो पहा—'.मरणोत्तर आत्मा

बेटाच्या पश्चिम किनाऱ्यावर जातो. सागरामध्ये उडी घेऊन पश्चिम दिशेला स्वर्गाकडे प्रयाण करतो. इतकेच नव्हे, तर मरणोत्तर देहाचे अस्थिअवशेष एका लाकडाच्या होडीत ठेवून ती होडी पश्चिमेकडे म्हणजेच स्वर्गाच्या दिशेला लोटून देत. ' इतकी प्रगाढ श्रद्धा त्याची आपल्या मायभूमीच्या ठायी होती. कालांतराने मूळ भारताचा संबंध तुटलाच होता. तरी तेथील आर्यांच्या मनात त्या भूमीबद्दलच्या प्रेमाची अखंड ज्योत तेवत होती. परकीय इतिहासकारांनी केलेलीं वरील वर्णने वाचली म्हणजे मायभूमि सोडून वसाहतीसाठी गेलेल्या आपल्या सुपूर्वजांनी भारतीय संस्कृति राखण्यासाठी आणि तिचा प्रसार करण्यासाठी केवढी जिवापाड मेहेनत, केवढे श्रम घेतले असतील, याची कल्पना येते हे वर्णन वाचून खऱ्या हाडाच्या भारतीयाचे हृदय थरारून गेले पाहिजे. अगस्ति व वामनाच्या वेळचे आर्य द्रष्टे होते. त्यांनी सर्व जगभर संस्कृतीचा विस्तार केला परंतु कालांतराने भारतीय धर्मपंडितांना दुर्बुद्धी सुचली आणि त्यांनी समुद्रबंदी, रोटीबंदी, बेटीबंदी इत्यादि निर्बंध लादले. गायीपासून वासराची ताटातूट करावी, त्याप्रमाणे या वसाहती वसविण्यास गेलेल्या भारतीय सुपुत्रांना मूळ मायदेशापासून तोडून टाकले. त्यांची स्थिती अनुकम्पनीय करून टाकली. परकीय आक्रमणाच्या वेळी ते परतविण्यास मूळ देशाची मदत मिळाली नाही, साहाय्य लाभले नाही आणि एखाद्या दुबळ्या शेळीला वाघाने अलगद आपल्या घशात लोटावे, त्याप्रमाणे परधर्मीयांनी त्यांना आपल्या संस्कृतीत सामावून घेतले. धन्य ते भारतीय धर्ममार्तंड ! याच संबंधात स्वातंत्र्यवीर सावरकर म्हणतात, ' परदेशगमन, जातीबहिष्कार हे पाप ठरविण्याची अवदसा ज्या दिवशी आम्हास आठविली, त्याच काळी आमचे हिंदुराष्ट्र मेक्सिकोपासून मिसर देशापर्यंत पसरलेल्या आपल्या जागतिक हिंदुसाम्राज्यास आचविले. परदेशीय व्यापार बुडाला, नाविक कला व बल पार पार लयास गेले. '

दूरागमन केलेल्या भारतीयांना मायभूमीबद्दल केवढे प्रगाढ प्रेम आणि उत्कट आपुलकी वाटते, याचे एक उदाहरण मी स्वतः अनुभविले आहे. सन १९५८ साली मॉरिशस बेटातून एक शाळामास्तर बाळगोपाळशेट महाबळेश्वरकर भारतामध्ये मायभूमीचे दर्शन घेण्यास आले होते. त्यांचे घराणे दोनशे वर्षांपूर्वी इतर भारतीयांबरोबर रोजगारधंद्यानिमित्त त्या देशात गेले होते. आपल्या पवित्र मायभूमीचे दर्शन व्हावे, आपली तीर्थक्षेत्रे पाहावीत आणि आपल्या आप्तस्वकीयांना एकदा डोळे भरून पहावे, या इच्छेने ते भारतात आलेले होते. अद्यापि त्यांनी आपली भारतीय संस्कृति घरातील आचरणातून, मंदिरातून उत्तम रीतीने टिकविली आहे. ते उत्तम मराठी बोलू शकतात. व्याख्याने देऊ शकतात. काव्यही थोडेफार करू शकतात. भारतातील तीर्थक्षेत्रे पाहिल्यावर आणि काही मान्यवर नेत्यांच्या भेटी घेतल्यावर माझ्या घरी गोरेगाव

येथे त्याचे स्वागत करण्याचे भाग्य मला लाभले. परदेशात संस्कृति टिकविण्यासाठी त्यांना किती महाप्रयास करावे लागतात, त्याचे हृदयद्रावक वर्णन त्यांनी केले. ते पोटाच्या उद्योगास्तव तेथे फ्रेंच शिक्षकाच्या व्यवसायात असून बाकीचा वेळ मंदिरांची वाढ करणे, बाधवांना धार्मिक शिक्षण देणे, वेळप्रसंगी धार्मिक प्रयोग चालविणे, भजन-कीर्तन चालू ठेवणे, देवतांचे उत्सव-समारंभ साजरे करणे इत्यादि गोष्टींत ते आपला वेळ व्यतीत करतात. भारतातील तीर्थक्षेत्रे पाहिल्यावर आणि इष्टमित्राची भेट घेतल्यावर त्यांना धन्यता वाटली आणि आयुष्याचे सार्थक झाल्याचे समाधान त्यांच्या मुखावर विलसले. साम्रत, समुद्रबंदीचा वाघोबा गुहेत झोपला असल्यामुळे ही दूर गेलेली आईची लेकरे इकडे येऊन तिला भेटू शकतात. लेखकाबरोबर पत्रव्यवहार करून अजूनही मातृभूमीची माहिती ते घेत असतात. देवीकोश ग्रंथाचा प्रसार आकाशवाणीवरून त्यांनी तेथे केला आहे.

## चीन

आतापर्यंतच्या अवलोकनावरून आपण पाहिले आहे की, या संस्कृतीचे मूळ वशज या देशात अक्केडिया या प्रातातून आले. त्याच्या पुराण ग्रंथातून कुन-लुन पर्वताचा उल्लेख आढळतो आणि त्या पर्वतावर त्यांच्या देवतांचे वसतीस्थान आहे असे ते मानतात. हा पर्वत बॅबिलॉनजवळ हिंदुकुश या नावाने ओळखला जातो आणि यावरूनच त्याच्या मूळ स्थानाची कल्पना करता येते. हा पर्वत तीन सहस्र मैल उंच असून त्या ठिकाणी अमृतकुंडातून चार प्रमुख नद्यांचा उगम झालेला आहे. भारतीयांचा सुमेरू पर्वत म्हणतात तो हाच असावा. नुकुवा या सृष्टिकर्त्या देवाने मानवाची स्त्री-पुरुष जोडी याच पर्वतमाथ्यावर उत्पन्न केली. या देवाला पान-कू असेही म्हणत. पृथ्वीला आकार ह्याच देवाने दिला. पान म्हणजे अंडे अथवा कवच आणि कू म्हणजे धारण करणे, अशी या पानकू शब्दाची उत्पत्ति आहे. हा देव अतिशय बुटका, अंगात कातडे अगर पानाचा झगा वापरणारा, मस्तकावर दोन शिंगे, उजव्या हातात लोखंडी हातोडा आणि डाव्या हातात लोखंडी छिन्नी अशा स्वरूपाचा असून काही चित्रलेखनात त्याच्या मदतीला घोडा, कासव, पक्षी व ड्रॅगून दाखविले आहेत. कोणी दोन हात अधिक दाखवून त्यामध्ये सूर्य आणि चंद्र दाखवितात. पृथ्वी तयार करण्यास त्याला अठरा सहस्र वर्षे लागली असे म्हणतात. या कालमर्यादेमध्ये त्याने चंद्र, सूर्य, स्वर्ग, तारकापुंज तयार केले आणि त्याची उंची दर दिवशी सहा फुटानी वाढून ते अंतराळात अतिशय उंचावर जाऊन बसले आहेत. पान-कू देवाने आपले शरीर इतके फुगविले की, त्याचे मस्तक म्हणजे भूतलावरील पर्वत झाले, त्याचा श्वासोच्छ्वास हा वायु झाला, त्याचा आवाज मेघगर्जना झाली, ह्याची शरीरगात्रे चारी दिशा बनल्या. त्याच्या रक्ताचे रूपांतर नद्यांमध्ये झाले, शरीराचा मेद म्हणजे मेदिनी झाली.

कातडी व केस, औषधी वृक्ष तयार झाले. हाताचे खडक बनले. चरबीची अमोलिक रत्ने तयार झाली. शरीराला आलेला घाम पर्जन्य झाला आणि त्याच्या शरीरावर वावरणारे कीटक हे मानवप्राणी झाले.

( चायनीज पुराणग्रंथ, लेखक वेरनर, पृष्ठ ७७ )[1]

दुसरा एक पक्ष असे मानतो की, पृथ्वी तयार झाल्यावर न्यु-कुवा-शिह या देवीने मानवप्राणी तयार केले. या देवतेचे शरीर मत्स्याकृति असून मस्तक वृषभाचे होते. (चा. पु., पृष्ठ ८२ )

वर जी पौराणिक कथा दिली आहे, त्यासंबंधी लेखक विवेचन करतो की,

' Mythology is the science of unscientific man's explanation of what we call the other world itself and its denizens, their mysterious habits and surprising actions, both there and here, usually including the creation of this world also. '

( चा. पु., पृ. ६० )

## पौराणिक कथांची उत्पत्ति

पौराणिक कथा म्हणजे ज्याला आपण दुसरे विश्व मानतो, त्यासंबंधी कल्पनाशक्तीच्या जोरावर केलेले वर्णन असून ज्याला कसलाही सु-सूत्र आधार नाही व ज्यामध्ये पृथ्वीच्या उत्पत्तीची माहिती अंतर्भूत असते, अशी वर्णने होत. ग्रीस, स्कँडेनेव्हीया या देशातील पौराणिक कथा फारच रम्य वाटतात; परंतु त्यामानाने चीन किंवा इतर देशांतील तुलनेला त्या उतरत नाहीत, असे या ग्रंथकाराचे मत आहे. त्याचे कारण तो असे देतो की, ज्या संस्कृतीची बौद्धिक पातळी प्रगल्भ झालेली नसते, तेथे कल्पनेची भरारी कमी असल्याने सुरस कथा निर्माण होऊ शकत नाहीत. बौद्धिक उत्कर्षाबरोबरच कल्पनाशक्तीची वाढ होते. यासाठी ज्या संस्कृतीमध्ये ही वाढ झालेली नाही, त्या ठिकाणी कमी दर्जाच्या कथा निर्माण होतात. याशिवाय नुसती कल्पनाशक्ति असूनही भागत नाही, ती असणाराला दांडगा आत्मविश्वास पाहिजे व त्याप्रमाणे त्याचे वर्तनही पाहिजे. कल्पनेबरोबरच स्वतःचे भावविश्वही हवेच. कथा वाचताना वाचकाच्या भावना उचंबळून आल्या पाहिजेत, हेलावल्या गेल्या पाहिजेत. यातनामय आणि संकटमय कथांनी मन भरारते आणि उत्स्फूर्त काव्यमय प्रसंग निर्माण होतात. संकटे आणि वीरांची शूर कृत्ये यांनी रंगविलेला कथाभाग जास्त आकर्षक होऊ शकतो. कल्पनाशक्ति जर

१. Myths & Legends of China by E. T. C. Werner या ग्रंथातील पुढील पृष्ठांक संदर्भ समजावेत.

सतत वाढत राहिली आणि एका विशिष्ट गतीनेच चालत राहिली, तर कथा-भागात फरक पडणार नाही, सांखळी तुटल्यासारखे भासणार नाही. यामुळेच असे म्हटले जाते की, पौराणिक कथा या आपोआप वाढतात. त्या कोण्या एका व्यक्तीच्या कथा नसून, व्यक्तीच्या वंशांच्या, संस्कृतीच्या कथा असतात.

(चा. पु., पृ. ६६)

## धर्मवेत्ता कॉन्फ्युशस

चिनी संस्कृतीचा एक मोठा धर्मवेत्ता कॉन्फ्युशस ह्याला अध्यात्माविषयी वादविवाद घातलेला आवडत नसे. त्याचा काल साधारणपणे ख्रिस्तपूर्व ५५१–४७९ असा मानला जातो. त्याच्या मरणानंतर अनेक वर्षांनी म्हणजे सन पूर्व २०२ ते २२१ या हॅन राजवंशाच्या वेळी ही संस्कृति जास्त वाढीस लागली, असे अर्नोल्ड टायन्बीचे मत आहे. ह्याने सृष्टीची उत्पत्ति व वाढ यांवर कधीही भाष्य केले नाही. संशोधनात तो विशेषसा शिरला नाही. फक्त वास्तववादी घडामोडींच्या अनुषंगाने काही धर्मतत्त्वे त्याने प्रतिपादन केली आणि ती लोकांकडून आचरणात आणविली. इतकेच नव्हे, तर ह्या धर्मतत्त्वांवर कोणतीही टीका करण्यास त्याने मनाई केली होती. (चा. पु., पृ. ८८)

वरील संदर्भामध्ये हा खालील एक गुरु-शिष्य संवाद पहा—

शिष्य—ईश्वराची सेवा कशी करावी ?

गुरु—अद्याप तुला मानवाची सेवा करता येत नाही. ती पहिल्याने शीक म्हणजे कालांतराने तुला ईश्वराची सेवा आपोआप करता येईल.

शिष्य—मृत्यु म्हणजे काय ?

गुरु—अद्याप तुला बरेच जगायचे आहे. मेल्यावर तुला आपोआप कळेल.

शिष्य— स्वर्गलोक कशाला म्हणतात आणि तो कोणाला प्राप्त होतो ?

गुरु—तुझ्या मृत्यूनंतर या गोष्टी तुला कळतील. आज त्यांचा विचार नको.

तात्पर्य, अशा काही उत्तरांमुळे शिष्याच्या कल्पनाशक्तीची वाढ खुंटली होती. सुमारे दोन हजार वर्षे तरी त्याच्या मतांचा पगडा जनतेवर राहिल्यामुळे विचारशक्तीची वाढ होण्यास सवड मिळाली नसावी. याचा परिणाम असा झाला की, पौराणिक कथा या प्राचीन वन्य जमाती अगर अशिक्षित समाजाबरोबर जोडलेल्या आहेत, सुधारणावादी जनतेबरोबर नव्हे अथवा तत्त्वज्ञानाच्या बैठकीवर तर नाहीच नाही. कान्फ्युशसने शिकविलेल्या धर्माला ते ताउइझम ( टाओइझम ) म्हणतात. त्यामध्ये नीतिशास्त्र व सदाचरणी मार्ग दाखविलेले असून काही वेळा

जादुटोण्यावरही विश्वास दाखविला आहे. पितरपूजा मात्र या काळात अधिक प्रचारात आली.

सर अर्नोल्ड टायन्बी, ताओ ( टाओ ) या शब्दाची व्याख्या खालीलप्रमाणे देतो—

" The way the universe works The great Tao is like a boat that drifts; it can go this way, it can go that " सारांश, विश्वाची नियमन करणारी शक्ति ती ताओ होय. ( Study of History, P. 509)

ताउइझम हा जरी नीतिशास्त्र शिकविणारा धर्म असला, तरी कालांतराने त्यामध्ये पितराची, भूतमात्राची, सर्प, कीटक, वृक्ष, पाषाण यांच्या पूजेचा समावेश करण्यात आला. कारण या चेतन–अचेतन वस्तूंमध्येही जीवात्मा असावा ही धार्मिक समजूत प्रचारात आली. या सर्व सचेतन–अचेतन वस्तूनाही देवत्व प्राप्त झाले. कॉन्फुशिअनिझम हा राजधर्म बनलेला होता. ( चा. पु., पृष्ठ ७३ )

## धार्मिक समजुती

यातील काही धार्मिक समजुती पहा—

( १ ) भूतसृष्टी ही चांगली व वाईट अशी दोन्ही प्रकारची असून ही काही दिवस शुभ तर काही दिवस अशुभ असते.

( २ ) जलदेवता ड्रॅगून ही चंद्र-सूर्यांना भक्षण करावयास पाहाते ,म्हणून ग्रहणे लागतात.

( ३ ) इंद्रधनुष्य हे भूमीवरील दूषित वातावरण आणि सूर्य-किरणे यांच्या मिलाफाने तयार होते.

( ४ ) दडावर ताईत बांधल्याने, घराच्या प्रवेशद्वारावर बाहुली टांगल्याने, वाघाचे पजे, घोड्याच्या आकृति गळ्यात बांधल्याने रोगराई दूर होते.

( ५ ) जपानी माणसाप्रमाणे यांची अशी समजूत होती की, सूर्य हा पूर्वी गुहेत लपून बसलेला होता, तेव्हा त्याला बाहेर आणून लोकोपयोगी करण्यासाठी युक्ति योजावी लागली. गुहेबाहेर येऊन आरशात आपले रूप पाहण्याची त्याला विनंती करण्यात आली, त्याप्रमाणे तो बाहेर आल्यावर गुहा बंद करण्यात आली.

देवतापूजन या संस्कृतीमध्ये कसे चालू झाले असावे, यासंबंधीची कल्पना अशी—मानवाची उत्पत्ति पानकू व चिनमँग या देवतांनी केली. त्यांनी उत्पन्न केलेला हा मानव दोन प्रकारची सृष्टी मानू लागला, एक सत्यसृष्टी व दुसरी

भासमान सृष्टी. पहिल्यामध्ये मानव हा सत्य आहे. कालक्रमण जागृतावस्थेत होते आणि शुद्धीवर असताना जीवमान व्यतीत होते. भासमान सृष्टीमध्ये मानवाची पाण्यात पडलेली पडछाया, स्वप्नावस्थेतील जग आणि बेशुद्धावस्था यांचा समावेश होतो. या दोन सृष्टी जरी वेगवेगळ्या भासत असल्या तरी त्यामध्ये आत्मा हा एकच आहे. दुसऱ्या क्षणभगुर भासमान सृष्टीतील आत्मा हा पहिल्या सृष्टीमध्ये परत आणावा लागतो, तो जर परत आणला गेला नाही तर तो इतर जड वस्तूमध्ये अथवा वायुसृष्टीत अदृश्य योनींमध्ये प्रवेश करून मानवाला अपाय केल्याशिवाय राहात नाही. तो प्रसंग टाळण्यासाठी त्या भासमान आत्म्याची आराधना करूनही त्याला परत आणावे लागते आणि जीवात्म्याचे व्यवहार चालू करावे लागतात. या कारणासाठी आत्म्याची पूजा सुरू झाली असली पाहिजे. मग तो आत्मा जिवत मानवाचा असो अथवा मृत पितराचा असो. त्याचे पूजन होऊ लागले. ( चा. पु., पृष्ठ ९३ )

### मानवाचे देवतास्वरूप

भूतलावर जशी चांगल्या व दुष्ट प्रवृत्तींची माणसे आहेत त्याप्रमाणे मरणोत्तर जगामध्येही देव व दानव योनी आहेत. भूतलावरील एखाद्या उत्तम गुणांची व्यक्ति मृत्यु पावली, म्हणजे दुसऱ्या जगात ती तेथील पुण्याईच्या साठ्यावर देवपदावरच आरूढ झालेली असते आणि दुर्गुणी व्यक्ति दानव-योनीत खितपत पडते. भारतामध्ये प्रभुरामचंद्र अथवा श्रीकृष्ण यांनी आपल्या उत्तम, अलौकिक गुणांनी सृष्टी गाजविली, तेव्हा अर्थातच त्यांच्या येथील प्रयाणा-नंतर त्यांना देवपण प्राप्त होऊन मानव त्यांची पूजा करू लागला. रावण अथवा कंस यांची पूजा कोणी करीत नाही, हेच तत्त्व पुराणकथामधील अनेक व्यक्तींना लागू झालेले आपल्याला दिसून येईल, मग तो देश भारत असो वा चीन-जपान असो. 'टी' हा एक वेळचा चीनमधील प्रख्यात राजा होऊन गेला, त्याच्या अगाच्या उत्तम गुणसमुच्चयामुळे मृत्यूनंतर त्याला देवपण प्राप्त होऊन शँगटी या नावाने त्याचे पूजन होऊ लागले. मृत्यूनंतर त्याच्या आत्म्याने पुन्हा भूतलावर येऊ नये आणि कोणाला अपाय करण्याचा प्रयत्न करू नये म्हणून त्याचे पूजन सुरू झाले, या धार्मिक समजुतीचा परिणाम असा झाला की, हे चांगले जीवात्मे मृत्यूनंतर ज्या दुसऱ्या जगात राहातात, ती स्थळे म्हणजे स्वर्ग अथवा पाताळ. ही पवित्रच असली पाहिजेत, या श्रद्धेमुळे त्या नावाच्या ठिकाणांची पूजा सुरू झाली. भारतामध्ये भगवान् शंकर, विष्णु इत्यादि देव कैलास वैकुंठामध्ये (हिमालय पर्वतात) राहातात म्हणून तो पर्वतही पूजनीय झाला आहे. तद्वत त्या देशात काही पवित्र स्थळांचीही पूजा चालू असते. प्रभुरामचंद्राचे वंशज अथवा त्यांचे काही भक्त त्यांची पूजा करू लागले, म्हणून आणि त्यांच्या

अंगच्या पवित्र आणि अत्युत्कृष्ट गुणांमुळे शेजारीपाजारी व मग सर्व जनताही त्यांचे पूजन करू लागली. यास्तव त्यांचेच रूपांतर सार्वजनिक पूजाउत्सवात झाले. पूजेबरोबर काही ठिकाणी बळी देण्याचीही प्रथा रूढ झाली. ( चा. पु., पृष्ठ ९४ )

## देवतामध्ये शासनाधिकाऱ्यांची कल्पना

डू योस या गृहस्थाने आपल्या ' ड्रॅगून देवता आणि दैत्य ' ( Dragon Image & Demon ) या ग्रंथात या दुसऱ्या भासमान सृष्टीची तुलना भूतलाबरोबर केलेली आहे. तो म्हणतो की, चीन देशात एकूण अठरा प्रांत आहेत आणि प्रत्येक प्रांतात शासनव्यवस्थेसाठी ८/९ वरिष्ठ अधिकारी आहेत. त्याचप्रमाणे स्वर्ग आणि यमलोकात अनेक प्रांत असून त्यावर अधिकारीवर्ग आहे. भूतलावरील बऱ्यावाईट कृत्यानुसार त्यांना त्या त्या प्रांतात पाठविले जाते. प्रांताधिकारी वर्गाची ज्याप्रमाणे येथे निवासस्थाने आहेत, तशी त्या लोकांतही आहेत. राज्यामध्ये शांतता व सुव्यवस्था राखण्यासाठी ज्याप्रमाणे सैन्य व पोलिसदले असतात, तसे त्या लोकांतही द्वारपाल, दानव व भूतमात्रांच्या पलटणी आहेत. याचे तात्पर्य एवढेच की सत्यसृष्टीमध्ये आपण जे जे अनुभवतो तेच दुसऱ्या जगात असेल असे मानतो, इतकेच ! ( चा. पु., पृष्ठ ९८ )

## चीनमध्ये बौद्धपंथ का सुरू झाले ?

महायानपंथीय भिक्षूंनी इ० स० ६५ मध्ये चीनमध्ये प्रवेश करून धर्मप्रसाराचे काम चालू केले. या संस्कृतीमध्ये पितर-पूजा असल्याने आणि आत्मा अमर आहे, हे तत्त्व बौद्धधर्मात असल्याने, बौद्धधर्म-प्रसाराला येथे जलद गती मिळाली, पितर-पूजेमुळे हा पंथ अनेक शतके टिकू शकला. बुद्धधर्माची त्रयी म्हणजे ( १ ) शाक्य, ( २ ) अमित व ( ३ ) तथागत. याचाच क्रमाने अर्थ असा, ( १ ) धर्मतत्त्वे प्रतिपादण्यासाठी अवतरलेला बुद्ध, ( २ ) प्रचारात असलेले बुद्धधर्मांचे तत्त्व आणि ( ३ ) तत्त्वाचे पालन करावयाला लागणारा बुद्ध. ताओ संस्कृतीमध्येही ही त्रिमूर्तीची कल्पना होतीच आणि त्यांना ' तीन शुद्ध पवित्र देव ' असे म्हणत. ते देव असे : ( १ ) युचिंग हा अमोलिक पर्वताची निर्मिती करून तेथे स्वर्गात राहाणारा, ज्या ठिकाणी फक्त सत्य गोष्टींचाच उगम होतो आणि ज्याच्या प्रवेशद्वाराला ' सुवर्णद्वार ' असे नाव आहे असा. कोणी याला लौचिंग-हीन असेही म्हणतात. ( २ ) शॅंग चिंग, हा दुसऱ्या स्वर्गावर अधिकार चालवितो. धार्मिक पुस्तकांची मोजदाद करणे, त्यांचे रक्षण करणे, कालाची मोजदाद ठेवणे इत्यादि कामे तो सृष्टीनिर्मितीपासून करीत आहे. ( ३ ) लावोत्सु, हा तिसऱ्या स्वर्गावर सत्ता गाजवितो आणि सर्व भूतमात्रांचे रक्षण करतो. ( चा. पु., पृष्ठ १२४ )

## धर्मसंस्थापकाचे पूजन

ताओ धर्मसंस्थापक कॉन्फुशस हा देव नव्हे. परंतु तो विद्वान धर्मसंस्थापक असल्याने वर्षातून एकदा त्याच्या स्मरणार्थ त्याचे पूजन केले जाते त्याचे ग्रंथ वेदाप्रमाणे मानले जातात वार्षिक उत्सवप्रसंगी सहस्रावधी पशु त्याला बळी दिले जातात. वरील विवेचनावरून असे दिसून येईल की, चीनमध्ये पितरपूजा, बौद्धपूजा व कॉन्फुशस याची पूजा होते. भारतामध्ये ज्याप्रमाणे शंकर व विष्णु यांची स्थाने अलग असतात त्याप्रमाणे येथे दिसून येत नाही. या सर्वांच्या मूर्ती एकमेकांच्या मंदिरात असू शकतात. कुईसिंग हा साहित्यविषयक पदवीदान करणारा देव मानलेला असल्याने त्याची आकृति चितारताना एका हातात ब्रश आणि दुसऱ्या हातात ताओ धर्मग्रंथ असतो याचीही मूर्ति वरील मंदिरात आढळते. (चा पु, पृष्ठ ११६)

मेरु पर्वताची कल्पना या संस्कृतीमध्ये आहे. स्वर्गाचे चार राजसत्ताधिकारी या पर्वतावर वास्तव्य करून रहातात तो पर्वत ३·२ लक्ष 'ली' उंच असून पूर्व बाजूची उतरण सुवर्णाची, पश्चिमेकडील रुप्याची, आग्नेय बाजू स्फटिकाची व ईशान्य बाजू स्वच्छ पारदर्शक द्रव्याची बनलेली आहे.

(चा. पु., पृष्ठ १४२)

## सार्वजनिक उत्सवाची प्रथा

या संस्कृतीमध्ये सार्वजनिक उत्सवाची रूढि सुमारे दोन सहस्र वर्षांपूर्वी म्हणजे हॅन राजघराण्याच्या वेळेपासून चालू झाली असावी. नवीन वर्षारंभाचा दिवस हा पहिला उत्सव होय (भारतामध्ये ज्याप्रमाणे चैत्र महिन्यातील पाडवा, अथवा कार्तिक महिन्यातील पाडवा साजरा करतात, त्याप्रमाणे). या दिवशी घरेदारे शृंगारणे, उद्योगधंदे बंद ठेवणे, देवतांना हवन अर्पण करणे, आकाशकंदील लावणे, नवीन कपडे शिवणे, इष्टमित्रांना भेटी देणे, मधुर पक्वान्नांच्या मेजवान्या झोडणे इत्यादि कार्यक्रम त्या दिवशी साजरे केले जातात. या संस्कृतीमध्ये अशा रीतीने आठ उत्सव साजरे केले जातात आणि त्यापैकी चार भूतमानांच्या पूजेसाठी असतात.

(१) दुसऱ्या चंद्राच्या[1] पंधराव्या दिवशी प्राचीन भूतमानांची पूजा.

(२) तिसऱ्या चंद्राच्या तिसऱ्या दिवशी मृतांच्या थडग्यांची पूजा व दुरुस्ती.

(३) पाचव्या चंद्राच्या पाचव्या दिवशी जलदेवता डुंगून त्याची पूजा.

---

१. दुसरा चंद्र म्हणजे दुसरा महिना, तिसरा महिना समजावे.

या दिवशी ड्रॅगूनच्या आकाराची लहान लहान नावांची स्पर्धा होते. या दिवसासाठी खास बनावटीच्या तांदुळाचे केक व मद्य प्राशन करून आनंदात दिवस घालवितात.

( ४ ) सातव्या चंद्राच्या पंधराव्या दिवशी मध्यकालीन भूतमात्रांची पूजा.

( ५ ) आठव्या चंद्राच्या पंधराव्या दिवशी पावसाळ्याच्या मध्यावर मृताचा दिवस साजरा केला जातो. या दिवशी नरकपुरीची दारे उघडली जातात. त्यामुळे बुभुक्षित भुताचे थवे बाहेर येऊन भक्ष्य शोधण्यासाठी इतस्ततः संचार करतात. त्यांना शांत करण्यासाठी स्त्रीवर्ग त्या दिवशी चंद्राचे पूजन करून नैवेद्याला फळे व भाकरी अर्पण करतो. या नैवेद्यावर भूतप्राणी झडप घालून त्याचा महिनाभर उपभोग घेत असतो.

( ६ ) नवव्या चंद्राच्या नवव्या दिवशी चुँगयँग देवाचा उत्सव होतो. या दिवशी प्रत्येक जण डोंगरमाथा अगर मंदिराचा माथा चढून जाण्याचा प्रयत्न करतो. भारतामध्ये ज्याप्रमाणे संक्रांतीच्या दिवशी पतंग उडविण्याचा खेळ खेळला जातो, त्याचप्रमाणे या दिवशीही येथे पतंग उडविले जातात.

( ७ ) दहाव्या चंद्राच्या पाचव्या दिवशी चालू कालातील भूतमात्रांची पूजा.

( ८ ) वर्ष संपविण्याच्या दिवशी च्यूसी हा स्वयंपाकघरातील देव स्वर्गामध्ये जाऊन त्या घरातील वार्षिक अहवाल मोठ्या देवाला सादर करतो. शहाणे लोक त्या दिवशी त्या देवासाठी गोडधोड भोजन तयार करतात, तर दुष्ट प्रवृत्तीची माणसे त्या देवाच्या ओठाला मद्य अथवा अन्य चिकट पदार्थ लावतात. तसे करण्याचा त्याचा हेतु असा की, ओठ चिकट झाले म्हणजे स्वर्गात गेल्यावर हा देव जास्त बडबड करणार नाही आणि घरातील वाईटसाईट गोष्टी मुख्य देवाला सांगणार नाही आणि त्यामुळे त्या देवाला कळणारही नाहीत !

(चा. पु., पृष्ठ ८८)

### चंद्रसूर्यांचे पूजन

अंतराळामधील सूर्य-चंद्र व ग्रह याची पूजा येथे होते. या आकाशस्थ ग्रहांचा रंग बदलणे म्हणजे भूतलावरील मानवावर संकटे येण्याची आगाऊ सूचनाच होय, असे हे लोक मानतात. सूर्याच्या प्रकाशात अगर देखाव्यात बदल होणे याचा अर्थ मानवजाती, पशुपक्षी आणि राज्यव्यवस्था यांच्यावर संकटपरंपरा ओढविण्याचे पूर्वचिन्हच होय अशी याची समजूत आहे. ज्या वेळी तो जास्त आरक्त होतो आणि त्याला कलाक्षीणता येते त्या वेळी भावी काळ हा वाईट असून तो समीप आलेला आहे याचीच सूचना देत असतो, त्या वेळी दुष्काळ पडतो

अथवा राजमृत्यूही होतो. हा अनर्थ टळण्यासाठी सूर्य चंद्राची पूजा सरकारी रीत्या जाहीरपणे केली जात असे. (चा. पु, पृष्ठ १७६)

आजचे सशोधकही हेच म्हणत आहेत की, सूर्यावरील डाग कमीजास्त प्रमाणात प्रकट लागले म्हणजे उष्णतामानावर परिणाम होतो आणि मानव जीवितावरही त्याचा परिणाम होतो. आर्मस्ट्रॉंग, कॉलिन्स व आल्ड्रिन हे तीन वीर तर दि. २१–७–६९ रोजी चद्रावर पदार्पणही करून आलेले आहेत व त्यानी चद्रावरून आणलेल्या खडक मातीचे सशोधन वरील गुणधर्मांचा ठोकताळा पाहण्यासाठी चालू आहे.

## कालगतीचक्र ६० वर्षांचे

या सस्कृतीमध्ये भारतीयाप्रमाणे येथे ६० वर्षांच्या कालगतीचा एक एक फेरा मानला आहे आणि प्रत्येक नवीन वर्षावर एक एक तारादेवता स्थापित केली आहे. वर्ष सुरू झाले म्हणजे त्या त्या तारादेवतेचे पूजन केले जाते.

## विलक्षण आकृतीचे देव

'These gods are represented by grotesque images white, black, yellow and red, ferocious Gods with vindicative eye-balls popping out and gentle faces as expressive as a lump of putty, some looking like men and some looking like women '

हे तारकादेव काळ्या, पिवळ्या, लाल रगाच्या मूर्तींचे असून, काही दिसण्यात उग्र तर दुसरे शात वृत्तीचे असतात. स्त्री व पुरुष दोन्ही स्वरूपात ते दिसून येतात. अशा एका ६० मूर्तींच्या मदिरात, कोणा एकाचे मुख डुकरासारखे तर दुसऱ्याचे मुगुसासारखे आढळून आले आहे. कोण्या एका देवतेचे दोन्ही हात डोळ्याच्या बाजूने मस्तकापर्यंत पसरलेले असून दोन्ही नेत्र खाली पायाकडे दृष्टी लावून आहेत. पायाजवळ काही उदीर इकडून तिकडे उड्या मारीत असून काही निळातून हळूच तोंड बाहेर काढून पहात आहेत, असा देखावा आहे. कोणा एका मूर्तीच्या मस्तकातून नागफणा बाहेर पडलेला आहे.

(चा. पु., पृष्ठ १७६)

## देवतांचे पूजन का ?

या तारकादेवताची पूजा सततीच्या सुखसमृद्धीसाठी केली जाते. ते असेही समजतात की, मानवी भरभराट, बाजारातील तेजी-मदी, विवाह समारभ, पर्जन्य अथवा दुष्काळ या गोष्टी तारकाच्या स्वाधीन असल्याने त्याची पूजा करून त्याना प्रसन्न ठेवणे उचित आहे ही पूजा घरोघर ताओधर्मीय पुरोहित अथवा ज्योतिषी

यांच्याकडून केली जाते. एखादा मनुष्य आजारी पडला तर तारकादेवतांच्या अवकृपेमुळे असे झाले, असे मानतात. आजारीपणाचे निवारण करण्यासाठी दहा तारा देवतांची पूजा केली जाते. त्यांच्या मूर्ति कागदांच्या बनविल्या जात. त्यामध्ये पाच देवता शुभ देवतांपैकी आणि पाच अशुभांपैकी असत. त्यांना दोन निरनिराळ्या ओळींत समोरासमोर बसवून मधोमध पक्वान्नांची ताटे ठेवीत. त्यांची अशी श्रद्धा होती की, अशुभदेवता बुभुक्षित असल्याने पहिल्याने पोटभर पदार्थ ग्रहण करतील आणि नंतर आग्नेय दिशेला निघून जातील. शुभदेवता त्यांचा पाठलाग करून त्यांना दूर हाकलून देतील आणि आजारीपणाचे संकट निवारण होईल. अर्भकाप्रमाणे असणाऱ्या तारादेवतांची पूजा केली तर स्त्रीला पुत्ररत्न प्राप्त होईल. शुभग्रहांची पूजा न केल्यास एक वर्षाच्या काळात आईबापांवर प्राणसंकट येईल. बलुसट्रेड या ताऱ्याचे पूजन न झाल्यास तो माणसांवर कोर्टदरबाराचे लफडे आणील; प्लीचर्डासम हा तारा आकडी, वेडेपणा यांवर प्रभुत्व गाजवितो. अशा अनेक समजुतींमुळे तारकादेवतांचे पूजन होते. (चा. पु., पृष्ठ १८९)

## देवतांची प्रधानमंडळे

या संस्कृतीमध्ये प्रत्येक पंचमहाभूतात्मक देवतेला एक प्रधानमंडळ व्यवस्था पाहण्यासाठी दिलेली आढळून येते. त्याप्रमाणे आकाश-देवतेलाही प्रधानमंडळ असून त्याचा प्रमुख लो-सुवान या देवाची नेमणूक केलेली आढळून येते. त्याचे चार दुय्यम प्रधान, तारका देवतांपैकी आहेत. शी-चिंग-हू हा अध्यात्मिक हत्ती तर हुवी-लु हा ग्रहातील अग्नि होय. (चा. पु., पृष्ठ २३६)

मेघगर्जना म्हणून वादळदेवता ली-सू या देवतेची पूजा होते. यांच्या प्रधानमंडळांत अनेक लहान-मोठे सरदार आहेत. (१) ली-कुंग, मेघगर्जनेचा सरदार; (२) तीन यू, विद्युल्लतेची माता; (३) फेंग-पो, वायुदेवाचा एक सरदार; (४) यू-शीह, पर्जन्याचा मालक, इत्यादि. भारतीयांनी मरुत्तदेवता या पर्जन्यासाठी मानलेल्या असून त्यांमध्ये प्रमुखस्थान वरुणाला आहे. भारताच्या आजच्या स्वातंत्र्ययुगांत नौकादलाच्या मानचिन्हावर 'शं नो वरुणः' हेच ब्रीदवाक्य कोरलेले आहे. ली-सू हा प्रधानमंडळात मध्यभागी बसतो आणि इतर देवतांची मांडणी आजूबाजूला होते. ली-सू या देवाला तीन नेत्र असून तो काळ्या घोड्यावर स्वार होऊन निमिषार्धात लक्षावधी मैलांचा प्रवास करू शकतो. लिंग-कू हा दिग्भ्रात विद्रूप असून, कृष्णवर्णी, वटवाघुळाचे पंख परिधान करणारा, वानराचे मस्तक असलेला, गरुडासारखी लांब चोच असलेला असा आहे. एका हातात लोखंडी छिन्नी व दुसऱ्या हातात 'अध्यात्मिक ज्ञानाचा हातोडा' असून तो ढोलावर सारखे आघात करीत असतो. या बडविण्याचा भयंकर आवाज होतो;

इतका की, एखादे वेळी त्या आवाजाने माणसाचा मृत्यूही होतो. कोणी या देवाला भारतीय गरुडाचे रूप देतात.

पँग पो हा देव वृद्ध असून पांढरी दाढी, पिवळा अंगरखा, लाल टोपी, हातात एक मोठी गोणपाटाची पिशवी धरून, नाकातून येणारा श्वासोच्छ्वासाचा वारा तो पाहिजे त्या दिशेकडे वळवितो, अशी त्याची ख्याती आहे यू शीह ही देवता पिवळट सवले असलेले चिलखत घालून मस्तकावर निळी टोपी अगर लोकरीची पिवळी उंच टोपी घालते ही देवता काळ्याभोर मेघावर उभी राहून झारीतून भूतलावर पाण्याचा वर्षाव करते वेदातील पर्जन्यदेवता हीच असावी. (चा पु , पृष्ठ १९८)

कुवान यिन ही सर्व प्राणिमात्रावर दया करणारी देवता आहे बौद्ध धर्मीयानीही ही देवता मानलेली आहे इसाई धर्मपथात जे स्थान मेरीला आहे तेच या संस्कृतीमध्ये कुवान यिन या देवतेला आहे. स्त्री पुरुष व मुले या देवतेची भक्ती करून तिची स्तुतिस्तोत्रे गातात येथील कोणत्याही देवतेच्या मदिरात या देवीची मूर्ति ल्हानशा गाभाऱ्यात बसविलेली आढळून येईल. मातांची ती अतिशय लाडकी असून, सर्व काळ ती त्याचे सरक्षण करते, अशी त्या संस्कृतीतील लोकाची श्रद्धा आहे कोणत्याही सकटकाली या देवतेची प्रार्थना करतात, 'हे दयाशील माते, हे सकटनाशिनी माते, या दु खातून मला मुक्त कर. या यातनातून माझी सुटका कर. या प्रांत सकटापासून माझे सरक्षण कर ' समुद्रात जहाजे चालवीत असताना सकटात सापडलेल्या नावाड्याचे ती सरक्षण करते परतु सकटात सापडूनही जर कोणी या देवतेची आठवण केली नाही, अथवा तिची प्रार्थना केली नाही, तर सकटाची भयानकता आणखीनच वाढते. पर्जन्य जोरजोरात कोसळतो आणि दु खाचा कडेलोट होतो. अग्निप्रलय झालेला असल्यास या देवतेच्या प्रार्थनेने अग्नीच थड होऊन जातो व भक्ताची सुटका होते. पर्वत प्राय लाटांमुळे कोणी सकटग्रस्त झाला असल्यास कोणीही हिची प्रार्थना केली तर पाणी एकदम गुडघ्याएवढे कमी होते एखादा व्यापारी व्यापार करून सुवर्ण, चांदी, मोती अथवा अमोल रत्ने जहाजातून भरून मायदेशी येत असेल आणि त्याच वेळी दर्यावर तुफान उसळले तर या देवतेच्या स्मरणाने त्या जहाजाचे सरक्षण होते. द्वद्वयुद्धात आठवण केल्यास प्रतिपक्षाची तलवार अथवा भाला बोथट होऊन जातो एखाद्या भक्ताच्या मनात वाईट विचार आले आणि त्याने या देवतेचे स्मरण केले तर त्याचे मन शुद्ध होते. क्रोधाग्नि भडकला असल्यास नाव घेताच तो शांत होतो वेडा मनुष्य तिच्या नामस्मरणाने शहाणा होतो एखाद्या गर्भवती स्त्रीने पोटी मुलगी मागितली तर ती अतिशय सुदर होते बुद्ध देवाच्या नावाचा ६२ लक्ष वेळा जप करणे आणि या देवतेचे एकदाच स्मरण

करणे, या दोहोंचाही परिणाम सारखाच होतो. या देवतेचे कायमचे वसतीस्थान पू-टू या बेटांवर असून ती त्या ठिकाणी जलपुष्पांवरून वाहात आलेली आहे (भारतात लक्ष्मीदेवी कमलपुष्पावरून किनाऱ्यावर आलेली आहे). या देवतेचे मुखकमल सुवर्णाप्रमाणे चकचकीत आणि चंद्रासमान शीतल आहे. ती अतिशय सौंदर्यवान अशी मानली जाते. दोन, सहा आणि नवव्या महिन्याच्या एकूण विसाव्या दिवशी या देवतेच्या नावाने उत्सव साजरे होतात. या कुवान-यिन देवीच्या वरील अनेक गुणांमुळे तिची अनेक रूपांतरे झालेली आढळून येतात. (चा. पु., पृष्ठ २५२)

## ताऊ-यू

ही अशीच एक पूजनीय देवता होय. या देवतेला बुशेलमाता अथवा उत्तरध्रुवाची माता असेही म्हणतात. तोओ व बौद्धधर्मीय, दोघेही या देवीचे पूजन करतात. भारतीय संस्कृतीमधील मरीची देवी हीच असावी. राजपुरुषांची ती माता असे मानले जाते. तिला सृष्टीतील अनेक चमत्काराचे ज्ञान असल्यामुळे सूर्यलोकावरून तिला चंद्रलोकावर जाता येत असे. सागराचे उल्लंघन ती करू शकते. तिच्या उत्तम गुणांची कीर्ति पसरल्यानंतर उत्तर दिशेचा राजा चौ-यू ह्याने तिच्याबरोबर विवाह केला. या दांपत्याला एकूण नऊ पुत्र झाले. स्वर्गातील प्रमुख देवाने तिला वर बोलावून घेतले आणि उत्तर ध्रुवाच्या बाजूचे संरक्षण करण्याची कामगिरी तिच्यावर सोपविली. अर्थात तिच्या नऊ मुलांना तिच्याच आसपास स्थाने मिळाली. उत्तर-ध्रुव तारा आणि त्याच्याभोवती वर्तुळात फिरणारा लहान सप्तर्षींचा समूह हीच तिची प्रजावळ असावी. या देवीच्या स्वरूपाचे वर्णन करताना ती कमळासनावर बसविलेली आणि ते आसन अंतराळामधून वेगवान गतीने धावणाऱ्या गाड्यावर ठेवलेले दाखवितात. तसेच ती त्रिनेत्री, अष्टादशभुजा, त्यांमध्ये धनुष्य, बाण, भाला, तरवार, निशाण, डूगूनमस्तक, पॅगोडा, पाच रथ, सूर्यचक्र, चंद्रचक्र, कमळ इत्यादि आयुधे धारण करणारी (ग्रंथात दाखविलेल्या छायाचित्रामध्ये फक्त आठच भुजा दाखविलेल्या आहेत). नीलवस्त्र परिधान करणारी असून तिची सत्ता मानवी जीवनाच्या पुस्तकावर—दीर्घायुष्यावर—चालते. प्रत्येक महिन्याच्या तिसऱ्या आणि सत्ताविसाव्या दिवशी तिचे भक्त मांस भक्षण करीत नाहीत. (चा. पु., पृ. १४४)

## सी-वॅग-यू

या देवतेला सुवर्णकासवमाता असे म्हणतात. कुन-लू या पर्वताच्या उंच माथ्यावर या देवीचे वसतीस्थान आहे. पर्वताचा परिघ सुमारे १००० 'ली' म्हणजे ३३३ मैल आहे. मंदिराच्या भिंती अमोलिक रत्नांच्या बांधलेल्या असून

अमर व चिरंजीवी लोक या ठिकाणी राहतात. ही अमर माणसे ज्या रंगाचा कपडा अंगावर वापरतात, त्यावरून त्यांचे सात वर्ग केलेले आहेत. लाल, निळा, किरमिजी, पिवळा, हिरवा, काळा आणि सृष्टीचा रंग याप्रमाणे ते वर्ग आहेत. दुर्मिळ आणि मौल्यवान रत्नाचा या ठिकाणी एक रत्नसागर आहे. साती वर्गांतील अमर जीवात्मे या ठिकाणी जमून उत्सव साजरा करतात, त्याला 'पीच उत्सव' असे म्हणतात. येथील पीचवृक्ष तीन सहस्र वर्षांनी एकदा पालवतात आणि त्यानंतर तीन हजार वर्षांनंतर त्यांना फळे येतात. पालवी येण्याचे आणि फळे येण्याचे दिवस हे या देवतेचे जन्मदिवस समजले जातात आणि चिरंजीव आत्मे त्या निमित्ताने एकत्र येतात. (चा. पु., पृ. १३७).

## ड्रॅगन

ही एक काल्पनिक जलदेवता आहे. ही देवता म्हणजे अग्निज्वाला बाहेर टाकणारा सर्पच होय.

'Dragon is a type of a man, self-controlled and with powers that verge upon the supernatural.'

या देवतेचे चित्र रेखाटताना तिला घोड्याचे मस्तक व सर्पाची शेपटी दाखवितात. दोन्ही बाजूंना पंख असून तिला प्रत्येकी पाच बोटे असलेले चार पाय असतात. हरिणासमान शिंगे, उंटासारखी लांब मान, पण सर्पासारखे बारीक-मोठे फुगीर पोट, गरुडपक्ष्याप्रमाणे पायांचे पंजे पण त्यांना वाघासारखी नखे आणि बैलाच्या कानासारखे कान असतात. प्राचीन काळी अनेक पशुपक्षांची दैवते म्हणून ज्यांची पूजा केली जात होती, त्या सर्वांची प्रतीके यांच्या स्वरूपात समाविष्ट केलेली दिसून येतील. या जातीमधील सर्वांत लहान प्राणी रेशमी किड्याएवढा असेल, तर सर्वांत मोठा प्राणी स्वर्ग व पृथ्वी यानाही व्यापून उरेल एवढ्या आकाराचा असतो. त्याच्या गळ्यात मोत्यासारखे एक रत्न लोंबत असते आणि ते सूर्याचे प्रतीक म्हणून असते.

चीनमध्ये या देवतेची सत्ता पर्जन्यावर चालते. त्याची हाडे, दांत व लाळ औषधी आहेत. पर्वतभागात निवास करून राहणारे हे प्राणी त्रासदायक असतात, तर जलाशय, तळी या ठिकाणी राहणाऱ्या मानवांना साहाय्यक असतात. दृश्यातून अदृश्यात प्रवेश करण्याची शक्ति त्यांच्यापाशी आहे. हे प्राणी वसंत-ऋतूमध्ये अंतरिक्षात जातात, तर वर्षाऋतूत पाण्यामध्ये लपून बसतात. काही देवतांना जरी पंख नसले तरी अंतरिक्षापर्यंत उड्डाण करण्याची शक्ति त्यांच्यामध्ये असते. स्वर्गामध्ये राहणारा हा प्राणी देवांचे दरवाजे राखतो. वायु उत्पन्न करून

भूतलावर पर्जन्यवृष्टी करतो. भूतलावर जे प्राणी राहातात ते नद्या व ओहोळ यांचे प्रवाह निश्चित करतात. भूमीमध्ये पुरून ठेवलेल्या द्रव्यराशींचे रक्षण करतात. भारतीय संस्कृतीतही अशा द्रव्याची राखण भुजंग करतो असे मानले जाते.

सागराच्या तळाशी राहाणाऱ्या यातील काही देवता मोती व नीलमणी यांचे खाणे खातात. सागरामध्ये अशा पाच देवता आहेत. एक मध्यमार्गी आणि चार, चारी दिशांना आहेत. यांच्या शरीराची लांबी दीडकोसाची असून अंगे डोंगराप्रमाणे जाडजूड आहेत. याचा परिणाम असा होतो की, ही जजस्त्र देवता एका बाजूवरून दुसऱ्या बाजूला वळली म्हणजे भूतलावर उत्पात होऊन एखादे वेळी एक पर्वत दुसऱ्यावर जाऊन आदळतो. त्यांना प्रत्येकी पाच पाय असून पाचवा पोटाजवळ आहे. इच्छामात्रे ते स्वर्गातही पोहोचू शकतात. यांच्या शरीराचे वर्णन करताना असे दाखविले आहे की, यांना लांब दाढी, केसाळ शेपटी, वेडंच पाय, गोलगट डोळे, लहान व जाड कान, नेहमी उघडे असलेले तोंड, लांब जीभ, तीक्ष्ण दात व अंगामध्ये पिवळ्या खवल्यांचे चकचकीत चिलखत असते. त्यांचा श्वासोच्छ्‌वास इतका उष्ण असतो की, लहान-सहान मासे त्यामुळे शिजून वितळूनही जातात. ज्या वेळी तो सागरतळांचे आपले निवासस्थान सोडून भूपृष्ठाकडे प्रयाण करतो, त्या वेळी अमृतमथनाप्रमाणे सागर घुसळून निघतो. दह्यावर लोणी यावे त्याप्रमाणे वरती पादरा शुभ्र फेस जमा होऊन प्रचंड वादळ उठते. ज्या वेळी तो हवेतून आकाशात जातो, तेव्हा वायुदेवता किंचाळून सैरावैरा पळत सुटते. धुवाधार धारा खाली कोसळतात. घरावरील छपरे उडून जातात आणि जे जे मार्गात आडवे येईल, ते ते तुफानामध्ये वाहून किंवा उडून जाते. सागरतळीच्या या देवता अमर आहेत. कोणत्याही माध्यमाशिवाय त्यांना एकमेकांचे आचार-विचार समजून येतात. इतर देवताप्रमाणे वर्षभरातून एकदा ते सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाला भेटून आपल्या जगाचा अहवाल त्याला सादर करतात. साधारणतः ते तिसऱ्या महिन्यात ब्रह्मदेवाला भेटतात. (चा. पु., पृष्ठे २०९-२११)

## अप्सरा

जलदेवताचा तिसरा प्रकार म्हणजे विहिरीजवळच्या अप्सरा होत. या सदैव विहिरींमध्येच राहाण्याचे कारण असे दिले जाते की, एकदा बारा अप्सरा एकत्र जमल्या आणि त्यांनी चँग-टाओ-लिंग या गृहस्थाला आपल्या जाळ्यात ओढण्याचा प्रयत्न केला. त्या सर्वांनी आपापल्या रत्नजडित अंगठ्या त्या गृहस्थाला देऊन आपल्याशीच विवाह करण्याचा हट्ट धरला. चँगने त्या सर्व अंगठ्या हातात दाबून त्यांची एकच अंगठी केली आणि ती विहिरीमध्ये फेकून

दिली. नंतर तो त्यांना म्हणाला, ' जो कोणी ही अंगठी या विहिरींमधून वर आणील तिच्याशीच मी विवाहबद्ध होईन. ' अंगठी आणण्यासाठी सर्वांनी विहिरींमध्ये उड्या मारताच चॅगने वरून दगड घालून त्यांना आतमध्ये बंद करून टाकले सर्वांचा प्राण वाचविला आणि ' जलदेवता म्हणून लोक तुमचे पूजन करतील, ' असा त्यांना आशीर्वाद दिला (चा पु, पृष्ठ २१७)

## साओ-चुन

ही स्वयपाकघरातील देवता मानली जाते. ताओ धर्मीयांनी ही देवता पूजनात आणली असली तरी इतर पंथीय देखील या देवतेला मानतात. असे सांगितले जाते की, अमावास्या व पौर्णिमा या दिवशी देशात सर्वत्र या देवतेची पूजा केली जाते त्या देशात ह्या देवतेच्या अशा सुमारे ६० लक्ष प्रतिमा असाव्यात. या देवतेचे मंदिर म्हणजे स्वयपाकघरातील एक लहानसा कोनाडा होय. स्वयपाकघरातील हे मंदिर सदैव धुराने माखलेले असते. या देवतेची मूर्ति एका ' फार्दिंग ' ला (एक नाणे) विकली जाते. कोणी याला ' स्टोव्हदेव ' असेही म्हणतात. गरीब अथवा श्रीमंत कोणाही असो त्याच्या घरी ही देवता असते घरातील सर्व माणसांच्या बऱ्यावाईट कृत्यांची तिला संपूर्ण माहिती असते आणि त्याबद्दलचा अहवाल वर्षातून एकदा ती स्वर्गातील प्रमुख देवाना देत असते. वास्तव घरात ती चार दिवस गैरहजर असते. ती स्वर्गात जाण्याच्या दिवशी आणि परत येण्याच्या दिवशी उत्सव साजरे केले जातात. जाण्याच्या दिवशी गोडाचा स्वयपाक केला जातो. परमेश्वराजवळ तिने फक्त गोडगोडच सांगावे, आपल्या दुष्कृत्याचा पाढा वाचू नये म्हणून जाण्याच्या दिवशी तिच्या ओठांना मध लावतात ही देवता खिस्ताब्द दोन शतके तरी पूजनात आहे

(चा. पु , पृष्ठ १६८)

पाव कुवान आणि चुग कुइ हे भूतबाधक्षत्री प्रमुख देव होत या दो प्रधानमंडळात सात मंत्री असून भूतमानांचा नाश करणे, त्यांना हुसकून लावणे इत्यादि काम त्यांना करावे लागतात एखाद्या अन्यान्य भूतयोनीतील कोणी पकडले तर याच देवाची आराधना करावी लागते (पृष्ठ २४८) निरनिराळ्या रोगावर उपाय सुचविण्यासाठी एक औषधी मंडळ आहे त्यामध्ये पान कु, पूर्ती व शनन्नग या देवांना समावेश आहे (ना पु, पृष्ठ २४८)

There are also Gods, Goddess, Patrons, etc of wind rain, snow, frost rivers tiles, caves trees flowers, theatres, horses, oxen, cane sheep dogs pigs scorpions locusts, gold, tea, salt lamps, wells, carpenters, masons ear, nose throat, monkeys, fire shadows, gamblers, inn keepers painters dyers brothels etc etc

याप्रमाणे सुमार शंभर प्रकारच्या देवतांची यादी मूळ ग्रंथात दिलेली आहे. यावरून एकच दिसते की वायु, पर्जन्य, अग्नि या पंचमहाभूता बरोबर देवताबरोबर पशुवर्गातील गाई, बैल, घोडा, मेंढ्या, धातुवर्गातील सोने, रुपे, पितळ, मानवी शरीराचे अवयव, नाक, कान, तोंड, मानवी स्वभावातील चांगल्यावाईट गुणदर्शक भावना, दया, क्षमा, क्रूरता, लहानमोठाले धंदेवाले, जुगारी, गाडीवान, सुतार, गवंडी, चांभार, ज्योतिषी अथवा बाजारबसव्या इत्यादि सर्वांवरच्या देवतांना स्थापना केलेली आहे. स्थावरजंगम सर्व वस्तूसाठी देवता मानलेल्या आहेत

या सम्कृतीमधील पौराणिक कथा अतिशय रम्य आहेत, तशाच त्या उद्बोधकही आहेत त्यांतील दोनतीन कथा वानगीदाखल येथे देण्याचे योजिले आहे वाचकांना त्यामुळे स्फूर्ति मिळून येईल आणि मनाची थोडी फार करमणूकही होईल चिनी संस्कृतीचा दर्या जरी उत्तरेकडून खाली सरकला आणि त्याखाली अनेक वन्य जमाती नामशेष झाल्या, तरी त्यातून ज्या काही वाचल्या, त्यांनी आपले अस्तित्व आजही शाबूत ठेवलेले आढळते फुची या शहरापासून काही मैलावर जग नावाची रानटी जमात एका पर्वतावर राहते त्यांचे शिरस्त्राण एका विशिष्ट प्रकारे बनविलेले आहे वाळूच्या कामस्याचा सागाडा तयार करून मागाड वाळू तो वेणाच्या गाठीवर अडकवितात आणि दोन्ही बाजूच्या आधाराने तो राहतो हा सागाडा लाल कपड्याने झाकला जातो त्यामध्ये धान्याचे तीन असते, अशी समजूत असल्याने तो झाकलेला असतो याच्या उत्पत्तीची कथा अशी सांगितली जात आहे, पश्चिम दिशेकडून एकदा चिना राज्यावर आक्रमण झाले त्यावेळी राजा म्हणाला, 'जो कोणी शत्रूच्या राजाचे शीर तोडून आणील त्याला राजकन्या दिली जाईल ' राजाचा

ही दवडी एका हुशार कुत्र्याच्या कानी पडताच त्याने ती पण जिंकण्याचा निश्चय केला. लपतछपत तो शत्रुराजाच्या तंबूत शिरला आणि त्या राजाचे-शत्रूचे मस्तक आपल्या पजानी तोडले. ते तोंडात धरून तो राजाच्या द्वारी आला. यामुळे शत्रुसैन्य पराभव पावून सैरावैरा पळून गेले.

राजप्रतिज्ञा एका यःकश्चित कुत्र्याने पूर्ण केलेली पाहाताच राजा खिन्न झाला आणि राजकन्येचा विवाह श्वानाबरोबर कसा करावा या पेचात पडला. कुत्र्याने राजाची मनस्थिती ओळखून तो म्हणाला, '२८० दिवसात (गर्भधारणेचा हा काल आहे.) मानवाचे मस्तक धारण करून मी पुन्हा तुला भेटेन, त्या वेळी हा विवाह करून घ्यावा.' राजाने या गोष्टीला मान्यता दिली. त्यानंतर एका मोठया घंटेखाली तो कुत्रा तप करण्यास बसला. '२८० दिवस पूर्ण होईतो मला कोणीही त्रास देऊ नये', अशी त्याने सर्वांना विनती केली. सर्व काही सुरळीत चालले असता शेवटच्या दिवशी राजाचे कुतूहल त्याला स्वस्थ बसू देईना. म्हणून घंटा जराशी कलवंडून त्याने आत डोकावले. त्या वेळी त्या कुत्र्याचे सर्व शरीर मानवाचे झाले होते, पण फक्त तोंड श्वानाचे राहिलेले होते. अधीरपणाने राजाने जर मुदतीआधी घंटा उचलली नसती, तर ते श्वान पूर्ण मानवरूपी झाले असते. तपश्चर्येचा भंग झाल्यामुळे पुन्हा घंटा खाली ठेवून उपयोग होण्याजोगा नव्हता. चुकी राजाचीच होती. यास्तव राजाने श्वानाच्या त्याच स्वरूपात त्याचा आणि राजकन्येचा विवाह लावून देऊन आपली प्रतिज्ञा पूर्ण केली. पण विवाहाच्या वेळी पाहुण्यांना जावयाचे श्वानमुख दिसू नये म्हणून राजाने त्यावर पडदा टाकला. आजही या देवतेच्या उत्सवसमयी देवीच्या मुखावर पडदा टाकलेला असतो (पृ. ४२०). भारतीय काली देवीचा इतिहास पाहाताना याच प्रकारे मुदत देऊन देवता अर्धस्वरूपात उत्पन्न झालेल्या आहेत, हे वाचकांनी वाचलेच असेल.

## मर्कट-देवता

चीनच्या पूर्व दिशेला हुवा-कोओ-शान नावाचा एक पर्वत आहे. त्याच्या एका उतारावर ३६ फूट उंच आणि २४ फूट परिघाचा खडकाचा एक सुळका आहे. त्या सुळक्याच्या माथ्यावर एक अंडे तयार झाले, वायूने त्याचे पालनपोषण केले आणि शेवटी त्यामधून एक पाषाणाची माकडाची मूर्ति बाहेर आली. ती जरी पाषाणाची होती, तरी जन्मतःच तिने चारी दिशांना प्रणाम केला. कालांतराने त्या मूर्तीत जीव आला आणि त्याने पर्वतमाथ्यावरून उड्या मारणे, वृक्षांची पाने-फळे खाणे इत्यादि मर्कटलीला करावयास प्रारंभ केला. त्यामुळे त्या पर्वताचे ते माकड म्हणजे एक भूषणच होऊन बसले. या कृत्यामुळे

काही लोकांनी 'माकडाचा राजा' अशी त्याला पदवी दिली. सर्वत्र त्याचा सत्कार व्हावा आणि त्याला अजिक्यपद मिळावे म्हणून त्याने अठरा वर्षे पृथ्वी-पर्यटन केल्यावर, स्वर्गातील अमरलोकांचा राजा पू-टी ह्याला भेटला असता हवेतून कसे उडत जावयाचे आणि ७२ प्रकारांत आपले रूप कसे बदलावयाचे याची गुरुकिल्ली त्याने त्याला दिली. जगभर प्रवास करीत असताना साहजिकच त्या माकडाच्या आकारात व रूपात फरक पडला आणि ते मानवस्वरूपी झाले. पू-टी जवळून विद्या प्राप्त झाल्यावर ते माकड एका उडीमध्ये १०८०० ली म्हणजे ३६ सहस्र मैल भूभाग ओलांडू शकत असे. याबद्दल इतर अनेक कथा सुमारे ४० पानांत मूळग्रंथात वर्णिलेल्या आहेत. शेवटी बुद्धाने या माकडाला देवपण दिले (चा यु पृ. ३२५–३२७) भारतीय संस्कृतीतील हनुमानाचे वरील कथेतील माकडाशी बरेचसे साम्य दिसून येईल.

कोल्हा एक पूजनीय प्राणी, म्हणून या संस्कृतीत महत्त्व पावलेला आहे. तो दीर्घ आयुष्य भोगणारा (वेळप्रसंगी एक सहस्र वर्षेपर्यंतही), धूर्त, सावध-चित्त, संशयी, दूरदृष्टी असणारा आणि शेपटी आपटली तर अग्नि उत्पन्न होईल अशा गुणांनी शरीरांनी युक्त असतो. कधी वृद्ध स्त्री तर कधी सुंदर रूपयौवना, मादक तरुणी यांची रूपे धारण करून मानवाची चेष्टा करून त्यांना त्रास देण्यात तो प्रख्यात आहे त्याच्या अनेक कथा वर्णिल्या आहेत. त्यांपैकी एक अशी, एक घरधनी गवताच्या गंजीतून रोज थोडे थोडे गवत उपयोगासाठी काढून घेत असल्यामुळे त्यामध्ये एक पोकळी निर्माण झालेली होती. कोल्ह्यांनी आपले बस्तान त्या ठिकाणी बसविले. एके दिवशी त्या कोल्ह्याने वृद्धाचे स्वरूप धारण करून त्या घरधन्याला आपल्या झोपडीत पाहुणचाराला बोलाविले. याप्रमाणे मालक त्या ठिकाणी गेल्यावर गंजीमध्ये अतिशय रम्य आणि उत्तम सजावटीची झोपडी त्याला दिसली आणि तो आश्चर्य करीत राहिला. फराळाचे पदार्थ, चहा, मद्य याचा यथेच्छ समाचार घेतल्यावर जेव्हा तो बाहेर आला, तेव्हा त्याने पाहिलेल्या नि अनुभवलेल्या देवताच्या कसल्याही खुणा तेथे नव्हत्या. ही सर्व कोल्ह्याची किमया होती, असे त्याला नंतर समजले.

(Strange Stories from Chinese Studies by H A Hills, P 370)

## जपान

सांप्रतच्या आधुनिक जगात हा देश फार पुढारलेला मानला जातो तेव्हा येथील देवतांचे प्राचीन स्वरूप विस्ताराने पाहणे सयुक्तिक ठरेल, असे वाटल्यावरून

ते देत आहे 'जपानमधील पुराणकथा' (Myths and Legends of Japan)[1] या नावाचा एक ग्रंथ श्री एफ एच डेव्हीस या सद्गृहस्थानी प्रसिद्ध केलेला आहे त्याच्या आधाराने यातील विवरण करीत आहे असे समजावे हा देश चीनच्या पूर्वेला असल्याने ते या देशाला 'Jih Pen' म्हणजे ज्या देशातून सूर्य वर येतो तो देश असे म्हणतात याच शब्दाचा अपभ्रंश 'जपान' असा झालेला आहे मार्कोपोलो या देशाला 'झिंगापू' असे म्हणतो तर दुसरे कोणी त्याला 'यामाटो' असे म्हणत आणखी हे एक लाबलचक नाव पहा

The Luxuriant Read plains of Land of Fresh Rice Ears of a Thousand Autumns of a Long Five Hundred Autumns वर्षानुवर्षे सतत भात पिकविणारा प्रदेश असा त्याचा भावार्थ होय

सातव्या शतकापर्यंत त्याचे धर्मग्रंथ तयार झालेले नव्हते पण सन ७१२ साली 'कजिकी' नावाचा आणि सन ७२० साली 'निहोंगी' या नावाचा असे दोन ग्रंथ तयार झाले या ग्रंथावरून त्यापूर्वीची पौराणिक माहिती, चमत्कार, दंतकथा, देवतांचा इतिहास यांची माहिती मिळते भारतामध्ये ज्या प्रमाणे दशावताराची कल्पना आहे, त्याप्रमाणे ती या संस्कृतीमध्येही असावी त्याची आद्यदेवता अमी मुजुदुरू सिकोटो ही असून, सातवी पिढी इझागी आणि इझनामी ही जोडी होय या दोघांचे भांडण म्हणजे पुरुष आणि प्रकृति यांच्या मधील संवाद होय असे मानले जाते त्यापैकी इझनामी ही आदिशक्तीची स्त्री रूप अवतार होय चिनीसंस्कृतामध्य ज्याप्रमाणे येंग व चीन या आद्य जोडीने भसृष्टी निर्माण केली, त्याप्रमाणे या संस्कृतीमध्ये यो इन (Yo In) यांनी सर्व सृष्टी निर्माण केली त्यांनी प्रथम एक अंडे तयार केले आणि त्याचा वरील हलका भाग वेगळा करताच स्वर्गलोक तयार झाला खाली राहिलेला स्थूलभाग भूतल तयार झाला भूतल तयार झाल्यावर इझागी व इझनामी यांना तयार करण्यात आले भारतीय संस्कृतीमधील यम व यमी यांच्याप्रमाणे प्रथमतः ही दोघे भाऊ बहीण होती पण कालांतराने जेव्हा त्यांना कामवासना उत्पन्न झाली, तेव्हा त्यांनी विवाहबद्ध व्हावयाचे ठरविले त्यासाठी त्यांना एक मजेदार प्रयोग केला भूतलावर एक स्तंभ उभा करून दोघांनी त्याभोवती उलटसुलट दिशेने प्रदक्षिणा घालण्यास सुरुवात केली त्या दोघांची भेट जेव्हा अशा रीतीने फिरता फिरता झाली, तेव्हा इझनामी म्हणाली, 'मी मला ह्या अगणाया प्रिय तरुणाला प्रथमच भेटत आहे' पण या शब्दांनी

---

१ टीप Myths and Legends of Japan by F Hadland Davies या ग्रंथातील पृष्ठाचे पुढील क्रमांक समजावेत

इझागी उल्हसित झाला नाही. कारण तेथील चालीरीतीप्रमाणे प्रथम भेटीत पहिल्याने प्रश्न करणे हा मान पुरुषाचा असतो, स्त्रीचा नव्हे. तेव्हा दोघांनी पुन्हा खांबाभोवती प्रदक्षिणा घालण्यास सुरुवात केली. त्यांची भेट झाल्यावर इझागीने इझनामीला प्रश्न विचारले आणि मगच दोघांचा विवाह झाला.

(ज. पु., पृष्ठ २१)

नंतर इझनामी देवीने समुद्र, नद्या, झाडे झुडुपे, पर्वत यांना जन्म देऊन आपल्या पतीच्या संमतीने या सर्वांवर सत्ता म्हणून अमा तेरसू या सूर्यदेवतेची स्थापना केली. एक मोठी शिडी लावून अमा तेरसूला वर आकाशात पाठवून दिले. अमा तेरसू तेथे सर्वत्र फिरून सर्वांवर देखरेख ठेवू लागला. पुढे इझनामीला एक कन्या झाली. तिचे नाव सुकी युमी (चन्द्रदेवता) असे ठेवण्यात आले. तिला वर पाठवून देण्यात आले. पण तिचे अमा तेरसूबरोबर काही पटेना. एकमेकाची भांडणे चालू झाली आणि एकमेकाचे मुखावलोकनदेखील न करण्याचे त्यांनी ठरविले. यामुळेच ते दोघेजण वेगवेगळ्या वेळी उगवतात व मावळतात. इझनामीने पुढे पुन्हा कागु सुची या अग्निदेवतेला जन्म दिला. ती देवलोकात गेल्यावर तिचा विवाह झाला, पण कालांतराने तिचा पती इझागीकडे गेला. हे तिला आवडले नाही. पतीला शिक्षा करण्यासाठी तिने आठ दुष्ट चेटक्या निर्माण केल्या आणि त्या पतीच्या पाठलागावर पाठविल्या पण या वेळेपावेतो सृष्टी व देवतानिर्मितीचे त्यांचे कार्य संपुष्टात आले असल्याने तो अहाजी या बेटात कायमचाच राहावयास गेला.

(ज. पु., पृष्ठ २४)

भारतीय संस्कृतीची देवघेव जपानमध्ये फार प्राचीन काळापासून चालू आहे. तेथील सनातन धर्माचे नाव 'ब्राह्मनोक्या' होय. या प्रदेशाची नारा ही राजधानी होती आणि भारतातील वाराणसी क्षेत्रासारखी ती प्रसिद्ध होती. तेथील राजवस्त्र सर्वदर्शनीय होते तेथील प्राचीन सांस्कृतिक चिन्हे आजही दृग्गोचर होत आहेत टोकिओ शहरापासून १५ मैलावर इंद्रदेवाचे मंदिर आजही उभे असून द्वारपाल म्हणून दोन हनुमानाच्या मूर्ति आहेत. टोकिओ शहरातील सरस्वती-मंदिर प्रेमिकांचे आवडते स्थान असून तिला बेन्तेनसामा या नावाने संबोधिले जाते क्योतो, नारा, कोयापर्वत, तोक्यो, मियाजिमा इत्यादि शहरातून विष्णु अवताराच्या मत्स्य, कूर्म, वराह देवताच्या मूर्ति आहेत. एम्मामाम्मा म्हणजे यमराज यांचीही तेथे पूजा होते. त्याची प्रतिमा चितारताना मस्तकावर चिनी पद्धतीचा किरीट, वृषभवाहन, ताम्रवर्ण आणि नेत्रामध्ये अग्निज्वालेप्रमाणे तेज चमकत असलेले दाखवितात. काही वेळा जपानी माता लहानग्यांना दटावताना म्हणतात, 'वारंवार खोटे बोललात तर यमराज येऊन झोपेत तुमची जीभ कापून टाकील

बरं का!' यासाठी या देवतेची कृपा संपादन करण्यासाठी १६ जानेवारी व १६ जुलै रोजी शाळाना मुद्दाम सुट्टी देतात आणि मुले तेथे जाऊन देवापुढे सामुदायिक प्रार्थना करतात.

क्योटो येथील संजूसंजेडो मंदिरात ३३,३३३ मूर्ति आहेत. मूळमूर्ति सुमारे एक सहस्र असून त्या प्रत्येकी पाच फूट उंचीच्या आणि त्यांच्या अंगावर चितारलेल्या लहान लहान सहस्रावधी मूर्तींनी युक्त अशा आहेत. या सर्वांची संख्या वरीलप्रमाणे भरते. मंदिराच्या प्रवेशद्वारावर ब्रह्मा, इंद्र, शिव, विरोचन, वैश्रवण या देवता आहेत. इ. स. ११३२ च्या सुमारास तोबा नावाच्या राजाने हे मंदिर बांधले आणि सन १६६२ साली त्याचा जीर्णोद्धार होऊन त्याला सांप्रतचे स्वरूप प्राप्त झालेले आहे. (जेम्स धार्मिक कोश, १/१४७)

## जपानी मंदिरे

सन १८६८ पर्यंत क्योटो हे राजधानीचे शहर होते, नंतर टोकिओ झाले. या शहरात बौद्ध व शिंटो धर्मीयांची मंदिरे जागोजाग विखुरलेली दिसतात. १५९८ बौद्ध मंदिरे असून २७३ शिंटो धर्मीयांची आहेत. याच शहरात तोजी नावाचा पॅगोडा पाच मजली असून त्याची उंची १८७ फूट आहे.

जपानमधील दुसरे एक शहर नारा, या गावी सर्व जगातील भव्य बौद्ध मंदिर असून, तोडाजी या नावाने ते प्रसिद्ध आहे. या मंदिरामध्ये ५३ फूट उंचीची ब्रॉंझ धातूची बुद्धाची भव्य मूर्ति आहे. मंदिराची बांधणी आठव्या शतकातील असून शिल्पकलेसाठी हे फार प्रख्यात आहे. या ठिकाणचे वैशिष्ट्य असे की, एका खांबाला भव्य भोक असून, त्यातून आरपार जाणारा पार पुण्यवान समजला जातो. अनेक प्रवासी हा प्रयोग करून पाहतात. नास्तिक माणसाचे हृदयातही भाविकता उत्पन्न व्हावी, माथा देवाचे चरणी आपोआप नमावे इतके तेथील वातावरण धीरगंभीर, शांत असते. मंदिरे अगदी स्वच्छ राखण्यात येत असल्यामुळे, पवित्रपणा आपोआपच उठून दिसतो. येथील व्यवस्थेचे अनुसरण इतरत्र व्हावे अशी नमुनेदार व्यवस्था चटकन लक्ष वेधून घेते.

येथील कासुगा नावाचे एक मंदिर दिव्यांचे रोषणाईसाठी प्रसिद्ध आहे. अनेक भाविक भक्त या मंदिराला टांगत्या दीपांची भेट म्हणून देतात. त्यामुळे सांप्रत येथे सुमारे तीन सहस्र दीप जळत असतात. मंदिराप्रत जाण्याचा मार्ग डिअर-पार्क म्हणजे हरिणाचे कळपातून जातो. सहस्रावधी हरणे त्या बागेत इतस्ततः फिरत असून, मंदिराला भेट देणारे भक्त त्यांना खाऊ-पिऊ घालतात.

भारतामध्ये काही ठिकाणी माकडाना चणे खावयास देण्याची रूढि आहे, अगर नदीमध्ये माश्याना खावयास टाकतात, त्याचप्रमाणे येथील रूढि भासते. बिकानेर येथील श्रीकरणीदेवींचे भक्त तेथे उंदिराना खाणे घालतात.

फुशिमी नावाचे मंदिर येथे असून, त्याचे वैशिष्ट्य म्हणजे देवाला लाकडी कमानींची भेट समर्पण करतात. सुमारे वीस हजार तरी कमानी त्या मंदिरात आहेत असे सांगतात. जपानमध्ये दोन भव्य हिंदु मंदिरेही आहेत व प्रत्येकात सुमारे हजार हिंदुदेवता एकत्र ठेवलेल्या आढळतात. . . .

( श्रीकांत टिळक, प्रवासवर्णन—केसरी १९-११-६७ )

## अग्निहोत्र

या देशात तुरळक कोठे अग्निहोत्र आजही चालत आहे. दिनांक १—३—१९६९ रोजी शिवपुरी—अक्कलकोट ( भारत ) येथे सोमयाग भव्य प्रमाणात सात दिवस चालू झाला. अनेक देशातील प्रतिनिधी या अपूर्व यज्ञास उपस्थित होते. त्यापैकी एन्. मोरी हे जपानी प्रतिनिधी होते. जपानमध्ये अखंडपणे अकराशे वर्षे चाललेल्या अग्निहोत्राचा चित्रपट त्यानी यज्ञसमितीला भेट म्हणून अर्पण केला. जपानी संस्कृतीमध्ये अग्निपूजा होती, याचाच हा पुरावा म्हणून देता येईल. •

( केसरी—पुणे, दि. ३—३—६९ )

## देवांचा पर्वत

टोकिओपासून १२० मैल अंतरावर मात्सुशिरो नावाचे गाव असून तेथे भारतातील भगवान शंकराच्या कैलासपर्वताप्रमाणे, देवाचा एक पर्वत आहे. त्याला ' मिनकामी यामा ' असे म्हणतात. पर्वतशिखरावर देवतांची वस्ती आहे, असे मानले जाते. सांप्रत या पर्वताच्या पोटात सहा मैल लांबीचे भुयार खोदलेले असून हवामानशास्त्रज्ञ उत्तमपणे त्या ठिकाणी प्रयोगशाळा चालवीत आहेत.

## जपानी कलाकौशल्य

रा. डेव्हीस यांच्या ग्रंथात जी देवताविषयक छायाचित्रे दिलेली आहेत ती मूळ मूर्तींची नसून चित्रकाराने चितारलेली दिलेली आहेत. जपानी चित्रकला आजही प्रसिद्ध आहे आणि अगदी लहान-सहान वस्तूंवरही ती आढळेल. या कलेविषयी जाणकाराचे मत असे—

" Great in small things, but small in great things "

म्हणजे अगदी लहान-सहान वस्तूही ते अतिशय कौशल्यपूर्ण रीतीने आणि बारीक-सारीक अंगे दाखवून चितारतील, पण मोठ्या चित्रांत तसे लक्ष देणार

नाहीत जसे फुले, फळ, पक्षी व लहान प्राणी चितारण्यात ते तरबेज आहेत, वेसाची वळणे अथवा ढगा ते बहुतेक चितारतील, चंद्रदेवतेसमोर एखादी चेरीब्लॉसम् वृक्षाची लहानशी फांदी सत्य भासावी इतकी उत्कृष्ट काढतील, पण एखादे मठे शिप तयार करावयाचे असेल अगर युद्धाचा देखावा चितारावयाचा असल तर तितके त्यांना साधणार नाहीत जपानात विकल्या जाणाऱ्या जगदी स्वस्त किंमतीच्या त्याच्या टॉवेलवर नक्षी असल्याशिवाय राहणार नाही

कोणी असे मानतात की, जपानी चित्रकलेचा उगम बौद्ध संस्कृतीमधून झालेला असून त्यावर चिनी संस्कृतीची छाप पडलेली आहे या कारणास्तव बौद्ध मंदिरातील कला गौरवपूर्ण असते, तर शिंटो मंदिरातील साधीसुधी असते या कलेसंबंधी एक भावपूर्ण कथा प्रचलित आहे ती अशी—हिदारी जिंगारो या नावाचा एक शिल्पकार होता एकदा त्याची एक कलाकृति पूर्ण झाल्यावर ती एका मंदिरात ठेवण्यात आली कालांतराने त्या कलाकृतीत आपोआप जीवशक्ति प्राप्त झाली इकडे शेतकऱ्याची तयार झालेली शेते एक काळा घोडा रात्रीचा येऊन त्याचा नाश करून जाई एकदा लोकांनी त्याचा पाठलाग करताच तो एका मंदिरात शिरला आणि गुप्त झाला त्या मंदिरातच त्या शिल्पकाराची घोड्याची कलाकृति टांगून ठेवण्यात आली होती तोच तो घोडा असावा असे त्या शिल्पकाराला वाटून शिल्पकृतीजवळ एक लाकडी खांब उभा करून त्याने घोड्याला दोरीने ठाणबद्ध करून टाकले त्यानंतर घोड्याला बाहेर जाता न आल्यामुळे शेतकऱ्याचा नाश वाचला दुसरा एक चित्रकार शेशीवू यासंबंधी अशीच एक कथा प्रचलित आहे लहानपणी त्याला शिक्षा देण्यासाठी म्हणून त्याच्या आईने त्याला एका बुद्धमंदिरात दोरीने बांधून ठेवले त्या मुलाने आपल्या डोळ्यातील अश्रू गाळून त्याची शाई तयार केली आणि पायाच्या बोटाचा कुंचल्यासारखा उपयोग करून आजूबाजूला अनेक उंदीर चितारले थोड्या वेळात त्या उंदरामध्ये जीव उत्पन्न होऊन त्यांनी त्या मुलाचे दोर कुरतडून टाकून त्याची मुक्तता केली या सर्वांचे तात्पर्य असे की, इतकी सजीवता, इतकी वास्तवता जपानी चित्रकलेत असते (ज पु, पृष्ठ ११६)

## धार्मिक समजुती

या संस्कृतीमध्ये काही धार्मिक संकेत पाळण्यात येत होते ते असे—

(१) माणसाच्या वयाची २५, ४२, ६१ ही वर्षे अशुभ असतात, तर स्त्रीवर्गाची १९, ३३, ३७ ही वर्षे अशुभ असतात या अशुभ वेळी धार्मिक कृत्ये केली तरच वाईट परिणाम टळतात १६, २५, ३४, ४३, ५२, ६१ ही वर्षे प्रवासाला घातक असल्याने त्या वेळी माणसांनी प्रवास करू नये

( २ ) नवीन कपडा तयार करावयाचा झाल्यास प्रथम स्त्रिया काही एका मंत्राचे पठण करतात आणि तीन चिमटी मीठ त्यांवर टाकून मगच कपडा शिवावयास सुरवात करतात.

( ३ ) काही दिवस पथ्यासाठी, तर काही दिवस माकडांसाठी शुभ दिवस म्हणून राखून ठेवलेले असतात. माकडाचा जो दिवस असेल त्या दिवशी नवीन सुई शिवणास घेऊ नये, पण पथ्याच्या दिवशी अवश्य घ्यावी. हा संकेत न पाळता जर प्रथमच सुई माकडाच्या दिवशी घेतली तर कपडा जळून जाण्याची भीती असते. पण इतर दिवशी घेतल्यास कपडा जास्त टिकतो आणि उत्तम प्रकारे तयार होतो.

( ४ ) लहान मुलांचे दात पडले असता ते पवित्र जागी जमिनीवर टाकले, तर पुन्हा येणारे दात उंदरासारखे तीक्ष्ण येतात.

( ५ ) लहान मुलाच्या कपाळावर 'कुत्रा' शब्द कुंकवाने लिहिला तर कोणत्याच्या जादुगिरीच्या प्रयोगाचा त्या मुलावर काही प्रभाव पडत नाही.

( ६ ) लहान मुलाच्या हाताचा शाईने कागदावर ठसा घेऊन त्याचा ताईत करून गळ्यात घातल्यास त्याला दृष्ट लागत नाही. तसेच एखादे मंदिराचे चित्र, तांदूळ, धर्मसूत्रे, बुद्धाची पावले अशाचा ताईत करून घातला असता दृष्ट लागत नाही.

( ७ ) टेंगाशिया वृक्षाची पाने समुद्रावर सफरीसाठी जाणाऱ्या नावाड्याच्या घरावर बांधतात. तसे केल्याने त्या नावाड्याचा प्रवास निर्विघ्न पार पडतो, अशी त्यांची श्रद्धा आहे.

( ८ ) जपानी स्त्रिया स्वयंपाकघरात बांबूची फुंकणी वापरतात. काही वेळा जास्त वापराने अथवा उष्णतेने ती फुटते. अशा वेळी त्या फुटक्या फुंकणीत तांब्याचे नाणे घालून काही मंत्रांचा जप करून ती खाली रस्त्यावर फेकली जाते. *यामुळे बिंगोगामी देवतेची हकालपट्टी होते, अशी त्यांची समजूत आहे.* हा देव दरिद्रीनारायण असल्याने त्याच्या जाण्याने घरातील दारिद्र्य दूर होते असे ते मानतात. ( ज. पु., पृष्ठ ३४९ )

भारतीय संस्कृतीमध्येही गावाला जाण्याचे शुभ दिवस, नवीन वस्त्र परिधान करण्याचे शुभ दिवस, लहान मुलाचे पडलेले दात तुळशीवृंदावनात टाकणे, गळ्यात अथवा दंडात ताईत बांधणे इत्यादि इत्यादि संकेत पाळतात.

### मृतांसाठी महोत्सव

या संस्कृतीमधील पुरुष आत्मघात ( हाराकिरी ) करण्याविषयी सर्वत्र प्रसिद्ध आहेत. आत्मघात करताना त्यांच्या काही इच्छा अतृप्त राहातात, तेव्हा त्यांची पूर्तता करून घेण्यासाठी त्यांचे जीवात्मे जुलै महिन्याच्या १३ ते १५ तारखेपर्यंत परत येतात, अशी त्यांची समजूत आहे. या वेळी वृक्षराजींना सर्वत्र सुगंधी मोहोर आलेला असल्यामुळे त्यांचा सुवास सर्वत्र दरवळत असतो. जोरदार वायु हा सुगंध सर्वत्र पसरवीत असतो. फुलपाखरे या फुलावरून त्या फुलावर बागडत असतात. आयुष्यातील काही क्षण ज्या चांगल्या ठिकाणी व्यतीत झाले त्या वरील-प्रमाणे असणाऱ्या जागा पाहाण्यासाठी, त्या क्षणाचा उपभोग घेण्यासाठी ते जीवात्मे चोरट्या पावलांनी येतात आणि वातावरणात रमून जातात. या वेळी काही पाईन वृक्षावर दिवे लावण्यात येतात. स्मशानात कंदील लावून ठेवण्यात येतात आणि गोड जेवणाचा कार्यक्रम करून त्यांना काही भाग त्या जीवात्म्या-साठी स्मशानात ठेवतात. (ज. पु., पृ. १६१)

### सेन-जेन

ही फुजी पर्वतावरील देवता होय. जपानी संस्कृतीमधील तिचे नाव का नो-हन-साकु-या-हिमे असे असून त्याचा भावार्थ असा की, जो झाडाच्या फुलांच्या फुलोऱ्याप्रमाणे सदैव स्फूर्ति देणारी ती देवता. या देशातील विख्यात फुजी पर्वत-माथ्यावर देवीचे हे क्षेत्र असून ते अतिशय पवित्र मानले जाते. भक्तांची अशी श्रद्धा आहे की, ही देवता अंतरिक्षामधून सदैव घिरट्या घालत असून जो कोणी मनात तिच्याविषयी विकल्प धरून वर येईल, त्याला ती खाली लोटून देते. या देवीच्या मंदिराच्या परिसरात ओ-अना मोची नावाची दुसरी एक लहान देवता असून तिला शरीराचा कायाकल्प घडविणारे अमृतच मानले जाते. एक जपानी कवि तिला म्हणतो, 'आम्ही तुझ्याभोवती असलो म्हणजे मरणदेखील विसरून जातो.'

एके वेळी या देवीची कीर्ति चीनच्या राजाने ऐकली. त्याने असे ऐकले की, पर्वत आणि ते मंदिर एका रात्रीत भूमीतून वर आले आहे. ( भारतामध्ये एका रात्रीत अनेक मंदिरे बांधली गेलेली या ग्रंथातून वाचकांनी वाचले असेलच ). राजाने या स्थानाला भेट देण्याचे ठरवून आपल्याबरोबर आपली सुस्वरूप पत्नी आणि इतर माणसे घेऊन जलद गतीने जाण्यास निघाला. समुद्राच्या वादळातही राजाने आपली जहाजे चालविली आणि किनाऱ्यावर उतरल्याबरोबर भिरभिरीने सर्वजण निघाले. स्वतः राजाची स्वारी आघाडीवरच होती. मंदिर दृष्टिपथात आल्याबरोबर आणि पुढील अंतर थोडेच आहे असे समजून अमृत पिण्यासाठी

अर्धार झालेला तो राजा धावतच सुटला आणि एकदाचा मंदिराप्रत पोहोचला. इतर माणसे त्याच्या मागोमाग धावत वर येऊन पाहतात तो राजा स्वस्थ निजलेला होता. लोकांना वाटले तो अमृत प्यायल्यावर स्वस्थ चित्ताने पडला असावा. पण हाय रे दैवा! ती होती त्याची अखेरचीच चिरस्थायी निद्रा! अर्थात अतिशय श्रमामुळे त्याला ही स्थिती प्राप्त झालेली होती. (ज. पु., पृष्ठ १३३)

## देवता प्रकट झाली

या देवीसंबंधाने आणखी एक दंतकथा प्रचलित आहे, ती अशी. एकदा येसोजी नावाच्या माणसाची आई मरणाच्या द्वारी पडली असता कामो-यामाक्रिको या मांत्रिकाने त्याला सांगितले की, वरील मंदिराच्या नैर्ऋत्य दिशेला एक निर्झर असून बाजूला मानवाना दीर्घायुष्य देणाऱ्या देवतेचे मंदिर आहे. त्या निर्झराचे पाणी तुझ्या आईला आणून पाजल्यावर ती बरी होईल. येसोजी धावतच त्या स्थळाकडे निघाला. पर्वतमार्गावरील एका तिठ्यावर आला असता पुढील मार्गाविषयी संभ्रमात पडला. अशा वेळी त्या ठिकाणी एक सुंदरी प्राप्त झाली व तिने त्याला इच्छित मार्गदर्शन केले. ह्या स्थळी पोहोचल्यावर अमृततुल्य जल त्याला प्यावयास देऊन मातेसाठी थोडेसे देऊन ती त्याला म्हणाली, 'पुन्हा एकदा चार दिवसानी तुला यावे लागेल!' येसोजीला तिने पुन्हा तिठ्यापर्यंत आणून सोडल्यावर ते पाणी घेऊन तो घरी आला. मातेला पाणी दिल्यावर तिला जरासा उतार पडला. चार दिवसानी पुन्हा पाणी आणून दिल्यावर तिला पूर्ण गुण पडला. आपल्या उपकारकर्तीचे आभार मानण्यासाठी येसोजी परत तेथे गेला असता, ती सुंदरी त्याला दिसली नाही, इतकेच नव्हे तर तो निर्झरही आटून गेलेला होता. त्याने मनोभावे देवीची प्रार्थना करताच फुजी देवता प्रगट होऊन त्याला पुष्पप्रसाद देऊन ती अदृश्य झाली. येसोजी मनात समजला की, त्याला मार्गदर्शन करणारी सुंदरी म्हणजे स्वतः देवीच त्या रूपात प्रकट झालेली होती. (ज. पु., पृष्ठ १३५)

## काननदेवी

ही एक कृपाळू आणि दयाशील देवता होय. भारतीय दुर्गादेवतेप्रमाणे या देवीला सहस्र बाहु असल्याचे मानतात, परंतु प्रत्यक्षात मात्र चारच भुजा आहेत. भारतात सहस्र भुजा असलेली देवीची मूर्ति आढळली आहे, हे आपण पाहिलेच आहे. प्रत्येक हातात आयुध असून भक्ताचे मनोरथ पुरविण्याकडे त्याचा उपयोग केला जातो. ही देवता अनेक स्वरूपांत दाखविली जाते. वर म्हटल्याप्रमाणे सेजु-क्वानन देवीला सहस्र बाहु आहेत ही भावना आहे. जिवू-ची-मन-क्वानन या देवीच्या स्वरूपात अकरा मुखे दाखवितात. (भारतीय संस्कृतीत एकापेक्षा अनेक मुखाची स्त्रीदेवता दिसून येत नाही. मग ही देवता कोठून आली

ते समजत नाही ). या देवीच्या हास्यात कमालीचा नाजुकपणा आणि स्वर्गीय मोहकता भक्तांना दिसते. तिच्या अनेक मुखांवर हे निरनिराळे आविष्कार दाखविण्याचा कलाकाराचा हेतु बराच साध्य झालेला आहे. बाटो-क्वानन हे तिचे अश्वमुख स्वरूप असून शेतकरीवर्ग या स्वरूपाची पूजा करतो आणि आपले पशुधन व घोडे यांचे संरक्षण करण्याची तिला विनंती करतो. चिनी लोक याच स्वरूपाला क्वानर्जीन असे म्हणत असून ते तिला अमितभाचेच स्वरूप मानतात. क्वाननदेवींमध्ये लहान मुलांच्या जीजोदेवीप्रमाणे अनेक सारखे गुण आहेत.

(ज. पु., पृष्ठ २०४)

क्वाननदेवीचे स्वरूप म्हणजे बोधिसत्त्वाचे स्त्री-स्वरूप होय असे बौद्ध-पर्याय मानतात. अवलोकितेश्वराला हे स्त्रीस्वरूप कसे प्राप्त झाले याचा उलगडा कोठेच होत नाही. या रूपाला तीन मस्तके, अनेक भुजा आणि कमळ, चक्र, कुऱ्हाड, पॅगोडा ही त्यांमध्ये आयुधे असतात.

नर-आई पर्वतावर या देवीचे एक प्रमुख ठिकाण आहे. त्याबद्दलची दंतकथा अशी की, प्राचीन काळी या मंदिराच्या जागी ' सायन-झेंजी ' नावाच्या तपस्व्याने आपले उर्वरित आयुष्य घालविण्याचे ठरविले. या ठिकाणावरून आयाटकी सरोवर व मियाझ्-उपसागर यांच्यामध्ये असणारी अयो-नो-हशीडेट ही कड्याची जागा फारच रमणीय दिसते. हे रमणीय क्षेत्र आणि तेथील आकर्षक देखावा पाहाण्यास आजही यात्रिक या स्थानाला भेट देत असतात. सायन झेंजी याने आपल्या उपासनेसाठी त्या ठिकाणी एक लहानशी देवीची लाकडी मूर्ति स्थापन केली. देवीची पूजा, पाठ, बौद्धसूक्ते यांचे पठण करून तो आपला काळ व्यतीत करीत असे. एकदा त्या पर्वतमाथ्यावर भयंकर बर्फवृष्टी होऊन २० फूट जाडीचा थर सर्वत्र पसरल्याने तपस्व्याची झोपडी त्याखाली गाडली गेली. त्यामुळे त्याला अनेक दिवस काही खावयासही मिळाले नाही. परंतु म्हणतात ना, देवतांना आपल्या श्रद्धावान भक्ताची काळजी वहावीच लागते. एके दिवशी त्या तपस्व्याने बर्फाच्या ढिगाऱ्यांतून बाहेर पाहाताच त्याला एक मृत हरीण दिसले.- तेही बर्फात गोठून गेलेले होते. हरिणांचे मांस खाणे जरी निषिद्ध मानले गेले असले, तरी प्राण जगविण्यासाठी त्याने ते खावयाचे ठरविले. ( भारतीय पुराणात विश्वामित्राने कुत्र्याच्या तंगडीचे मांस यासाठीच भक्षण केलेले आहे ). गोठलेल्या हरिणाच्या मांसाचा तुकडा त्याने हत्याराने काढून घेतला आणि शिजविला. त्यापैकी अर्धा भाग त्याने खाल्ला आणि अर्धा भाग तसाच भांड्यात ठेवून दिला. काही दिवसांनी बर्फ वितळल्यावर भक्तमंडळी त्या तपस्व्याची अवस्था पाहाण्यासाठी मुद्दाम मंदिरात आली. अन्नपाण्याविना तो इतका दीर्घकाळ कसा जगू शकला

याचे त्यांना आश्चर्य वाटले. तपस्याने झालेली हकीगत त्यांना सांगितली. लोकांनी मांस शिजविलेल्या भांड्यात पाहिले, तो तेथे एक सुवर्णाचा तुकडा त्यांना आढळला. देवीच्या स्वरूपाचे दर्शन घेता त्यांना असे आढळून आले की, देवीच्या मांडीचा कोणीतरी लचका तोडलेला आहे. तेव्हा भक्तांना समजून चुकले की, भक्ताचे रक्षण करण्यासाठीच देवीने आपले मांस हरिणरूपात त्याला खावयास दिले. नंतर लचका तोडलेल्या ठिकाणी त्यांनी दुसरा तुकडा आणून बसविला.

(ज. पु., पृष्ठ २०६)

या देवतासंबंधाने एका उत्कृष्ट कलाकृतीचा नमुना पाहता येतो. कोनो-होगाई या कलाकाराने एका वस्त्रावर उत्तम कशिदा काढलेला असून त्यामध्ये या देवतेला मातृदेवता म्हणून दाखविली आहे. एका नळकांड्यातून गंगोदकासारखे पवित्र जल खाली पडत असून त्या पतीत जलाच्या धारा खाली आपटण्याने वर निघणाऱ्या बुडबुड्यांतून एकेक बालक हात जोडून बसलेले आहे. असे सांगतात की, ही कलाकृति पूर्ण होण्यास तीन वर्षे लागली. त्यामध्ये १२ सहस्रापेक्षा जास्त रेशमी सुताच्या निरनिराळ्या छटांचा आविष्कार केलेला असून १२ सुवर्णतारांमध्ये तो गोवलेला आहे. ही कृती पाहून प्रेक्षक आश्चर्याने थक्क होऊन जातो. या क्वानन देवतेची मंदिरे आणि प्रमुख स्थाने तेहतीस ठिकाणी आहेत. त्यामध्ये किशु, यामाटो, यायाशिटो, क्याटो, हरिया, अचेयी इत्यादि स्थानांचा समावेश आहे. (ज. पु., पृष्ठ २०५)

## सातलक्ष्मी[1]

बेन्टेन ही मूळची सागरदेवता, कारण तिचा जन्मच सागरात झालेला आहे. लक्ष्मीदेवीची जी सात स्वरूपे आहेत त्यापैकी हे एक होय.

(१) फुकुरो-कुजो—मोठे मस्तक असून जवळ हरिणबालक, कासव व तराजू असतो.

(२) डायकोकू—हिची बैठक तांदुळाच्या गोणीवर असून बरोबर एक उंदीर असतो.

(३) इमुथी—हिच्याबरोबर एक मत्स्याकृति असते.

(४) होटेई—लक्ष्मीच्या एका हास्यस्वरूपाचे नाव.

---

१. भारतामध्ये अष्टलक्ष्मी मानलेल्या आहेत.

( ५ ) विशापन—युद्धदेवता स्वरूप असल्याने अंगावर चिलखत, भाला व पॅगोडा असतो.

( ६ ) वेन्टेन —सौंदर्य, संपत्तिवर्धन करणारी आणि संतति देणारी देवता. हिला वाग्सरस्वती असे म्हणतात. ( ज. पु., पृष्ठ ११५ )

जपानी संस्कृतीमध्ये ड्रॅगून अथवा सर्प हे जलवाहक असल्याने अनेक ठिकाणी ते पवित्र मानलेले आहेत. या देवतेच्या मूर्तींला आठ भुजा दाखवितात. पैकी सहा वरील बाजूस असून त्यामध्ये धनुष्य, बाण, चक्र, तरवार, चावी व पवित्र रत्न हीं आयुधे असून इतर दोन हात प्रार्थना करीत असलेल्या स्वरूपात आहेत. ही देवता क्वॉनन देवीचे बरेच साम्य दाखविते. परंतु भूभागावरील द्वीपामध्ये या देवतेचा प्रत्यक्ष संचार आहे. ( ज. पु., पृष्ठ २०८ )

टोकिओ शहरी एक सरस्वतीचे मंदिर आहे, ते प्रेमिकांचे आवडते आहे. परंतु या देवतेलाही तेथे वेन्टेन-सामा याच नावाने संबोधिले जाते. क्योतो, नारा, कोयापर्वत, तोक्यो, मियाजिमा इत्यादि शहरामध्ये विष्णूच्या अवतारांपैकी मत्स्य-वराह इत्यादि देवतांच्या मूर्ती आहेत. काही ठिकाणी या देवतेला ' किच्छीजोतेन ' या नावाने संबोधितात.

( केसरी, पुणे, ११/१०/१९५९ )

## देवता व ड्रॅगून यांचा विवाह

एके काळी कोशिगो गावी एका अवाढव्य आकाराचा ड्रॅगून एका गुहेत राहात असे. आपले भक्ष्य म्हणून तो शेजार-पाजारची मुले मारून खात असे. सहाव्या शतकातील ही गोष्ट आहे. वेन्टेन देवीने त्याच्या कृत्याला प्रतिबंध करावयाचे ठरवून भक्तांचे रक्षण केले. प्रथमतः तिने एक भयंकर मोठा धरणीकंप घडवून आणला आणि आपण स्वतः अंतराळामध्ये गुहेभोवती फिरत राहिली. हेतु हा की, तो ड्रॅगून बाहेर आल्यावर त्याचा बंदोबस्त करता यावा. पण इतके करूनही तो ड्रॅगून जेव्हा गुहेबाहेर येईना, तेव्हा ती खाली उतरली, गुहेमध्ये प्रवेश केला आणि त्या ड्रॅगूनबरोबर विवाह करून ती त्याच्यासह राहू लागली. कालांतराने आपल्या अंगच्या उत्तम गुणामुळे तिने त्या ड्रॅगूनवर ताबा मिळविला आणि लहान मुलांचे भक्षण करण्यापासून त्याला परावृत्त केले. पण प्रथमतः तिने जो धरणीकंप घडवून आणला त्यामध्ये एक नवीन द्वीप तयार झाले, त्याचे नाव ईनोशिया. आजही हे बेट अस्तित्वात आहे आणि ते वेन्टेन देवीच्या नावाने ओळखिले जाते.

या देवीसंबंधी आणखी एक मजेशीर दंतकथा पाहू या. अमेदेरा येथील मंदिराच्या जीर्णोद्धाराच्या वेळी इनयकी-वैशु (विष्णु) या नावाचा एक कवि तेथे उपस्थित होता. मंदिराच्या परिसरात हिंडत असताना एका सरोवराच्या काठी त्याला एक बेन्टेनदेवीची मूर्ति आणि तेजो-सुई (नवजीवन देणारे पाणी) असा फलक त्याने पाहिला. एवढ्यात वाऱ्याने एक कागदाचे चिठोरे उडत येऊन त्याच्या पायाजवळ पडले. त्याने उचलून पाहिले, तो त्यावर सुंदर आणि सुवाच्य अक्षरात एक कविता लिहिलेली होती. अक्षर पाहाताच ते कोणातरी स्त्रीचे असावे, असे त्याच्या मनाने ठरविले. त्याला वाटले, अशा सुंदर अक्षरे लिहिणारी पत्नी आपल्याला मिळावी. तो देवीच्या मंदिरात गेला आणि अशी पत्नी आपल्याला मिळावी म्हणून त्याने तिची मनोभावे प्रार्थना केली. फलप्राप्तीसाठी त्याने सात दिवसाचे पूजाव्रत घेऊन तो निष्ठेने देवीची सेवा करू लागला. सातव्या रात्री त्याने एक आश्चर्यकारक देखावा पाहिला. मध्यरात्रीच्या सुमारास मंदिराचा प्रवेश-दरवाजा आपोआप उघडला जाऊन एक वृद्ध गृहस्थ मस्तकावर काळी टोपी आणि समारंभाच्या वेळी वापरतात तशल्या पोषाखात मंदिरात आला. देवीच्या पुढे गुडघे टेकून प्रार्थना करीत असतानाच गाभाऱ्याचा दरवाजा उघडला गेला आणि आतून एक तरुण मुलगा बाहेर येऊन त्या वृद्धाला म्हणाला, 'वैशुवर आम्ही दया करण्याचे ठरविले आहे. त्यासाठी तुम्ही पूर्ण चौकशी करून हा विवाह घडवून आणावा.'

नंतर त्या वृद्धाने एक दोरी घेऊन त्याचे एक टोक वैशूच्या भोवती गुंडाळले आणि दुसऱ्या टोकाला अग्नि चेतविला. खुणेने कोणाला तरी आमंत्रण दिले. क्षणार्धात त्या स्थळी एक तरुणी आली. तिने आपले मुख वाऱ्याच्या पदराखाली झाकून घेतले होते. त्वरितच तिने वैशूसमोर गुडघे टेकले. काही वेळाने तो मुलगा म्हणाला, 'वैशूवर आम्ही कृपा करावयाचे ठरविले आहे. त्याची विनंतीही मान्य करावयाची ठरविले असल्याने, तुझ्याशेजारी जी मुलगी बसली आहे तीच तुझी पत्नी होईल. भेट होताच त्या तुझ्या पत्नीस घरी घेऊन जावे.' काही वेळाने तो वृद्ध गृहस्थ आणि ती मुलगी अंतर्धान पावली. वैशू घरी परत येत असताना आदल्या दिवशी देवळात दिसलेली मुलगी त्याला घराबाहेर उभी असलेली दिसली. 'बेन्टेन देवीने तुला पत्नी दिलेली आहे, तिचा स्वीकार करावा' असे तिने म्हणताच नंतर ती दोघे एकत्र राहू लागली. (ज. पु., पृष्ठ २०९)

## किशी-बोजिन

ही लक्ष्मीच्याच वर्गापैकी असावी. कारण ती स्त्रियांना संपत्ती आणि संतती

प्रदान करते. नवीन वर्षारंभीचा उत्सव अनेक संस्कृतीत साजरा करतात. तसाच तो या संस्कृतीमध्ये केला जातो. त्याला ' संगनिची उत्सव ' असे म्हणतात. याच वेळी टागो-नो-सेकु हा खास बालकांसाठीच असलेला उत्सव तीन दिवस साजरा करतात. देशरक्षणार्थ मुलांना प्रोत्साहन देणे आणि त्यांच्यात लष्करी शिस्तीची आवड उत्पन्न करणे हे प्रधान हेतु या उत्सवामागे असतात इतर संस्कृतींनी ही प्रथा खरोखर आत्मसात करावयाला उचित अशीच आहे.

जिजो

ही एक लहान बालकाची देवता मानतात. ही देवता बौद्धवर्गीय असून तिच्यामध्ये क्वानन देवीचे अनेक गुण दाखविलेले आहेत. इतर देशातील बौद्ध संस्कृतीपेक्षा ती जपानमध्येच जास्त मानली जाते. जपानी स्त्रीवर्ग या देवीचा निस्सीम भक्त आहे. या देवतेमध्ये बुद्धाचेही अनेक गुण अंतर्भूत केलेले आहेत. देवता कोणतीही असो, अनेक वेळा असे घडते की, मानवासाठी नीतिशास्त्रांमध्ये जे उत्तम गुण सांगितले आहेत, त्यांतील अनेक आपल्या प्रिय देवतेच्या ठिकाणी भक्त आरोपीत करीत असतात. बुद्धाचे निर्वाण ही देवता मानीत नाही अथवा कमलासनावरही बसत नाही. ही देवता खवळलेला सागर शांत करते. ज्यांची मुले जगत नाहीत अथवा जिवंत असलेल्यांपैकी काही मयत झालेली आहेत, अशा जपानी स्त्रिया कागदावर प्रार्थना लिहून ते कागद नदी अथवा समुद्रामध्ये सोडून देतात. त्यांची अशी श्रद्धा आहे की, वाहात वाहात ते कागद त्या मृताच्या जीवात्म्याला जाऊन भेटतील आणि मातृहृदयकुंभातील प्रेममयी अमृत त्यांच्याप्रत पोहोचवतील.

(ज. पु., पृष्ठ १०४)

जलदेवता

या देशात पूर्वी नरबळीची प्रथा होती. मोठमोठे किल्ले अथवा नद्यांवर पूल बांधावयाचे झाल्यास त्याच्या पायाभरणीच्या वेळी नरबळी दिल्यास त्या वास्तूला दीर्घकाळ स्थैर्य लाभते अशी त्याची कल्पना होती. कदाचित् असेही झाले असण्याचा संभव आहे की, असली अवाढव्य कामे ठेकेदाराकडून करून घेतली जात असता वेठीने मजूर कामावर लावले जात आणि त्यांना कामाबद्दल आत्मियता नसल्याने कधीकधी ते कामचुकारपणा करीत असावेत. त्या काळी क्षुल्लक मजुराला विशेषसा मान नसल्यामुळे तो ठेकेदार त्या मजुराला खड्ड्यात लोटून देत असावा व त्याचे मरण ओढवून आणीत असावा. त्यामुळे या रूढीचा उगम झाला असणे शक्य आहे. परंतु कालांतराने नरबळी प्रथेवर लोकांची श्रद्धा बसल्याने ती प्रत्येक वास्तूच्या बांधणीच्या वेळी अस्तित्वात आली आणि पुढे रूढ झाली. एकदा मिटसुई नदीवर पूल बांधण्याचे कंत्राट होरिओ योशिहारू या ठेकेदाराने घेतले. पाया बांधण्यासाठी खळाळा खळखळत्या नदीच्या पाण्यात अनेक अवजड पाषाण फेकले गेले, तरी

पाया धरेना. कारण ते दगड पाण्याने वाहून दूरवर जात. एकदा तर झालेले थोडेसे बांधकामही प्रवाहाने पाडून टाकले. तेव्हा ठेकेदार आणि इतर अधिकारी वर्ग यांची खात्री होऊन चुकली की, या जलदेवतेला नरबळीची आवश्यकता आहे. यासाठी गेनासुके या माणसाला मधल्या खांबाखाली जिवंत गाडण्यात आले. नंतर झालेले बांधकाम तीनशे वर्षे टिकले. त्या मृताची स्मृति मधल्या खांबाला त्याचे नांव देऊन चिरस्थायी करण्यात आली. असे सांगितले जाते की, रात्री लालसर प्रकाश त्या खांबातून बाहेर येतो आणि भाविकांना तो दिसतोही.[१] (ज. पु., पृष्ठ ३४४)

## कप्पा अथवा कोम्पिरा

ही दुसरी एक जलदेवता आहे. त्याचा शरीरभाग कासवासारखा असून अंगावर लव असते. त्याचे अवयव बारीक असतात. त्याचे मस्तक मर्कटाच्या मस्तकासमान असून वरच्या पोकळीत त्याला शक्तिमान करणारा द्रवपदार्थ साठलेला असतो. या द्रवशक्तीच्या जोरावरच तो माणसांना लढाईत आव्हान देतो आणि असे आव्हान देणे त्याला अतिशयच आवडते. माणसेही त्याचे आव्हान मोठ्या शौर्याने स्वीकारतात. जरी ही देवता तटेखोर अथवा क्रूर असली तरी ती आदरातिथ्यशील आहे. युद्धाचे आव्हान स्वीकारणारा माणूस युद्ध सुरू झाल्यावर जोरजोराने कप्प्याच्या शरीरावर ठोके मारतो आणि त्याचा पराभव करतो. कप्पा आपला पराभव हसतमुखाने स्वीकारतो आणि पराभवनिदर्शक म्हणून आपली मान वाकडी करतो. मान खाली करताना त्याच्या मस्तकातील द्रवपदार्थ बाहेर पडतो आणि त्याची युद्धाची खुमखुमी साफ जिरून जाते. परंतु त्याचा पराभव करणे हे दुसऱ्या प्रकाराने अनिष्टच होय. कारण गेलेली शक्ति पुन्हा मिळविण्यासाठी, स्नानासाठी पाण्यात शिरलेल्या माणसाला तो आत ओढून घेतो आणि वटवाघुळाप्रमाणे त्याच्या रक्ताचे शोषण करतो. अशी काही विवक्षित ठिकाणे आहेत की, वर्षातून दोनतीन माणसे याप्रमाणे तो ओढून घेतोच घेतो. रक्तशोषणानंतर मनुष्य पाण्याबाहेर आला म्हणजे तो आजारी पडतो आणि शेवटी परलोकी निघून जातो.

## देवता करारपत्र देतात

मिटसुईजवळ कावाची-मुरा नावाचे एक लहानसे गाव असून तेथे कावाची नदीच्या किनारी या कप्पादेवतेचे एक मंदिर आहे. त्याला कावाकोनो-मिया असे म्हणतात. असे सांगतात की, या देवतेने पूर्वी एक करारपत्र लिहून दिलेले

१. नदीवरील पूल अगर बंधारे ढासळू नयेत, म्हणून भारतामध्येही या प्रकारे नरबळी देत असल्याच्या कथा वारंवार ऐकू येतात. सन १९६९ साली उत्तर प्रदेशात जलसंचयाचा बंधारा बांधताना ठेकेदाराने एका मजुराचा बळी दिला आहे.

असून ते या मंदिरात आहे. करारपत्र लिहिण्यासंबंधीची दंतकथा अशी की, कावाची नदीच्या पात्रामध्ये एक कप्पा राहात असे. तो उदरनिर्वाहास्तव गावकऱ्यांची नदीवर पाणी पिण्यास आलेली जनावरे मारीत असे. एकदा एक घोडा तेथे पाणी पिण्यास आला असता कप्प्याने त्याला पकडले. पण घोड्याची शक्ति इतकी की, त्याने त्या कप्प्यालाच बाहेर खेचून काढले, आणि फरफटत मालकाच्या घरी आणले. गावकऱ्यांनी लगेच त्याच्या मुसक्या बांधून त्याला ठार मारण्यास ते सज्ज झाले, कारण याच कप्प्याने त्यांची अनेक जनावरे मारली होती. घोड्याचा मालक दयाळू आणि युक्तिबाज होता. त्याने अशी युक्ति सुचविली की, आपण कप्प्याजवळून करारपत्र लिहून घेऊ की, त्याने यापुढे गावकऱ्यांची जनावरे ठार करू नयेत. कप्प्याने या करारास मान्यता दिली आणि स्वाक्षरी म्हणून आपल्या हाताचा तळवा शाईमध्ये बुडवून तो करारपत्रावर उठविला. हे करारपत्र त्या मंदिरात असल्याने देवतेला महत्त्व प्राप्त झाले आहे. (ज. पु., पृष्ठ ३४१)

## तिकटीवरील देवता

जपानमधील देवता पहातांना सुरुवातीलाच आपण पाहिले आहे की, इझानी या आदिशक्तीने तिच्या यजमानाचा पाठलाग करण्यासाठी आठ दुष्ट देवता निर्माण केल्या. त्यांपैकीच ही एक देवता होय. या देवतेपासून त्रास न व्हावा अथवा झाला असल्यास तो जावा, या दुहेरी हेतूमुळे या देवीच्या पूजनार्थ तीन तीन स्त्रियांचा समूह तिकटीवर जातो आणि देवीचा महामंत्र म्हणून सर्वत्र तांदूळ फेकतात. त्यांची अशी श्रद्धा आहे की, मंतरलेल्या तांदूळदाण्यांनी चारी दिशांना मारून टाकल्यामुळे भुतेखेते जवळ येत नाहीत. त्यानंतर त्या बायका आपल्या हातांची बोटे लाकडाच्या फणीवर चोळतात. शांत चित्ताने भुतांच्या मधुर आवाजाचे ग्रहण करून त्याप्रमाणे वागतात. (ज. पु., पृष्ठ ३४६)

## वृक्षपूजन

भारतीय संस्कृतीप्रमाणे जपानी संस्कृतीमध्येही वृक्षपूजा आहे. कामेलिया नावाचा वृक्ष फार पवित्र मानला जातो. यागेळी या गावी असा एक जुनाट वृक्ष आहे. त्याचे खोड जुळे असून पसरलेल्या फांद्या माणसाच्या शरीरातील शिरांसारख्या भासतात. त्याच्या रक्षणासाठी दगडाची भिंत बांधलेली आहे. समारंभाच्या वेळी या ठिकाणी अनेक दिवे लावले जातात. या वृक्षाच्या जुळ्या खोडांच्या वाढण्याचा भावार्थ असा काढला जातो की, माणसांच्या (नवरा-बायकोच्या) सुखी संसाराप्रमाणे त्यांचे आयुष्य चालले आहे. या वृक्षावर शुभ्र देवतांचा निरंतरचा निवास असल्याने तो भक्तांच्या सर्व कामना पूर्ण करतो.

(ज. पु., पृष्ठ २७५)

क्रिप्टोमेरिआ

या वृक्षाची लागवड युसुनोमिया शहरापासून विको या शहरापर्यंत वीस मैलाच्या टापूत सरळ रेषेत केली आहे. ही झाडे पवित्र मानण्याचे कारण असे की, वाकाशो शहरातील आठशे बौद्ध भिक्षूनी त्या वृक्षाची लागवड केलेली आहे. त्याची वाढ भयकर झालेली असून एका वृक्षाच्या खोडाचा व्यास तर १० फुटापर्यंत आहे. (ज. पु., पृष्ठ १७५)

पाईन

हा वृक्षही पवित्र मानला जातो. क्वाननदेरा येथील स्मशानात एक भव्य वृक्ष आहे त्याचे वैशिष्ट्य असे दाखवितात की, पशूच्या पायाप्रमाणे अथवा खाटेच्या चार पायाप्रमाणे या वृक्षाला चार पाय आहेत. इतके असूनही तो वर एकाच खोडाने वाढलेला आहे. या वृक्षाभोवती कुपण घातलेले असून, मुळाजवळ अनेक देवता माडलेल्या आहेत त्याना 'तोरी देवता' असे म्हणतात. भारतामध्ये कोणा एखाद्या देवीला ज्याप्रमाणे चिंचवाच्या प्रतिकृति अर्पण करतात अथवा कोंबडेबकरे अर्पण करतात, त्याप्रमाणे याच्या मुळाजवळ गवताच्या बनविलेल्या अनेक प्रतिकृति दिसतात. फोशीन ही या सस्कृतीमधील मार्गदेवता असल्याने तिचा प्रवास सुखावह व्हावा, यास्तव त्या कृति अर्पण केलेल्या असतात. जे भाविक लोक अशी प्रतिकृति वाहतात त्याची अशी भावना असते की, त्या मार्गावरून जे घोडे प्रवास करतील त्याना कोणत्याही प्रकारचा त्रास न व्हावा आणि रोगराईपासून ते सदा मुक्त असावेत नवीन वर्षाच्या उत्सवसमारभात या वृक्षाला मोठा मान दिला जातो. घराच्या, मदिरांच्या अथवा बागेच्या प्रवेशद्वारी या वृक्षाची 'शुभ' म्हणून लागवड केली जाते. त्यामुळे मानवाचे वैवाहिक आयुष्यही सुखावह होते अशी त्याची श्रद्धा आहे. श्विनो-बेके नावाची देवता या वृक्षावर राहाते. बाहेर वेगवेगळ्या वेषात हिंडून ती प्रवाशांची करमणूक करते. कोणी तिला छेडल्यास ती खोडात शिरून लपून बसते. याचप्रमाणे इनोकी वृक्षावर कोजीन देव राहातो. एकाक्ष वृक्ष, चेस्टनट वृक्ष, शात पाईनवृक्ष याच्याही अनेक कथा आहेत. (ज. पु, पृष्ठ १७६)

पशूपूजन

वृक्षपूजेप्रमाणेच या सस्कृतीत पशूची पूजा होते आणि कोल्हा हा अतिशयच प्रिय मानला जातो. याबाबत एक दतकथा प्रचलित आहे. ती अशी—एकदा काही ल्हान मुलानी कोल्ह्याची दोन ल्हान पिले पकडून एका दयाळू माणसाला विकली. मुलानी त्यापैकी एकाच्या पायाला थोडीशी दुखापत केली होती. त्या दयाळू

माणसाने त्याला औषधपाणी केले व त्याला पूर्ण बरे वाटल्यावर त्या पिलाना त्याने सोडून दिले. पिलांची माता हे सर्व लाबून पाहात होती. पुढे असे झाले की, त्या गृहस्थाचा मुलगा आजारी पडला. वैद्याने निर्णय दिला की, कोल्ह्याचे यकृत मिळाले तरच हा मुलगा वाचेल. हे वृत्त बाहेर पसरल्यावर एक शिकारी त्या गृहस्थाकडे आला आणि काही ठराविक किंमत दिल्यास यकृत आणून देण्याचे त्यास वचन दिले. दुसऱ्या दिवशी रात्री एक माणूस ते यकृत घेऊन आला. औषध तयार झाले. ते मुलाने घेतल्यावर त्याला खरोखरच आराम वाटला. काही दिवसानी एक स्वरूपसुदर स्त्री त्या गृहस्थाकडे आली आणि म्हणाली, 'तुम्ही माझ्या एका मुलाला औषधपाणी करून सोडून दिलेत. त्याच्या मोबदल्यात मी आज माझे एक मूल मारून त्याचे यकृत तुम्हाला आणून दिले. माझेच यजमान शिकारी वेषात येऊन त्यानी ते तुम्हाला आणून दिले होते.'

(ज. पु., पृष्ठ १००)

ससा हा एक या लोकाचा पूजनीय प्राणी आहे. शाक्यमुनींनी इद्राची भूक शमविण्यासाठी आपला देह सशाच्या रूपात त्याला अर्पण केला होता. नतर त्याची स्मृति म्हणून त्याला चद्राच्या अकावर आश्रय मिळाला. चीनच्या टाओ सस्कृतीप्रमाणे तो चद्रबिबात राहून तेथे औषधी कुटण्याचे काम करतो. काहींच्या मते तो तेथे तादूळ कुटीत असतो. हा प्राणी एक सहस्र वर्षेपर्यंत जगू शकतो. त्याला पाचशे वर्षे झाली म्हणजे त्याची लोकर पाढरी शुभ्र होते.

(ज. पु., पृष्ठ २५९)

## घंटापूजन

निपोन येथील कारागीर कलाकुसरींच्या घटा बनविण्यात वाकबगार आहेत अनेक मंदिरातून घटा बाधलेल्या असतात. भारतामध्ये ज्याप्रमाणे अनेक मदिरातून घटानाद होत असतो अथवा इसाई धर्मपथीयाच्या चर्चेसमधून घटा घणघणत असतात, तद्वत येथेही होतो. सर्वात भव्य घटा क्योटो शहरात जोडो मदिरात आहे. तिचे वजन ७४ टन असून घटेचा लोलक आपटण्यास एका वेळी ७५ माणसे लागतात. ही 'एकांकुजी' या नावाने प्रसिद्ध आहे. बाजूच्या पत्र्याची जाडी सहा इच, व्यास ४'–७' व उची आठ फूट आहे. आतील लोलक म्हणजे भला मोठा लाकडी ओंडकाच होय. तो दोरीने ओढल्यावर आपल्या मधुर आवाजाने दशदिशा भारून टाकतो. तेराव्या शतकापासून ही घटा या मदिरात आहे. (चा. पु., पृष्ठ १४०)

या घटेसबधी अशी कथा प्रचलित आहे की, ओनो की मी नावाचा एक माणूस मृत्यू पावल्यावर यमलोकात गेला. परतु आश्चर्य असे की, ईमा नो

(यमराज) त्याला पाहून म्हणाला, 'तू आयुष्य फार लवकर संपविलेस. अजून तुझी काही वर्षे बाकी आहेत. तेव्हा पृथ्वीवर जाऊन तुझे उर्वरित आयुष्य भोगून ये.' यमराजाचे म्हणणे त्याने मान्य केले. परंतु त्याला परत जाण्याचा मार्गच सापडेना. तेव्हा यमराज त्याला म्हणाला, 'इंकाकुंजी येथील घंटेचा मधुर आवाज तुला परत भूलोकावर जाण्यास मार्गदर्शन करील.' आणि आश्चर्य असे की, तो मनुष्य त्याच घंटेच्या आवाजाच्या अनुरोधाने परत आला.

(ज. पु., पृष्ठ १४१)

भारतीय संस्कृतीमध्ये घंटेला प्राचीन काळापासून निष्ठापूर्ण स्थान आहे.[1] मंदिरात तशीच घरातही ती सदा पूजनीय आहे. 'घंटानादेन कुर्यात्' हा पूजाविधीतील तिचा मंत्र आहे. इसाई चर्चेसमध्येही मोठमोठ्या घंटा बांधलेल्या असतात. आजही युरोपमध्ये चर्चेसमधून घंटा वाजविणारी वतनी माणसे आहेत. हॉलंडमध्ये घंटा तयार करण्याचे प्रचंड कारखाने आहेत. खास तंत्रज्ञांच्या देखरेखीखाली कमीअधिक उंचीच्या आवाजाच्या घंटा तेथे तयार होतात. सुमारे पाच हजार पौंड वजनाची घंटा तेथे एका चर्चमध्ये आहे. परंतु जपानमधील इंकाकुंजी घंटेपेक्षा ती लहानच आहे. आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे सन १९२२ पासून घंटा वाजविण्याच्या कलेचे शिक्षण देण्यासाठी येथे तीन वर्षांचा शिक्षणक्रम असून तो पूर्ण केल्यावर पदवीही मिळते. इतकेच काय, पण अशा घंटावादकांची वार्षिक स्पर्धा घेऊन त्यांना बक्षीसेही दिली जातात.

(केसरी, पुणे. २०-४-१९६४)

जपानच्या वायव्य दिशेला फोर्मोसा नावाचे एक द्वीप आहे. त्याचा संबंध चीनबरोबर जास्त येतो. तेथील प्रमुख आदिशक्तीस्वरूप देवतेचे नाव टेकरपदा असे असून तिचा यजमान जेव्हा पृथ्वीवरील पर्जन्य रोखून धरतो, तेव्हा ती जोरजोराने त्याच्याबरोबर भांडण करते आणि हे त्यांचे भांडण म्हणजेच मेघगर्जना होय. शेवटी तिच्या बोलण्याचा परिणाम होऊन पृथ्वीवर पर्जन्यवृष्टी होते. सापाशिअस व ताकापुटा या दोन युद्धदेवता होत. काकरिंग व कलापेटा या दोन देवतांच्या भांडणामुळे भूकंप होतात. भांडणाच्या वेळी हे जोडपे जी घरातील चीजवस्तूंची आदळआपट करतात, तीच धरणीकंपापूर्वी होणाऱ्या आवाजास कारणीभूत होते. काही काळ विद्युल्लतेचा चकचकाटही होतो. असे तेथील देवतांचे त्रोटक स्वरूप आहे.

(जेम्स धर्मकोश ६, पृष्ठ ८४,)

---

१. देवीकोश खंड ३ रा, पृष्ठ ५१ पहा.

अंदमान बेटे संस्कृति

२२३ द्वीपांची, ३०० मैल लांबीची व सुमारे ३२ मैल रुंदीची ही भारतीय द्वीपमाला, कलकत्त्यापासून १७८० आणि मद्रासपासून ७४० मैल असून, क्षेत्रफळ २५८० वर्ग मैल आहे. सुमारे ७५००० वस्ती असून, त्यांपैकी ३५००० हिंदु आहेत. प्राकृत भाषा, संस्कृतनिष्ठ व संस्कृतप्रभव आहे.

रामायण कालापासून बाराव्या शतकापर्यंत, या बेटांबरोबर भारताचा घनिष्ठ संबंध होता व सांप्रत तेथे किरात लोकांची वस्ती आहे. उत्कल, कलिंग, तामिळ या समूहांनी पूर्वेकडे जेव्हा यव, सौमित्र, वरुण, कंबोज इ० भागांवर वर्चस्व गाजविले, त्याचा पाया या बेटातूनच तयार झाला. या भागास भेट देणारा इटालियन प्रवासी टालेमी याने पहिल्या शतकात हा सर्व प्रदेश पाहिला, आचार-विचार व जनता पाहिली, त्यावरून ते पूर्णपणे भारतीय आहेत असे समजून, त्या भागाला त्याने ( Indonesus ) इंडोनिसस असे नाव दिले. इंद्रद्युम्न, हंदुमान, हनुमान अशी पूर्णतः भारतीय नावे द्वीपांना आढळतात.

आठव्या शतकाच्या सुमारास अरब व्यापारी या प्रदेशात शिरले आणि क्रमाक्रमाने बलवान झाल्यावर तेथील हिंदु मंदिरे, व मूर्तींचे भंजन आरंभिले. आक्रमण काली आपल्या पवित्र मातृभूमीचे रक्षण करण्याऐवजी धर्मरक्षण व्हावे म्हणून अनेकांनी पितृभूमीस पलायन केले व जे उरले ते धर्मांतरास बळी पडले. हिंदु मंदिरे, हिंदु मूर्ती यांचे सहस्रावधी भग्नावशेष अजून शिल्लक इतस्ततः विखुरलेले दिसतात. (कौशिक–केसरी ७–७–६८)

भारताच्या पूर्वेला अंदमान हे एक लहानसे बेट आहे. तेथे वन्य जमातच आजवर रहात असे, येथे शक्तिस्थाने नाहीतच असे म्हटले तरी चालेल. तराई हा तेथील वंश होय. बिलकु ही त्या वंशाची आदिमाता मानली जाते. पर्जन्य आणि वायु याची तीच अधिष्ठात्री मानली जाते. चंद्रदेवता ही स्त्री व पुरुष या दोन्ही स्वरूपांत मानतात, वाढता चंद्र हा पुरुष आणि उतरता चंद्र ही स्त्री होय. इतरही पंचमहाभूतात्मक देवता ही संस्कृति मानत असे.

(जेम्स धर्मकोश ९, पृष्ठ २६५)

अंदमानातील पोर्टब्लेअर या गावी पूर्वी भारतीय ब्रिटिश सरकार जन्म-ठेपेच्या शिक्षेचे कैदी ठेवीत असे. स्वा. वीर वि. दा. सावरकर व इतर काही क्रांतिकारक त्याच ठिकाणी शिक्षा भोगून आले आहेत. त्या वेळी म्हणजे सुमारे १९१० च्या सुमारास सरकारी खर्चाने श्रीलक्ष्मीनारायणाचे मंदिर हिंदु कैद्यांच्या

सोयीसाठी येथे बांधले गेले. एक मशीदही बाधली होती. आता त्या बेटावर भारतीयांची वस्ती वाढल्यानंतर एक विठ्ठल मंदिर बांधण्यात आले आहे.

( वि. दा. सावरकर, ' माझी जन्मठेप ' पहा. )

जावा-सुमात्रा या मलाया देशातील द्वीपसमूहामध्ये पूर्वी वन्यसमाज रहात असे. करी या देवाने पृथ्वी उत्पन्न केली असे ते समजत आणि मानवजात प्लेया या देवीने उत्पन्न केली आहे असे ते मानीत असत. मानवाला जीवनोपयोगी साहित्य व पर्जन्य करी देवाने दिले. हा देव मानवाना जीवन देणारा आहे, तसाच ते घेणाराही आहे. पापपुण्याचे माप तोच भरून ठेवतो. याचा अर्थ असा की, उत्पत्ति व लय ही दोन्ही कार्ये एकाच देवतेच्या हातात आहेत. या देवाला रक्ताचा नैवेद्य लागत असे. आकाशात मेघगर्जना झाली म्हणजे हा सृष्टिकर्ता देव कोपला आहे असे समजून, त्याला शांत करण्यासाठी, रक्ताचे थेंब वर आकाशात पिचकारी मारून उडवीत असत. प्लेयादेवीलाही रक्ताचा नैवेद्य समर्पण करीत असत. ( जेम्स धर्मकोश, ९/२७२ )

## सिलोन

येथील जो इतिहास उपलब्ध आहे, त्यावरून असे दिसते की, अनुराधापूर काळ म्हणजे सनपूर्व ४५७ ते सन ७०० पर्यंतचा काळ आणि पोलोन्नारुव म्हणजे सन ७५० पासून सन १२४० पर्यंतचा काळ, असे दोन प्रमुख टप्पे आहेत. या दोन्ही काळात येथे बौद्ध पंथियांचीच पकड जास्त दिसते, त्यामुळे ब्राह्मणधर्माची मंदिरे व मूर्ति क्वचितच दिसतात. तोलुनिला, गालविहार, अनुराधापूर या ठिकाणी बुद्धाचे पुतळे उभारलेले आहेत अथवा खडकांत कोरलेले आहेत. अकुनवा येथे जी बुद्धाची मूर्ति आहे, तिला मस्तकाजवळ प्रकाशवलय दाखविले असून ती पाचव्या शतकातील असावी असे म्हणतात.

ब्रह्मदेशात बौद्धधर्माचा प्रसार येथील बौद्ध भिक्षूंनी केला. पंथगू, उत्तराजीव, छापता, आनंद इ० भिक्षु सिलोनमधून तिकडे गेले व त्यानी प्रसार केला. ही गोष्ट बाराव्या शतकात घडून आलेली आहे. सिलोन येथे अकराव्या शतकात विजयबाहूराजा राज्य करीत असता तेथे हीनयान पंथाचा प्रचार वाढीस लागला आणि पराक्रम बाहु ( ११६४–११९७ ) याने तो पूर्ण केला. यामुळे सिलोनला फार महत्त्व प्राप्त झाले होते व तेथूनच प्रचाराची सूत्रे ब्रह्मदेश, सयाम, कंबोडिया या भागांत हलविली जात होती.

मलायामधील श्रीक्षेत्र अथवा जावक राजांनी सिलोनवर दोन स्वाऱ्या सन १२३० व १२५६ साली केल्या. पण पराक्रम बाहु ( २ ) याने त्या परतविल्या. तसेच दक्षिणेतील चोलवंशीय राजांनी सिलोनवर स्वारी केली, तेव्हा विजयबाहु

( १ ) ( सन १०६५–११२० ) याने ब्रह्मदेशातून राजा अनुरुद्ध याची मदत मागवून हल्ला परतविला.

सिलोन येथे बौद्धधर्माचा प्रसार राजा अशोकाच्या वेळेपासून झालेला आहे. त्याने आपला पुत्र महेंद्र व कन्या संघमित्रा राजदूत म्हणून तेथे पाठविले आणि सिलोन येथील राजा देवानाप्रिया याने त्याचे स्वागत केले, असा इतिहास आहे.

सिलोन गॅझेट ( पृष्ठ १४० ) प्रमाणे चोलवंशीय राजानी आपली सत्ता तेथे प्रस्थापित केल्यावर, कार्तिकेय, दुर्गादेवी, शंकर याची मंदिरे उभारली.

## पट्टिनी देवळे

हे दुर्गादेवीचे मंदिर कोलंबो येथील मॅजिस्ट्रेट कोर्टाजवळ असून कत्राग्राम येथे स्कंदाचे मंदिर आहे. या मूर्तीवर काही वेळा शिव-नेत्राचे किरण पडतात, त्यामुळे त्याला ' Lord of Rays ' असे नामाभिधान प्राप्त झाले आहे. वार्षिक यात्रेच्या वेळी भारतामधून अनेक हिंदु-मुस्लीम यात्रेकरू तेथे जातात.

## ब्रह्मदेश

हा देश भारताच्या पूर्व बाजूला अक्षांश १०°–२८° आणि रेखांश ९२°– १००° या रेषांवर वसलेला आहे. त्याची लांबी १६०० मैल असून जास्तीत जास्त रुंदी ५७५ मैल आहे. या देशातील दोन प्रमुख जमाती पियू ( Pyu ) ही तिबेटमधून आलेली असून, मोन ( Mon ) अगर तलइंग ही भारतातील तेलंगण प्रांतातून तेथे वसाहतीसाठी गेलेली आहे. पाचव्या शतकापासून पियू जमातीने मध्य ब्रह्मदेशामध्ये वसाहत करून इरावती नदीच्या किनारी जुन्या प्रोम शहरी राजधानी वसवली होती. मोन वंशाने दक्षिणभागात थाटोन व पेगू येथे दोन अलग राज्ये वसविली होती. परंतु अकराव्या शतकात थाटोन येथील वंशाचा पाडाव झाल्यावर पेगू शहरीच सर्व संस्कृतीवर्धन झालेले दिसून येते. प्रोम शहरी बौद्ध धर्मियांचे वर्चस्व असून साधारणपणे तिसऱ्या शतकातील सम्राट अशोकाच्या वेळेपासून त्याची सुरवात झालेली असावी. प्रोमजवळील मौनगन गावी जे उत्खनन झालेले आहे आणि त्यामध्ये सुवर्णाच्या ज्या वस्तु मिळालेल्या आहेत, त्या वरील अक्षरे पाली भाषेतील असून कदंबराजघराण्याच्या वेळच्या त्या असाव्यात असे संशोधक प्रा. फिनाट साहेबांचे मत आहे. तसे बुद्धाच्या दोन सुवर्ण मूर्ति, चांदीचा करंडक आणि दोन चांदीच्या द्वारपालाच्या मूर्ति या स्तुपामध्ये आढळल्या आहेत. त्यावरून वरील विधानानाच बळकटी येते.

कलगनगार येथे बुद्ध प्रतिमेच्या जवळ शिवलिंग आढळले असून त्याची उंची १४ इंच आहे. या देशात अनेक गांवी विष्णु, गणेश, हनुमान, सूर्य, दुर्गा

देवी या ब्राह्मण देवतांच्या मूर्ति आढळून येतात. यावरून असे म्हणता येते की, बौद्ध धर्माबरोबर त्या वेळी ब्राह्मण देवताचेही पूजन घडत असले पाहिजे. सर्वसाधारण शेतकरी हीनयानी बौद्ध पंथीय, काही शेतकरी हिंदु व महायानी पंथीय, पण राजसत्ता या दोघानाही सांभाळून घेत असे. प्रोम येथील राज-संस्थेला त्या वेळी भारतीय नांव श्री-क्षेत्र असे होते.

प्रोम शहरातून राजे साहेबांची स्वारी निघाली की, तिचा थाट और होता. चीनमधील तंग घराण्याच्या वर्णनाप्रमाणे (६०६-९१८) प्रोम शहराभोवती संरक्षणात्मक नऊ भिंती होत्या. त्यांची १६० ली लांबी असून त्याना बारा प्रमुख दरवाजे होते. राजघराण्यातील माणसे फक्त कापसाची वस्त्रे वापरीत. कारण रेशमी कापड तयार करतांना काही जीवांची हत्या घडत होती, व धर्माला ती मान्य नव्हती.

राजाच्या मस्तकावर सुवर्ण पुष्पांकित पागोटे असून त्यामध्ये मौक्तिकाचे सर गुंफलेले असत. राजांची स्वारी हत्तीवरील अंबारीत, रत्नखचित आसनावर आरूढ होत असे आणि रस्त्यांतून प्रजाजन मुजरे करीत. शहरात एके ठिकाणी १०० फूट उंच हत्तीची प्रतिमा होती, तेथपर्यंत ही मिरवणूक जाई. राजा खाली उतरून, गुढघे टेकून त्या प्रतिमेसमोर सर्वत्र आबादीआबाद राखण्यासाठी प्रार्थना करी. नगरवासीजन या प्रतिमेसमोर उद-धूप जाळून प्रार्थना करीत. चंद्रकोरीप्रमाणे आकृतीची सुवर्ण अगर रुप्याची नाणी या प्रतिमेपुढे ठेवीत. तेलाचा अभाव असल्याने सर्वत्र मेणबत्ती वापरली जाई. स्त्रीवर्गही या मिरवणुकीत सामील होत असे. भारतामधील राजेलोकांच्या मिरवणुकीप्रमाणेच हे दृश्य सुंदर दिसत असे.

दक्षिण भागातील थाटोन व पेगू ही शहरे पूर्वी बंदरे होती आणि भारतीय या गावी बोटीतून येऊ शकत होते. थाटोन येथील राजप्रदेशाचे नाव रमण्णदेश असे होते व भारतामधील दक्षिण भारतीयाप्रमाणे हे नाव दिसते. या शहरी अनावृहत नावाचा फार निख्यात राजा होऊन गेला. त्याने आसपासच्या प्रदेशात मंदिरे उभारणी करण्यास सुरवात केली व जवळजवळ दोन शतके ती चालू होती. पेगनच्या जवळ दोन मैलांवर मियानकाबा गावी 'ननपया' नावाचे मंदिर असून, त्यावर ब्राह्मणदेवतांचे उत्तम शिल्प कोरलेले आजही आढळते. त्या वेळी मंदिरबांधणी इतकी भरभराटीत होती की, आजही सुमारे पाच सहस्र स्तूपाचे अवशेष पहावयास मिळतात. 'नाट' ही या देशातील एक भूतयोनी देवता मानतात. अशा ३७ देवताचे एक मंदिर या क्षेत्री बांधण्यात आलेले आहे. येथील किंयाझित राजाने सन १०९० मध्ये सांप्रतच्या विश्वमान्य आनंद मंदिराची उभारणी पुरी केली. देवापुढे गुढघे टेकून प्रार्थना करीत असलेली स्वतःची मूर्ति

या मंदिरात नसविलेली आहे. त्यावरून हा भारतीय राजा होता, याची खात्री पटते. हा राजा सन ११११ साली स्वर्गवासी झाला. त्याच्या वंशजांनी पुढे काही मंदिरे बांधली आणि शेवटी सन १२८७ साली कुबलीखानाच्या नातवाने या शहरावर स्वारी करून राजवंश बुडवून टाकला

तेथील काही देवतांची नावे अशी

१. पद्मावती = बदामा, २. सरस्वती = सारावती, ३. हयावती = हायावती, ४. पृथ्वी = बोयसा, ५. आप = थरोसा, ६. आकाश = अधाकेसा, ७. वृक्षदेवता = येकोसा, ८. मेघदेवता = मेकोसा, इ० इ० ( जेम्स धर्मकोश, ३/३३ ).

ब्रिटिश राजवटीतील मंडाले या शहरातील कारागृहात लो. टिळक यांचा ' गीता रहस्य–कर्मयोग ' हा ग्रंथ जन्मास आला.

मलाया

" All the inhabitants, both men and women, let their hair hang loose and wear garments without sleeves, made of cloth material The king and the chief nobles wear, in addition a piece of dawn red cloth which covers the upper-part of the back between the shoulders They girdle their loins with a golden cord and wear golden rings in their ears Their women folk cover themselves with beautiful scarves enriched with the precious stones " ( Chinese Annals )

सांप्रत आपण ज्याला मलयाद्वीपकल्प म्हणतो, त्या भागातील चिनी प्रवाशांनी इसवी सनाच्या पहिल्या शतकातील केलेले वरील वर्णन आहे. वरील वर्णन साधारणत बौद्ध भिक्षु व भिक्षुणी यांना लागू पडते. याचाच अर्थ बौद्ध-प्रचारकांनी त्या भागात वसाहती करून आपले आसन स्थिर केलेले होते. श्रीतम्मरात ( लिगोर ) केडाह, पेनांग, सुमात्राबेटातील पलेंबंग, ब्रिटिश मलाया, मलाक्का, सिंगापूर, जत्री, बकानेट इ० भागाचा समावेश झालेला असा हा प्रदेश श्रीविजयसाम्राज्य म्हणून ओळखला जात असे.

असे जरी असले तरी मलाया व जावा येथील पूर्व इतिहासावरून असे दिसते की, या भागाला लंकासुग हे नाव होते. चीनच्या माहितीवरून रक्तद्वीप ( लाल मातीची भूमि ) तांब्रलिंग, टक्कोला, पानपान, जत्री इ० लहान राज्यांचा समावेश या श्रीविजयसाम्राज्यात झालेला होता. यी-चिंग या चिनी

प्रवाशाने जेव्हा सन ६७१ साली पलेंबंग या सुमात्रा बेटातील शहरास भेट दिली. तेव्हा तो म्हणतो की, 'त्या क्षेत्री हजारो बौद्ध भिक्षु असून त्यांचे ध्यान व मनन सतत चालू असते. भारताप्रमाणे तेथे धर्मचर्चा चालते आणि विधिनियम सर्व एकच आहेत.' इतकेच नव्हे तर भारतामध्ये जाऊन शिक्षण घेण्यापूर्वी येथे वर्ष दोन वर्षे ते घेतल्यास भारतामध्ये ते सुकर होते. सन ६८९ च्या सुमारास पुन्हा या शहरास त्याने भेट दिली, अनेक संस्कृत ग्रंथांच्या नक्ला करून घेतल्या व पुस्तके लिहिली. यावरून तेथील संस्कृत भाषेची थोरवी आणि महत्त्व ध्यानी येते.

आठव्या शतकाच्या मध्यावर जावा बेटाच्या मध्यभागी एका राज्याची उभारणी केली गेली, आणि तेथील राजे आपणाला शैलेंद्र म्हणू लागले. सुमात्रा बेटातील श्रीविजयसाम्राज्यावर आस्ते कदम त्यांनी आपली पकड बसवून, या शतकाच्या शेवटी, जावा-सुमात्रा-मलायाद्वीपकल्प एवढ्या मोठ्या भागावर शैलेंद्रांनी सत्ता प्रस्थापित केली. भारतातील नागरी लिपी तेथे चालू केली. अरब व्यापारी या राज्याला झबग राज्य म्हणत, तर इतर जावक म्हणत असत. येथील राजा चंद्रभानु याने सन १२३६ व १२५६ साली सिलोनवर स्वाऱ्या केल्या होत्या पण त्यात तो पराजय पावला.

हे शैलेंद्र घराणे तिकडे कसे गेले हे पाहणे उद्‌बोधक आहे. इतिहासकार वेल्स याच्या मताप्रमाणे म्हैसूर येथील गांग वंश प्रथम तिकडे गेला. पण मुजुमदार म्हणतात की, त्या वेळी गांगवंश पूर्वकिनाऱ्यावरील कलिंग देशातून, पलौरा बंदरातून तिकडे गेला. आठव्या शतकात कामार्णव नावाचा त्रि-कलिंग देशाचा राजा होऊन गेला आणि या त्रि-कलिंग शब्दाचाच अपभ्रंश पुढे तेलंग असा झालेला आहे. या राजाच्या कारकीर्दीतच काही लोक ब्रह्मदेशाच्या दक्षिण भागात प्रवेश करते झाले आणि पुढे हळूहळू उत्तरेकडे त्यांनी आपले पाय मोनवंश म्हणून पसरले. पण इतिहासकार जोव्हु डुब्रेइल (Jonveau Dubreuil) आपल्या Ancient History of Deccan यामध्ये असे प्रतिपादितो की, सहाव्या शतकात म्हैसूर व कलिंग येथे गांगवंश राज्य करीत असता, काही वर्षांनी चालुक्य राजघराणे उदयास येऊन पुलकेशीन (दुसरा) राजाने ही दोन्ही राज्ये बुडविली. त्यामुळे पराभव पावलेले गांगवंशीय राजे आपल्या प्रजाजनासह नशीब काढण्यासाठी पूर्वेकडे ब्रह्मदेश, मलाया भागांत गेले आणि त्यांनी राजसंस्था स्थापन केली. इतिहासकारांचे हे मत जास्त पटण्यासारखे आहे. या सर्वांचा सारांश इतकाच की, गांगवंश ब्रह्मदेश, मलाया भागात गेला, अपभ्रंशाने तो मोन झाला आणि अमरावती अगर नालंदा भागातील संस्कृतीचे त्यांनी तिकडे वर्धन व प्रसार केला. भारतीयांचा प्रसरणकालीचा हा इतिहास फार स्फूर्तिदायक आहे.

यानंतर तेथे बलीतुंग, दक्ष, सिंघोक, एअरलंग, अंगरोक, कृतराजस, राजस-नागर इ० अनेक राजे झाले. त्यांनी निरनिराळ्या राजधान्यांतून कारभार केले. शैव आणि बौद्ध वास्तु उभारल्या, व सन १४०२ मध्ये मलाक्का येथे उठाव केलेल्या मलिक इब्राहिम या अरब राजाने हिंदुराज्ये बुडविली व त्या संस्कृतीची वाढ होत गेली.

बृहत्तर-भारत ही संज्ञा ब्रह्मदेश, मलाया, जावा, सुमात्रा, बोर्निओ, इंडो-चायना, कंबोडिया, बाली. इ० पूर्वेकडील भागास आहे. इतिहासकार मुजुमदार यानी तिकडे संशोधन केले, तेव्हा त्यांना कमीत कमी २० तरी संस्कृत शिलालेख आढळून आले. तेथील राजे आपणांस 'राजाधिराज' ही उपाधी लावून घेत असत. गोमती नदीवरील ६१२२ धनु लांबीचा कालवा पूर्ण झाला म्हणून त्या वेळी तेथील राजाने १००० गाईंचे दान केले. मूलवर्मा राजाने विप्रकेश्वर येथे 'बहुसुवर्णक' यज्ञ करून, ब्राह्मणांना २००० गाई दान केल्या. चंपादेशांत एका शिलालेखात, 'कौण्डिण्य याने द्रोणपुत्र अश्वत्थामा याजकडून मिळविलेला भाला या ठिकाणी रोवला' असा उल्लेख आहे.

सूर्यवंशीय राजा महर्षि कंबूस्वयंभुवा, याच्या नावावरून सांप्रतचे कंबोडिआ हे नाव आले आहे. इतिहासात असेही नमूद आहे की, 'इंद्रप्रस्थाचा राजपुत्र येथे गेला आणि त्याने तेथील राजाचा पराभव केला.' ब्रिटानिका एन्सायक्लोपिडीआ (आवृत्ति १९२९) म्हणते, 'इसवी सनापूर्वी काही शतके, हिंदुस्थानच्या पूर्व-किनाऱ्यावरून गेलेल्या लोकाचा कंबेडिआमध्ये प्रभाव पडू लागला. त्यांनी तेथे वैदिकधर्म आणि संस्कृतभाषा आणली. देशाच्या हिंदीकरणाचा हा उपक्रम पाचव्या शतकात ख्मेर वंशातील सूर्यवर्मा राजाच्या राजवटीत ठळकपणे दिसून आला.' याचा अर्थ इतकाच घेता येईल की, इसवी सनापूर्वी भारतीयानी तिकडे जाऊन संस्कृतीचा प्रचार सुरू केलेला होता आणि त्याला पूर्णत्व ख्मेर राजवटीत आले.

या बृहत्तर-भारतामध्ये संस्कृत शब्दांचा भरणा विपुल आहे, रामायण-महाभारताचा प्रसार आहे. सयाममध्ये तेथील भाषेत आढळणारे हे शब्द पहा—

१. कर्मशाला = कारखाना, २. कर्मशूर = कारागीर, ३. कर्मसंपादिक = संस्था-कार्यवाह, ४. रेखागणित = भूमिति, ५. पाटीगणित = अंकगणित इ० इ०.

### बडा बुद्ध म्हणजेच बोरोबोदर

हे जावामधील दुसरे प्रेक्षणीय स्थळ आहे. या वास्तूला चार प्रवेशद्वारे असून पायऱ्याच्या पायऱ्या चढून आत प्रवेश करता येतो. या दरवाज्यावरील

कमानी काल-मकर आकृतीच्या असून भारतामधील दुसऱ्या शतकातील लोमेश ऋषि गुहेतील शिल्पाप्रमाणे आहेत. पहिल्या माळ्याचा आकार ४७९ चौरस फूट असून, त्यानंतर एकावर एक असे सहा माळे आहेत. पण या माळ्यांचे वैशिष्ट्य असे की, खालच्यापेक्षा वरच्या माळ्याचा भाग चारी बाजूंनी कमी होत गेलेला असल्याने वरच्या माळ्यांचा आकार कमी कमी होत गेलेला आहे. सर्वांत वरच्या भागावरील गोल पोकळ स्तूपाचा व्यास ५२ फूट आहे. महायान पंथातील पाच ध्यानी बुद्ध, पूर्वबाजूस अक्षोभ्य, दक्षिण बाजूस रत्नसंभव, पश्चिम बाजूस अमिताभ आणि उत्तरेकडे अमोघसिद्धि यांच्या प्रत्येकी ९२ मूर्ति बसविल्या असून, त्याच्या वरील बाजूस विरोचनाच्या ७२ आणि कोनाड्यांतून ६४ मूर्ति, याप्रमाणे एकूण ५०४ पुतळे येथे आढळतात. याशिवाय अनेक लहान लहान पोकळ स्तूप ठिकठिकाणी उभारलेले आहेत.

उत्तर द्वारांतून आत प्रवेश केल्यावर डाव्या बाजूने पहात गेल्यावर बुद्धाच्या जीवनावरील १२० उत्तम चित्रणे पाहाता येतात. जन्म, तारुण्य, दीक्षा इ० अनेक प्रकार 'ललितविस्तार' ग्रंथाप्रमाणे चित्रण केलेले आहेत. याशिवाय प्रत्येक मजल्यावरील गोल सज्जामध्ये अनेक चित्रणे आढळतात आणि ती सर्व एका ओळीत मांडली तर त्याची लांबी तीन मैल होईल असे मानले जाते. पायावर बाहेरील बाजूने असेच १६० चित्रांचे शिल्प कोरलेले आढळते. या त्रोटक वर्णनावरून त्या भव्य चिरस्थायी वास्तूची कल्पना यावी असे वाटते. क्रोम या संशोधकाच्या मते याची बांधणी सन ७५० ते ८०० पर्यंतची असावी,

क्वरिच वेल्स यांचे मत असे की, सिलोनमधील मेरुपर्वतशिल्पाप्रमाणे ही आकृति भासते.

सन ७७८ साली पेनांग करौ येथील महाराजाने आपल्या गुरूच्या आदेशावरून जोगियाकर्ताजवळ कलस गावी एका मठाची स्थापना करून त्यामध्ये तारा देवीची स्थापना केली. या स्थानाला कलसनचंडी हे नाव पडले. येथे वापरलेली भाषा उत्तरभारतीय असून, त्यावर नालंदाविश्वविद्यालयाची छाप पडलेली दिसते.

चंडी या शब्दाचा मूळचा अर्थ, स्मरणार्थ उभारलेली कबर, स्तूप अगर छत्री असा आहे. पण सांप्रत त्याचा उपयोग जावा-सुमात्राकडील शिल्पकलेची क्षेत्रे असा रूढ झालेला आहे. अर्जुनचंडी, भीमचंडी, कलसनचंडी, मेनदूतचंडी, सेवूचंडी, प्लौसनचंडी, बेनानचंडी, बेलाहनचंडी, जागोचंडी इ० अनेक शिल्पकलेची स्थाने आहेत आणि ती निरनिराळ्या राजांनी उभारलेली आहेत. यांच्या बांधणीविषयी रेजिनॉल्ड मे लिहितात,

"The plan of the temple was Indian The principal building was placed in the centre of the group and the subsidiary ones were set all round occupying its proper place and thus, forming a complete whole"

प्रमुख देवतेचे स्थान मध्यभागी आणि परिवार देवताची[1] मंदिरे सभोवार असणे हे भारतीय मंदिराचे वैशिष्ट्य येथेही दिसून येते

या सर्व शिल्पामध्ये डिआग पठारावरील भीमचंडी आणि अर्जुनचंडी याची बांधणी सन ७३२ च्या सुमारास झालेली असावी आणि तशा रीतीचा संस्कृत शिलालेख छागल या गावी शैव मंदिराच्या अवशेषात मिळाला आहे. दक्षिण भारतातील पल्लव बांधणीचा येथील बांधणीवर परिणाम घडलेला असावा, असे संशोधकाचे मत आहे. पठाराच्या उत्तर बाजूला अर्जुनचंडी आणि दक्षिण भागी भीमचंडी आहेत या पठारावरील आणखी काही मंदिरसमूह नष्ट झालेले आहेत. ही दोन्ही शैवस्थाने आहेत दक्षिण भारताप्रमाणे ही मंदिरे घडीव दगडाची असून, भिंतीच्या बाहेर अनेक कोनाडे आहेत, पण त्यामधील ब्राह्मणदेवताच्या लहानसहान मूर्ति मात्र नष्ट झालेल्या आहेत. येथील शिल्पकलेची दोन वैशिष्ट्ये अशी की, दरवाज्यावरील चौकटीवर 'काल मकर" याची आकृति असून, कोनाड्यावर निरनिराळ्या प्राण्याच्या आकृत्या आहेत. भीमचंडीच्या मंदिरावर दोन्ही बाजूच्या कोनाड्यातून काही मानवाकृति दिसतात. येथील शिल्प वैशिष्ट्य म्हणजे दरवाजाच्या कार्नीसवर जोड कमळे आणि कमळ कळे व लहानसर वडाचे झाड आहे. याशिवाय वेलीच्या कुंड्या, मोहर, फुले याचा समावेश माळेसारख्या शिल्पात केलेला आहे. जावानीज इतिहासाप्रमाणे हे शिल्प शैलेंद्रराजांनी मध्य जावा जिंकल्यावर सन ६७५ ते ७५० पर्यंत तयार झाले असावे.

कलसनचंडीच्या आसपास सेवूचंडी असून, मुख्य स्तूपाच्या परिवारात लहानमोठ्या २५० मूर्ती आहेत. एका संशोधकाच्या मते येथील बांधकाम हे बोरोबोदर बांधणी वेळचेच असावे आणि ते सन ८०० साली पुरे झालेले आहे. मेनदूतचंडी येथे १४ फूट उंचीचा बुद्धाचा पुतळा असून, तो पूर्णपणे गुप्तशैलीचा आहे. मंदिराच्या पाषाणी बांधकामात एकूण बावीस शिल्पे कोरलेली असून बोरोबोदरच्या

---

१. टीप—मध्यप्रदेशात महानदीच्या काठी रायपूर, खरारोड ही दोन गावे आहेत पडझड झालेली अनेक प्राचीन शिल्पे तेथे आहेत. संशोधक बेगलर (Beglar) याच्या मते, काल मकर हे येथील गुप्त राजवटीतील शिल्प असून, तीच प्रतिकृति डिआंगपठार अगर अन्य ख्मेरशिल्पकलेत आढळते.

(Reginald May, P. 113)

खालोखाल या क्षेत्राला प्रवासी मान देतात. बोरोबोदरच्या अग्नेय दिशेला बेनान-चंडीचे स्थान व तेथे शिवाची मूर्ति आहे. त्याच्या डोक्यावर मुकुट असून, दाढी वाढलेली व पोट पुढे आलेले आहे. त्याच्या बाजूला गणेशाची मूर्ति, गळ्यात मुंडामाळा घातलेली आहे.

नवव्या शतकाच्या मध्यास जावामधील शासनात सत्तांतर झाले आणि ब्राह्मणधर्माचा प्रसारक राजा तेथे आला. जोगियाकर्ता व सुरकर्ता या दोन शहरांना जोडणाऱ्या रस्त्यावर *प्रमबनन येथे त्याने मंदिरे बांधण्यास सुरवात केली.* ब्रह्मा, शिव, विष्णु यांची मंदिरे उभारून त्याच्या समोर त्यांच्या वहानांच्या मूर्ति मंदिरात बसविल्या. बाहेरील बाजूने निरनिराळ्या शिल्पाच्या आकृति खोदल्या, त्यामुळे हे क्षेत्र प्रेक्षणीय झालेले आहे. लोरो जोंगरंग येथे दक्ष राजाने आपला पिता बलितुंग याच्या स्मरणार्थ सन ९१५ साली एक शिवमंदिर बांधले आणि गणेश, पार्वती यांच्या मूर्ती स्थापन केल्या. राजा सिंधोक याने बेलाहन व इतर गावी शिवमंदिरे बांधली, पण ती विशेष प्रसिद्ध नसल्याने, त्याची संपूर्ण माहिती मिळत नाही. या राजाच्या कारकीर्दीत जावानीज भाषेत रामायण ग्रंथ तयार झाला व तांत्रिक बौद्धिझमवर काही ग्रंथ प्रकाशित झाले, हे विशेष होय.

एअरलंग राजाने आपली सत्ता जावामध्ये स्थिर केल्यावर सन १०३७ साली तो गादीवर बसला. हा ब्राह्मणधर्माचा पुरस्कर्ता असून त्याने अनेक मंदिरे उभारली. बेलाहनचंडी येथील विष्णूची मूर्ति म्हणजे त्याचीच प्रतिकृति असून सन १०४९ साली तो मृत्यु पावल्यावर त्याचे दफन त्या मंदिरातच करण्यात आले आहे. आपल्या हयातीत त्याने 'शिवशासन' नावाचा जावानीज भाषेतील राजशासनावरील ग्रंथ तयार केला आणि महाभारताची तीन पर्वे भाषांतरित केली. सन १२९२ चे सुमारास कुबलीखान या चीनच्या सरदाराने मोठी फौज पाठवून या राजाकडून खंडणी वसूल केली. त्यानंतर मजापहित येथे नवीन राज्य सुरू झाले व कीर्तिराजस राज्य करू लागला. सिंमपिंग गावी त्याने हरिहराचे मंदिर उभारले आणि आतील हरिहराची मूर्ति म्हणजे स्वतःचीच प्रतिकृति तयार करून बसविली. सांप्रत ती बटाव्हिया संग्रहालयात पाहता येते. पुढे सन १३५० ते १३८९ पर्यंत राजसनागर राज्यकर्ता होता. त्याने नवीन मंदिराची उभारणी केली नसली तरी पनतरन येथे जी मंदिरे बांधलेली होती त्यावर बाहेरील बाजूने रामायण व कृष्णायनमधील अनेक देखावे खोदून काढले. त्याच्या मरणानंतर येथील हिंदुसाम्राज्य मोडकळीस आले. राजसत्तेसाठी आपसात यादवी सुरू झाली, आणि मलाक्का येथे व्यापारासाठी आलेल्या अरबीसंस्कृतीची वाढ होऊन

मलिक इब्राहिम, जो सत्ताधारी झालेला होता, त्याने हे राज्य सन १४०१ साली बुडविले. येथील हिंदु संस्कृतीचे लोक पुढे बाली बेटांत शिरले आणि तेथे स्थायीक झाले.

संशोधक रेजिनॉल्ड मे निष्कर्ष काढतो की, 'In the Javanese history there is one deity, who always occupied a very important position and that is the Goddess Sri, the Earth mother, the goddess of glory and fertility, especially rice' जावा प्रदेशात श्री देवीलाच सर्वत्र मान मिळत असे.

## इंडोनेशिया

जावा, सुमात्रा, बोर्निओ आणि सिलेबस ही चार बेटे मिळून पूर्वेकडील बेटांचा, ज्याला सांप्रत इंडोनेशिया म्हणतात हा भाग तयार होतो. या बेटांचा भूभाग जरी तुटक असला तरी एकूण चौरस मैल क्षेत्र काही कमी नाही जावा बेटाची लांबी ७२५ मैल तर सर्वसाधारण रुंदी १४० मैल, सुमात्रा ११०० मैल आणि ३०० मैल, बोर्निओ ९९० मैल व ७०० मैल आणि सिलेबसचा आकार आठ पायांनी एकादी वस्तु आकर्षण करून घेणाऱ्या समुद्रफूल (Octopus) प्राण्या सारखा असल्याने त्याचे क्षेत्रफळ काढणे कठीणच पडते. याशिवाय बाली, बका इत्यादि अनेक लहान बेटे या समूहात मोडतात सन १९६० च्या शिरगणतीप्रमाणे या सर्व भागातील लोकसंख्या सहा कोटींपर्यंत होती. पूर्वी निरनिराळ्या राजवटांनी सत्ता गाजविल्यावर शेवटी डच लोकांनी तेथील सत्ता सोडून गेल्यावर लोकशाही स्थापन झालेली आहे

## जावा मलाया भागांत रामायणाचा प्रसार

थायलँडमध्ये जे रामायण वाचले जाते त्याचे स्थानिक नाव आहे 'रामकियेन रामकीर्ति' बहुधा हे वाल्मिकीरामायणाचे भाषांतर असून सन ८०७ साली राम नरेश नावाच्या यहस्थाने हे प्रसिद्ध केलेले आहे. त्या भागांत अयोध्या नगरी आहे, तशी लवपुरी (लोपबुरी) आहे बँकॉक येथील मंदिरात रामायणातील अनेक महत्त्वाच्या घटना चित्रण केलेल्या असून राष्ट्रीय संग्रहालयात अनेक राममूर्ति आहेत. कंबोडियामधील अंकोर (औंकार) मंदिरात रामायणातील देखावे चित्रित केलेले आहेत. त्या प्रदेशातील रामायणाची ही निरनिराळी नावे पहा' मलाया— हिकायत सिरीराम, इंडोनेशिया—रामायण काकविन. नौसेना प्रमुख अँडमिरलचे नाव 'लक्ष्मण' म्हणून संबोधितात व ते शूरत्वाचे द्योतक मानले जाते.

भारतीय संस्कृतीचे अवशेष अद्यापही येथे अनेक रूपांनी दिसतात. येथील राजचिन्ह गरूड आहे, ध्येयवाक्य ' भिनका टन्गल इका ' म्हणजे ' भिन्नत्वात एकत्व आहे;' सभेची सुरुवात करताना वक्ता म्हणतो, बापा बापा ( वडीलधारी पुरुषमंडळी हो ! ), इबु इबु ( वडीलधाऱ्या स्त्रियानो ! ), सौदरा सौदरा ( सहोदर बधूनो ! ), सौदरी सौदरी ( सहोदर भगिनींनो ! ) इ० इ० वार्तापट दान्वितान। प्रथम ' अनेका वार्ता दुनिया ' असा फलक असतो. नावे मुसलमानी असली तरी आडनावे हिंदूच आहेत, जसे अबदुल्ला वासुकी, मेघावती धर्माधिकारी, रहीम सुर्यधर्मो, सहस्त्रबाहो इ० इ०. मध्य जावात ब्राराची नावे भारतीय आहेत, सोमा, अगार, बुदा, राधपती, सुका इ० इ० बँक ऑफ पिरटिवी = पृथ्वी बँक, जाकर्ता जयकर्ता ही भारतीय नावे आहेत.

साराश तेराव्या शतकात हा प्रदेश जरी मुसलमानी आक्रमणास बळी पडला असला आणि तेथील शेवटचा सम्राट मोजो पाहिर व त्याची मुले यानी गायक, शिल्पकार, चित्रकार, सगीतज्ञ व विद्वान यासह पुढे बाली बेटात आश्रय घेतला असला, तरी अनेक अवशेष आजही तेथे प्रत्यही दृग्गोचर होत आहेत

वरील सर्व प्राचीन साधनाचा उपयोग करून साप्रतच्या भारतीय धुरिणांनी दोन्ही देशात एकात्मता वाढीला लावून, पूर्वीच्या भारतीय सस्कृतीचे तेथे पुनर्जीवन करणे हे राष्ट्रच भूषणावह ठरल.

बँकॉक शहरामध्ये रामायणावर आधारित छायानाट्याचे प्रयोग आजही होत असतात. विशाल गणेशमूर्तीभोवती नृत्य करून, थाय तरुणी त्या विघ्न हर्त्याची उपासना करीत असतात. एका मदिरात २२ इच उचीची बुद्धाची पाचूची मूर्ति सपूर्ण सुवर्णाच्या रत्नजडित सिंहासनावर विराजमान आहे. सन १४५७ ते १७८२ या दीर्घ काळात ही मूर्ति निरनिराळ्या राज्यकर्त्यांनी देशो- देशी हिंडविली पण शेवटी थाय राजाने शत्रूबरोबर युद्ध करून, ती मूर्ति जिंकून घेतली आणि राजधानीत आणून स्थापन केली आहे. तेथील प्रजा ९५% बौद्ध- धर्मीय साप्रत असल्याने, तेथे अनेक बुद्धमदिरे असणे स्वाभाविक आहे. एका मदिरामध्ये तर १६० फूट लांबीची बुद्धाची भव्य मूर्ति निद्रिस्त स्वरूपात आहे. असे भव्य शिल्प अन्यत्र क्वचितच पहावयास मिळते.

( श्रीकांत टिळक—प्रवासवर्णन, केसरी, १७–१२–६७ )

नागपूजन

मलायामधील पेनांग शहर हे प्रसिद्ध आहे. येथे एका खोलसर गाभाऱ्यात अनेक जातीवत सर्प व अजगरे सोडलेली असून, वरील कठड्यांवरून अनेक

भाविक तरुण-तरुणी आणि प्रवासी, त्याचे प्रत्यही दर्शन घेत असतात. या प्रदेशात पूर्वी नागपूजन होते, हेच अनुमान काढता येते.

कौलालापूर येथे चुनखडीच्या डोंगरात यांची लेणी आहेत. सुमारे २७० पायऱ्या चढून वर टेकडीच्या माथ्यावर गेल्यानंतर, अनेक हिंदुपद्धतीची देवालये पाहाता येतात. ही जुनाट मंदिरे सांप्रत अन्य संस्कृतीच्या अमलाखाली असल्याने कालाच्या ओघात ती कित्ती दिवस तग धरतील आणि भारतीय प्रवासी याना पाहता येतील, हे तो परमेश्वरच जाणे. आज तरी प्राचीन भारतीय प्रसरण कालाची साक्ष ती मंदिरे देत आहेत, हे खरे.

( श्रीकांत टिळक–प्रवासवर्णन, केसरी, १७–१२–६७ )

## कंबोडिआ

सयामच्या पूर्वबाजूला हा लहानसा देश आहे. अक्षांश १०२° ते १०८° आणि रेखांश १०°-१५° याप्रमाणे आहेत. फ्रेंच इंडोचायना देशापैकी हा एक पचमांश भाग असून राजधानी पॉम-पेह शहर होते. या देशाच्या उत्तरेस टोनकिन प्रांत व पूर्वेला अनाम देश होता. याच अनाम देशाच्या उत्तर भागाला सांप्रत व्हीएट-मिन्ह ( Viet-Minh ) हा कम्युनिस्टव्याप्त प्रांत असून, दक्षिण भागाला व्हीएटनाम हा बिगर कम्युनिस्ट प्रांत संबोधला जातो. आजही कंबोडिआ प्रांत स्वतंत्र आहे.

इसवी सनाच्या पहिल्या शतकात कौंडिण्य नावाचा ब्राह्मण भारतातून या प्रदेशात आला आणि तेथील राणी 'विलो लीफ' बरोबर विवाह करून, त्याने उघडयानागडया जनतेला सुधारण्याचे कार्य केले. चवथ्या शतकात पुन्हा काही ब्राह्मण कौंडिण्य ऋषीच्या मार्गदर्शनाखाली येथे प्रचारकार्य करण्याकरिता आले आणि जनतेला सुखी व संपन्न करण्याच्या कार्यात त्यांना साहाय्य दिले. या त्यांच्या सांस्कृतिक कार्यामुळे येथे हिंदुधर्माची प्रगती झाली आणि ब्राह्मण देवतांची स्थापना व मंदिरे वाढीस लागली. हरी हर, यक्षी, अर्धनारी इ० अनेक देवतांच्या मूर्ति स्थापन झाल्या. तसेच अनेक संस्कृतशिलालेख निरनिराळ्या प्रसंगाने लिहिले गेले. चीन व इतर देशात या देशातील सरकारी वकील पाठविण्यात येऊ लागले, याचे पुरावे चीनच्या वार्षिक प्रतिवृत्तात मिळतात. जयवर्मन, रुद्रवर्मन, यशोवर्मन यासारखे पराक्रमी राजे या भूमीला लाभले. ते आपणाला सूर्यवंशीय म्हणत. आपल्या कारकीर्दीमध्ये त्यांनी अनेक शक्तिस्थाने निर्माण केली. त्यांची कलाकुसर व सुबक मांडणी पाहण्यास सांप्रत अनेक प्रवासी तेथे जात असतात आणि त्या शिल्पावर अनेक ग्रंथ निर्माण झालेले आहेत.

## कंबोडियात भारतीय संस्कृतीची जपवणूक

नरोत्तम सिंहनुक हे सांप्रत तेथील राजे आहेत. कंबोज वंशावलीप्रमाणे कंबऋषि हे त्यांचे आदिपुरुष होत. मिरा नावाच्या अप्सरेबरोबर विवाह करून त्यांनी सूर्यवंशाची स्थापना त्या देशात केली, यास्तव कंबोज हे नाव त्या देशाला प्राप्त झाले. चवदाव्या शतकापर्यंत संस्कृत ही तेथे राजभाषा होती. सांप्रतही अनेक मंत्रविधि त्याच भाषेत आहेत. दररोजच्या वापरातील अनेक संस्कृत शब्द आहेत. टेलीफोन ( दूरशब्द ), टेलीग्राम ( दूरलेख ), टाइपरायटर ( अंगुली लेख ), टायपिस्ट ( अंगुली लेखक ), आगगाडी ( अयसमय अथवा लोहमय वाहन ), सायकल ( द्विचक्रयान ), रिक्षा ( त्रिचक्रयान ), इ० इ० 'रामायण रामकेर' ( रामकीर्ति रामायण ) हे महाकाव्य लोकप्रिय असून नाट्यातील अभिनयाचा प्रमुख विषय तोच आहे. नृत्यकलेतील प्रमुख विषयही रामायणच आहे.

शुभ कार्ये करण्यासाठी ज्योतिषाकडून शुभ वेळा काढतात. मुलांचे जावळ काढून झाल्यावर मीकाङ या पवित्र नदीचे पाणी ताम्याच्या पात्रात घेऊन त्यावर अभिषेक करतात. कैलासपर्वतावरील गंगा नदीचे पाण्याइतके पावित्र्य त्या पाण्यामध्ये मानतात. शैव ब्राह्मण डोकीवर केस वाढवीत नाहीत. राज्याभिषेकादि राजसंस्कार शैव ब्राह्मणाच्या हातून होतात. या वेळी युवराज उजवे हाती शिवाची व डावे हाती विष्णूची प्रतिमा घेऊन वेदोक्त मंत्राने त्यावर प्रोक्षण करवून घेतात.

गुरुवार हा जास्त शुभ दिवस मानला जातो. राजनर्तकीचा दीक्षासमारंभ अगर इतर शुभ कार्ये शक्य तर या दिवशी करतात. दाट केशरी रंगाची वस्त्रे त्या दिवशी मुख्यतः वापरतात. अष्ट दिशाना वेदी मांडून संस्कार करण्यात येतात, त्या वेळी चारही दिशांना लाह्यांची पखरण केली जाते. सायंकाळी स्त्रिया व मुली सुगंधी द्रव्य आणि तांदूळ यांचे तिलक लावतात. जीवनातील साफल्य आणि मांगल्य आधुनिक जीवनात याप्रमाणे ओतप्रोत भरलेले तेथे आढळते. रामायण हे कंबोजी कथांचा आणि नृत्यांचा प्राण आहे. कथा ऐकण्यात अगर नृत्य पाहाण्यात आई, बाप, लहान मुले तल्लीन होऊन जातात. रामाचा वनवास, कांचन मृगकथा, हनुमंताची लंकेतील कामगिरी, सीताशोक, रामरावणयुद्धातील प्रचंड काया वानर व राक्षसांचे नृत्य इत्यादि देखाव्यात ते तल्लीन होऊन जातात. सडसडीत नर्तिकांची कुंकुमारुण मुखकमले संध्याकाळच्या अंधारात लुप्त होऊ लागतात, तेव्हा शिवसुंदरात तन्मय झालेल्या प्रेक्षकाला कार्यक्रम संपल्याची खेदपूर्ण जाणीव होते.

## चंपादेश ( कंबोडिआ )

कंबोडिआ हा श्याम प्रदेशाचा एक भाग असून मध्य सयाम भाग म्हणजे मेनम नदीचे खोरे अगर लवपुरीच्या आसमंतातील प्रदेश होय. येथे पूर्वी ख्मेर

वंशीयराजांची सत्ता होती आणि यालाच कंबोडिया म्हणत. श्री तामराज येथील राजा उत्तरभागी सरकला आणि त्याने लवपुरी येथील राज्य दहाव्या शतकाच्या शेवटी काबीज केले. त्याचा पुत्र सूर्यवर्मन (१) याने ही राज्यपद्धती येथे सन १००० साली चालू केली, यावरून काही वेळा सयाम व कंबोडिआ येथील भागात कपडे, गाणे, नृत्य व लिपी यामध्ये बरेच साम्य आढळून येते.

ही राजवट प्राय: ब्राह्मण धर्मीयांची असल्याने निरनिराळ्या शहरी हिंदु-मंदिरे उभारली गेली. वन-हिन-कोन, पनोम-वन, कोराट इ० अनेक ठिकाणी संस्कृतशिलालेख आढळून आलेले आहेत. यावरून तेथील ब्राह्मणधर्माचे प्राबल्य दिसून येते. पिमई, पनोम-वन, पनोम-रग, मॉंग-तम इ० शहरातून ही मंदिरे बांधली गेलेली होती. काही आज उभी आहेत, तर इतरांचे अवशेष त्या त्या ठिकाणी सापडतात.

श्रेष्ठपूर ही कंबोजाची राजधानी होती. या शहरी श्रुतवर्मा राजाने भद्रेश्वराचे शिवालय बांधले. हर्षवर्मा (दुसरा) याने शंकर व पार्वती यांची मंदिरे उभारली. सूर्यवर्मा याने शिवरुपिलेश्वराचे मंदिर बांधले. उदयादित्य (दुसरा) याने शिव-मंदिर उभारणीत अफाट पैसा खर्च केला. बेयोन येथे विषपान करणारी शंकराची मूर्ति सापडलेली आहे. सोमशर्मा राजाने त्रिभुवनेश्वराची प्रतिष्ठापना केली. संमोर (शिवपुरी) येथे राजवाड्यात हरिहराची मूर्ति आढळली आहे. ही मूर्ति शैव-वैष्णव वाद मिटवू पाहणारा राजा ईशानवर्मा याने बसविलेली असावी.

साम्प्रतचा कंबोडिया व इंडोचायना हे भाग या प्रदेशात मोडत असे. या ठिकाणी पूर्वी हिंदुसाम्राज्य होते, हे आपण वर पाहिलेच आहे. असेही सांगतात की, व्यापारी जहाजातून कौंडिण्य नामे ब्राह्मण प्रथम कबुंज (साम्प्रतचे फुनान) येथे गेला आणि तेथील राजकन्येबरोबर विवाहबद्ध होऊन राज्यकारभार पाहू लागला. प्रैकुक, कोममाग व घोम शहरांत सुमारे ५० मंदिरे तरी गुप्तकालीन बांधणीची, म्हणजेच वरती सपाट छत असलेली आढळून आलेली आहेत. बांधणी अर्थात विटांची होती. यशोवर्मन दुसरा याने सन ११२५ च्या सुमारास यशोधरापूर (सांप्रतचे ऑंकारवँट) आणि यशोवर्मन याने सन ९०० च्या सुमारास ऑंकारथोम या ठिकाणी मंदिरे बांधून भारतीय शिल्पांनी नटविली होती. त्यांमध्ये शिव, विष्णु व शक्तीची मंदिरे होती.

(Archaeology of India, P. 206)

त्या वेळी तेथे शक्तिपूजा चालत होती. पण कालांतराने इतर संस्कृतिच्या आक्रमणामुळे हिंदुसंस्कृति बुडाली आणि मंदिरेही उध्वस्त झाली. क्वचित एखादे-दुसरे पीठ अस्तित्वात आहे इतकेच. या देशात 'पो' हा देवतावाचक शब्द

असून त्या त्या कर्तृत्वशक्तीचे दर्शक नाव त्या पुढे ठेवले जाते. पो-सहा इनो ही आद्यकुमारी माता असून, पो-कोसी-गराई या देवीचा जन्म तिच्यापोटी झालेला आहे. भारतीयांची उमाभगवती देवतेला आता पो-नागर ही संज्ञा आली असून ती विश्वमाता अथवा विश्वजननी म्हणून मान्यता पावलेली आहे. न्हात्र्यग या शहरी या देवीचे मंदिर आहे. कोचीन-चायना भागात विनहोव या ठिकाणी झालेल्या उत्खननात एक लक्ष्मीची मूर्ति आढळली असून, तिच्या हाती कमलपुष्प व नागाच्या प्रभावळीखाली तिचे आसन दाखविले आहे. पत्तन-कुमई ही देवता स्त्री-सम्राज्ञी मानली जात असून आकाशातील मेघापासून तिचा जन्म झालेला आहे असे मानतात. या देवीला एकूण ९७ पति असून १३८ मुले आहेत. तांदूळ हे या देशातील प्रमुख उत्पन्न असून त्यावर या देवतेची सत्ता चालते. पोयान-दरी ही रोगराईची देवता होय. ती दऱ्याखोऱ्यातून राहते अथवा गुहे-मध्ये असते आणि लहान मुलांचे सर्व आजार बरे करते.

( जेम्स धर्मकोश ३, पृष्ठ ३४१ )

प्रा प्रांग साम-योत येथील कलाकृति आज उभी आहे, या ठिकाणी उंच गोल मनोऱ्याचा, वरचा भाग निमुळता होत गेलेली व संपूर्ण भारतीय घडणीची तीन मंदिरे आहेत, बौद्ध बांधणीचा येथे कोणताही अंश दिसत नाही. मंदिराची तीन शिखरे म्हणजे भारतीय देवांपैकी ब्रह्मा-विष्णु महेश या त्रिमूर्तींची ती मंदिरे असली पाहिजेत. शिखरावरील कलाकृतीत दाढीवाले अनेक ऋषि आणि हाती गदा घेतलेल्या काही मूर्ती आहेत. यावरून हे स्थान ब्राह्मणधर्मीयांनी निर्माण केलेले असावे, पण नंतर बौद्धधर्मीयांनी त्या ठिकाणी मस्तकावर शेषफणा असलेली बुद्धाची मूर्ति बसविली असल्याने, ते एक बौद्ध क्षेत्र मानले जाते.

पनोम रग येथील मंदिरासंबंधातही हाच संशय निर्माण केला गेलेला आहे. सुमारे पाचशे फूट उंच टेकाडावर असलेली ही कलाकृति ख्मेर राजांनी निर्माण केलेली आहे. दरवाज्यावरील कमानी व भिंतीवरील इतर स्थाने याचेवर ब्राह्मण-देवतांच्या मूर्तींची कलाकृति आजही स्पष्टपणे दिसते. स्तूप अगर विहार याकरिता बौद्धांची जी एक विशिष्ट पद्धती आहे, त्याचा या ठिकाणी मागमूसही आढळत नाही. इतके असूनही ऑमोनिअर सारखे फ्रेंच संशोधक मात्र मत देतात की हे बौद्धांचे क्षेत्र असावे. या संशोधकाला बांधणीमधील मर्म व सूक्ष्म भेद समजलेला नाही असेच म्हणावे लागते.

लपपुरी येथील सन १०२२ च्या शिलालेखाप्रमाणे ख्मेर वंशीय राजे आपणाला सूर्यवंशीय म्हणवीत असत, तरी त्यांनी महायान, हीनयान, ब्राह्मणधर्म अगर योगमार्गी या सर्वांना सम वागणूक दिली आहे. ' The Royal Court

was surrounded by Brahmin rites and ceremonies and the people followed the Buddhist faith ' या त्याच्या समत्वाच्या वागणुकीमुळेच दोन्ही धर्मांची प्रगती त्याच्या राज्यात होत होती. महा-तात याबारसी बौद्धधर्मीय कला कृति बांधली गेली ती याच वेळी अगर पनोमन्रग येथे मायादेवी व लुंबिनी या बुद्धाच्या मातांची चित्रे रेखाटण्यात आली. या संस्कृतीने सुमारे तीनशे वर्षे येथे राज्य केले.

या देशात भारतीयांना अभिमानास्पद वाटणाऱ्या अनेक कलाकृति असून त्या सर्वांचे वर्णन येथे करणे अशक्य आहे. बंतेनसेरी, प्रविहार, अकोर (ओंकार) आणि बायन या चार स्थानांचे त्रोटक वर्णन वानगी दाखल पहाणें इष्ट होईल

## बंतेनसेरी

बंतेनसेरी हे क्षेत्र अकोर क्षेत्राच्या ईशान्येस १५ मैलावर आहे. बंतेनसेरी याचा अर्थ स्त्रीचा अथवा देवीचा बालेकिल्ला असा केला जातो. भगवान शंकरा साठी राखून ठेवलेल्या या भागाला येथील शिल्पाच्या आकड्यांवरून पूर्वी ईश्वरपूर असेच सांगेथे नाव होते

उपलब्ध सनावलीवरून असे दिसते की, सन ९५२ ते ९६१ चे दरम्यान ही कलाकृति तयार झालेली असून त्या वेळी जयवर्मन (५) राज्य करीत होता. कालप्रवाहात या वास्तूची मोडतोड होऊन अवशेष इतस्तत पडलेले होते व काही रानटी माणसे तेथील वस्तु बाजारात विकीत असत नोव्हेंबर १९२३ मध्ये चोरांची एक टोळी तेथे आली आणि भिंतीवरील अप्सरा मूर्तींची चोरी करून जात असता, सर्वजण पकडेल गेले व त्याना शिक्षा मिळाली. या खटल्याच्या वेळी जो साक्षीपुरावा झाला त्यावरून फ्रेंच संशोधक परमेंटिअर व गालौनेट यांनी त्या ठिकाणाला भेट देऊन, वास्तूचे महत्त्व समजून घेतले व वरिष्ठाकडे त्याप्रमाणे अहवाल सादर केला. फ्रेंच सरकाराच वास्तूचे महत्त्व पटून, सन १९२७ ते १९३२ पर्यंत जीर्णोद्धाराचे काम पूर्ण केले गेले, सर्वत्र विखुरलेले अवशेष जमा करून, आधु निक पद्धतीने त्यांची पूर्ववत नीट बांधणी केली वास्तूचा ऊर्जितकाळ पुन्हा उदयाला आला हिंदु संस्कृतीची ही उत्तम कलाकृति आहे.

या मंदिराची बांधणी दहाव्या शतकातील आहे असे वर म्हटले आहे, पण बाहेरील काही कलाकुसरीचा भाग चवदाव्या शतकातील असावा असे संशोधक फिनॉट यांचे मत असले तरी ते इतर मान्य करीत नाहीत.

या मंदिराचा बाहेरील परिसर सुमारे ३३० चौ. फुटांचा असून पूर्व पश्चिम बाजूला भव्य गोपुरे आहेत यातून आत प्रवेश केल्यावर मध्यभागी सुमारे

१२५ चौ. फूट जागेवर मुख्य मंदिर आहे. यामध्ये तीन प्रमुख गाभारे तीन देवांसाठी असून, त्यामध्ये शंकर-पार्वती-गणेश यांच्या मूर्ती आहेत. या तीन गाभाऱ्यासभोवार भव्य सज्जा असून, त्यामध्ये पाषाणावर महाभारतामधील व इतर काही प्रसंगाचे चित्रण आहे. महाभारतामध्ये सुंद-उपसुंद राक्षसाची कथा प्रसिद्ध असून त्यांचेच चित्रण एके ठिकाणी आहे. राक्षसाची तपश्चर्या, देवांची सभा, तिलोत्तमानिर्मिती, राक्षसावर तिची मोहनी आणि तिच्या प्राप्तीसाठीच्या भांडणात दोघांचाही अंत, असे चित्रण आहे. तसेच रावण, कैलास पर्वत हलवीत असता शंकरांनी त्याला पायाच्या अंगठयाने खाली दाबणे, हे चित्रण आहे. याप्रमाणे अनेक देखावे शिल्पकलेत दाखविलेले आहेत. गाभाऱ्याचे तीन दरवाजे, पायाच्या बैठकीवरील माकडे व सिंह यांच्या आकृतींनी रक्षित आहेत. गोपुरावरील अप्सरांचे चित्रण मोहक असून आजुबाजूला इतरही सुंदर शिल्पकाम आहे. एकंदरीत या शिल्पाची गणना उत्तम शिल्पात केली जाते.

## प्रविहार

हे क्षेत्र अंकोरच्या उत्तरेस आणि श्रीसाखेत या रेल्वे स्टेशनपासून दक्षिणेस सुमारे ६५ मैल अंतरावर घनदाट अरण्यात वसलेले आहे. १५०० फूट उंचीवर गेल्यावर या मंदिरात जाण्यासाठी दगडी पायऱ्याची सुरुवात होते. प्रत्येक पायरी अखंड पाषाणाची बनविलेली असून, अगर काही ठिकाणी मूळच्या खडकात कोरलेली असून तिची लांबी सुमारे ३० फूट आणि उंची एक फूट आहे. याप्रमाणे १६० पायऱ्या चढून गेल्यावर इतस्ततः दगडांच्या काही राशी पडलेल्या दिसतात व काही अंतरावर दोन्ही बाजूंना नक्षीदार कठडा असलेला लहानसा जिना दिसतो. या जिन्याच्या सुरुवातीलाच दोन्ही बाजूंना दोन दहा फूट उंचीच्या, फणा पसरलेल्या नागाकृति नेत्राना आनंद देतात. हा जिना संपताच गोपूरवजा लहानशा पाषाणाच्या मंदिरातून पुढे मार्ग जातो. घटीव पाषाणाच्या या मार्गावरून सुमारे १०० फूट गेल्यावर पहिल्याप्रमाणेच लहान जिना चढून वर जावे लागते आणि गोपूरातून पुढे जावे लागते. मार्गामध्ये डाव्या हाताला, प्राचीनकाळी बांधलेला एक सुंदर तलाव दिसतो, पण सांप्रत गर्द झाडीमध्ये तो दडून गेलेला आहे. वृक्षाच्या रांगा खूप शोभा देतात. उजव्या बाजूला एक पक्का रस्ता दिसतो, त्याचा उपयोग पूर्वी खाणींतून काढलेले मोठमोठे सलग पाषाण जागेवर आणण्यासाठी झालेला असावा. या रस्त्याच्या दोन्ही बाजूंना एका ओळीत मोठमोठे वृक्ष आणि त्यामध्ये उंच शिवलिंगाच्या आकाराचे दगड पुरलेले असल्याने फार रमणीय शोभा दिसते. समोरील तिसरा जिना चढून गेल्यावर एक चौकोनी मंदिरशिल्प आढळते. त्याच्या दोन्ही बाजूंना दुसऱ्या दोन गोल सज्जा

असलेल्या कलाकृति आहेत. गाभाऱ्यात शंकर-पार्वतीच्या मूर्ति पूर्वी असाव्यात, पण सांप्रत दिसत नाहीत. डावीकडील बाजूस एक लहानसा स्तूप आढळतो.

देवताच्या या मुख्य मंदिरातून पुढे गेल्यावर, मागील बाजूस थोडी अंतरावर पुन्हा एक जिना असून, आजूबाजूला नागमूर्तींचे अवशेष दिसतात. पुन्हा चवथ्या घडीव रस्त्यावरून पुढे गेल्यावर, जिना चढल्यावर आणि गोपुरातून प्रवेश केल्यावर सर्वांत प्रमुख असे देवालय आपण पाहतो. या मंदिराच्या मागे ४० फुटावरील तुटलेल्या कड्यापर्यंत पोहोचल्यावर, सुमारे २३०० फूट उंचीच्या या भव्य शिल्पाची कल्पना येते. पाषाणाचे घडीव रस्ते, दोन्ही बाजूला घनदाट वृक्षराजी, लहान लहान जिने, गोपुरे या क्रमाने चारपाच वेळा थोड्या थोड्या चढणीचा मार्ग सुमारे ८०० फूट चढून गेल्यावर मगच मुख्य देवाचे दर्शन घडते. या प्रकारची डोंगरावरील मंदिराची बांधणी एक आगळीच मानली पाहिजे. हे सर्व ब्राह्मणकालीन ब्राह्मणदेवतांचे शिल्प आहे, हे आणखी एक विशेष होय. मुख्य मंदिराचे पटार सुमारे अर्धा मैल लांबीचे असून, त्यामध्ये पाण्याची तळी आणि दोनचार इतर इमारतीही आहेत. त्यांतील काही मोडकळीस आलेल्या, तर काही पूर्ववत ताठ उभ्या आहेत. त्या सर्व घडीव पाषाणाच्या आहेत.

कोम्टेसे कोरल या संशोधकाच्या मताप्रमाणे ही कलाकृति सन १०४० साली सुरू होऊन काही वर्षांनी पूर्ण झाली. ख्मेरसंस्कृतीमध्ये घडत असलेला बदल येथे उठावदारपणे दिसून येतो. द्वाररक्षक म्हणून सिंहांच्या दोनतीन आकृत्या येथे आढळतात. मुख्य मंदिरात कोणतीही मूर्ति सांप्रत आढळत नाही. सर्व अवशेषांवरून हे ब्राह्मण संस्कृतीचे क्षेत्र होते असे निश्चितपणे म्हणता येते.

रेजिनॉल्ड मे या संशोधकाला या ठिकाणी खडकात कोरलेले एक मानवाकृति पाऊल आढळले. आपला पाय त्यामध्ये बरोबर बसतो असा त्याने अनुभव घेतला, पण अशा रीतीने येथे पाऊल कोरण्याचे कारण काय, याचे कोडे मात्र त्याला उमगलेले नाही.

## अंकोर ( Angkor ) ऑंकारवॅट मंदिर

कंबोजमधील ख्मेर राजवटीचे सुवर्ण युग म्हणजे दुसरा सूर्यवर्मा ( १११३ ते ११५० ) याच्या राजवटीचा काळ होय. हे राजे विष्णुभक्त असल्यामुळे त्यांनी 'अंकोरवाट' हे विष्णुमंदिर बांधले. आजही, आशिया खंडातील ही एक सर्वोत्तम कलाकृति मानली जाते. भारतामधील वेरूळ येथील कैलासलेण्याप्रमाणे ही कलाकृति कोणी मानवाने तयार केली, हे आजच्या कंबोजी लोकांना खरेच

वाटत नाही व प्रत्यक्ष इंद्रदेवाने प्रथम ही मातीची कलाकृति तयार करून मग त्याला पाषाणरूप दिले असेच ते मानतात. त्यावर दिसणारी छिद्रे, ही इंद्राच्या हाताच्या बोटांचे ठसे आहेत, असे ते समजतात. रामायण-महाभारत यामधील अनेक प्रसंगांची चित्रे शिल्पात खोदलेली आहेत. समुद्रमंथनाचा देखावा तर फारच उत्कृष्ट आहे.

सन १९३७ साली एका कंबोजी भक्ताला दृष्टांत झाल्यावरून मंदिराच्या तलावाजवळ खोदकाम झाल्यावर, काशाचे शेषशायीविष्णूचे भव्य मस्तक आढळून आले. हीच मूर्ति मंदिरात पूर्वी असली पाहिजे. शेषशायीभगवानाचे हे महान प्रसादमय तेजस्वी मस्तक संपूर्ण भारतीय शैलीचे आहे.

ही कलाकृति निर्माण करण्यास किती काळ लागला याची निश्चित माहिती मिळत नाही, पण काहींच्या मते तो काळ ३० ते ५० वर्षांपर्यंतचा असावा. ताजमहाल बांधणीस वीस वर्षे लागली, यावरून या मंदिराची कलाकृति किती उत्कृष्ट असेल याची कल्पना वाचकांना यावी. या मंदिरात जी विष्णुमूर्ति स्थापन केलेली आहे, ती मात्र भारतातील शिल्पाप्रमाणे नसून, सूर्यवर्मन राजाचीच मूर्ति विष्णूस्वरूप म्हणून बसविलेली आहे. मंदिराच्या भिंतीवर अनेक अप्सरांचे चित्रण केलेले आढळते.

सुमारे दोनशे-तीनशे वर्षे हे क्षेत्र अज्ञात होते, झाडेझुडपे वाढलेली होती, कलाकृतीमध्ये खूप गाळ साचलेला होता व माणसांची मुळीच वर्दळ नव्हती. कारण अशा घनदाट अरण्यात सहसा कोणी जात नसे. परतु हेन्री मौहोट हा फ्रेंच संशोधक त्या ठिकाणी फिरत असता सन १८६० साली त्याला हे क्षेत्र प्रथम उमगले आणि नंतर ते प्रसिद्धीला आले. या शहरी पूर्वी ख्मेर राजवंशाची राजधानी होती, पण सन १४४० साली अनेक वर्षांच्या युद्धानंतर सयामी राजांनी ते राज्य मोडकळीस आणल्याने, तेथील राजधानी पॉपेह्र हा शहरी नेण्यात आली. यामुळे तेथील वर्दळ कमी झालेली होती. हेन्रीने ही कलाकृति पाहताच उद्गार काढले,

"This architectural work perhaps has not and perhaps never has had, its equal on the face of the globo"

इतकी अप्रतीम ती कलाकृति आहे.

याप्रमाणे प्रथम ही जरी ब्राह्मण कलाकृति म्हणून तयार झाली तरी कालौघात ती तशी टिकली नाही. सन ११८१ च्या सुमारास जयवर्मन (७) हा राजा असताना महायान पंथीय बौद्धांची जोरदार लाट त्या राज्यावर आली

आणि त्यांनी या कलाकृतीवर आक्रमण करून, त्यामध्ये काही बुद्धाच्या मूर्ति स्थापन केल्या. पुढे चवदाव्या शतकात सिलोनमधून हीनयान पंथियांची दुसरी जोरदार लाट येऊन त्यांनी या मंदिराचा ताबा घेतला व बौद्ध कलाकृतींची अधिक भरती केली. यावरून सर्वसाधारण माणसांना वाटते की, अंकोर ही कलाकृति बौद्धानीच तयार केलेली आहे, पण मूलतः तसे नव्हे. पुढे तर निरनिराळे शिलालेख तेथे बसविले गेले आणि एक प्रमुख बौद्ध मठ म्हणून त्याची सर्वत्र ख्याती झाली.

जानेवारी १९०८ ते मे १९११ हा तीन वर्षांचा प्रदीर्घ काळ फ्रेंच सरकारने साफसुफी करण्यास घालविल्यावर, आता या मंदिराला प्रेक्षणीय स्वरूप प्राप्त झाले असून, हजारो प्रवासी ते पाहण्याचा आनंद लुटीत आहेत.

या मंदिराची बांधणी चौकोनी आकाराची असून, प्रत्येक बाजू २२० यार्ड लांबीची असल्याने एकूण आकार ४८४०० चौरस यार्डांचा होतो. इंग्लंड-मधील कॅंटरबरी येथील धर्ममंदिर फार मोठे म्हणून सांगितले जाते. म्हणजे ५०० × ८५ फूट, तेव्हा त्याचा चौरस आकार होतो, फक्त ४७२२ चौ. यार्ड. याचाच अर्थ अंकोरची कलाकृति कॅंटरबरीपेक्षा दहापट मोठी आहे. ही सर्व कला-कृति वालुकामय पाषाणाची असून, चुन्याचा वापर केलेला नाही, हे तिचे वैशिष्ट्य होय. एकावर एक अनेक माळे असून, मधल्या शिखराची उंची २२० फूट आहे. चारही कोपऱ्यांवर कंगोरेदार शिल्पयुक्त कळस आहेतच. अनेक कलाकुसर-युक्त खांब पाहाण्यात येतात. ख्मेरसंस्कृतीचे असे आणखी एक वैशिष्ट्य दाखविता येते की, खांबाच्या एका बाजूला एक इंच खोल अशी अनेक छिद्रे एका ठराविक रीतीने पाडलेली दिसतात. ती का व कशासाठी पाडलेली आहेत याचा बोध आजवर झालेला नाही. मंदिराच्या बाहेरील बाजूने एक गोल सज्जा असून त्याचीच लांबी अर्धा मैल भरेल. येथे पाषाणांच्या भिंतींमध्ये अनेक कलाकृति खोदलेल्या आहेत, त्यामध्ये केवळ १७५० अप्सरांच्या मूर्ति असून, प्रत्येकाची आकृति, अंगाची ठेवण, शिरोभूषण व अंगविक्षेप निरनिराळे दाखविलेले आहेत. या मंदिराची जी छायाचित्रे प्रसिद्ध झाली आहेत, ती जरी पाहिली, तरी मन प्रसन्न होते.

या प्रकारच्या कलाकृतींचे वर्णन करण्यास स्थापत्यशास्त्राचे संपूर्ण ज्ञान पाहिजे, कवीची भरारी पाहिजे, कसबी कारागिराचा डामडौल पाहिजे अगर वरदहस्त लेखकांची अस्खलित लेखणीच पाहिजे, असे जे एका लेखकाने म्हटले आहे तेच सर्वथैव खरे आहे. साधारण कल्पना येण्यास हे वर्णन पुरेसे व्हावे. भारतीय संस्कृतीचा विस्तार दृगोचर होतो, हेच मूलतः दाखविणे आहे.

## वायन मंदिरे

अंकोरवॅट येथील विष्णु मंदिराची निर्मिती झाल्यावर त्याच्या उत्तर बाजूला अंकोरतोम नावाचे दुसरे शहर बाराव्या शतकाच्या शेवटी वसविले गेले व त्या ठिकाणी ही नवीन कलाकृति निर्माण करण्यात आली. या दोन्ही कलाकृतींच्या पूर्व बाजूला सियेमरीप नावाची नदी उत्तर-दक्षिण वाहात असून मंदिराकडे जाण्यासाठी पूल आणि भराव घालून तयार केलेल्या बांधावरून जावे लागते. वरील क्षेत्राप्रमाणे हे स्थलही कालौघात विसरले गेले होते. झाडेझुडपे वाढली होती, त्याचा ऊर्जितकाळ लोप पावलेला होता. पेरी लोटी या संशोधकाला हे क्षेत्र प्रथम उगमले आणि कालांतराने फ्रेंच सरकारने सन १९१२–१४ सालापर्यंत त्याची साफसफाई करून, त्याचा ऊर्जितकाळ पुन्हा उदयाला आणलेला आहे.

असा एक समज प्रचारात आहे की, सन ८९० साली यशोवर्मन राजाने जेव्हा अंकोरवॅट शहराची प्रथम स्थापना केली, तेव्हाच ही कलाकृति उभारलेली असावी. शहराभोवती दोन मैल लांबी रुंदीचा दगडी तट असून, त्यास पाच महाद्वारे होती. या चौकोनी तटाच्या आत राजवाडे आणि देवालये होती. मंदिराच्या संरक्षणासाठी, ६०६० वार लांबीचा खंदक होता. मंदिरबांधणीचे कौशल्य असे की, निरनिराळ्या रंगाचे दगड, चुना-सिमेंटच्या मिश्रणाविना कुशलतेने बसविलेले आहेत. पण संशोधकांचे असे मत झाले आहे की, महायान पंथीय बौद्धांनी बाराव्या शतकांच्या शेवटी ही वास्तु निर्माण करून त्यामध्ये लोकेश्वर बुद्धमूर्तींची स्थापना केली. मंदिराच्या पूर्व बाजूला आकर्षक बंधारा असून त्यावरून 'पोर्टे-नॉर्ड' या क्षेत्राकडे जाता येते. या बंधाऱ्याच्या दोन्ही बाजूंना वीस फूट उंचीच्या, पाषाणांच्या देव-दानवांच्या भव्य मूर्ति बसविलेल्या आहेत. अमृतमंथनाच्या वेळी शेषाची दोरी करून ज्याप्रमाणे रस्सीखेच देव-दानवांनी केली, त्याचीच ही प्रतिकृति भासते. अथवा भूतलावर कोणाची सत्ता नांदावी, त्यासाठी ही स्पर्धा आहे, असा भास होतो. कसेही असो, या प्रकारचे हे एकमेव शिल्प भारतीय कलेचा नमुना म्हणून या ठिकाणी आजही पाहण्यास मिळत आहे.

बौद्धविहाराप्रमाणे यांची बांधणी असल्यामुळे, एक भव्य दिवाणखाना आणि त्याभोवती पाषाणाच्या भिंतीमध्ये आतून-बाहेरून उठावाचे चित्रण हेच प्रमुख होय. देवमूर्तींच्या खांबावरील चित्रण साधारणतः भारतातील पालवंशीय चित्रणाप्रमाणे आहे. भिंतीवरील बाहेरील बाजूचे चित्रण ऐतिहासिक घटनांचे असून आतील बाजूला पुराणग्रंथातील देवादिकांचे आहे. दुथडी भरून चाललेली नदी, किनाऱ्यावर पोळ्या-भाकरी भाजणारे भक्तजन, डोक्यावरून मोठ्या कष्टाने सामान वाहून नेणारी माणसे इ० अनेक दृश्ये आहेत. या शिल्पकलेसाठीच हे स्थान प्रसिद्ध आहे.

सन १९१२ साली हे स्थान साफसूफ करीत असताना एक गोष्ट मात्र प्रामुख्याने लक्षात आली, ती अशी की, सांप्रतच्या चित्रणाच्या ज्या भिंती आहेत, त्याच्या खाली ९–१० फुटांवर उत्तम फरसबंदी असलेली आढळून आली आहे. ही तेथे कशी आली याचा उलगडा आजवर झालेला नाही. यामुळे संशय घेण्यास जागा आहे की, दक्षिणेकडील अंकोरवॅट मंदिराच्या वेळी अगर तत्पूर्वी त्या ठिकाणी हिंदु मंदिर तयार झालेले असावे आणि इतक्या खोलवर फरशी असणे म्हणजे खोल गाभाऱ्यांत भगवान शंकराची मूर्ति बसविलेली असावी. बौद्धांनी ती कलाकृति पाडून, त्या पायावरच आजचे मंदिर उभारलेले असावे. एरव्ही या पूर्वबांधणीचा उलगडा होत नाही.

## सयाम

हा अतिशय डोंगराळ प्रदेश सुमारे १२०० मैल आणि ५०० मैल रुंदीचा असून वंशभेदाप्रमाणे त्याचे साधारणतः चार विभाग पडतात. उत्तर भाग हा ब्रह्मदेशाप्रमाणे मोनवंशाने उत्तरेकडील शान भागातून प्रवेश करून व्यापलेला आहे. अर्थात हे दक्षिण भारतीय लोक होते. तसेच पूर्व बाजूने कंबोडियातील ख्मेर वंश आला, तर सावन लोक व मुकोताई भागातून ताई वंशाने प्रवेश मिळविला. साराश या भागात तीन वंशांचे मिश्रण आढळते. ईशान्य भागात हिंदूंनी वसाहत केली. दक्षिण भागात पहिल्या शतकात पल्लव वंशीय लोक येऊन त्याची परिणती सहाव्या शतकात श्रीविजयराज्यस्थापनेपर्यंत झालेली होती. पुढे आठव्या शतकात कलिंग प्रांतीय आणि वंग प्रांतीय यांनी येथे प्रवेश मिळविला व वसाहती केल्या. याप्रमाणे हा भाग वसाहतीखाली आणला गेला, असे इतिहास सांगतो. या भागातील शहरांची नावे अयोध्या, लवपुरी, राजपुरी, शांतापुरी, सावनकालोक, पितसानुलोक, ओंकारपुरी इ० पूर्ण भारतीय आहेत, पण त्यांचे अपभ्रंश आता निराळे झालेले दिसतात.

## ताईवंशाचा सयाम प्रवेश

जर्मन भूगर्भशास्त्रज्ञ क्रेडनेर यांचे म्हणणे असे की, ताईवंश हा उष्ण कटिबंधातील हवामानात डोंगरपठारावर राहून भातशेती पिकविणारा असल्याने चीनच्या दक्षिण प्रांती क्वंग-सी भागातील मूळचा रहिवासी आहे. सहाव्या शतकानंतरचा याचा इतिहास मिळतो. दक्षिणेकडील नानन्चौ या शहरी याचे प्रथम राज्य स्थापन झालेले होते. नवव्या शतकाच्या मध्यावर यातील काही प्रमुख कर्ते पुरुष पश्चिमेकडे ब्रह्मदेश आणि पूर्वेकडे टोनकिन भागाकडे सरकले आणि वंशाचा विस्तार झाला.

'From the time they continued to found colonies in the south until about A D 860 a Tai prince called Brahma crossed the Me-Kong river and founded the first Tai settlement at Chai Praka in Chengrai district Those who setttled in Burma, were known as Tai Yai (Great Tai) now called Shan and those who settled in the Lao states and Siam are called Tai Noi (Little Tai) now called Siamese'

नान-चौ येथील ताईसाम्राज्य थोडक्याच दिवसात मोडकळीस आल्यामुळे आणि पिढ्या पिढ्यातील अंतर वाढत गेल्याने, शान व सयामी लोकांचा चीन वगैरेशी संबंध संपूर्णपणे सर्व बाजूने तुटला आणि भारतीय संस्कृतीबरोबर त्यांनी लगट केली, हे सर्व पुढील इतिहासावरून स्पष्टपणे दिसून येते. ताई वंशाला आपल्यात सामावून घेणे हेच भारतीय संस्कृतीचे श्रेष्ठत्व म्हणता येईल

सयाममधील साम्प्रतचे शहर लाम्पून याचे पूर्वीचे नाव हरिपंजय असे होते चैंगमाई शहरापासून आग्नेय दिशेला १० मैलावर हे असून मी कॉंग नदी काठी वसलेले आहे. सातव्या शतकाचे मध्यावर ख्मेर वंशीय राजकन्या शामादेवी हिने मोठ्या लवाजम्यासह त्यामध्ये (५०० धर्मगुरु होते) उत्तरेकडे जाऊन हरिपंजय शहर स्थापन केले. हंस पक्षी हा या किंवा मोनसंस्कृतीचे मानचिन्ह होते आणि अजूनही काही धार्मिक स्थानांच्या शिखरावर त्यांचे अवशेष साक्ष पटवितात. काही मंदिरात मोनभाषेतील शिलालेखही आढळतात व ते ते तेराव्या शतकातील आहेत. ( सन १२१३, १२१८ इ. ) शामादेवीवंश पुराण आणि जिनकलमालिनी, हे ग्रंथही वरील विधानालाच दुजोरा देतात. या ग्रंथाप्रमाणे असे दिसते की, लवपुरी येथील राजाची शामादेवी ही कन्या असून तिचा विवाह ब्रह्मदेशाचा राजा रामंञ नागर याजबरोबर झालेला होता. परंतु सन ६६३ साली तिने पतीचा त्याग करून संस्कृति-प्रचारासाठी ती उत्तरेकडे चाल करून गेली, हरिपंजय शहर वसविले आणि कारभार पाहू लागली. तिकडे गेली तेव्हा ती गरोदर होती. तिला दोन पुत्र झाले, एकाला तिने हरिपंजय ( लाम्पून ) येथे गादीवर बसविले आणि दुसरा लम्पाग ( केलांग ) येथे नवीन गादी निर्माण करून तेथे बसविला. पाच बौद्ध मठांची स्थापना तिने या नवीन शहरी केली. तसेच अलवनगणपुरी ( Lampang Luang ) या नवीन शहराची स्थापना करून तिने तेथे एक मंदिर उभारले. या शहरी एक विहीर आहे आणि ती शामदेवीची स्मृति म्हणून दाखविली जाते, याचे कारण असे की तिने शहर वसविले पण पिण्याच्या पाण्याचे दुर्भिक्ष जाणवू लागताच तिने विहीर खणली व जलदेवतेची प्रार्थना करताच जमिनीतून पाण्याचे फवारे वर उडू लागले. सारांश शामादेवी ही त्या काळी मोठी महत्वाकांक्षी आणि कर्तबगार राणी होऊन गेली.

धर्मप्रसारासाठी तिने पतीचा त्याग केला, सधार सुखावर पाणी सोडले व कंबोडियाचे उत्तर भागी जाऊन राज्य स्थापन केले, मठ, मंदिरे बांधली आणि धर्मध्वजा उचावली

लाम्पून येथील गादीवर पुढे अनुरुद्ध, दित्तराज (११२०५०), अदित्तराज (सन ११५० ७५) यांनी राज्य केले व वाट कुकुट, वाट सी लीम इ० मंदिरे बांधली विष्णु, लक्ष्मी, शिव पार्वती यांच्या ब्राँझ धातूच्या ताईवंशी यांनी केलेल्या अनेक मूर्ति सयाम भागात सापडल्या आहेत

नान चौ येथील ताईसाम्राज्यावर कुबलीखानने स्वारी केल्यामुळे ते उध्वस्त झाले आणि ताईवंशीय दक्षिणेकडे मोठया वेगाने सरकले. यामध्ये मेंगराय आणि राम-कामहेंग नावाचे दोन तरूण उदयास आले आणि त्यानी आपली निरनिराळी राज्ये चेंगराई व सुकोताई येथे स्थापन केली. मेंगराय सन १२३९ मध्ये जन्म पावला व सन १२५९ मध्ये गादीवर बसला सन १२९२ साली त्याने लाम्पून येथील मोनवंशीय राज्य काबीज करून तो उत्तर सयामचा अधिपति झाला सन १२९६ साली त्याने चेंगमाई येथे नवीन राजधानी स्थापन केली सन १३१७ साली तो स्वर्गवासी झाला

मेंगराय हा बौद्धपंथीय राजा असल्याने त्याने सन १२९२ साली चेंगराई येथे चेंगमन हा बौद्धस्तूप उभारला. ब्रह्मदेशातील पागन येथील स्तूपाप्रमाणेच याची बांधणी आहे. संप्रत जो स्तूप चेंगमाई येथे पाहण्यात येतो, तो सन १४७१ साली ताई राजा तिलोकराज याने जीर्णोद्धार केल्यानंतरचा आहे. या शहराच्या सीमेवर दुसरा एक स्तूप ' चेत–योत ' या नावाचा असून तो मेंगरायने बांधला असे मानले जाते. त्याच्या शिखराला सात गोल कंगोरे आहेत, हे त्याचे वैशिष्टय असून शिवाय त्याची बांधणी गया येथील महाबोधीमंदिराप्रमाणे आहे. त्याचा पुत्र तिलोकराज यानेही काही विहार व स्तूप उभारलेले आहेत.

तेराव्या शतकाच्या मध्यावर सुकोताई हे ख्मेर वंशीयांचे ताब्यात होते पण आजूबाजूला ताईवंशीय ल्हान ल्हान राज्ये असल्याने, शेवटी ही बंड करून उठली आणि सुकोताई येथे ताई वंशाची स्थापना श्री इंद्रादित्य ह्या रोकराजा याच्या नावाने झाली. क्रमाक्रमाने मध्य सयामवर या राजाची सत्ता वाढत गेली व ती दक्षिणेकडे अयोध्येपर्यंत वाढली. सन १२७३ साली इंद्रादित्याचा पुत्र राम कामहेंग गादीवर आल्यावर त्याने आपले साम्राज्य दक्षिणेकडे नाखोन श्रीतामराज, पूर्वेकडे मेरगुई व पश्चिमेकडे मलाया द्वीपकल्पापर्यंत वाढविले. यावरून असे मानले जाते की, हा फार पराक्रमी राजा होऊन गेला

सुकोताई आणि सावनका-लोक ही जुनी शहरे नष्ट झाली असून संप्रत जी त्याच नावाची शहरे आढळतात, ही पूर्वीच्या स्थानापासून थोड्या अंतरावर

वसविली आहेत. नवीन सुकोताई शहराला तानी हे नाव असून तेथे राजतानी व प्रचूम पोन ही नवी बौद्ध स्थाने आहेत. तसेच या ठिकाणी महा तात हे प्रख्यात बौद्ध स्थान आहे. प्रजेडी चेत-तेओ या नावाचे एक प्रसिद्ध स्थळ असून, या ठिकाणी ल्हान ल्हान स्तूपाच्या सात ओळी आहेत. त्या फारच आकर्षक वाटतात.

## बुद्धाच्या मूर्ति आणि भक्तांच्या श्रद्धा

चेंगमाई (सयाम) येथे एक बुद्धमूर्ति असून त्याबद्दल अशी कथा सांगितली जाते की, बुद्धाच्या निर्वाणानंतर अजातशत्रूने ती मूर्ति बनविली. ती पालवशीय शिल्पकलायुक्त असून, त्यामध्ये बुद्धदेहाचे अवशेष भरलेले आहेत. प्रथम तीन भिक्षूंनी ती सिलोनमध्ये नेली आणि नंतर सुकोताई, लम्पांगमार्गे ती चेंगमाई येथे आली. 'प्रा सिला' या नावाने आज ती ओळखली जाते. या मूर्तीचा उपयोग सांप्रत पर्जन्य येण्याकरिता केला जातो. वेळेवर पाऊस न आल्याने हाहा कार उडाला असेल, तर विधीपूर्वक या मूर्तीवर पाण्याचा अभिषेक केला असता पाऊस येतो व पिके पिकतात.

(रेजीनॉल्ड मे, पृ. १६६)

या प्रकारच्या मूर्ति नवव्या शतकात बुद्धगया येथे प्रचलित होत्या.

## सिंहली बुद्धमूर्तीचा प्रवास

सयाममध्ये प्र सिहिंग या ठिकाणी बुद्धाची एक विख्यात मूर्ति आहे व तिला खूप इतिहास आहे. तेराव्या शतकाच्या मध्यावर सुकोताई येथील ताईवंशीय राजा रोकराजा तथा इंद्रदित्य याने नाग्कोन श्रीतामराज येथील राज्याला भेट दिली, त्या वेळी त्याला समजले की, सिंहलद्वीपच्या राजाजवळ उत्तम शिल्प असलेली बुद्धाची मूर्ति आहे. ती मूर्ति आपल्याजवळ असावी असा विचार करून नाखोन येथील राजाच्या सहकाराने, त्याने आपले दूत सिंहलद्वीपाला पाठविले. दूतानी ती बुद्धाची मूर्ति आपल्या राजाला बक्षीस द्यावी अशी विनंती केल्यावरून राजाने ती देण्याचे मान्य केले. दूत मूर्ति घेऊन येत असता, वाटेत जहाज फुटले पण मूर्ति मात्र एका तराफ्यावर शिल्लक राहून, परमेश्वरकृपेने तो तराफा हलकेहलके श्रीतामराज राजधानीकडे जात होता. तेथील राजाला स्वप्नात दृष्टान्त झाला की, मूर्ति तराफ्यावरून शहराकडे येत आहे. दुसऱ्या दिवशी दृष्टांताप्रमाणे मूर्ति राजाला दिसल्यावर, मोठ्या भिक्तभक्तीने त्याने ती राजवाड्यात आणली आणि तिची स्थापना केली.

रोकराजाला हा वृत्तात समजल्यावर, तो श्रीतामराज येथे जातीने आला आणि मूर्ति घेऊन गेला. सुकोताईजवळ त्याने दगड-विटांचा एक भव्य स्तूप निर्माण करून त्यामध्ये ती मूर्ति स्थापन करून त्या क्षेत्राचे व मंदिराचे नाव सचनालय (सावनका-लोक) असे ठेवले. या ठिकाणी ती मूर्ति सुमारे शंभर वर्षे सुखाने नांदली. पण नंतर तिलाही धकाधकीचे आयुष्य लाभले.

पुढील ५० वर्षांच्या कालखंडात, त्या मूर्तीची कीर्ति सर्वत्र पसरल्यामुळे अनेक राजाना ती आपल्याजवळ असावी अशी प्रबळ इच्छा झाली. सुकोताई येथील मूळची राजसत्ता दुर्बल झाली असल्याने, अनेक लहान लहान राजांनी तिची सरेहोलपट केली. सुकोताईहून ती क्रमाक्रमाने चैनाट, अयोध्या, कापेंगपेठ, टाक-रहेंग, चेंगमाई, चेंगराई, चेंगसेन आणि पुन्हा चेंगमाई येथे येऊन प्र-सिंहिंग येथे कायम झाली. सन १३५०–१४०० या कालखंडात मूर्तीने इतका प्रवास केला. सन १६६२ साली राजा नारायण याने पुन्हा ती अयोध्या शहरी आणून स्थापन केली. परंतु सन १७६७ साली ब्रह्मदेशातील नासोन येथील राजाने अयोध्या शहरावर हल्ला करून ते जिंकले आणि मैत्रीच्या पूर्वसंबंधामुळे ती मूर्ति चेंगमाई येथील स्तूपात नेऊन स्थापन केली. पुढे १७९५ साली ती मूर्ति बँकाक येथे आणून राष्ट्रीय वस्तुसंग्रहालयात ठेवली गेली आहे.

या मूर्तीचे वैशिष्ट्य असे की, ती पद्मासनावर स्थापन केलेली असून, २६ इंच उंचीची आहे. मस्तकाच्या सभोवार तेजोवलय आहे. हात, पाय, डोळे यांची ठेवण अतिशय अप्रतीम आहे. देवतांनाही त्यांच्या श्रेष्ठपणामुळे कसा त्रास सहन करावा लागतो, स्थापना झाल्यानंतरही पुन्हा उच्चाटन, पुन्हा स्थापना या क्रमाने अनेक शहरी प्रवास घडतो, हा इतिहास रम्य आहे.

## पाचूची बुद्धमूर्ति

प्रनेदी सुआंग येथील राजा तिलोक्राज याने सन १४०१ मध्ये बौद्ध मंदिर बांधण्यास सुरुवात करून अनेक वर्षांनी बांधकाम पुरे केले. त्याने नान-ची भागातून हिरव्या रंगाचा दगड आणून, चेंगमाई येथेच मूर्ति घडवून घेतली. पाचूच्या रंगावरून तिला हे नाव आले आहे. ही मूर्ति साधारण दोन फूट उंचीची आहे. या मूर्तीची अशीही दंतकथा प्रचलित आहे की, सम्राट अशोकाच्या वेळी तिची भारतात प्रथम निर्मिती झाली. नंतर सिलोन, अंकोर, अयोध्या, कँफेंग व नंतर चेंगमाई येथे आली.

## मोन व ख्मेर वंशीय अंमल

मोन वंशियांची ज्या भागात वसाहत होती आणि अयोध्याशहराप्रमाणे गावे होती, त्याला पूर्वी द्वारावती म्हणत असत. काठेवाडातील श्रीकृष्णाचे क्षेत्र द्वारका, त्याचाच हा अपभ्रंश होता. हुवेनसंग या चिनी प्रवाशाने या भागाला ईशानपूर असे नाव दिलेले आहे. सन १३५० साली राजपुत्र उत्तांग याने अयोध्या राजधानी स्थापन केली. पाचव्या शतकापासून दहाव्या शतकापर्यंत या भागात मोन वंशीय अधिकार गाजवीत होते आणि नंतर त्यांची जागा ख्मेर वंशियांनी घेतली. या भागात प्रपातम नावाचे एक प्रसिद्ध शहर आहे. त्याबद्दल अशी कथा सांगितली जाते की, पूर्वी याचे नाव शिरिछावी असे असून सम्राट अशोकाच्या वेळी दोन धर्मप्रचारक शोण व उत्तर यांनी तेथे जाऊन मठ स्थापन केलेले होते. त्याचे काही अवशेष आज उपलब्ध आहेत. मोनवंशीय हे बहुधा बौद्धपंथीय असल्याने ब्राह्मण देवतांच्या मूर्ति अगर मंदिरे या भागात आढळत नाहीत, पण लवपुरी येथील महातातमंदिर नागाच्या सात फण्यांखालील बौद्धाची मूर्ति व अनेक बौद्ध मूर्ति, येथील प्राचीन बौद्ध संस्कृतींची साक्ष देतात.

## अयोध्या

सयाम उपसागराच्या उत्तर टोकाला हे शहर वसलेले होते. सांप्रत त्याचा अपभ्रंश ' अयुत्य ' असा झालेला आहे. मेनाम (मेनका), पा-साक व आणखी एक नदी यांच्या मुखाजवळ जो त्रिभुज प्रदेश बनलेला आहे, त्यावर या शहराची उभारणी केलेली आहे. बँकॉक शहराच्या उत्तरेला सुमारे ४५ मैलावर हे शहर आहे. साधारण १४ चौ. मैलाचा हा भू-भाग फार रमणीय दिसतो. प्राचीन द्वारावती शहर ते हेंच होय. ख्मेर राजवंशीयांनी हे शहर उभारले असे म्हणतात. या शहराने अनेक राजघटी पाहिल्या. सन १२५० चे सुमारास युवानवंशीय सम्राट कुबलीखान याने ताईवंशाचा पाडाव केल्यावर, तो वंश खाली सरकून, या शहरी राहू लागला. सन १७६७ पर्यंत हे राजधानीचे शहर म्हणून मिरवले गेले पण या वर्षी ब्रह्मदेशातील नागोन राजानी या शहरावर स्वारी करून त्याची पूर्ण धूळदाण करून टाकली. राजे बौद्ध पंथीय होते.

अनेक उत्तमोत्तम शिल्पकला व प्रेक्षणीय स्थळे या राजानी न्हाहीशी केली, हिंदुमंदिरातील मूर्ती फोडल्या, पुतळे उखडून टाकले भिंतीवरील चित्रकला विदारण केली आणि जंगम माल व भांडी-कुंडी लुटून नेली. सैनिकांच्या झुंडींच्या झुंडींनी सर्व शहर लुटून फस्त केले आणि शहराचे वैभव पार धुळीला मिळविले.

या शहराचे वैभव अंतर्गत कालव्यामुळे होते. मेनका नदीला कालवे काढून शहरात निरनिराळ्या भागात खेळवून, हे शहर जणू एक बेटच बनवून सोडलेले

होते गावात रस्ते असले तरी सर्व व्यवहार कालव्यामधून चालत असे, त्यामुळे सर्व कालवे नावांनी फुलून गेलेले दिसत सुमारे १०० जलद्वारे आणि १५ भूद्वारे या शहरात होती. कालव्यांच्या भिंती विटांनी बांधून काढलेल्या असून बाजूने अनेक वृक्षांची लागवड केलेली होती. कालव्यांवरील वाहनमार्ग उंच पुलांवरून असल्याने खालून नावा अविरोधपणे जात येत असत. एक भूदरवाजा तर इतका मोठा होता की, माहुत हत्तीवर बसून त्यातून जात असे. शहराभोवती प्रचंड तट असून सतरा बुरुज व त्यावर तोफा डागलेल्या होत्या.

या शहरात तीन भव्य राजवाडे असून ठायी ठायी शिल्प सौंदर्यांनी नटलेली देवी, शंकर, विष्णु इत्यादि अनेक ब्राह्मण देवतांची मंदिरे होती, बौद्धमठ आणि विहार होते अमृतसागर तलावाचे विहारात बुद्धाचा ९० फूट लांबीचा, शयनावस्थेतील पुतळा आजही पाहता येतो त्याचे मुखावर निद्रिस्तभाव आणि मधुर स्मित यांचा सुंदर मिलाफ झालेला आहे. राजवैभव तर असे नेत्रदीपक होते की, हजारो नौकामधून मिरवणूका निघत ३००० मोठया नौका आणि २०,००० लहान नौका एके वेळी मिरवणुकीत भाग घेत असत.

(ले प्रवासी, केसरी १४-५-१९६७)

कीम्फर नावाचा जर्मन डॉक्टर सन १६९० च्या सुमारास या शहरी गेला असता, त्याने वर्णन लिहून ठेवलेले आहे. ते असे—

'कालव्यांच्या बाजूने शहरातील रस्ते सरळ असून, काही मोठे तर काही लहान, पण ते मलीन व अस्वच्छ दिसतात भरतीच्या वेळी काही रस्त्यांवर पाणी उफाळून येते शहराचा आकार जरी मोठा असला तरी मनुष्यवस्ती त्या मानाने कमी आहे. शहरात भरपूर मोकळ्या जागा असून, रस्त्याच्या बाजूला अनेक ठिकाणी बागबगीचे आहेत त्या शहरी एकूण तीन राजवाडे आहेत शहरातून रस्त्याचा जसा उपयोग होतो, तद्वत कालव्याचाही होतो म्हणजे माणसे एका ठिकाणाहून दुसरीकडे कालव्यातून नावात बसून जातात रस्त्याप्रमाणे गावात कालव्यांचेही जाळे पसरलेले आहे. राज्यामध्ये ज्याप्रमाणे असंख्य धर्म मंदिरे आहेत, तशी या राजधानीच्या शहरातही आहेत. त्यामधून मठाध्यक्ष आणि भिक्षु यांची गर्दी झालेली दिसते. मंदिरे बांधताना रस्ता आणि मंदिर यांच्यामध्ये भरपूर मोकळी जागा सोडलेली असून, नानाविध आकाराचे खांब, कमानी, छपरे, पायऱ्या यामुळे ती आकर्षक दिसतात धर्ममंदिरात मानवी आकाराच्या बुद्धाच्या मूर्ति आणि अनेक लहान मूर्ति खच्चून भरलेल्या दिसतात

राजा राम नियोधी (२) याने सन १४९१ साली आपले वडील त्रैलोक्यनाथ यांच्या स्मरणार्थ एक मंदिर उभारून त्यामध्ये ५० फूट उंचीचा

बुद्धाचा पुतळा २४ फूट उंचीच्या चौथऱ्यावर बसविला. तो ब्रॉंझ धातूचा असून ८०० पौंड वजनाच्या सुवर्णाच्या पत्र्यांनी मढविलेला होता.[१] या मंदिराला 'श्री सरपेट' म्हणत. ही मूर्ति तयार करण्यास तीन वर्षांपेक्षा अधिक काळ लागलेला होता. परंतु सन १७६७ सालच्या आक्रमणकाळी ब्रह्मी फौजांनी तो फोडून टाकला. कालांतराने त्याची जुळवाजुळव करणे बँकाक येथील राजाला अशक्य वाटल्यामुळे, बँकाक येथेच जेतुपॉन मंदिराच्या खाली ते अवशेष त्याने गाडून टाकले आहेत. जुन्या जीवनमूल्यांचा आणि सांस्कृतिक अवशेषांचा नाश करणे, हे जणू काय आक्रमकांचे नेहमीचेच सूत्र दिसते.

पण काळ-पुरुष हा घड्याळ्याच्या लंबकाप्रमाणे आहे, हे पदोपदी तो अनुभवास आणून देत असतो. कोठेही शाश्वतपणा त्याला दाखवावयाचा नाही. मग तो मानव असो, सम्राट असो अगर ते वैभवशाली नगर असो. वैभवाचे एका टोकाला लंबक पोहोचला, की दुसऱ्या टोकाची अधोगती लगेच सुरू होते. लंबकाची गती असेल त्याप्रमाणे दुसरे टोक गांठण्यास कमी जास्त वेळ लागेल इतकेच. पण दुसरे टोक गांठले म्हणजे पूर्ववत सर्व प्रदेश सपाट करून टाकल्याविना तो काळपुरुष राहात नाही. पशु, पक्षी यांच्या अंगावर पावसाच्या पाण्याचा भयंकर मारा झाला, म्हणजे एकदा अंग झटकून घेऊन तीं पाण्याचा निचरा करून घेतात, तद्वत भूमि आपले अंग झटकून घेते आणि पृष्ठभाग सपाट बनविते, काही वेळा अवशेषही राहात नाहीत. याप्रमाणे युगायुगांचा खेळ ही भूदेवी सतत खेळत असते.

श्रीधर्माशोकराज याने सन १५१० मध्ये, सहा फूट आठ इंच उंचीचा शिवाचा ब्रॉंझ धातूचा पुतळा बनविलेला होता. सांप्रत तो बँकाक येथे वस्तु-संग्रहालयात आहे. इतर ब्राह्मणदेवतांचे पुतळे येथे ठेवलेले आहेत.

फ्नान-पैन (कंबोडिआ) शहरातील एका रजत बौद्धालयात फरशीवर ४७०० चांदीचे पत्रे मारलेले असून, बुद्धाची १९० पौंडांची सुवर्ण मूर्ती एका कांचेच्या कपाटात मांडलेली आहे. कपाटावरील नक्षीकाम व मूर्तीची मांडणी आकर्षक आहे.

मुरकर्ता संस्थानात प्रवनन येथे अनेक हिंदु देवालये आहेत. येथील एका मंदिराचे वैशिष्ट्य असे की, मुख्य मंदिराभोवती तिहेरी तट असून दुसऱ्या व तिसऱ्या तटाच्या पोकळीत १५७ मंदिरे उभारलेली होती. तटाच्या मध्यभागी

---

१. टीप—भारतामध्येही अनेक उंच उंच बुद्धाच्या मूर्ति आढळलेल्या आहेत. गोमटेश्वर येथील मूर्ति ५६ फूट, नालंदा ८० फूट, तर मामलपुरम-मार्गीरय येथील मूर्ति ९८ फूट उंच आणि ४३ फूट रुंद होती.

काळस्वरूप शिव, दुर्गा, गणेश, चतुर्मुख ब्रह्मा, विष्णु, चन्द्रसूर्य, चडीरवग इत्यादि दैवताची देवाल्ये होती अनेक मदिरावर शिलालेख आढळून आलेले आहेत त्यामध्ये पूर्वीचा इतिहास वर्णिलेला आहे

(जेम्स धर्मकोश, ७-४९६ आणि केतकर ज्ञानकोश, उ २५०)

काही ठिकाणी बत्तार गुरूचे अवशेष मिळालेले आहेत बत्तार–बृहत्तर असा त्याचा अर्थ आहे म्हणजे या देवाची घडण आणि उत्पत्ती मोठी आदरणीय असली पाहिजे भौमकाव्याचे मलायिन भाषातर 'हिकायतखगशांव' या नावाने प्रसिद्ध आहे या काव्याचा विशेष असा की, त्यात बत्तार हा सार्वभौम देव मानला असून ब्रह्मा व विष्णु हे दुय्यम प्रतीचे मानलेले आहेत अर्थात ते काव्य कोणीतरी शिवभक्ताने केले असले पाहिजे. काही ठिकाणी खेरी म्हणजे दुर्गादेवी हे नाव प्रचलित आहे मलायन लोकाची अध्यात्मविषयक व्याख्याने अथवा धार्मिक प्रवचने होतात, त्यामध्ये सस्कृत शब्दाचा भरणा जास्त आहे

(जेम्स धर्मकोश, ८–३५४)

परतु ही भारतीय सस्कृति या ठिकाणी आणखी किती दिवस टिकाव धरून राहाणार, याबद्दल थोडी वानवाच आहे कारण इस्लामी सस्कृतीचे आक्रमण वाढतेच आहे हे सर्व देश आता स्वतत्र झालेले आहेत भारतीयाचे, राजकीय व सामाजिक सबध त्यामुळे दूरावत चालले आहेत आणि चिनी आक्रमक आपले बस्तान बसविण्याच्या प्रयत्नात आहेत याच पार्श्वभूमीवर भारताचे त्या भागातील भूतपूर्व वकील श्री अप्पासाहेब पत म्हणतात, 'अग्नेय आशियातील जावा, सुमात्रा आदि राष्ट्रे आपली अस्मिता टिकविण्यासाठी फार पुरातन काळापासून प्रयत्न करीत आहेत ही प्राचीन भारतीय अस्मिता टिकविण्यासाठीच त्या राष्ट्राचे डोळे भारताकडे लागलेले असतात आपल्या सस्कृतीबद्दलच्या अभिमानामुळे आणि ही राष्ट्रे लहान छोटी आहेत म्हणून आजवर आपले त्याकडे दुर्लक्ष याल्ले असले, तरी यापुढे आपल्याला तसे करून चालणार नाही भारतीयानी लक्ष न दिल्यास चीनच्या नवीन आक्रमक सस्कृतीखाली उरलीसुरली प्राचीन भारतीय सस्कृतीही येथून नष्ट होईल आणि भारतीयाना कायमचा पश्चात्ताप करावयाची पाळी येईल' (केसरी, पुणे, दिनाक २५–४–१९६४) पण या सर्वांचे दूरगामी परिणाम आळखून त्याप्रमाणे वर्तन करणारी केंद्रिय सत्ता आज भारतामध्ये अधिकारावर नाही ही दुर्दैवाची गोष्ट आहे।

## न्यूगिनी

जावा सुमात्राच्या दक्षिणेला आणि ऑस्ट्रेलियाखडाच्या शेजारी न्यूगिनी नावाचा द्वीपसमूह आहे त्यामध्ये एक न्यू आयर्लंड नावाचे बेट आहे तेथील

हिंतुवुहेत ही देवता आदिशक्तिस्वरूपी असून पृथ्वी, आकाश व मानवजात याच देवीने निर्माण केली असे तेथील लोक मानीत. हिंतुवुहेत या शब्दाचा अर्थ त्यामुळे स्त्रीपूर्वज असा केला जातो. आश्चर्य इतकेच की, जरी ही देवता मानलेली असली तरी या देवतेची मूर्ति बनविलेली नाही. ही देवता कोणाजवळून काही मागत नाही व दिल्यास घेतही नाही. तसेच ती कोणाला काही देतही नाही. असे म्हणतात, की, तिच्या भक्ताने एकादा गुन्हा केला तरी ती त्याला शिक्षा करीत नाही. इतकी शांत आणि निरुपद्रवी देवता अन्यत्र कोठेच आढळून येत नाही.
(जेम्स धर्मकोश, ९,३३७)

## पॉलेनेशिया

पॉलेनेशिया द्वीपसमूहातून भारतीयांच्या वसाहती कशाप्रकारे झाल्या याचे त्रोटक विवरण सुरुवातीला आलेच आहे. हा द्वीपसमूह पॅसिफिक महासागरामध्ये ऑस्ट्रेलिया-न्यूझिलंडच्या उत्तरेला, जपानच्या पूर्वेला आणि अमेरिकाखंडाच्या पश्चिमेला वसलेला आहे. हवाई, मार्शल, फिनिक्स, सोसायटी, कुक, फिजी, फैडली, टोंगा, मंगाईआ, ऑस्टर, सॅमोआ, युनियन, ताहिटी इत्यादि बेटांचा हा भाग आहे. जावासुमात्रामधून भारतीय तिकडे व्यापारासाठी अथवा जनवाढीचा दट्टा जास्त झाल्याने सरकले व वन्य जमातींबरोबर संकर करून स्थायिक झाले. राजकर्ते बनले. संशोधक पर्सी, स्मिथ, फोरनेंदर, रिव्हर्स यांनी संशोधन करून या संस्कृतीसंबंधीची माहिती प्रसिद्ध केलेली आहे. 'पॉलेनिशयन पुराण व कथा' [Myths & Legends of Polynesia] या नावाचे पुस्तक जोन्स अंडरसन यांनी लिहिलेले आहे, त्याच्या आधारे पुढील सर्व माहिती देण्यात आली आहे.

वरील सर्व संशोधकांचे म्हणणे असे की, खिस्ताब्द पाचव्या-सहाव्या शतकात भारतामधील राजकीय व सामाजिक परिस्थिती बिघडलेली असल्याने आणि काही अस्थिर वातावरण निर्माण झालेलें असल्यामुळे उत्तर भारतामधून वीस हजार कुटुंबे अरिस्थशनर ह्याच्या नेतृत्वाखाली सामुदायिकरीत्या स्थलांतर करून ब्रह्मदेश, मलाया, मादागास्कर इत्यादि भागांत गेली आणि तिकडे स्थायिक झाली. या मंडळींचे परदेशांत व्यवस्थित बस्तान बसलेले आहे, असे समजताच सुमारे दहा वर्षांनंतर आणखी वीस सहस्र कुटुंबे कलिंग देशाच्या किनाऱ्यावरून बाली बेटापर्यंत गेली आणि योग्य स्थळी स्थायिक झाली. (Myths & Legends of Polynesia, by Anderson. (पृष्ठ २१)[१]. आता असे अनुमान करण्यास

१. टीप— यापुढील पृष्ठक्रमांक याच पुस्तकातील समजावेत.

जागा आहे की, उत्तर भारतामधून जी कुटुंबे गेली, त्यांमध्ये काही मौर्यवंशीय होती आणि या शब्दाचाच अपभ्रंश पुढे त्या नवीन ठिकाणी मौरी (Mouri) असा झालेला असावा. हा वंश तेथील संस्कृतीमधील आजही एक प्रमुख वंश म्हणून गणला जातो. त्याच्या लोककथांमधून व लोकगीतांमधून त्यांचे पूर्वज पश्चिम दिशेकडून त्या देशी आल्याचा उल्लेख मिळतो. क्रमाक्रमाने या स्थलांतरित लोकांची वाढ होऊन त्यांनी न्युगिनी, सॅमोआ, टॉंगा, हवाई, मंगाईआ, इस्टर इत्यादि बेटे काबीज केली. (अंडरसन, पृष्ठ १३)

भारतीय वेदाप्रमाणेच हा वंश आपला वंश इतिहास, मुखोद्गत करून इतर वंशांना शिकवीत असे. पाठ्यपुस्तके नव्हतीच, पण पाठशाळा होत्या आणि त्यामध्ये सर्व पाठांतरच असे. इतकेच नव्हे तर भारतीय संस्कृतीत अनेक धार्मिक विधि व काही प्रसंग वेदमंत्राने सुरुवात करून अथवा एखाद्या विवक्षित मंत्राचा जप करून केला जातो, त्याप्रमाणे हा वंशही करीत असे. अशा मंत्रांना ते करकिया (Karakia) (कारिका हा मूळ संस्कृत शब्द आहे) म्हणजे पठणमंत्र (Charm, Incantation) म्हणत असत. करकिया हा उच्चार, मूळ शब्द कारिका हा माहीत नसल्यामुळे केला गेला असण्याचा संभव आहे. परंतु वास्तविक त्याचा संस्कृतसदृश उच्चार आणि उपयोग पाहिला म्हणजे तो शब्द कारिकाच आहे, यात तिळमात्र संदेह राहू नये.

(अंडरसन, पृष्ठ ५१)

काही कारिकांचे नमुने पाहणे उचित ठरेल. ते असे— आयो (Io) ही सृष्टी उत्पन्नकर्ती देवता. तिला उद्देशून ही कारिका आहे.

T is Io.
The A-io-nuku of motion.
The A-io-rangi of space.
The A-io-papa of Earth.
The A-io-matva of parents.
The primval darkness.
The continuous darkness.
The night, The day,
The rangi and papa i space and matter,
The Sky Father and the Earth Mother,
who beget Tana-rangi-tanke, Aitua Rango-ma-Tane,
Tane-Mahivta, Tawalvri-matea, Tangora, etc.
(Myths and Legends of Polynesians by Anderson, Page 354)

या सर्व मंत्राचा भावार्थ असा की, आयो देवतेपासून सूर्य, चंद्र, तारे उत्पन्न झाले. पूर्वी आकाश क्षितिजाला टेकलेले होते. परंतु टॅने[1] याने टेकू (Toko) लावून ते वर उचलले आणि पुढे ते टेकूच सूर्यकिरण बनले. दिवस, रात्री कोणी उत्पन्न केल्या, अवकाश, पृथ्वी कोणी उत्पन्न केली इत्यादि संबंधानेच वरील कारिका आहे. मूळ कारिकाचे इंग्रजीत भाषांतर लेखकाने करवून घेऊन वरील उतारे दिले आहेत. तेव्हा हे सर्व स्पष्ट आहे की, भारतीय संस्कृतीचे हे अवशेष आहेत. फिजी बेटातील वैतुपुवंश असे मानतो की, पूर्वी भूमि व आकाश एकमेकांना चिकटलेले होते. परंतु कालांतराने भूमीच्या तापण्याने वाफ उत्पन्न झाली आणि त्या वाफेच्या जोरदार दाबामुळे ते मूळ स्थानापासून भ्रष्ट होऊन वरील बाजूस गेले. त्याच वाफान्यामधून मानवाची उत्पत्ति झाली आणि पुरुषाच्या घामापासून स्त्रीची उत्पत्ति झाली. (अंडरसन, पृष्ठ ४१५)

राताटेव म्हणून या संस्कृतीमध्ये एक प्रमुख देवता आहे. वास्तविक हा या वंशातील एक पूर्वज होय. इंडोनेशियामधून न्यूगिनी, फिजी बेटे इत्यादि ओलांडून जाऊन त्याने तिकडे वसाहत केली (पृष्ठ १७९). या राजाने जहाज-बांधणी केली आणि सफरीसाठी निघाला असा उल्लेख पुराणातून मिळतो. (पृष्ठ १८६). या नांवाप्रमाणेच हेमा, तन्हाकी, वाहिरो ही नावे या संस्कृतीत प्रसिद्ध आहेत.

## हवाई, सॅमोआ

इतर संस्कृतीप्रमाणेच हवाई वंशातही त्याच्या पौराणिक कथांचा संग्रह आहे. त्यामध्ये एकूण चार लक्ष देवता असल्याचा उल्लेख मिळतो. काने-कू-लोनो ही त्रिमूर्ति येथे प्रसिद्ध आहे. सॅमोआ बेटाची उत्पत्ति कशी झाली या-संबंधीची कथा अशी—तुली हा तगोला देवाचा मुलगा. तो एकदा पक्षीरूपाने अंतराळात विहार करीत असता त्याला कोठेही उतरण्यास जागा मिळेना. तेव्हा तो परत सृष्टीकर्त्याकडे गेला आणि त्याला त्याने आपले दुःख निवेदन केले. सृष्टीकर्त्याने अंतराळामधून एक पाषाण खाली फेकला. विश्वाच्या गतीमान चक्रामध्ये तो फिरत असता त्याचा आकार वाढत वाढत गेला आणि शेवटी एका प्रचंड खडकरूपात तो भूमीवर स्थिर झाला. तुली या खडकावर राहू लागला. पुढे

१. टीप—भारतीय सूर्यवंशाने पश्चिमेकडे जेव्हा प्रसरण केले तेव्हा हाच शब्द क्रीट, अर्केडिअन व ग्रीस संस्कृतीत आलेला असून, शेवटी Tan=Zan=Zeus झाला. पण पूर्वीचा तो भारतीय शब्द दनूचा अपभ्रंश आहे असे चमनलाल म्हणतात.

निसर्गतः त्यावर झाडाझुडुपांची वाढ झाली. तुलीने त्या वाढलेल्या गवतातील दोन झुबके उपटले आणि त्याना मानवाचा आकार देऊन त्यात प्राण भरला[१]. तेव्हापासून येथे मानवीवस्ती झाली ( पृष्ठ ३८३ ). दुसऱ्या कोणाचे असे मत आहे की, भूतलावर पूर्वी सर्वत्र अंधार व पाणीच होते. आयो ही देवता त्यामध्ये कोठेतरी राहात होती. ( आयो म्हणजे भारतीयांचा ॐकार असावा ). या देवतेनेच सर्व प्राणीसृष्टी व जलसृष्टी नंतर उत्पन्न केली. या संस्कृतीने भूपृष्ठावर दहा आणि भूपृष्ठाखाली दहा अशाप्रकारे भुवनाची कल्पना केलेली होती. याखाठीच की काय कोण जाणे, पूर्वी पॉलेनिशियन संस्कृतीचे वर्ष दहा महिन्याचे होते[२] ( पृष्ठ ३५६ ). पण या ठिकाणी जर आपण मेक्सिकन संस्कृतीचा इतिहास ध्यानी आणला, तर असे दिसून येईल की, अतिपूर्वी त्या प्रांतात दशमास वर्षच चालू होते. पॉलेनेशियामधूनच भारतीय लोक पुढे प्रवास करून मॅक्सिकोमध्ये गेले, असे संशोधकानी मान्य केले आहे. तेव्हा असे अनुमान करण्यास हरकत नसावी की, दशमास संस्कृतीचे लोक मध्य मंगोलियामधून परस्पर अथवा भारताच्या माध्यमातून या बेटात प्रथम आले आणि कालांतराने पुढे अमेरिकेमध्ये सरकले.

कोणी असे मानतात की, सृष्टिकर्ता आयो देव म्हणजे आपला ज्युपिटर अथवा गुरु असावा. इजिप्शियन संस्कृतीचा सूर्यदेव रा, या संस्कृतीमध्ये तम-नेदू-ते-रा ( तमाचा नाश करणारा असा अर्थ असावा ) या नावाने प्रसिद्ध आहे. तेव्हा त्या संस्कृतीमधील काही लोक पूर्वी येथे आले असल्यास, वरील नाव येण्याचा संभव आहे. या आयो देवतेची दहा भुवने भूपृष्ठाच्या वर आहेत आणि आपले अंतरिक्ष हे सर्वात खालचे होय. सर्वात उंच भुवनामध्ये तो राहातो. ( भारतात गोलोक हा सर्वात उंचावर आहे असे मानतात आणि तेथेच महाविष्णु व राधा राहात असते, अशी समजूत आहे ) ( पृष्ठ ३५२ ). निर्मितीनंतर पो = रात्र आणि ओ = दिवस यांचे रहाटगाडगे चालू झाले.

या सूर्यदेवता संबंधात एक रम्य कथा प्रचलित आहे. मौई ही या संस्कृतीमधील एक प्रमुख देवता आहे. तिच्या वडिलाचे नाव माकी-तुरारा आणि आईचे नाव तरांगा असे होते. एके दिवशी ती दोघे समुद्रकिनाऱ्यावरून फिरत असता तिला पूर्ण वाढ न झालेला एक गर्भ त्या ठिकाणी आढळला. तिने आपले काही केस ओढून काढले आणि त्या गर्भाला त्यामध्ये गुंडाळून पाण्यात सोडून दिला. जलदेवतानी त्याची वाढ केली. पण सागरातील लाटामुळे तो पुनः किनाऱ्यावर फेकला गेला आणि काही दिवस तसाच तेथे पडून राहिला. एका जलराक्षसाने

१. भगवान शंकरांनी आपल्या जटा उपटून राक्षस निर्माण केला आहे.
२. दशमास वर्ष ही प्राचीन भारतीय परंपरा होती.

त्याला पडताच, उचलून घेऊन आपल्या घरी नेऊन त्याचे संगोपन केले त्याचे नाव त्याने तमा सुई-की ते रगी असे ठेवले. जलराक्षसाने त्या मुलाला पौराणिक कथा शिकविल्या, नृत्यगायनादि कला शिकविल्या आणि सर्व अद्भुत गोष्टींत त्याला तरबेज केले. कालांतराने भूतलावरील माहिती मिळविण्यासाठी तो वर आला आणि इतस्तत फिरू लागला

त्याच्या मातेला तरांगाला पुढे चार पुत्र होऊन तेही सर्व विद्यामध्ये प्रवीण होत. कर्मधर्मसंयोगाने मौई, मातेच्या घरी येऊन त्याचे भाऊ नृत्य करीत असता त्याच्या मागे लपून बसला. वास्तविक ही नृत्याची तालीम चालली होती त्यानंतर ते सर्व कोठेतरी नृत्याच्या कार्यक्रमाला जाणार होते. सर्व तयारी झाल्या-वर मातेने आपल्या चारही मुलांना बरोबर घेतले आणि जाण्यास निघाली एवढ्यात तिने मौईला लपून बसलेला पाहिला. तिने विचारले, 'तू कोणाचा मुलगा आहेस?' तो म्हणाला, 'आई, मी तुझाच पुत्र आहे.' हे पटवून देण्यासाठी मौईने आपली जन्मकथा तिला निवेदन केली व त्याची खात्री पटल्या नंतरच त्या चार भावांनी मौईला आपला वडीलभाऊ म्हणून मानले.

(अँडरसन, पृष्ठ १९२)

(बारकाईने जर पाहिले तर ही कथा भारतीय महाभारतामधील कर्णाच्या कथेबरोबर खूपच साम्य दाखविते)

एकदा या मौईला वाटले की, सूर्याच्या प्रखर उन्हामुळे आणि त्याच्या लवकर प्रवास करण्याच्या कारणामुळे दिवस लहान होतात आणि मानवांना काम करण्यास व जेवण शिजविण्यास पुरेसा वेळ मिळत नाही तेव्हा सूर्यावर आक्रमण करून, त्याला नमवून, आपले उद्दिष्ट साध्य करण्याचे त्याने ठरविले पण हे व्हावे कसे? जलराक्षसाने त्याला अनेक अद्भुत क्रिमया शिकविलेल्या होत्या. त्याचा उपयोग करण्याचे त्याने ठरविले, आपल्या चारही भावांना त्याने आपला बेत सांगितला. अर्थात त्यांना तो मूर्खपणाच वाटला, परंतु वडील बंधूच्या आज्ञेचे उल्लंघन[1] करावयाचे नाही म्हणून ते सर्व त्याच्याबरोबर गेले. एक पहाट, मोठमोठी दोरखंडे घेऊन, भावासह, सूर्य उगविण्याचे पर्वतावरील जे ठिकाण त्या गुहेजवळ तो गेला. दोरखंडाच्या साहाय्याने त्याने गुहेच्या तोंडाजवळ एक मोठे-जाळे तयार करून चारी भावांच्या हातात दोरीचे एक एक टोक देऊन, त्याच्या इशाऱ्यांवर काम करण्यास तयार राहण्यास सांगितले. सूर्य क्षितिजावर आल्यावर

---

१. वडीलबंधु म्हणून धर्मराजाच्या आज्ञेचे उल्लंघन इतर पांडव करीत नसत.

आणि त्याचे मस्तक जाळ्याच्या मधोमध दिसल्याबरोबर दोऱ्यांची टोके ओढण्याची त्याने खूण केली. भावानी दोऱ्या जोराने ओढल्या. पण त्याचा परिणाम असा झाला की, त्या दोऱ्या तुटल्या आणि सूर्य जाळ्यात सापडला नाही.

पुन्हा विचार करता मौईला असे दिसून आले की, दोऱ्या जुन्या आणि सुक्या असल्यामुळे सूर्याने आपल्या प्रखर तेजाने त्या जाळून टाकल्या आणि त्यामुळेच त्या तुटून गेल्या असाव्यात. तेव्हा त्याने ओल्या गवताच्या दोऱ्या विणण्याची कला शोधून काढली आणि ती सर्वांना शिकविली. काही दिवसांनी त्या ओल्या दोऱ्या घेऊन, पूर्वीप्रमाणे जाळे तयार करून त्याने सूर्याला त्यामध्ये पकडण्याचा प्रयत्न केला. त्या दिवशी दोऱ्या तुटल्या नाहीत. सूर्य जाळ्याच्या मध्यभागी दिसल्यावर, तो जाळ्यात अडकला आहे असे समजून मौईने त्यावर मुरी-रंगा व्हेनुआ या देवतेच्या जबड्याच्या हाडाने त्याला मारण्यास प्रारंभ करताच सूर्य काकुळतीला येऊन म्हणाला, 'तुझ्या इच्छेप्रमाणे मी सावकाश चालेन. त्यामुळे अर्थातच दिवसमान मोठे होईल, पण मला मारू नको रे बाबा मारू नको!' या संस्कृतीमध्ये असे मानतात की, मौई देवाच्या कृपेमुळेच सूर्य सावकाश चालत आहे व त्याने आपले प्रखर तेज कमी केलेले आहे.

(अडरसन, पृष्ठे १९२ ते २००)

या कथेचे मूळ पाहाताना असे दिसून येईल की, या संस्कृतीमधील पूर्वज उत्तरेकडून विषुववृत्ताकडील द्वीपामध्ये येत असताना क्रमाक्रमाने दिवसमान मोठे होत गेले. मौई हा उत्कृष्ट दर्यावर्दी असल्याने त्याने ताहिटी, मॉणिआ, रारोटोंगा या बेटांना भेटी देऊन तो खाली दक्षिणेकडे सरकला. भूकंपापासून अग्नि मिळविणे, अन्न, वारा, पाऊस, पाणी यावर सत्ता गाजविणे, ही त्याची कार्ये म्हणूनही वर्णिली जातात. (अडरसन, पृष्ठ २२८)

(भारतीय संस्कृतीमध्येही विश्वकर्म्याने सृष्टीचे चक्र फिरते ठेवून सूर्याचे प्रखर तेज कमी केल्याची नोंद आहे आणि त्यानंतर त्याची पत्नी संध्यादेवी परत त्याच्याकडे राहाण्यास गेलेली आहे.)

पंचमहाभूतात्मक देवता या संस्कृतीनेही मानलेल्या आहेत. त्या अशा:

| | |
|---|---|
| ओ-नुई : | मोठा काळा ढग. |
| टी-यीरा : | विद्युल्लता देवता. |
| टी-कानपू : | वायुदेवता. |
| व्हाई-तिरी : | मेघगर्जनेची देवता. |
| तव्हाकी : | विद्युत्‌देवता. |

| | |
|---|---|
| व्हाव्ही-रो : | दोंडेनक्षत्रदेवता. |
| युवा : | पर्जन्यदेवता. |
| आपु-मातंगी : | वादळदेवता. |
| व्हाट्ट : | वादळी पर्जन्यदेवता. |
| हिनाउरी : | नवबालकांची देवता. (हिच्या स्मरणाने गर्भवती स्त्रीची सुटका लवकर होते, अशी समजूत आहे.) |

या संस्कृतीमधील पुरुषवाचक देवता प्रमुख आणि स्त्रीवाचक देवता जरा कमी प्रतीच्या मानतात. कारण पुरुष हा जन्माला कारणीभूत होतो तर स्त्री ही मृत्यूला कारणीभूत होते अशी त्यांची समजूत आहे. (पृष्ठ ४०५). मानव व मृत्यु यांचे नाते असे की, सूर्य ज्याप्रमाणे संध्याकाळी मरतो (म्हणजे अस्ताला जातो) आणि सकाळी पुनश्च जन्म घेतो, तद्वत माणसाचे हे आयुष्य आहे असे काहींना वाटले. तेव्हा मौईदेवाने त्यांना सांगितले की, '*मृत्यु शक्यतो मानवापासून लांबवर असावा, जवळ नको*' (पृष्ठ २१२). वास्तव माणसापासून मृत्यु इतका दूर राहिलेला आहे. तसे जर नसते तर आपणही सूर्यासारखे संध्याकाळी मृत्यु पावून सकाळी पुनर्जीवित झालो असतो. मानवाचे जीवनमान दीर्घायुषी का त्याचे हे कारण, खासच गमतीचे वाटेल.

या भागात लिंगपूजाही चालत होती (Phallic Worship). 'टिकी' हे त्या लिंगाचे नाव होते. भारतामधील लिंगायत समाज ज्याप्रमाणे गळ्यात लिंगधारणा करतो, त्याप्रमाणे प्रजोत्पादन उत्तम रीतीने व्हावे यासाठी तेथील महिलावर्ग 'टिकी' गळ्यात घालीत असत. गर्भाप्रमाणे त्याचा आकार बनविण्यात येई. त्यांची अशी धारणा होती की, ते धारण केल्यावर उदरातील गर्भाला कोणत्याही प्रकारची इजा होणार नाही व कोणी करूही शकणार नाही. सांप्रतही याच कारणासाठी तेथे लिंगधारणा चालू आहे. हवाई बेटात तर ह्याचा सर्रास उपयोग केला जातो. पुना शहरी (भारतीय 'पुणे' नव्हे) केपकुमुका या ठिकाणी दोन मोठया लिंगाकृति आहेत. त्याला पोहाकू-ए-कोन या नावाने संबोधिले जाते. त्यांचे पूजा-अर्चादि विधि ज्याप्रमाणे चालतात, अथवा उत्सवादि कार्यक्रम ज्याप्रकारे पार पडतात, त्यावरून असे निश्चयाने म्हणता येते की, ती लिंगे अतिशय प्राचीन काळापासून तेथे स्थापिली असली पाहिजेत. फिजी बेटात हुना, नालोआ गावाजवळ अशी लिंगे आढळून आलेली आहेत. थोकाव्हा गावाजवळ जे लिंग आहे ते काळ्या पाषाणाचे, गोल आकाराचे व मध्यभागी वाटोळे असे आहे. इतकेच नव्हे, तर ते सात-आठ फूट उंच आहे. लेखक त्याचे असे वर्णन करतो—

'A round black, mile-stone slightly inclined with a laku (a band with closest fringe) tied round the middle'

(अडरसन, पृष्ठ ४१३)

टॅन ही या भागातील एक प्रसिद्ध देवता असून, तिला ६ ते १२ मुखे असतात असे वर्णन मिळते अनेक ठिकाणी ही मुखे लिंगप्रधान आहेत टॅने तुतारी, टॅने पेपर, टॅने युएरि इ० इ० त्याचा अनेक नावे आहेत लिंगप्रधान देवता आणि त्याची अनेक नावे ही आपल्या संस्कृतीमधील शंकराशी मिळती जुळती आहेत कारण भगवान शंकराना पाच मुखे असून त्याना अनेक नावानी ओळखले जाते, हे सर्वविदितच आहे

## न्यूझीलंड

न्युझीलंडच्या उत्तरेला रौ न्गुहाना जिल्ह्यात एक लिंगवृक्ष होता त्याचे नाव टॅने मातारा असे असून त्याची चमत्कार करण्याची शक्ती निदान वीस पिढ्या तरी चालू होती एखाद्या निपुत्रिक स्त्रीला संतानप्राप्ती व्हावी अशी प्रबळ इच्छा झाली तर तिचा पती आपल्या स्त्रीला घेऊन त्या वृक्षाजवळ जाई दोघेही दोन्ही हातानी झाडाच्या खोडाला विळखा घालीत आणि त्याच वेळी पुरोहित काही मत्राचा उच्चार करून त्याना आशीर्वाद देत असे वृक्षाच्या पूर्वेकडूची आराधना केली तर पुत्रलाभ आणि पश्चिम बाजूची केला तर कन्या प्राप्त होत असे ज्या अर्थी शेकडो वर्षे ही रूढि अमलात होती, त्या अर्थी ती सत्य असलीच पाहिजे, असे माझेही मत आहे (अडरसन, पृष्ठ ४१४)

भारतामध्येही अश्वत्थाला प्रसन्न करून घेतल्यावर पुत्रलाभ होतो, याची अनेक उदाहरणे आहेत

मौरी पुराणात अरोहीरोही ही सूर्याची पत्नी मानलेली आहे याबाब . थ सूर्याची प्रखर उष्णता असाही कोणी करतात पुढे सूर्याची उष्णता आणि प्रतिध्वनी यापासून एका स्त्रीची उत्पत्ती झाली तिचे नाव मारिकोरिको असे ठेवण्यात आले तिचा विवाह टिकी या देवाबरोबर लावून देण्यात आला आणि त्याना हिने नो अटारा नावाचा पुत्र झाला (अडरसन, पृष्ठ ४१५)

भारतीय संस्कृतीमध्येही दुर्गादेवीची उत्पत्ती सर्व देवाच्या तेजापासून झाली असून ती शंकराची पत्नी मानली जाते स्कद हा शंकराना मुलगा आहेच

या प्रदेशात 'टॅनेचे जियत पाणी' या नावाचे एक क्षेत्र ओळखले जाते मौरी पुराणाप्रमाणे हे स्थळ भूपृष्ठाच्या वर चौथ्या जगात आहे असे मानतात आणि काही वेळा त्याला ऐना सरोवर असे संबोधिले जाते

'Bathed in these waters, the wearying find renewal of strength, the sick are healed, the dead find life'

तात्पर्य, त्या पाण्यात स्नान केल्यावर शिणभाग नाश पावतो, नवीन तरतरी व तकवा येतो, आजारी बरे होतात आणि मृत झालेल्यानाही पुन्हा जीवनप्राप्ती होते. एके वेळी प्रवास करून थकवा आल्यावर चद्राने येथे स्नान केले असता त्याला नवजीवन प्राप्त झाले. श्यामवर्णी हिनादेवी[1] हिने स्नान केल्यावर ती गौरवर्णी बनली अतरिक्षात सचार करणाऱ्या यक्षिणीने स्नान केले असता तिचे मृत मूल तिला परत मिळाले. असे मानले जाते की, नवबालके प्रथम अदृश्य स्वरूपात या ठिकाणी जन्म घेऊन मग भूतलावर येतात. हवाई पुराणातही या स्थळाचा निर्देश आहे. हे अमृततुल्य पाणी प्रथम एका निर्झरातून उत्पन्न होऊन पुढे वाहात वाहात ओढ्यात रूपातर पावून पुढे वाहात जाते. भूतलावरील मानव-उत्पत्ती प्रथम याच भागात झालेली असावी असे मानतात हवाई नृत्यामधील एका गाण्यामध्ये या स्थळाचा निर्देश 'Water of Tane' असा आहे. त्या सस्कृतीमध्ये रोंगायरोरा नावाची एक देवता आहे. न्युझीलड भागात हीच धान्यदेवता असून तिचा उल्लेख 'Kumara is connected with Tane' असा केला जातो (पृष्ठ ४२४) याचाच अर्थ कुमार हा शकराचा मुलगा असून त्याच्या सदृश ही देवता आहे.

## तारकादेवता

बुध, मगळ, गुरु, शुक्र, रवि, हे ग्रह हवाई लोकाना माहीत होते. त्याची नावे येणेप्रमाणे होती. शुक्र–फायटी, सकाळचा तारा–पैरो, मिथुन राशीतील दोन जुळे तारे होई व तरारा इत्यादि. राहीआ या ताऱ्याच्या ऑक्टोबरमधील उगवण्यापासून वर्षारभ मानला जाई. अनुत्ताई या ताऱ्यामुळे सफरी लोकाना मार्गदर्शन होत असे. फनौई हा अतिशय वेगाने धावणारा तारा होय. (पृष्ठ ३९७)

मिथुन राशीच्या जुळ्या तारकाच्या उत्पत्तीची कथा अशी की, एका आई-बापाची ही दोन जुळी मुले होती. आईबाप त्याना दोन वेगवेगळ्या ठिकाणी ठेवणार असे कळताच ती घरातून पळून गेली. या बेटातून त्या बेटात प्रवास करीत करीत ती शेवटी ताहिटी बेटामध्ये गेली. घरातून मुले नाहिशी झाल्याचे समजल्यावर त्याची आई त्याच्या शोधार्थ त्याच्यामागे धावतच होती मागोवा घेतघेत तीसुद्धा ताहिटी बेटात येऊन पोहोचली. आईला पाहताच ती मुले एका पर्वतमाथ्यावर

---

१. पार्वती मूल्त काळसर होती. पण नतर गौर वर्णी झाली ही भारतीय कथा आहे.

चढून गेली. तरी आई त्याचा पाठलाग करीतच आहे असे त्यांनी पाहताच शेवटी त्या माथ्यावरून ती उडून गेली आणि त्यांनी आकाशात आपला कायम मुक्काम ठोकला. ती दोन जुळी मुले म्हणजे मिथुन राशीचे पुनर्वसु नक्षत्राचे दोन जुळे तारे होत.

मूळनक्षत्रातील ताऱ्याची कथा अशी की, हार्वे बेटातील, तारा-कोरेरेरे या नावाच्या एका बाईला एक मुलगा व एक मुलगी झाली. त्या बाईचा नवरा जातीने कोळी होता. त्याने मासे धरून आणल्यावर रात्रीच्या वेळी आईने ते शिजवले आणि खाण्याच्या वेळी मुले झोपली असल्याने त्याना उठविले नाही. नवराबायकोने ते मासे खाल्ले, वास्तविक मुले अंथरुणावर जागीच होती. परंतु आईने हाक न मारल्यामुळे ती उठली नव्हती. मासे खाताना आईने आपल्याला बोलावले नाही याबद्दल मुलाना राग येऊन ती रात्री घरातून पळून गेली. एका उंच पर्वतावर जाऊन खूप रडली आणि आकाशात उडून गेली व कायम तेथेच राहिली. आईबाप शोध करीत त्या पर्वतमाथ्यावर आले आणि दोन्ही मुलाना आकाशात लुकलुकताना पाहिले. त्याबरोबर ती दोघेही मुलाच्या शोधार्थ अंतराळात गेली. त्या दिवसापासून मुले पुढे आणि आईबाप मागे अशी पळापळी अव्याहतपणे चालू आहे. ही पळापळी वृश्चिक राशीतील मूळ नक्षत्रात चालू आहे. जास्त प्रकाशाच्या दोन तारका म्हणजे ते आईबाप व कमी प्रकाशाच्या दोन तारका म्हणजे ती दोन मुले होत. (अंडरसन, पृ. ४००)

ज्येष्ठा नक्षत्रातील ताऱ्यांची कथा अशी की, ताहिटी बेटामध्ये तौआ-रेहुआ याला दोन मुले होती. मुलाचे नाव टेहुआ आणि मुलीचे नाव पिपरी असे होते. वडिलानी मासे पकडून आणल्यावर आईने ते शिजविले. मुलाची झोपमोड होईल म्हणून त्याना त्यांनी उठविले नाही आणि त्या दोघानीच भोजन केले. मुले जागीच होती. त्यांना मासे खायला बोलाविले नाही म्हणून फार वाईट वाटले. आईवडील झोपल्यावर ती मुले घरातून पळून गेली आणि वर आकाशात राहू लागली. मुले अंथरुणावर नाहीत असे पाहून आईने पाठलाग चालू केला. मुले वर गेलेली पाहून ती माता एका पक्षावर स्वार झाली आणि त्यांच्या मागे धावली. मुलांना ती एकसारखी हाका मारीत होती, "पिपरी, या, परत या" (या हा शब्द दोन किंवा अधिक समूहवाचक आहे). मुलांनी उत्तर दिले, "आम्ही परत येणार नाही. चागल्या शिजविलेल्या माशापैकी एकदेखील तुम्ही आम्हाला दिला नाही."

पुन्हा पुन्हा त्या आईच्या कानावर हेच उत्तर येत होते. ज्येष्ठा नक्षत्रातील प्रकाशमान तारा म्हणजे ती आई व लुकलुकणाऱ्या तारका म्हणजे ती मुले होत. (अंडरसन, पृष्ठ ४०१)

चंद्र हा सुद्धा तारकादेवतांमध्ये मोडतो. सॅमोआ बेटामध्ये या देवतेला सीना असे म्हणतात (भारतीय नाव सिनीवाली असे आहे). चंद्रावर जी काही आकृति दिसते त्यासंबंधी अनेक कथा आहेत. भयंकर दुष्काळाचे दिवस होते. एक माता आपल्या मुलांना घेऊन बसली असता चंद्रबिंब वर वर येताना तिने पाहिले. मातेला वाटले की ती एक खाद्य वस्तूच आहे. जठराग्नि पेटला मग काय विचारता हो ! मुलांना काही खायला मिळावे या उद्देशाने ती चंद्राला म्हणाली, "तू खाली येऊन माझ्या भुकेलेल्या मुलांना तुझ्यातला एक तुकडा दे." मुलांची ही केविलवाणी दैन्यावस्था पाहून चंद्राला दया येऊन माता सिना, व मुले यांना घेऊन तो वर गेला. यासाठीच चंद्रबिंबामध्ये माता मुलांना घेऊन बसली आहे असे दृश्य दिसते, अशी त्यांची श्रद्धा आहे. (अंडरसन, पृष्ठ २६२)

मौरी वंशीयांची अशीच एक कथा आहे. ऐना नावाची एक स्त्री रात्री पाणी आणण्यासाठी जात असता चंद्रबिंब एकाएकी ढगाआड गेले. त्याचा परिणाम असा झाला की, ऐना एका झाडाच्या बोडाला ठेचाळून खाली पडली. त्यामुळे क्रोधावश होऊन तिने चंद्राला शाप दिला की, "तू पुन्हा ढगाबाहेर येऊ नकोस आणि प्रकाशही देऊ नकोस." चंद्राला असे वागता येणे शक्य नव्हते. सदासर्वदा ढगाआड अंधारात तो कसा राहाणार आणि त्याद्वारे मानवाचे अहित कसे करणार ! वास्तव तो स्वतःच खाली आला आणि ऐनाला उचलून वर वर नेऊ लागताच तिने एका नाईओ वृक्षाचा आधार घेतला. चंद्राने तो वृक्षच उपटून त्यासह ऐनाला घेऊन तो वर गेला. यासाठीच पूर्णचंद्रबिंबामध्ये ऐना एका खडकाला टेकून उभी आहे आणि बाजूला तो वृक्ष, असे दृश्य दिसते.
(अंडरसन, पृष्ठ २६३)

बॅबिलोनियन संस्कृतीमध्ये सिन हे चंद्राचे नांव आहे, तसेच सॅमोआमधील सिना झाले असावे. मौरीवंशीय यालाच ऐनादेवी असे म्हणतात. सूर्यचंद्रदेवता काही वेळा स्त्रीवाचक तर काही वेळा पुरुषवाचक आढळून येतात. इना, ऐना, सिना हीं या प्रदेशात मात्र स्त्रीवाचक रूपे आहेत. ज्या वेळी ही रूपे पुरुषवाचक असतील त्या वेळी ती रोंगा या देवतेपासून तयार झालेली असतात.
(अंडरसन, पृष्ठ ३५०)

(श्री. ग. स. गोडबोले, आरे दूध केंद्राचे सर्वाधिकारी एकदा मला म्हणाले की, न्यूझीलंड येथे मौरी वंश असून, तो पॉलिनेशियामधून तिकडे गेला असे ते मानतात. पण संपूर्ण प्राचीन इतिहास त्यांना ज्ञात नाही.)

वर आपण पाहिलेच आहे की, या संस्कृतीमध्ये त्रिमूर्तीची कल्पना आहे. केने-कू लोनो ही त्रयी म्हणजे अनुक्रमे प्रकाश, स्थैर्य आणि गर्जना यांची प्रतीक होय. त्याचप्रमाणे सृष्टीकर्ता विश्वकर्मा आणि पालनकर्ता यांचीही ती प्रतीके आहेत. केने म्हणजे प्रकाश या देवतेने कानोला देवाला दूर लोटून दिले आणि तो अधारावर राज्य करू लागला. वास्तव तो केनेचा पक्का वैरी बनला. केने या सृष्टीनिर्मिती करणाऱ्या देवाने श्वासाबरोबर मानवप्राणी निर्माण करून ते भूतलावर वावरू लागले. कोनोला या देवाला तशी मानवसृष्टी निर्माण करता येईना आणि त्याच्या राज्यात तर त्याला ती पाहिजे होती. तेव्हा ती मानवजात कनेच्या लोकामधून चोरण्याचा त्याने सपाटा चालविला. यामुळेच भूतलावर मानवाना मृत्यु येऊ लागला. मानवाच्या मृत्यूविषयी ही त्याची उत्पत्ति आहे.

पण दक्षिणभागी न्यूझीलंडमध्ये हा कोनोला देव, तगोरा या नावाने प्रसिद्ध असून तो मत्स्य व सागरदेवता मानलेला आहे. टोनो या चन्द्रदेवतेबरोबर तो सागरावर अधिराज्य गाजवितो. पण दक्षिण न्यूझीलंडमध्ये ही देवता माहीत नाही. एके ठिकाणी वाईट, दुष्ट असणारा हा देव दुसऱ्या ठिकाणी उत्तम गुणदर्शक ठरतो. मानवाच्या स्वभावाचे निरीक्षण केले तर या गोष्टीत आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. कारण एके ठिकाणी अथवा काही लोकाना उत्तम गुणांकित असणारा मनुष्य दुसऱ्या ठिकाणी अथवा दुसऱ्या काही लोकाना तो क्रूर, दुष्ट, वाईट दिसतोच की! हीच कसोटी या ठिकाणी देवानाही लावलेली असली पाहिजे.

## देवतांचे मरण

वरील दृष्टांतावरून एक निराळाच सिद्धांत या संस्कृतीमध्ये मांडलेला आहे आणि तो म्हणजे 'देव मरतात काय?' हा. यासंबंधी एक संवाद पहा:

"The God of whom I speak is dead," said a witness in a native Court in New Zea-Land

"Gods do not die," said the Court

"The Court is mistaken," said the witness

"Gods do die unless there are TOHUNGA to keep them alive"

वरील संवादाचा भावार्थ असा की, देवाची पूजाअर्चा करण्यासाठी जर भक्तमंडळी नसली तर देवांचे अस्तित्वच नाहीसे होते, म्हणजे पर्यायाने ते मरण पावतात. यासाठी देवतांचे पूजनअर्चन सतत चालले पाहिजे.

(अडरवन पृष्ठ ३१९)

## मंत्रांचे पठण

आर्यो अथवा ॐ याची स्तुति पुरोहितवर्ग मंत्राचे पठण दीर्घ स्वर एका विवक्षित पद्धतीने उच्चारून करतो. या मंत्राचे पठण एक किंवा दोघे मिळून करतात आणि एक श्वास घेण्यासाठी थांबला तर दुसरा तोच स्वर घेऊन पठण पुढे चालू ठेवतो. मंत्राचे उच्चार करताना प्रथम दीर्घ श्वास आत घेऊन नंतर सावकाशपणे म्हटले जातात (पृष्ठ ३४८). भारतीय वैदिकांचीही वेदपठण म्हणण्याचीही साधारणतः हीच रीत आहे. फिजी बेटांत अग्निवरून चालत जाण्याचा पराक्रम काही पुरोहित करतात.

रोंगा ही एक प्रमुख देवता मानतात. त्याला तावाची मुलगी, पत्नी म्हणून हवी होती. पण तिचा ठावठिकाणा त्याला माहीत नसल्यामुळे आपल्या धाकट्या भावांना त्याने तिच्या संशोधनार्थ पाठविले. भूतलावर फिरता फिरता बोरोबोर या ठिकाणी वैरामती नावाची एक कुलीन व योग्य मुलगी त्यांना आढळली. स्वर्गलोकात राहणाऱ्या रोंगादेवाला भावांनी तिजबद्दल सर्व माहिती सांगितली. रोंगाने आपले इंद्रधनुष्य सज्ज केले आणि एक टोक स्वर्गात तर दुसरे टोक भूतलावर ठेवून त्यावरून तो सरसर खाली आला. एकमेकांनी अनुरूप असल्याचा निर्वाळा दिल्यावर त्या दोघाचा विवाह झाला. पुढे त्यांना एक मुलगाही झाला. ही एक शेतकीप्रधान देवता मानतात. (भारतीय संस्कृतीमध्ये अर्जुनाने बाणांचा पूल रचून भीमाला इंद्राचा ऐरावत आणावयास पाठविले आहे). उत्सव-समारंभाच्या वेळी या देवतेला डुकराचा बळी अर्पण करतात. प्रथम त्याला व्यवस्थितपणे सजविले जाते. परंतु काही वेळा त्या डुकराला ठार मारतात अथवा काही वेळा सोडूनही देतात. पण जर त्याला सोडून दिले तर तो 'ओवाळलेला' म्हणून इतस्ततः फिरू शकतो, त्याला कोणी मारीत नाहीत. कारण तो देवाचा असतो. (भारतामध्ये बळीच्या बाबतीत ही प्रथा अनेक ठिकाणी दिसते.)

(अँडरसन, पृष्ठ ४३२)

## पेलेदेवता

हवाई बेटातील ही एक जलदेवता होय, त्याचप्रमाणे ती अग्निदेवताही मानतात. असे मानले जाते की, ही देवता स्वतः ताहिटी बेटामध्ये राहून तिने हवाई बेटाभोवती पाण्याचा वेढा घातलेला आहे. तिच्या वडिलांचे नाव काने-होवालानी आणि आईचे नाव काहिनली असे होते. वहिआ-लोआ या देवतेबरोबर तिचा विवाह झालेला असून मुलांचे नाव येने-हुने आणि मुलीचे नाव लाका असे आहे. लाका ही वनदेवता असून ती डोंगरपठारावर राहाते. पूजेच्या वेळी तिला डुकराचा नैवेद्य अर्पण करतात. हुला नावाचा जो एक नृत्याचा प्रकार

आहे, त्यामध्ये या देवतेच्या संबंधी गाणी गायली जातात. ही देवता मानवाला सुस्वर आवाज देते, बक्षिसे देते अगर मनकामना पुरविते अशी हिची ख्याती आहे ( पृष्ठ २८३ व ४४७ ). इसाई संस्कृतीचा प्रसार झाला तरीही या देवतेचे पूजन चालूच आहे.

वरील विवरणावरून असे दिसून येईल की, देवता आणि देवत्व पावलेले पूर्वजाव्यतिरिक्त या संस्कृतीमध्ये अनेक लहानसहान देवता होत्या. त्यामध्ये मत्स्य, सर्प, कुत्रे, पक्षी, युद्ध, शांतता, सूड, गायन, वृक्ष, वायु, पर्जन्य, मेघ, अंधकार, प्रकाश, प्रवास, शिकार, मासेमारी, रोगराई इत्यादींसाठीही अनेक देवता होत्या. या सर्व देवांना प्रसन्न ठेवण्यासाठी लहान लहान कारिका म्हटल्या जात आणि देवतांना वश करून घेतले जाई. काही जुन्या देवता नष्ट झाल्या अथवा मागे पडल्या तरी त्यांच्या जागा नवीन देवता भरून काढीत आणि यामुळेच मौरी-वंशियही म्हणत की, ' देवतांना मरण आहे, त्या मरतात. '

( अंडरसन, पृष्ठ ४५३ )

येथे एक लक्षात ठेवणे आवश्यक आहे की, या भागातील पौराणिक कथांचा संग्रह बव्हंशी इसाई धर्मोपदेशकांनी केलेला आहे आणि त्यांचा प्राचीन संस्कृतीकडे पाहण्याचा दृष्टिकोन द्वेषबुद्धीचा जरी म्हणता आला नाही, तरी खात्रीने सहृदयतेचा नव्हता. यामुळे आपल्याला प्राचीन संस्कृतीचा खरा इतिहास अथवा चालीरीती उपलब्ध झाल्याच आहेत, असा दावा करण्यात काही हंशील नाही. खऱ्या भारतीय दृष्टिकोनातून जर संशोधन झाले तर यापेक्षा अधिक सांस्कृतिक साम्य निश्चितपणे आढळून येण्यासारखे आहे, असे म्हणता येईल.

## मंदिरे व शिल्प

या भागातील मंदिराच्या कलाकृति दक्षिणेकडील भागात म्हणजे सोसायटी, मँडली, मार्केस, सॅमोआ इत्यादि बेटातून आढळून येतात व त्यांचे अवशेष दिसतात. या मंदिरांना ' माए ' अथवा ' मारी ' असे नाव होते. मंदिराचे प्राकार दगडी कुंपणाने वेष्टीत असत, आतील भाग दगडी फरसबंदीचा होता. प्राकाराच्या मागील बाजूस पिरॅमिडच्या आकाराचे मंदिर असे आणि पुढील पटांगण मोकळे असे. कॅप्टन कुक याने आपल्या प्रवासात अशी एक कलाकृति ताहिटी बेटामध्ये पाहिली आणि तिचे वर्णन करताना तो म्हणतो, ' ते मंदिर २६०' × ३५४' लांबी-रुंदीचे होते. पायऱ्याच्या अकरा पायऱ्या चढून गेल्यावर मंदिराच्या सभामंडपात जाता येत असे. प्रत्येक पायरी दोन फूट उंचीची होती आणि उत्तम कोरल खडकाच्या चौकोनी तुकड्यांनी ती बांधून काढलेली होती. दगडाचे सांधे कशानेही भरलेले नसत, तर एकमेकांवर दगडांचे

चौकोन रचलेले असून पायऱ्यांच्या आतील बाजू लहान दगडगोट्यांनी भरून घेतलेली होती. असे दगडाचे तुकडे ३½' × २½' आकाराचे होते. प्राकारात जे मंदिर होते, त्याचा आकार २६७ × ८७ चौ. फूट होता. गाभाऱ्यावर आपण ज्याप्रमाणे कळस उभारतो आणि वरची बाजू आच्छादून घेतो, त्याप्रमाणे येथे शिल्प नसून, वरील छताची बाजू उघडीच होती.

मंदिराचे व परिसराचे आकार वेगवेगळे असत. पाओपा या गावची क्लाकृति १३८ × २६ चौ. फूट होती. परिसराच्या कुंपणाच्या भिंतीची उंची साडेसहा फूट असून त्यासाठी वापरलेले दगड ११ × १२ × २½ फूट आकाराचे होते. एखाद्या बेटामध्ये असे मोठे दगड उपलब्ध नसल्यास त्याची शेजारच्या दुसऱ्या बेटावरून आयात करीत. सोसायटी बेटाच्या दहा मैल परिघाच्या टापूंत अशा २२० मारी आढळून आलेल्या असून, मिशनरी लोकांनी आपली संस्कृति दृढ करण्यासाठी या सर्व मंदिरांचा नाश करून टाकलेला आहे.

काही मंदिराच्या मध्यभागी हवनकुंडे असत आणि त्याच्यामागे देवतांच्या मूर्ति असत. मूर्ति पाषाणाच्या अथवा लाकडाच्या असून शिल्प रेखीव नसल्याने त्या आकर्षक नव्हत्या. काही ठिकाणी तर लाकडाचे मोठे ओंडकेच देवता म्हणून मांडीत असत (भारतामध्ये देवता म्हणून पाषाणाचे तांदुळे माडण्याची प्रथा होती व काही ठिकाणी ती अजूनही आहे.) त्या देवता दिसाव्यात म्हणून मानवाकृति मुखाचे आकार रंगाने काढीत आणि वरील बाजूस पक्ष्यांच्या पिसांचा मुकुट घालीत. काही ठिकाणी त्यांची दैनंदिन पूजा होई पण इतर ठिकाणी त्या मूर्ति उत्सवानिमित्त शोभेसाठी मांडलेल्या असत.

## मंदिराचे आश्रयस्थान

हवनकुंडे बहुधा लाकडीच असून ती साधारतः दहा फूट उंचीची असत. त्यामध्ये होम करताना धान्य, फळे अथवा नरबळीचे हवन केले जाई. या मंदिराचा उपयोग प्राणावर संकट आलेला मनुष्य आश्रयासाठी म्हणून करी. असा मनुष्य मंदिर-परिसरात असला म्हणजे शत्रुदेखील त्याला तेथून हुसकून लावण्याचा प्रयत्न करीत नसे. इतकेच नव्हे, तर तो शत्रु त्याला मंदिरात भेटला असता काहीही बोलत नसे. किंबहुना तो शत्रुत्व विसरून जाऊन त्याच्याबरोबर मित्रत्वाने वागत असे. महाराष्ट्रात शिवाजीने पुण्याजवळील रोहिडेश्वराच्या मंदिरात रात्री बारा वाजता, आपले विश्वासु सवंगडी जमवून स्वराज्याचा पाया घातला आणि सर्वांकडून गुप्तपणे शपथा घेवविल्या असे इतिहास सांगतो. तसेच ग्वालियरच्या किल्ल्यामध्ये मध्यभागी उंचावर एका देवीच्या मंदिरात तेथील राजा आपल्या मंत्रिमंडळाची गुप्त बैठक भरवीत असे, असे आजही प्रवाशांना सांगितले जाते. मंदिर म्हणजे

देवता आणि मनुष्य या दोघांच्या संगमाची परमपवित्र जागा असे समजले जाई. आपल्या कार्यात यश मिळावे यासाठी राजेलोक देखील आपली काही गुप्त सल्लवते या ठिकाणी येऊन देवतेसमोर करीत असत. [ औरंगजेब बादशहाच्या धास्तीमुळे मथुरेची केशवाची मूर्ति हलवून रजपूत राजाच्या बालेकिल्ल्यात, नाथद्वारा या ठिकाणी ती आणली गेली रजपूत राजाचे जरी आपसात हाडवैर होते तरी या मूर्तीच्या रक्षणास्तव सर्वांनी ऐक्य साधले. या मंदिरात दोन धडवे शत्रु एकत्र आले, तरी प्रेमाने वागत असे इतिहास सांगतो. पण हे प्रेम मंदिराबाहेर न टिकल्याने त्यांची राज्ये नष्ट झाली. ] कित्येकदा अनेक चांगल्या सार्वजनिक कार्यासाठी या मंदिराचा उपयोग केला जाई या परिसरात कोणी रक्तपात केल्यास त्याला तावडतोब मृत्यु येईल अशी सर्वांची श्रद्धा होती. मंदिराच्या या पवित्र भागाला काही वेळा ' टापू ' असे म्हणत आणि टापूच्या मर्यादानियमाचे कोणी उल्लंघन केल्यास त्याला फाशीची शिक्षा देण्यात येई.

ही मंदिरे दोन प्रकारची होती. ' मारी ' ही पवित्र असल्याने तेथे मृत्यूनंतर शव पुरण्यात येत नसे. पण जेथे मृताची शवे पुरण्याची व्यवस्था केलेली असे, त्या मंदिराना ' फाईटोका ' असे म्हणत या अशा फाईटोकाच्या माथ्यावर २०'X१४' या आकाराचे एक लहानसे घर असून त्याभोवती फिरता सज्जा असे. या वरच्या घरात राजेलोकांची थडगी बांधून त्याचे मृतदेह त्यांमध्ये ठेवले जात मृतदेह आतमध्ये ठेवल्यावर मलीमोठी पाषाणाची शिळा त्यावर ठेवण्यात येई काही राजेलोक अशी घरे आपल्या जिवतपणीच बांधून ठेवीत असत[1] याचे कारण त्यांच्या आवडीचे शिल्प त्यांना तयार करता येऊन मृत्यूनंतर त्यांचा देह त्यामध्ये ठेवण्यात येई. काही शिळा इतक्या जड असत की, दोर बांधून त्या वर उचलून थडग्यावर ठेवण्यास शे दोनशे माणसांचे बळ लागत असे. या जागा सुंदर दिसाव्यात म्हणून त्यांच्या सभोवार वृक्षांची लागवड केली जाई. आजही कित्येक ' फाईटोका ' अशा वनश्रीमध्ये डौलात उभ्या असून प्रवाश्यांची आकर्षणे बनल्या आहेत. या भव्य कलाकृति पाहिल्या म्हणजे कोणीही म्हणेल की, त्या तयार करणारा समाज खूप सुधारणावादी व कल्पक होता. इजिप्तमधील पिरॅमिड बांधणीचा याच्यावर परिणाम झालेला असावा

टोंगाटाबू बेटात टेलिआ नावाचा असा एक प्रचंड फाईटोका असून त्यात प्रेत पुरलेले नाही. त्याचे कारण असे देतात की, टेलिआच्या राजाने ती

---

१. टीप— सन १९७० साली संत मेहेरबाबा यांनी समाधी घेतली, पण त्यासाठी त्यांनी अहमदनगरजवळ ( महाराष्ट्र ) मेहेराबाद येथे स्वत साठी समाधीची जागा तयार करून ठेवलेली होती.

कलाकृति मरणोत्तर आपले शव ठेवण्यासाठी तयार केली खरी, पण ती संपूर्ण तयार झाल्यावर त्याच्या पसतीला ती न उतरल्याने त्याच्या शेजारी दुसरी कलाकृति तयार केली गेली आणि त्यामध्ये त्याचा मृतदेह ठेवला गेला.

असे सागतात की, सन १५३५ च्या सुमारास टकलावू येथील राजाने पिरॅमिड बाधण्यासाठी माणसे कामाला लावली, परतु लावून मोठमोठे दगड त्यासाठी आणताना तो त्या मजुराना मारीत असे. उत्तम दगड शोधण्यासाठी राजा स्वतः आसपासच्या बेटातून फिरून पाहाणी करीत असे. अशा एका कलाकृतीच्या पायाचा आकार १५६×१४० चौ. फूट होता. वर जाण्यास उच उच टप्प्याच्या चार पायऱ्या होत्या. पहिली पायरी चार फूट उच तर वरच्या प्रत्येकी ३॥ फूट उचीच्या होत्या. पायरीची रुदी ५॥ फूट होती. प्रत्येक पायरीचा पाषाण तिच्या उचीइतका जाड असे. पायरीचे कोपऱ्याचे दगड घडीव असून काहींचा आकार तर २४ × १२ × २ घ. फूट इतका भव्य होता. पिरॅमिड बाधला त्या ठिकाणी चागला दगड उपलब्ध नसल्याने ते सर्व पाषाण १२० मैल अतरावर असलेल्या रिफुका या बेटावरून जहाजातून आणलेले होते.

मदिराचा तिसरा प्रकार म्हणजे नरबळी देण्यासाठी बाधलेल्या जागा त्याना हिअन ( Hen ) असे म्हणत. अशा मदिराचा विस्तार पाच पाच एकर जागेवर पसरलेला असे. परिसराचे कुपण साधे दगड रचून तयार केलेले असे. चॅप्टन किंग याने असे एक मदिर स्वतः पाहिले होते आणि नरबळी देण्याच्या टेबलावरही तो उभा राहिला होता. त्या जागेचा आकार १२० × ६० चौ. फूट असून मोठमोठे पाषाण भिंतीसाठी वापरलेले होते. मदिरासभोवार लाकडी कठडा बाधलेला होता. एका कोपऱ्यात वीस फूट उचीची शिडी ठेवलेली होती. मदिरात सभामडपाच्या मागील बाजूला बारा मूर्ति गोलाकार माडून ठेवलेल्या होत्या. त्याच्या सभोवती यज्ञकुड व नरबळी मारण्यासाठी टेबल ठेवलेले असे. नरबळी देताना पुरोहिताला उभे राहण्यासाठी या टेबलाजवळ खास जागा तयार केलेली होती ( अंडरसन, पृष्ठ ४५३–५८ ). सॅमोआ बेटात मदिराचा आकार राहण्याच्या घरासारखाच असून त्याना फले-आयतू असे सबोधण्यात येत असे. अरिया बेटात राजा तुतेरगीवर्मा याने असे एक मदिर खिस्तपूर्व चारशेपन्नास वर्षांपूर्वी बाधलेले होते आणि त्याची उची बारा पॅदम ( पॅदम–सहा फुटाचे माप ) इतकी होती.

पॉलेनेशियाच्या उत्तर बाजूला इस्टर नावाचे एक बेट असून तेथील पाषाणाचे शिल्प अत्युत्कृष्ट होते. सर्वत्र विखुरलेल्या अवशेषावरून त्याची कल्पना केली जाते. पूर्वी या बेटावर ज्वालामुखी धुमसत होता आणि त्याचे अवशेष किनाऱ्यावर ठायी ठायी दिसतात. कित्येक खडकाची उंची तर १७०० फूट आहे आणि मृत

माणसांना पुरण्याची जी ठिकाणे आढळून येतात त्यावरून असे अनुमान काढले जाते की, या बेटावर अवश्य मानवाची वस्ती होती. मृतांना पुरण्याची अशी २६० ठिकाणे आजही दिसून येतात आणि त्यांना अहू (Ahu) या नावाने संबोधिले जाते. सन १९३० साली या बेटावर मानववस्ती सुमारे ३०० पर्यंत होती.

समुद्रकाठी जो एक अहू आहे त्याची लांबी ३०० फूट असून बांधणी मात्र मंदिरासारखी नाही. बाहेरच्या परिसराची उंची चौदा फूट आहे, तर मधला शवे पुरण्यासाठी बांधलेला भाग १०० फूट उंचीचा आहे. या मधल्या भागाला दोन्ही बाजूंना लांब पंखासारख्या आकृति असून त्यांची रुंदी १०० फूट तरी असावी. दोन्ही पंखाच्या मधील भाग मृतशरीरे पुरण्यासाठी उपयोगात आणला जाई. काही वेळा मृताचे दगडी पुतळे बाजूच्याच दगडी खाणीत बनवून येथे मांडीत असत आणि या पुतळ्याचा स्वीकारही याच ठिकाणी केला जाई. असे सुमारे पधरा पुतळे याच ठिकाणी पडून आहेत. मध्यभागाच्या या भव्य कलाकृतीमध्ये आतील बाजूने सुमारे २० फूट उंचीवर प्रेत ठेवण्यासाठी खोल्या तयार केलेल्या आहेत. (बौद्ध विहारामध्ये विद्यार्थ्यांना राहण्यासाठी ज्याप्रमाणे ओवऱ्या खोदलेल्या असत, त्याचप्रमाणे त्या होत्या). या मध्यभागाच्या कृतीपाठीमागे सुमारे १५० फूट मोकळी जागा प्रेतासाठी राखून ठेवलेली आहे. दगडी पुतळ्याची उंची साधारणत: ३० ते ३६ फूट असे. ज्याचे घडीव काम पूर्ण झाले नाही असा एक ६६ फूट उंचीचा पुतळा तसाच अर्धवट स्थितीत तेथे पडलेला आहे.

हे एकसंध पुतळे बनविण्याची त्यांची रीत अशी होती की, पुतळ्याच्या दगडाभोवती खाणीतच खंदक खणावयाचे आणि त्यातून पुतळ्याचे काम पूर्ण करून झाल्यावर मग तो पुतळा तेथून हलवावयाचा. हे पुतळे तयार करण्यासाठी जे हातोडे, छिन्न्या व इतर अवजारे वापरली, त्यापैकी काही तेथे मिळून आली आहेत. हे पुतळे प्रवेशद्वारी एका ओळीत उभे करण्याची मनीषा असली तरी ते काम अपूर्णच राहिलेले दिसते. या पुतळ्याची उंची ३० ते ३६ फूट असून मस्तकाचा आकार ६ फूट उंच व ८ फूट रुंद आढळून आला आहे. स्त्रियांच्या मस्तकावर मुकुट कोरलेले आहेत. एके काळी सुमारे तीस-चाळीस टन वजनाचे हे पुतळे खाणीतून कोणत्या पद्धतीने हलविले असतील आणि जाग्यावर आणून उभे केले असतील, याचे आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाही. कमीतकमी शंभर मजूर तरी ते उचलण्यास लागले असतील, असे अनुमान केले जाते. सन १७२२ साली जॅ. रोगाविन याने या बेटाला भेट दिली, तेव्हा

यातील बरेचसे पुतळे ओळीने उभे होते. परंतु त्यानंतर बहुधा मिशनरी लोकांनी त्याना खाली पाडून टाकले असावे. आक्रमक संस्कृति कुठलीही असो, मुस्लीम असो वा इसाई असो, प्राचीन कलाकृतींचा विध्वंस करणे हेच एकमेव ध्येय त्यानी मानलेले होते असे दिसते. भारतीयानी मात्र आपल्या आक्रमणकाळी कोठे विध्वंस केल्याचे उदाहरण दिसून येत नाही.

मौरी वशीयानी १२ ते १८ इंच उंचीच्या टागो देवतेच्या मूर्ति तयार केलेल्या होत्या. तसेच टिकी बाधल्या होत्या. यावरून असे दिसते की, पुजारी-वर्गाचे अस्तित्व या ठिकाणी असावे. हवाई व ईस्टर बेटामध्ये इसाई धर्मोपदेशकाचा प्रवेश सन १८२० च्या सुमारास झाला आणि त्यानतर विध्वंसनाचे कार्य झाले असावे. (अडरसन, पृष्ठे ४६४–४६७)

पॉलेनेशियन प्रदेशात भारतीय संस्कृतीचा प्रवेश कसा झाला, त्याची ऊर्जितावस्था कशी झाली आणि आक्रमकाच्या हल्ल्यामुळे तिचा विध्वंस कसा झाला याचे हे त्रोटक वर्णन आहे. या बेटातूनच पुढे अमेरिकेमध्ये भारतीय संस्कृति गेलेली असल्याने, या टप्प्याचे यथार्थ ज्ञान असावे या हेतूने खुलासेवार वर्णन दिलेले आहे. देवताच्या वर्णनाबरोबरच इतरही गोष्टींची माहिती मनोरंजक वाटेल, यासाठीच मुद्दाम ती ओघाओघाने दिलेली आहे. तसेच हा प्राचीन विस्तारवादी संस्कृतीचा इतिहास आहे. नेपोलियनसारखा योद्धा ५–५–१८२१ साली मृत्यू पावला. तत्पूर्वी लिहिलेल्या मृत्युपत्रात तो लिहितो, ' इतिहास नीट मनन करणे यासारखा दुसरा गुरु नाही. ज्याला आयुष्याचे तत्त्वज्ञान म्हणतात ते अशा इतिहासाच्या वाचनानेच निर्माण होते. ' भारतीयाच्या सुदैवाने त्याचा असा हा उज्वल इतिहास आहे.

## बाली-द्वीप संस्कृति ( बाली हे देवाचे बेट आहे. )

भारतीय संस्कृतीमध्ये बटु वामन ह्याने असामान्य दातृत्व असलेल्या बळी या दैत्यराजाकडून निषादभूमीचे दान मिळविले. नंतर त्याने आपले मूळ परमेश्वरी विश्वविराट स्वरूप प्रकट करून दोन पावलात स्वर्ग व भूलोक व्यापून तिसरे पाऊल बळी राजाच्या मस्तकावर ठेवून त्याला पाताळात पाठवून दिले. ज्या-ठिकाणी बळी राजाने वस्ती केली ते बालीबेट या नावाने आज विख्यात आहे. हे द्वीप विषुववृत्ताच्या दक्षिणेकडे असल्याने याला " पाताळ " ही संज्ञा विषुववृत्ताच्या उत्तरेकडे राहाणाऱ्या भारतीयानी अगर अन्य संस्कृतीने दिली असली पाहिजे. कारण पाश्चिमात्य संस्कृतीही याला Down Under म्हणजे पाताळ समजते.

बालीद्वीप हे देवाचे आहे असे आजही मानले जाते. Bali belongs to the God आणि तेथील स्थावरजगम मालमत्ताही परमेश्वराचीच आहे,

असे समजतात. भारतीयाप्रमाणे तेथील चार वर्णांची उत्पत्ति, सृष्टीकर्त्या देवाच्या मुखापासून ब्राह्मण, हातापासून क्षत्रिय, नाभीपासून वैश्य व चरणांपासून शूद्र अशी झालेली आहे असे मानतात. वर्णांमध्ये ब्राह्मण हा श्रेष्ठ मानला जातो व इतरांनी हात जोडून त्याजबरोबर संभाषण करावे लागते. राजदरबारी त्याला प्रथम मान आहे. प्राचीन संस्कृतीचे यथायोग्य अनुकरण स्वतः करणे आणि इतराकडून ते करवून घेणे ही अत्यंत अवघड पण अपरिहार्य कामे त्याला आजही करावी लागतात. येथील लोक बहुधा शैवपंथीय असून सूर्य, विष्णु, देवी यांचीही येथे पूजा होते. येथे भारतीय संस्कृति अद्यापीही अत्यंत कडवी असून ती इस्लाम व इसाई धर्मपंथीयांना कोणत्याही प्रकारे शिरकाव करू देत नाही ही अत्यंत अभिमानाची गोष्ट आहे.

## बळी आणि बाली बेट

प्रल्हादपुत्र विरोचन व त्याचा पुत्र वैरोचन याला बलि म्हणतात आणि विष्णूने वामन अवतारामध्ये यालाच पाताळात घातले, अशी पौराणिक कथा आहे. वैरोचनाच्या पत्नीचे नाव विंध्यावली असे होते. पुराणकथांतून दुसराही बली नावाचा राजा असून तो आर्यकुलोत्पन्न ययातीपुत्र जो अनु, त्याच्या वंशात सुतापा नावाचा राजा होऊन गेला, त्याचा पुत्र होय. याचे नाव बलि असून त्याच्या पत्नीचे नाव सुदेष्णा असे होते. दीर्घतमाऋषीच्या आशीर्वादाने तिला अंग, वंग, सुह्म, पुंड्र, अंध्र व कलिंग असे सहा पुत्र झाले होते. (मत्स्य. पु. अ. ४८). पुत्रांची ही सहा नावे पाहिली म्हणजे हे एक रूपक असावे असे वाटते. या बलीराजाने खाली दक्षिणेकडे आक्रमण करीत असता, त्या त्या देशातील लोकांबरोबर सलोखा वाढवून त्यांना पुत्रवत् मानले. अंध्र प्रांतात बलीजा नावाची एक जात आजही आहे. कै. श्री. म. माटे, आपल्या परशुरामचरित्र ग्रंथात सांगतात की, 'बलि हा शूद्र वर्गाचा म्हणजे त्या काळी जमीन कसणाऱ्या वर्गाचा राजा होता.'

त्या काळची भौगोलिक परिस्थिती अशी दिसते की, जावासुमात्रा हा भाग भारताला बराच संलग्न होता, त्यामुळे वन्य जमातींना रेटीत त्या प्रदेशात नेणे सुलभ होते. जाणकारांचे असे मत आहे की, त्या भागात शूद्रवर्ण जमातच आजही प्रामुख्याने आहे. बालीमध्ये चातुर्वर्ण्य व्यवस्था असून शालीवाहन पंचांग, सणवार ठरविण्यास वापरतात. यावरून बाली बेटाचा पूर्वज अनु हा आर्य ययाति आणि असुर कन्या शर्मिष्ठा यांचा मुलगा असणे असंभवनीय नाही.

वामन अवतार म्हणजे शतपथ ब्राह्मण (१–२–५–१) प्रमाणे देव व असुर यांच्या युद्धात, देवांचा पराभव झाल्यावर, दैत्यांनी सर्व पृथ्वी व्यापली.

देवांना राहण्यापुरती सुरक्षित जागाही राहिली नाही. तेव्हा देवानी यज्ञरूप विष्णूला आपला पुढारी नेमून, दैत्यांकडून आपली वाटणी मागितली. शेवटी तडजोड होऊन विष्णु तीन पावलात जेवढी भूमि आक्रमण करील तेवढीच देऊ, असे वचन मिळाल्यावर विष्णुरूप वामनाने अकाळविक्राळ स्वरूप धारण करून सर्व विश्व व्यापले आणि तिसऱ्या पदाने बलीला पाताळात दवडले. याचा सारांश इतकाच दिसतो की, पूर्व किनारा वामनाने वसाहतीसाठी व्यापला. यासाठी वामन-द्वादशीला त्याचे स्मरण केले जाते. पश्चिम किनारा पुढे परशुरामाने व्यापला.

(चिं. ग. कर्वे–प्रसाद–नोव्हेंबर १९५८)

तेथील जनता अत्यंत देशाभिमानी व धर्माभिमानी आहे. सन १९०६ साली त्या वेळच्या डच सरकारने बांडुंग येथील राजाकडून ७५ सहस्र रुपयांची, काही कारणास्तव नुकसानभरपाईची मागणी केली. राजाला ते त्याच्यावर आक्रमण वाटले आणि शेवटच्या माणसापर्यंत त्याने प्रतिकार करण्याचे ठरविले. डच सैन्य राज्यावर चालून आले. आधुनिक शस्त्रांनी युक्त व मुसज्ज अशा सैनिकांपुढे आपला निभाव लागणार नाही हे जाणून आत्मघाताच्या तयारीने सर्वजण पुढे सरसावले. राजवाडा आदल्या रात्री भस्मसात करण्यात आला. दुसऱ्या दिवशी सहस्रावधि सैनिक, स्त्रीपुरुष, मुले यांची मूक मिरवणूक राजाच्या मागोमाग शत्रूशी सामना करावयास निघाली. मार्गामध्ये कोणी हूं की चूं केले नाही. पण १०/२० पावलांवर शत्रूसैन्य दिसल्यावर राजाने तरवार काढून हुकूम दिला, त्याबरोबर सर्वजण डच सैनिकांवर तुटून पडले. सूं सूं करीत गोळ्या सुटल्या. धडाडधुडुम तोफा डागल्या. हजारोंनी आपले देह राजासह धारातीर्थी ठेवले. जखमी स्त्रियांनी आपल्या कोवळ्या अर्भकांना निष्ठुर होऊन स्वतःच्या हातांनी भाल्याने भोसकले आणि जणू ती ईश्वराच्या घरी सुरक्षित राहातील म्हणून त्याना स्वर्गधरी पाठविले. राजाचा बारा वर्षांचा मुलगा पुढे सरसावला. मृत बापाची जागा त्याने घेतली आणि उरल्यासुरल्या सैन्यानिशी परत हल्ला चढविला. परिणाम व्हायचा तोच झाला. सर्वच्या सर्व गारद झाले आणि बाली प्रदेश अखेर डच सरकारच्या ताब्यात आला. डेनपसर या शहरातील बाली हॉटेल समोरच्या चौकात हा प्रकार घडला आणि प्रवासी त्या हुतात्म्यांच्या बलिदानाला आजही भक्तीने अभिवादन करतात.

येथील लोक शेतीप्रधान आहेत. भातशेती हा त्यांचा प्रमुख उद्योग आहे. डोंगरपठारावर जे ओहोळ वाहतात त्यांचा उपयोग करून घेऊन हे लोक शेती करतात. वर्षातून त्यांना तीन वेळा भाताची पिके मिळतात. प्रत्येक गावांत ग्राम-देवतेचे मंदिर असते आणि काही प्रमुख देवताची मंदिरे निरनिराळ्या शहरांतून

आहेत मानवसख्येच्या दृष्टीने विचार केल्यास स्त्रीवर्गाचे शेकडा प्रमाण अधिक आढळते आबा, केळी, ही येथील प्रमुख फळे आहेत या देशात सतीची चाल होती आणि १९०३ पर्यंत ती चालू होती आता कायद्याने ती बद आहे परतु ज्या वेळी ही चाल अस्तित्वात होती त्या वेळी गतधवा स्वखुशीने सती नात, तर कित्येकदा सामाजिक दडपणामुळे त्याना सती जावे लागत असे

या देशातील कालगणना निश्चित स्वरूपाची नाही चद्रवर्ष ३५४ दिवसाचे मानतात तर दुसरे काही सूर्यवर्ष ४२० दिवसाचे सपूर्ण वर्ष आणि जावानीजव्याली हे २१० दिवसाच वर्ष मानतात पाच दिवसाचा आठवडा आणि पस्तीस दिवसाचा महिना असतो यामुळे कित्येक शात्या पुरुषाना आपले वयही सागता येत नाही पण जन्मोत्सव साजरे होण्याचे दिवस त्याना नमके समजतात यामुळे दुसरा फायदा असा की, वर्षातून सर्व काळी, जन्म मृत्यूचे व वर्ष अधवर्षाचे उत्सव समारभ चालूच राहातात याशिवाय विवाह समारभही असतातच वार्षिक उत्सवाला ओदलन (Odalan) तर सहामाही उत्सवाला सिपिअन (Sepian) म्हणतात वर्षातून एक दिवस शाततादिन म्हणून पाळतात त्या दिवशी शेतात कोणी काम करीत नाहीत गिरण्या कारखान्यात जात नाहीत दिवसभर सर्व रस्ते ओस पडलेले असतात इतकेच काय, पण घरात विस्तवही पेटविला जात नाही घराच्या मागील बाजूला बसून सर्वजण शातपणे दिवसभर प्रार्थना करीत असतात

## मदिर बाधणी

याची मदिरे दोन प्रकारची असतात एक प्रत्येकाच्या घरात असते, तर दुसरे सार्वजनिक असते सार्वजनिक मदिर म्हणजे एक मोठा परिसर लाल विटाचे कुपण असलेला आणि त्यामध्ये तीन मोकळी दालने पाडलेला असतो प्रवेशद्वारी मोठी कमान असून पहिल्या दालनात कोणालाही प्रवेश असतो तेथेच लहानसा नगारखाना, उत्सवाचा स्वयपाक करण्यासाठी लहानसे स्वयपाकघर व भक्तांना राहण्यास ताडाचे छप्पर असलेली झोपडी धर्मशाळा म्हणून असते मधल्या दालनात पाली लोकाशिवाय इतराना प्रवेश दिला जात नाही यांच्या मध्यभागी एक लहानशी झोपडीवजा इमारत असून त्याला कुलुपकडीची व्यवस्था केलेली असते हेच देवघर होय खजिना, सामानसुमान येथेच ठवले जात एका बाजूला बाहेर एक ओटा असतो, त्यावर उत्सवाच्या वेळी देवता नेऊन बसतात आणि दुसऱ्या लहानशा ओट्यावर सूर्यनारायण बसतात देवघरावर एखाद्या वेळी पॅगोडाप्रमाणे अनेक वर्तुळाकार चक्रे असलेले घुमटवजा अकरा माळ्यांची छोटीशी इमारत असते, त्याला ते मेरुद म्हणतात त्यामध्ये देवतांची आणि रत्नांची पेटी

असते. ही देवळे म्हणजे एरव्ही ओसाड भासतात, पण फक्त उत्सवसमारभाच्या वेळी ती माणसानी फुलून जातात सर्जीत, तमन, साची, सिजोकापटी, कोबो भामभद्दन, गेल्गेल, तेजेल, पेनारम, अगोएग, मेनसुई इत्यादि मदिरे पाहाण्या सारखी आहेत या मदिरामध्येही ग्राममदिर, मृत्युमदिर, सागरमदिर, सरोवर मदिर, शेतकामदिर असे अनेक प्रकार आढळून येतात. काही मदिरे अतिशय साधी तर काही थोड्याफार कलाकुसरीची असतात काहींवर पक्षी फुले याचे नक्षीकाम असते. ज्या देवघरावर छपरे असतात, त्याना मेरोज असे म्हणतात. याच्या मदिरात चारही वर्णाच्या लोकाना प्रवेश असल्याने धार्मिक भेदभाव मदिरात पाळला जात नाही

मृतासाठी असलेल्या मदिरातून समोर एक होमकुड असते नवीन मदिरे बाधताना जनता स्वखुषीने बाधकामास मदत करते कोणी इतर मार्गाने मदत करतात शकराच्या मदिराच्या प्रवेशद्वारीच नदीची मूर्ति असते काही ठिकाणी गरुड अथवा कासवाची मूर्ति असते. काही ठिकाणी दीपमाळेसारखे स्तभ असतात.

वसतऋतूमध्ये एकदा सर्व देवताना समुद्रस्नानाला मिरवणुकीने नेतात. त्यासाठी त्याना २५–३० मैल लाब जावे लागते. देवाच्या लहान मूर्ति बायका डोक्यावर घेतात, तर अतिशय जड मूर्ति बायूच्या पालखीतून नेतात. मिरवणुकीबरोबर वाद्य-वृद असतो. सायकाळी मिरवणूक सागरकिनारी पोहोचल्यावर देवतावाहक व इतर भक्तगण समुद्रात कमरेइतक्या खोल पाण्यात जातात. 'पेदान्दा' तीरावर उभा राहून इतराना थानण्यास सागतो. मत्राचे पठण होते, देव व भक्त स्नान करून बाहेर येतात, काही मडळी लगेच देवतासह घरी परत येतात, तर काही रात्री वाळवटातच झोपून राहतात

## कलाकौशल्य

काही कला वशपरपरा चालत आलेल्या आहेत. सुवर्ण, रुपे, पाषाण, लाकूड यावर नक्षीकाम करणारे कलाकार वशपरपरेने आलेले असतात. मूर्ति बनविणे हा शिल्पेकांचा धदाच असतो स्त्री वर्गही सोने, रुपे यावर बारीक नक्षीकाम करण्यात कुशल असतो मदिरातील भाडी आणि काही समारभाची भाडी यावर नक्षीकाम असते. मृत्यूच्या शवपेटिका व मनोरे बनविणारे कारागीर येथे असतात.

## धार्मिक समजुती

या सस्कृतीमधील काही धार्मिक व शकुन अपशकुनांच्या समजुती—

१. (अ) सूर्यपूजा व सूर्यसेवन, सस्कृत मत्रविधीने करावयाचे.

(आ) शिव व सूर्य याच्यामध्ये ते द्वैतभाव मानीत नाहीत.

(इ) एखाद्या गरोदर स्त्रीला जुळे झाले आणि ते जर मुलगे नसतील तर घरावर भयंकर मोठे संकट येणार असे समजून त्या स्त्रीला काही दिवस स्मशानात ठेवतात, घर धुऊन साफसूफ करतात, प्रसंगी जाळूनही टाकतात. आपत्ती टाळण्यासाठी मंदिरातून प्रार्थना केली जाते व नंतर सर्वत्र पवित्र जलाचे सिंचन केले जाते.

२. जर स्त्रीला एखादे विद्रूप मूल झाले तर, सर्व गाव भितीने घाबरून जातो आणि मंदिरेही बंद केली जातात.

३. स्त्रीच्या गरोदरपणी पतीने अलस्थ राहून पान खाणे, अपू खाणे, जुगार खेळणे इत्यादि गोष्टी बंद केल्या पाहिजेत, एरव्ही सुखावह प्रसूती होत नाही.

४. पण जेव्हा पुनर्जन्म होतो, तेव्हा ते शुभ लक्षण समजून सर्वत्र आनंदी-आनंद पसरतो व भोजनसमारंभही होतात.

५. प्रत्येक पर्वतमाथ्यावर, वृक्षाच्या राईमधून, तळी, गुहा या ठिकाणी पंचमहाभूतात्मक देवताचा निवास असतो, ह्या समजुतीमुळे त्याची पूजा केली जाते. त्याचा स्वर्गलोक म्हणजे शिवलोक होय.

६. जलदेवता म्हणून सरोवरासाठी 'देवी देवा देवता' (Desi Dewa) असून त्याचे पूजन होते.

७. प्रमुख देवता म्हणजे शिव, ब्रह्मा, विष्णु, दुर्गा, देवी या असून, यमराज हा मुले व माणसे खाणारा देव आहे असे ते मानतात.

८. पहाटे गृहस्वामिनी केळीच्या पानावर थोडासा भात, त्यावर गुलाल, कुंकु व गूळ घालून ते पान घरासमोर रस्त्यावर ठेवते आणि असे केल्याने भूतयोनीतील जीवात्मे ते खाऊन दिवसभर कोणाला त्रास व उपद्रव देत नाहीत, असे समजतात.

९. झोपलेल्या माणसाला एकदम मोठ्याने ओरडून उठवायचे नाही. कारण त्या अवस्थेत त्याचा जीवात्मा स्वप्नसृष्टीत वावरत असतो आणि त्यामुळे त्याला परत आणण्यास त्या माणसाला पुरेसा वेळ मिळत नाही.

१०. मंदिर-नर्तनासाठी प्रत्येक घरटी दरमहा तांदूळ द्यावे लागतात.

११. शेतीला लागवड, कापणी मुख्य पुरोहिताच्या आशीर्वादाने शुभ

दिवशी करावयाची, तरच भरपूर पीकपाणी येते. श्रीदेवीचेही पूजन करावयाचे असते.

१२. कुत्र्याला लाथ मारू नये, कारण परमेश्वराचा अंश प्रत्येक प्राणिमात्राच्या ठायी वसलेला आहे.

१३. प्रत्येक माणसाने वृक्षारोपण केले पाहिजे, निदान वृक्षाला वृक्षाची फादी तरी बांधली पाहिजे. एरव्ही वृक्षदेवताचा त्याच्यावर राग होऊन एकतर माणसाचे केस गळून पडतील अथवा मृत्यु पावून त्याला लहान झुडुप व्हावे लागेल.

१४. भारतामध्ये आम्रपल्लवांना पवित्र मानून धार्मिक कार्यांत त्यांचा उपयोग केला जातो, तर येथे ताडपत्र्यांचा तोच उपयोग केला जातो.

## धर्मगुरु

त्यांच्या धर्मगुरूंचे दोन प्रकार आहेत. एक ग्रामदेवतेचा पुजारी, त्याला पेमॅन्को म्हणतात, तर दुसरा प्रमुख धार्मिक पुजारी, त्याला पेदान्दा म्हणतात. ब्राह्मणवर्गाला इडाबागुस असे म्हणतात. या संस्कृतीमध्ये वाटेल त्या वर्गाच्या इसमाला पेदान्दा होता येते. जर अंगी पात्रता असेल तरच या पदासाठी निवड केली जाते आणि उमेदवार हा चोर, व्याधिग्रस्त, व्यसनी नसल्याची खात्री केली जाते. दोन वर्षांच्या शिक्षणक्रमात त्याला अनेक धार्मिक ग्रंथांचे पठण करावे लागते. पुरोहिताचे पारिभाषिक शब्द, मंत्र, तंत्र आणि संस्कृत अध्ययन करावे लागते. प्राणायाम, योगसाधन आणि योगमुद्रांचे ज्ञान असावे लागते. शुद्धाचरण राखण्यासाठी त्याला जनसमूहांपासून एकटे व वेगळे रहावे लागते. तो परान्नाचा स्वीकार करू शकत नाही, कांच अथवा धातूच्या पात्रात जेवीत नाही, मांसाहार नाही, मद्यसेवन नाही, कोणाबरोबर हस्तांदोलन करावयाचे नाही, मस्तकावर जटाभार ठेवावयाचा, भोजन घेताना नेहमी पूर्वेकडे मुख करून ते घ्यावयाचे. एवढा शिक्षणक्रम पूर्ण झाल्यावर त्याला प्रथम 'मोवदा' (Moweda) या नावाच्या लहान प्रमाणावर होणाऱ्या धार्मिक समारंभाला पाठवितात.

त्या दिवशी त्याने पहाटे उठून, स्नान करून, शुचिर्भूत होऊन मंदिरात जाण्याची तयारी करावयाची, प्रार्थना म्हणता म्हणताच मस्तकावरी केसांच्या गाठी मारणे, डोळ्याला व कमरेला पांढरे वस्त्र गुंडाळणे आणि अंगावर तसेच वस्त्र टाकणे, इत्यादि क्रिया करावयाच्या. पूजेचे साहित्य चांदीच्या ताटात घेऊन त्यात सुवर्णपात्र, घंटा, निरांजन, फुले इत्यादि ठेवून मंदिरात प्रवेश करावयाचा. रात्रीच्या वेळची पूजा असेल तर सायंकाळी फुलणारी ताजी फुले घ्यावयाची.

ही पूजा करताना मस्तकावर त्रिकोणी मुकुट, गळयात व मनगटावर सुवर्णाचे अलंकार, गळयात ताईत, कानामध्ये रत्नजडित कुंडले इत्यादि अलंकार घालावयाचे. नंतर पूजाविधि चालू झाल्यावर जवळ जवळ तासभर प्रथम निरनिराळ्या मंत्राचे पठण करावयाचे. चंदनाची भुकटी हातांना चोळून झाल्यावर फुले पाण्यात भिजवून वास घेत राहावयाचे. देवताचे पहिले निर्माल्य काढून टाकून नवीन पूजा करावयाची. नंतर प्राणायाम करून तो पुजारी समाधिस्थितीत गेल्यावर त्याच्या अंगी देवतासंचार होतो. आजवर त्याने जे यौगिक ज्ञान मिळविलेले असेल, त्याचा उत्कर्ष अथवा समरसता साधण्यासाठी व आपल्या चित्शक्तीची वाढ करून घेण्यासाठी उच्च भावावस्थेत पोहोचून, अति शुद्ध भाणसात निमज्जन होणे, यालाच समाधी अथवा Trance म्हणतात. योग मार्गातीलच हा एक प्रकार आहे. तो गवताच्या काडीने पाण्यावर काही अक्षरे लिहितो. भक्ताच्या प्रश्नांची उत्तरे देतो, त्यांना आशीर्वाद देतो आणि कालांतराने पूर्वस्थितीत येतो. त्याची ही गूढभाषा व सकेत, काही अनुभवी माणसानाच कळतात, सर्वांना नाही.

### पेदान्दाचे कर्मकांड

डॉ. लोकेशचंद्र, एम्. ए. यानी या संस्कृतीसंबंधी अधिक संशोधन भारतीय दृष्टिकोनातून केलेले असून ते 'हिंदु-विश्व' या मासिकात प्रसिद्ध केले आहे. त्यातील ध्यानधारणेच्या आकृति, न्यास व मंत्ररचना यावरून असे निश्चितपणे म्हणता येते की, त्याच्या क्रिया बहुधा बौद्ध तांत्रिक मार्गाने होत असाव्यात. एका ताडपत्रीवर 'सूर्यसेवन' नावाचा ग्रंथ डॉ. लोकेशचंद्र याना उपलब्ध झाला असून त्यामध्ये त्यांच्या म्हणजेच पेदान्दाच्या धार्मिक आचरणाचे संपूर्ण चित्र रेखाटले आहे. उपासना व ध्यानधारणेला बसण्यापूर्वी, बाह्यशुचि झाल्यावर वस्त्र, मेखला, उत्तरीय परिधान करावयाचे व समंत्रक धारणा धरावयाची. ही प्राथमिक क्रिया झाल्यावर पुन्हा हस्तपादादि प्रक्षालन करून पद्मासन (येथील शब्द पद्मील आहे) घालून बसल्यावर अनेक क्रियांनी, न्यासांनी शिवाची आराधना चालू होते. आवाहन, प्रतिष्ठा, योग, क्रम आणि विसर्जन यांचे आचार समंत्रक मुद्रांसहित करावे लागतात. त्यानंतर क्रमाक्रमाने करशोधन मंत्र, प्राणायाम, पूरक-कुंभक-रेचक झाल्यावर तोय-तीर्थ बनवून त्यावर अ उ म अक्षरे (म्हणजेच ॐकार) लिहिली जातात. अग्निमंडळ, सूर्यमंडळ, व चंद्रमंडळ याना त्रितत्त्वमुद्रा करून नमस्कार केला जातो. या उपासनाक्रिया चालू असताना धूप जळत असतो, त्याची सुवासिक वलये पेदान्दाच्या मस्तकाभोवती भ्रमण करीत असतात आणि ध्यानधारणा केंद्रित करण्यास उद्युक्त करतात.

# भूचरी–खेचरी मुद्रा–शक्ति

कोणतीही मुद्रा करावयाची तर त्याला योगसाधनेची आवश्यकता आहे. चित्तवृत्तींचा निरोध करून त्यांचा लय स्वत मध्ये करून घेऊन, द्रष्टा जेव्हा स्वरूपानुभवातच निमग्न होऊन जातो, तेव्हा त्या स्थितीस योग म्हणतात. अशी योगाची व्याख्या पतंजली यांनी केलेली आहे योगाची अंगे आठ आहेत— यम, नियम, आसन, प्राणायम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी. सत्यभाषण, वीर्यरक्षण आणि परवस्तूचा अभिलाष न धरणे याला 'यम' असे म्हणतात. तप, मंत्राचे पठण, संतोष, ईश्वर पूजन, पवित्रता याला 'नियम' म्हणतात. श्वास आत घेणे व बाहेर सोडणे, त्याची गति स्थिर करणे याला 'प्राणायाम' म्हणतात. चित्ताचा लय आत्मस्वरूपात करून, इंद्रियाचे लक्ष विषयावरून काढून घेऊन ते चित्ताकडे नेणे याला 'प्रत्याहार' म्हणतात चित्ताला एके ठायी बांधून ठेवणे याला 'धारणा' म्हणतात. या धारणेचा एकतारता जो अनुभव येतो त्याला 'ध्यान' म्हणतात. धारणा व ध्यान याच्या संयोगात मनाचा लय होऊन *त्या वेळी इतर कशाचाही अनुभव न येणे याला 'समाधी' म्हणतात.*

आसन व प्राणायाम मिळून 'अभ्यासकला' होते आणि याला‌च दुसरे नाव 'हटयोग' असे आहे. ह म्हणजे सूर्य आणि ठ म्हणजे चंद्र, या दोन्ही नाड्यातून वाहणाऱ्या प्राणवायूचा योग करावा लागतो, यास्तव त्याला 'हटयोग' म्हणतात हटयोग-प्रदिपिकेत, आसन, कुंभक, मुद्रा व नादानुसंधान अशी हट-योगाची चार प्रमुख अंगे दिलेली आहेत. इष्ट ते आसन आपण घालून बसल्यावर *प्राणायाम* करून विषयापासून प्रत्याहार करावयाचा. नंतर भूचरी, चाचरी, खेचरी, अगोचरी, अलक्ष, शांभवी, षण्मुखी, अचल इ० इ० मुद्रा करावयाच्या असतात. या मुद्रांचे थोडक्यात विवरण खालीलप्रमाणे—

भूचरी—नासिकेच्या अग्रावरून भूमीवर लक्ष लावून बसणे.

चाचरी—दोन्ही डोळ्यांची बुबुळे हाताच्या बोटांनी थोडा वेळ दाबून, तेथे दिसणाऱ्या प्रकाशात लक्ष लावून बसणे.

खेचरी—दृष्टी ऊर्ध्व करून भ्रूमध्यभागी लक्ष लावून बसले असता, ब्रह्मांडात स्वयंज्योतिप्रकाशावर चित्त स्थिर करणे.

अगोचरी—सर्व बाह्य जगताचे भान सोडून, हृदयांतरातच लक्ष लावून प्रकाश पहाणे.

अलक्ष—हृदयात अंगुष्ठमात्र ज्योतीचे ध्यान करणे.

शांभवी—बहिर्दृष्टी ठेवून अंतर्यामी लक्ष ठेवणे व पापण्यांची उघड-झाप बंद ठेवणे

षण्मुखी—मुख, नेत्र, कर्ण व नासिका यांची छिद्रे बंद करून प्रकाश पहाणे व नाद येणे.

अचल—आरसा समोर ठेवून त्यामध्ये आपल्या उजव्या नेत्राच्या प्रतिबिंबाकडे एकसारखे काही वेळ, काही दिवस पहात असता, परमप्रकाश दिसतो तिकडे लक्ष ठेवणे.

(सार्थ केकावली, लेखक-शं. चि. पराजपे, पृ. ६६२-६५)

बाली बेटात तेथील साप्रतचे धर्मगुरू ज्या काही मुद्रा नेहमी करतात, त्यातील काही उदाहरणार्थ येथे दिलेल्या आहेत. त्या त्या कृतीचे योग्य ते रसग्रहण वाचकाना करता यावे यासाठी हे अत्यंत त्रोटक विवरण येथे देण्यात आलेले आहे.

---

टीप—देवीला नमस्कार योनीमुद्रेने करतात, पण ती मुद्रा छापणे योग्य दिसले नाही म्हणून घातलेली नाही.



कोणत्याही धार्मिक क्रियेला प्रारंभ होण्यापूर्वी पेदान्दा ममत्रव जप माधना करीत आहे. (४) ३३६.



आत्मान योजयित्वा शिखान्ते द्वादशांगुले।
संशोध्य दग्ध्वा स्वानु प्लावयेदमृतेन च ॥
(अग्निपुराण, ३०३/१४)

गायित्रीमंत्राला १०८ उपांशु जप केल्यावर, पेदान्दा ध्यानमग्न होऊन आत्मा शिखान्तस्थली स्थापन करतो (४) ३३८



मुख्य धर्मगुरु पेदान्दा, समस्तक शिवसूत्र म्हणजे यज्ञोपवित धारण करीत आहे (४) ३३८



आवाहन, प्रतिष्ठा, योग, क्रम आणि विसर्जन या पाच प्रकारच्या मुद्रांनी पंच-ज्ञानेंद्रियांचे संबंध जोडले जातात, (४) ३३६



धार्मिक विधीचे आचरण करण्यापूर्वी, काही न्यासमुद्रा (४) ३३६ ३३८

उदवत्ती पान, तांब्या, पळी, ताम्हन, फुले, घंटा, माळ इ० सामान समोर मांडलेले असते.

भारतामध्ये जो पूजेचा षोडशोपचार प्रकार चालू आहे तद्वत्‌च, किंबहुना अधिक प्रामाणिकपणाने येथे तो आचरणात आणला जातो, असे दिसते. सप्ततीर्थ अथवा अप्सुदेवमंत्र–

अप्सुदेव पवित्राणि गंगादेवि नमोऽस्तुते ।
सर्वक्लेशविनाशिनी तोयेन परिशुध्यते ॥ ( इ० इ० )

सप्तगंगा मंत्राचे पठण–

ॐ गंगा सरस्वती सिन्धु विपाशा कौशिकी नदी ।
यमुना महती श्रेष्ठा सरयुश्च महानदी ॥
मन्दाकिनि सुरदेवि नमस्ते मूलहारिणि ।
जम्दुशङ्ख महादेवि देवी देव नियोगतः ॥
मेरुप्रदक्षिणां कृत्वा क्लेशान् नारायणप्रिय ।
पर्वताश्च मुखपुण्ये शिशुक्लेशान् विनाशय ॥ ( इ० इ० )

मृत्युंजय, दीर्घायुर । सप्तवृद्धि मंत्रांचे पठण—

ॐ दीर्घायुर्बलवृद्धिशक्तिकरणं मृत्युञ्जयः शाश्वतम् ।
रोगादिक्षयकुष्टदुष्टकलुषं चन्द्रप्रभाभास्वरम् ॥
न्ही मन्त्रं च चतुर्मुखं त्रिनयनं व्यालोपवीतं शिवम् ।
शीतं चामृतमध्यसासुखकरं जीवत्सया व्यासङ्कम् ।

तसेच तेथील शुद्धिमंत्र व आशीर्वादमंत्रही किती अर्थपूर्ण आहेत हे पाहण्यासारखे आहे —

ॐ प्रथमं शुद्धं, द्वितीयं शुद्धं, तृतीयं शुद्धं, चतुर्थं शुद्धं,
पञ्चमं शुद्धं, शुद्धं शुद्धं वारि अस्तु ।
ॐ आयुर्वृद्धिः यशोवृद्धिः प्रज्ञासुखश्रियाम् ।
धर्मसन्तानवृद्धिश्च सन्तु ते सप्तवृद्धयः ॥
यावन्मेरौ स्थिता देवा यावद्‌गंगा महीतले ।
चन्द्रार्कौ गगने यावत् तावत् तावत् विजयी भवेत् ॥

ॐ दीर्घायुरस्तु तदस्तु । ॐ अविघ्नमस्तु तदस्तु । ॐ शुभमस्तु तदस्तु ।
ॐ श्रेयो भवतु । ॐ सुखं भवतु । ॐ पूर्णं भवतु । समृद्धिरस्तु ॥

बाली वेटातील मंत्रविधींचे जे काही साहित्य उपलब्ध झाले आहे, त्यावरून निश्चितपणे म्हणता येईल की, आजही तेथील कर्मकांड अत्यंत श्रेष्ठ दर्जाचे आहे. आपल्याकडील भारतातील साधे दशग्रंथी ब्राह्मण तर सोडाच पण आचार्यपीठाधिपतीही इतके निष्ठूर कर्मकांडी नसावेत असे वाटते. पेदान्दाची उपासना अत्यंत कडक असल्याने, अनेक न्यास बीजमंत्रासहित करावे लागतात. तसेच मंत्राचे पठण करावे लागते. अनेक प्रकारच्या मुद्रा कराव्या लागतात. जसे गंगादेवीची स्तुती करताना हाताच्या बोटांची अमृतमुद्रा करावी लागते. त्याच्या कर्मकांडाची केवल कल्पना येण्यासाठी काही जंत्री पहा—

मुद्रेसहित सप्ततीर्थमंत्र, चतुरैश्वर्यमंत्र, स्वरन्यास, व्यंजनन्यास, चारी दिशाचे शक्तिन्यास, त्रितत्वमंत्र, कूटमंत्र, शिवीकरणन्यास, शिवांगन्यास, अष्टमहमंत्रन्यास, चतुःसन्ध्यान्यास, चतुर्ऋषीन्यास, घंटाप्रार्थना, क्षमायाचनामंत्र, जलसंस्कार, सप्तओंकारक्षमा, सप्तगंगास्तव हे सर्व प्राथमिक विधि आटोपल्यावर, तुम्जु वङ्खन ( कल्पकपुष्प ) पाण्यामध्ये घालून मंत्राने ते पवित्र जल तयार केले जाते. त्या पाण्याचे गंधमाल्यादिनी पंचोपचार पूजन होते. उदकांजली, पाद्यार्घ्यमंत्र झाल्यावर मृत्युञ्जय मंत्राचे पठण होते. ' शुद्धं शुद्धं वारि अस्तु ' या मंत्राने मार्जन झाल्यावर, पेदान्दा अंगाला चंदनलेप करतो. त्यानंतर मंत्रोच्चाराने शिरोवेष्टन करतो. ' यज्ञोपवितं ' मंत्राने नवे जानवे धारण करतो, यालाच ते शिवसूत्र म्हणतात. ब्रह्मा-विष्णुप्रतिकात्मक मेखला व कौपिन धारण झाल्यावर १०८ मण्याच्या माळेने उपांशु जप करीत असताना योगसाधनेने ध्यानमग्न होतो. या वेळी त्याचा आत्मा जड शरिराचा त्याग करून, लिंगदेह धारण करून, शिरोभागी शिखास्थानी द्वादशांगुल जागी येतो. अग्निपुराणामध्ये या क्रियेचे वर्णन खालीलप्रमाणे आढळते—

आत्मानं योजयित्वा शिखान्ते द्वादशांगुले ।
संशोष्य दग्ध्वा स्वतनुं प्लावयेदमृतेन च ॥ ( ३०२–१४ )

याप्रमाणे पेदान्दाचा आत्मा शिवस्वरूप झाल्यावर, तो ॐ मंत्राचा सतत उच्चार करीत रहातो, अञ्जलीमुद्रा करून आदित्यप्रार्थना होत असते. शिवामृतमंत्राच्या उच्चाराने तो जलाचे अमृतीकरण करतो. जमलेले भाविक ' स्तव-भटार ' म्हणजे शिवाचे प्रार्थना स्तोत्र मोठ्याने पठण करीत असतात. त्रिभुवनमंत्र, क्षमायाचना, अनुग्रहमंत्र, काल-मास-नक्षत्र यांचा उच्चार करून एक पुष्प शिवमंत्राने

पेदान्दाचे शिरोभागी वाहिल्यावर, तो समाधीचे विसर्जन करतो आणि आत्मा पुन्हा जड शरीरात परत येतो.

नंतर आचमन करून सूर्याच्या दहा नावांचा मंत्र पेदान्दा म्हणतो. ती नावे अशी–सूर्य, भास्कर, दिवंकर, अर्क, आदित्य, रवि, मातंग, रथाय, सरथाय, आणि अश्व. (भारतातील बारा सूर्य नावांपेक्षा ही वेगळीच आहेत.) शिरोवेष्टण काढून झाल्यावर, आचमन करून फूल पाण्यात पडले, म्हणजे पेदान्दा संपूर्णपणे पूर्वस्थितीवर आला असे मानले जाते व सर्व विधि संपतो.

भारतामधील तांत्रिक, षोडशन्यास आणि ५१ मुद्रा करतात, पण त्याचे प्रदर्शन करीत नाहीत. गुरुमुखाने आलेली ती विद्या ते गुप्तपणे आचरतात. संपूर्ण अधिकारी झाल्याविना ज्याप्रमाणे ही गूढ विद्या भारतामध्ये गुरु देत नाहीत, तद्वतच बाली बेटामध्येही प्राथमिक पुरे झाल्याविना व योग्यता वाढल्याविना पेदान्दाचे उच्चपद प्राप्त होत नाही.

या परीक्षेत तो उतरला म्हणजे पुढील अधिकारप्राप्तीसाठी मुख्य गुरु पाहतो की, ह्याला कर्मकांडांचे पूर्ण ज्ञान झाले आहे, पूर्वजांच्या रीतीभातींचे पूर्णपणे आकलन झालेले आहे, प्राच्य लेखांचे वाचन त्याला करता येते, धर्मसंस्कारांचे आणि उत्सवसमारंभाचे शुभाशुभ दिवस त्याला ठरविता येतात, त्याने पाच भाषांचा अभ्यास केलेला आहे. पेदान्दाला पाच भाषा येणे आवश्यक मानले जाते. धर्म ग्रंथांच्या वाचनासाठी संस्कृतभाषा, काव्य व पुराणग्रंथासाठी कविभाषा, सर्वसाधारण लोकांसाठी मलायन-बालीभाषा, प्रवासीवर्गासाठी मध्यम बालीभाषा आणि राज्य-कर्त्यांसाठी इंडोनेशिअनभाषा असतात. बहुधा शेवटपर्यंत ब्राह्मणवर्गाशिवाय इतर वर्गाचा विद्यार्थी टिकतच नसल्याने, पेदान्दा हे बहुतेक ब्राह्मणवर्गापैकी असतात. पेदान्दा विवाह करू शकतो, पण त्याला आचरणाने फार पवित्र रहावे लागते.

खेडेगावचे जे पुजारी असतात ते इतर वर्गापैकी असतात. त्यांना ज्ञान बेताचेच असते. त्यांच्या मंदिरात 'लोंटार' (Lontar) म्हणून वंशपरंपरेने चालत आलेला धार्मिक ग्रंथ असतो. त्याची दैनंदिन पूजा तोंडपाठ झालेली असते. त्याला कोणताही शास्त्रार्थ सांगता येत नाही. या धार्मिक पुस्तकात रामायण-महाभारतातील अनेक प्रसंग वर्णन केलेले असतात आणि त्याचे वाचन तो मोठमोठ्याने करतो. हे ग्रंथ ताडाच्या पानांवर लिहिलेले असतात. २४ इंच लांब व २½ इंच रुंद पानाच्या पट्टयावर एका बाजूला चित्रे आणि दुसऱ्या बाजूला काही संस्कृत अक्षरे व ग्रंथातील मजकूर असतो. हा ग्रंथ वंशपरंपरेने चालत आलेला असल्याने ह्यामध्ये अनेक अशुद्ध शब्द घुसलेले असतात, पण कोणीच ते सुधारित नाहीत. एका विवक्षित रीतीने ती पाने एकात

एक दोऱ्याने ओवलेली असतात. असे समजते की, या प्रकारचे धर्मग्रंथ सांप्रत पुणे येथे भांडारकर रिसर्च इन्स्टिट्यूट, बरोडा येथील रामायण संशोधन शाळा व दक्षिण देशातील प्रमुख मठालयात पहावयास सापडतात. किंबहुना ताडपत्रांवरील लेखनकलेचा उगम अतीप्राचीन काळी भारतामध्येच झालेला दिसून येतो आणि येथूनच या लेखनकलेचा प्रसार अन्य देशात झाला असला पाहिजे.

मंत्रपठण

धार्मिक आचारविचाराचे मंत्र जुन्या जावानीज अथवा बाली भाषेत आहेत, त्याला 'कविभाषा' (Kawi Language) असे म्हणतात. ज्याला संस्कृत भाषेचे ज्ञान आहे त्याने हे मंत्र सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास त्याला असे आढळून येईल की, त्यातील प्रत्येक शब्द संस्कृत असून त्याचा अपभ्रंश तेथील भाषेत झालेला आहे. तेथील लोक शैवपंथीय असल्याने अर्थातच शंकरासंबंधीच्या मंत्राचा भरणा जास्त आहे. आपण आता काही उदाहरणे पाहू. प्रत्येक मंत्राची सुरुवात 'ओम्' बीजाक्षराने होते.

ओम् प्रणम्य भास्करं देवम् । सर्वक्लेशविनाशनम् ॥
परमादित्यं शिवार्थम् । मुक्तिमुक्तिवरप्रदम् ॥

हा मूळ संस्कृतमंत्र बाली भाषेत अपभ्रंश पावून, आज त्याचे रूपांतर कसे झाले ते पहा—

Wong Perenamia Perenadiem,
Sarwa Kalosa Winasajem,
Perenamuja raksa sanem,
Boata Boati para namem

गंगा, सिंधु, सरस्वती या नद्यासंबंधी हा मंत्र पहा. प्रथम संस्कृत,

ओम् गंगा सरस्वती सिंधुः ।
विपासा कौशिकी नदी ॥
यमुना महती श्रेष्ठा ।
शरयुश्च महानदी ॥

आता त्याचा अपभ्रंश पहा,

Wong Ganga Sarasoeti Sindoe
Sepa Kosi Kinandem,

Jamoo Jama Jamenandem,
Sarwa joentia menandem

याचप्रमाणे इतर संस्कृत मंत्रांचे अपभ्रंश झालेले आहेत. त्यांपैकी काही मंत्र येणेप्रमाणे,

ओम् क्षमस्व माम् महादेव सर्वप्राणिहितंकर ।
मुंन माम् सर्वपापेभ्यः पालयस्व सदाशिव ॥ १ ॥
ओम् समसमानियः नमः । ओम् तमजीवसुधाय नमः ॥
ओम् श्रेयो भवतु । ओम् सुखम् भवतु ॥ २ ॥
क्षतव्यः कायिको दोपः । क्षतव्यः वाचिको मम ।
क्षतव्यः मनसः दोपः । तत् प्रमादं क्षमस्व माम् ॥ ३ ॥
पापोहम् पापकर्माहम् । पापात्मा पापसंभवः ।
त्र्याही माम् सर्वपापेभ्यः । केनसिद एनसः माम रक्षतु ? ॥ ४ ॥
ओम आदितस्य परं ज्योतिः । रक्ततेजो नमोस्तुते ॥
श्वेतपंकजमध्यस्ते । भास्कराय नमो नमः ॥ ५ ॥
ओम् मंत्रहीनः क्रीयाहीनोः । भक्तीहीनो महेश्वरः ॥
यत् पूजितम् मया देव । परिपूर्ण तत् अस्तु मे ॥ ६ ॥

### मंत्रार्थाचे अज्ञान

वरील मंत्र आणि इतर मंत्र आज जरी तेथे प्रचलित असले, तरी पेदान्दाशिवाय इतर ग्रामीण पुजाऱ्यांना त्याचा अर्थ सांगता येत नाही. त्यामुळे त्याचा कसा घोटाळा होतो ते पहा : गंगा-सरस्वती या कोणी भारतामधील, म्हणजे मूळ वसतीस्थानांतील पवित्र नद्यांचे स्मरण आहे हे त्यांना माहीत नसल्याने ते कोणीतरी भयंकर क्रूर राक्षस आहेत आणि त्यांचे निर्दालन करण्यासाठी यमुना हा कोणी देव आला आहे, इत्यादि अर्थ ते भक्तांना सांगतात. यमुना हा देव होण्याचे कारण इतकेच की, नमो हा त्यांच्या ओळखीचा एक देव आहे. बाली प्रदेशांतील ग्रामीण पुजारी असे अज्ञानी आहेत म्हणून वाईट वाटून घेण्याचे काहीच कारण नाही. कारण मूळ भारतीय संस्कृतीशी असलेला त्यांचा संबंध कित्येक सहस्र वर्षांपूर्वीच तुटलेला आहे. परंतु खुद्द भारतामध्येही असा प्रकार कित्येकदा आढळतो. आता हेच पहा ना. मी देवतासंबंधी माहिती गोळा करीत असताना सोलापूर शहरी हिंगुळांबिकेच्या मंदिरात गेलो, त्या वेळी तेथील लिंगायत पुजाऱ्याला देवीच्या मूळ ठिकाणासंबंधी विचारले असता तो म्हणाला की, ते

ठिकाण कोल्हापूरपलीकडे कोठेतरी मोठ्या उच्च डोंगरावर आहे. वास्तविक या देवीचे मूलस्थान बलुचिस्तानमध्ये आहे पण त्याला कोणी खरी हकिकत सांगत नाही त्यासंबंधीचा ग्रंथ त्याच्या भाषेत उपलब्ध नाही, तेव्हा सांगोवांगी जे काही त्याला समजले त्याचा उच्चार तो भक्ताजवळ करतो संस्कृत शब्दांचे शुद्ध उच्चार भारतामध्ये सर्व प्रदेशातील लोकाना येत नाहीत हे तर निवार सत्य आहे कारण त्यांच्या जिव्हेला शुद्ध उच्चाराचे वळणच नसते मुळी ! तेव्हा वालीसारख्या लांब प्रदेशात संस्कृतीसंस्कारानेच केवळ तयार झालेल्या आजच्या पिढीला ते शब्द शुद्धपणे उच्चारता यावेत, अशी आगळी अपेक्षा न करणेच बरे, नाही का ! जे काही ते करतात, तेच त्यांना अतिशय भूषणास्पद, अभिमानास्पद आहे जे घडते आहे त त्याना शतश नव्हे कोट्यावधि धन्यवाद देण्याइतकेच घडते आहे, एवढे मात्र निश्चित !

## अंगामध्ये देवताचा संचार होणे

ही एक भारतीय रूढि आहे भारतामध्ये अनेक मंदिरातून आजही ही प्रथा चालू आहे. देवतासंचार झालेली ही माणसे भक्तांच्या काही प्रश्नाची उत्तरे देतात आणि दैवी कोपामुळे ओढवलेल्या आपत्तीवर उपाययोजना करतात त्याचप्रमाणे बाली बेटातही ही रूढि अस्तित्वात आहे हा देवतासंचार बहुधा पुजाऱ्याच्या अथवा पेदान्दाच्या शरीरात होतो देवताचा संचार होण्यास त्याचे माध्यम जो मानवदेह तोही पवित्र असावा लागतो तेथे काही काही गावातच असे देवतासंचार होणारे लोक आहेत काही ठराविक मंत्रपठनाने हा संचार होतो, तर काही वेळा होतही नाही यासंबंधी कोणी भक्ताने विचारले तर त्याला उत्तर मिळते, 'देवतासंचार होईल अथवा न होईल देवाची मर्जी बसली तर होईलही' उत्सवसमयी देवतांची प्रतीके अथवा मुखवटे तयार केले जाऊन त्यामध्ये देवत्व आले की नाही हे पहाण्यासाठी हा देवतासंचार आवश्यक मानला जातो बालीनीज लोकांची अशी श्रद्धा आहे की, देव नेहमी शिवलोकात उच्च पर्वतावर अगर सागराच्या ठिकाणी राहात असल्याने मूर्तीमध्ये ते नेहमी वास्तव्य करीत नाहीत तेव्हा उत्सवप्रसंगी पाचारण करून मूर्ति, प्रतीके अथवा मुखवटे यामध्ये प्रार्थना करून, मंत्रपठन करून त्याना आणावे लागते

## ओदालन (Odalan)

या धार्मिक उत्सवाचे स्वरूप जनवेलो या ग्रंथकाराने आपल्या 'बाली बेटातील मंदिरातील उत्सव' या ग्रंथात फार विस्ताराने आणि सखोल अभ्यास करून वर्णन केलेले आहे त्या साठ पानातील मजकूर आपल्याला अगदी

त्रोटकपणे पहावयाचा आहे. या उत्सवाचा कार्यक्रम चार दिवस चालतो तो येणेप्रमाणे—

## पहिला दिवस

१. पहाटे देवताजागृति, निर्माल्य काढून नवीन फुले चढविणे.

२. रात्रीपर्यंत आलेला प्रसाद सकाळी मोहल्यातील भक्ताना वाटणे.

३. देवतापूजन आणि नैवेद्याचे साहित्य तयार करणे. गृहदेवताप्रमाणे मंदिराच्या दुसऱ्या दालनात अनेक देवता मांडलेल्या असतात. त्याना पुरोहिताची पत्नी विडा, दक्षिणा व नैवेद्य नेऊन ठेवते. या गृहदेवता लहान तादळास्वरूप असतात. मध्यभागी मुख्य मंदिर, सूर्य मंदिर व ओटा असतो.

४. दोनप्रहरी सुमारे ३ वाजता गावकरी आपले कोंबडे आणून त्यांची लढत लावतात. प्रत्येक घरटी कोंबडा आलाच पाहिजे. नाहीतर १० 'केपिंग' दंड होतो. हा खेळ मनोरंजक असल्याने तो पहाण्यास शेजारचे गावकरीही येतात.

५. रात्रौ नऊ वाजता भक्तमंडळी आपापले नैवेद्य अर्पण करण्यास घेऊन येतात. त्यामध्ये प्रथम ब्राह्मणवर्गाने नैवेद्य आणावयाचा, नंतर इतरानी आणावयाचा. सर्वांनी एकाच दिवशी आणला पाहिजे अशी सक्ती नाही. चार दिवसात केव्हाही सवडीनुसार आणाना.

## दुसरा दिवस

१. देवताजागृती. नवीन फुले चढविणे इत्यादि.

२. या दिवशी कोणी नैवेद्य आणित नाहीत कारण देवाचा तो बाहेर फिरावयास जाण्याचा दिवस असतो. पण जर घरात सुतक असेल अथवा येण्याचा निकडीचा समय असेल, बाई मासिक पाळीत जाणार असेल, तर या दिवशी तो चालतो.

३. दुपारी कोंबड्याची लढत पहिल्या दिवसाप्रमाणे.

४. रात्रौ नऊ वाजता नृत्य व वाद्यवृंद कार्यक्रम. मंदिराच्या दुसऱ्या दालनातील सर्व लहान लहान देवतापुढे नृत्य होते आणि तत्पूर्वी प्रत्येक देवतेला नैवेद्य दाखविला जातो

५. रात्रौ बारा वाजता कार्यक्रम संपतो मग पहारेकऱ्याशिवाय इतर कोणी रहात नाही.

### तिसरा दिवस

हा उत्सवातील प्रमुख दिवस होय.

१. देवताजागृती झाल्यावर आज सर्व माणसांना कामावर बोलाविण्यात येते. जो कोणी उपस्थित राहणार नाही त्याला शंभर केपिग दंड भरावा लागतो. पण याचा निवाडा व इतर प्रमादांचा निवाडा उत्सव संपल्यावर पंचाच्या समितीने करावयाचा असतो. अनेक महिला मंदिरात जमून निरनिराळे खाद्यपदार्थ बनविण्यात मग्न झालेल्या असतात. हे सर्व पदार्थ बहुधा तांदुळाच्या पिठापासून तयार करतात.

२. सायंकाळी भक्तमंडळी स्नानासाठी व पवित्र पाणी आणण्यासाठी वाद्यवृंदासह मिरवणुकीने जातात. प्रत्येक मंदिराचे हे स्नानठिकाण वेगवेगळे असते. कोठे समुद्र, कोठे नदी, कोठे सरोवर, कोठे विहीर वगैरे.

३. रात्रौ अकरा वाजता परत आल्यावर देवतांना खावयास फराळाचे पदार्थ अर्पण करून मग नृत्यांचा कार्यक्रम होतो. वाद्यवृंद वाजतच असतो.

४. रात्रौ ११॥ वाजता सर्व देवतांना आवाहन होते. पेदान्दाचा मंत्रोच्चार सतत चालूच असतो. प्रत्येक देवतेला अभिषेक, पूजा केली जाते. यामध्ये मंदिराच्या बाहेरील देवतांचाही समावेश होतो आणि त्यांचे ठिकाण मंदिरापासून शंभर पावलावर असते.

५. समारंभ संपल्यावर सर्व देवतांना प्रेमाचा निरोप देणे व प्रार्थना १ वाजेपर्यंत चालतात.

६. मंदिरातील व मंदिराबाहेरील दालन माणसांनी फुलून जाते. अनेक भक्तमंडळी गप्पागोष्टीत वेळ घालवितात. स्त्रीपुरुष एकत्र असले तरी मर्यादातिक्रमण कोणी करीत नाहीत.

### चवथा दिवस

१. पेदान्दा सर्वांना पहाटे पाच वाजता उठण्याचा आदेश देतो.

२. कोंबडी, बदके, टोपलीत घालून ती काठीच्या दोन टोकांना बांधून तयार झाल्यावर त्यामध्ये भात व मांसाचे तुकडे घालतात.

३. गर्भागृह दालनातून दुसऱ्या दालनात जाण्यास मिरवणूक निघते. मुलींजवळ लहान लहान बाहुल्या दिल्या जातात. पाणी, भांडी, धुपाटणे सर्व काही सामान बरोबर घेतात. हा कार्यक्रम देवाच्या पाठवणीचा असतो आणि त्यासाठी पाथेय म्हणून कोंबडी, बकरी दिली जातात. फटाके उडवितात. सर्वत्र पावित्र जलाचे सिंचन करून नंतर बाहेरच्या दालनात येतात.

४. बाहेरच्या दालनातून ग्रामदेवाचे प्रतिष्ठालय आणि प्रवेशद्वाराबाहेर इतर देवांचे प्रतिष्ठालय असते. तेथे त्याचे पाथेय ठेवले जाते. या वेळी त्या पक्ष्यांचे काही पंख उपटून घेतले जातात आणि त्या ठिकाणी ते भूमीवर ठेवतात. मुलींजवळ असलेल्या बाहुल्या घेऊन त्या वर आकाशात उडवून दिल्या जातात. त्या बाहुल्या अप्सरांचे प्रतीक मानून, वर उडवून त्यांची पाठवणी करतात.

५. हा समारंभ संपल्यावर परत दुसऱ्या दालनात येऊन मुखवट्यांवरील देवतांच्या ल्हान मूर्ति काढून घेऊन त्या कापडात गुंडाळून उच्च जागी ठेवून देतात. लाकडी प्रतीके तेथे मंदिरातच राहू देतात. उत्सव-कार्यक्रम संपल्यावर सर्वजण आपापल्या घरोघर जातात.

वरील ओदालन समारंभ म्हणजे सांप्रत भारतातील गोवा अथवा उत्तर भारतामध्ये काही ठिकाणी चालू असलेल्या 'दोला' विधीचेच थोडयाफार प्रमाणात अनुकरण असावे असे वाटते. ओदालन शब्दही दोला शब्दाचाच अपभ्रंश असला पाहिजे असे मला वाटते. दोला विधीचे कार्यक्रमही चार दिवस चालतात.

वरील उत्सवाचे वर्णन करणारा ग्रंथलेखक जरी पाश्चिमात्य असला तरी ग्रंथलेखनापूर्वी त्याने बालीमध्ये आठ वर्षे वास्तव्य केलेले आहे. १९३७ साली तो रहात असलेल्या सजन या गावाच्या उत्सवाचे निरीक्षण त्याने अभ्यासू वृत्तीने केलेले आहे. १०५ मंदिराच्या पुजाऱ्यांच्या घरी त्याचे वास्तव्य होते आणि त्यांच्या साहाय्याने धार्मिक विधीतील अगदी ल्हानसहान बारकावे त्याने लक्षपूर्वक पाहून, ऐकून ते समजावून घेतलेले आहेत. बालीनीज मंत्राचे ग्राम्य उच्चार संस्कृत पंडिताच्या द्वारे समजावून घेऊन भाषांतरित करून घेतलेले असल्याने त्याने केलेले उत्सवसमारंभाचे विवेचन अतिसूक्ष्म आहे. यात संदेह नाही आपल्याला ते सर्वस्वी भाषांतरित करून घ्यावयाचे नाहीत, पण आजही ह्या बेटात भारतीय संस्कृति किती यथोचित प्रमाणात आहे, याचेच विवेचन जरा सविस्तरपणे करावयाचे आहे. थोडेसे विषयान्तर होत आहे. **परंतु ग्रंथाचा दृष्टिकोन देवतांचा संचार व अनुषंगाने भारतीय संस्कृतीचा प्रादेशिक आविष्कार हा असल्याने तसे होणे अपरिहार्यच आहे.**

## ओदालन समारंभाचा दिवस निश्चित करणे

हे काम पेदान्दा ह्याचे असते. या वेळी गावात जर एखादा मृत्यु झाला अथवा अमंगल कृत्य कोणी केले, खून मारामारी केली, तर हा दिवस पुढे ढकलला जातो. गावकऱ्यांना जर सोयर-सुतक असेल तर त्या काळात तो मंदिरात प्रवेश करणार नाही. मासिक पाळी आलेली स्त्री मंदिरात जाणार नाही.

## मंदिरातील मूर्ति

मंदिरांतील मूर्ति सुवर्णाच्या, अष्टधातूंच्या वा लाकडांच्या असतात. त्यांना अर्जा ( Artja ) म्हणतात. काही ठिकाणी ताडाच्या पानांनी देवाकृति बनवून तिचे पूजन होते ( भारतामध्ये कोणत्याही धार्मिक कृत्याच्या वेळी, देवतास्थापनेच्या वेळी आंब्यान्या पानांच्या मातृका देवता बनवितात. तसेंच जिवती अगर जलदेवताच्या प्रतिमा बनवितात ). अशा मूर्ति वृद्ध स्त्रिया अतिशय कुशलतेने तयार करतात. मानवाकृति मुखवटा पानांच्या निरनिराळ्या अवयवांनी तयार करतात. छाती, बरगड्या, पोट, नाभी, रक्तवाहिन्या इत्यादि सर्व अवयव दाखविले जातात. मस्तकावर एक पक्ष्याची आकृति बनवितात. ( भारतामध्ये आद्य शंकराचार्यांचे उपास्य दैवत जे शारदा, तिच्या स्कंधावर पोपट पाहिल्याचे आठवते. त्याचेच हे प्रतिक असावे ). सर्व अवयव तयार झाल्यावर उदरभागी काही तांबूळ व सुपाऱ्या ठेवून देतात. अंगावर कपडे घालून झाल्यावर डोक्यावर फुले माळतात. मुखवटे बसविताना पुरुषाच्या डाव्या बाजूला स्त्रीचा मुखवटा बसविला जातो.

## मुखवट्यांची सजावट

काही ठिकाणी हे मुखवटे सजविताना लाकडी चौकोनी फलकांवर मानवाकृति रेखाटलेल्या असतात. शरीराकृतीसाठी दोन त्रिकोण एकावर एक रेखाटलेले असून हे फलक सरळ उभे करून त्यावर मुखवटे तयार करतात. यांची उंची दीड ते दोन फूट असते. प्रथम काही कपड्याची वेष्टणे घालून त्यावर सोनेरी वर्ख असलेले पोशाखी कपडे घालतात. मस्तकावर फुले माळतात. नेत्रांच्या आकृति सजवितात. मुख्य पुजाऱ्याची पत्नी हे सर्व सजविण्याचे काम करते. पुजारी सर्व तयारी झाल्यावर मुखवट्यांवर सुवर्णाच्या दोऱ्या कमरेवर बांधून पूर्णाकृति तयार करतो. देवतांना आवाहन करण्यापूर्वी ही सगळी प्राथमिक तयारी करावी लागते.

## मंदिर शृंगारणे

उत्सवानिमित्त लतापल्लवांनी मंदिर व प्रवेशद्वार सजविले जाते. प्रवेशद्वारी मोठमोठे बांबू उंच उभे करून त्यावर चित्रविचित्र रंगांची कागदी अथवा पल्लवांची तोरणे बांधतात. एके ठिकाणी एक देवतेचा मुखवटा बांधून तेथे काही खाद्यपदार्थ ठेवतात. त्याचा हेतू असा असतो की, मुख्य देवतेचे आगमनप्रसंगी दुष्ट देवतांनी ते खाद्य खाऊन संतुष्ट राहावे आणि मुख्य देवतेला उपद्रव देऊ नये. ते अन्न पाहून वायूमार्गाने गमन करणारे लिंगधारी अथवा इतर योनीतील आत्मे त्याकडे आकर्षिले जावेत आणि मध्ये कोणी विघ्ने आणू नयेत. याप्रमाणे दुष्ट प्रवृत्तींच्या देवतांना उत्सवप्रसंगी दूर ठेवले जाते.

## इतर देवतांना निमंत्रण

भारतीयाच्या घरी काही मंगलकार्य असले म्हणजे आपण ज्याप्रमाणे आपले आप्तेष्ट अथवा मित्रमंडळींना निमंत्रण देतो, त्याप्रमाणे या उत्सवप्रसंगी गावांतील व शेजारच्या गावांतील देवतानाही निमंत्रण देण्याची रूढि आहे या देवताना उतरण्यासाठी मंदिराबाहेर एक प्रतीक्षालय बांधलेले असते. गावातील देवताचे प्रतीक्षालय मंदिराच्या पहिल्या दालनात असते, तर इतर देवताचे प्रवेशद्वाराबाहेर असते ज्याप्रमाणे वऱ्हाडीमंडळींचा जानोसा ठेवण्याची जागा असते, त्याप्रमाणेच ही व्यवस्था असते. उत्सवसमारंभ चालू असला म्हणजे त्याना आल्या दिवसापासून जाईपर्यंत एकदा भोजन मिळते आणि दोनतीन वेळा फराळाचे सामान दिले जाते, म्हणजे त्या त्या मंडपात ते ठेवले जाते. इतकेच नव्हे तर मुख्य पर्वांच्या वेळी ज्याप्रमाणे भारतात पाहुणे मंडळींना भोजनपात्रे तयार झाल्यावर पाटावर बसण्याची विनंती करतात, तद्वत तिसऱ्या दिवशी मुख्य समारंभाच्या वेळी याना खास वाद्यवृंदाबरोबर निमंत्रण त्याच्या मंडपात दिले जाते. समारंभ संपल्यावर तिसऱ्या दिवशी यजमान व इतर सर्व मंडळी या पाहुणे-मंडळींची मंडपात जाऊन पाठवणी करतात जाताना पाथेय म्हणून एका टोपलीत कोंबडी, वदके, मासाचे तुकडे, तांदूळ इत्यादि पदार्थ देतात समारंभ संपला असल्याने त्याना स्वस्थानी जाण्याची प्रार्थना करतात. या रीतीने उत्सव प्रसंगी देवतांच्या आगमनाच्या वेळी ही पाहुणीमंडळी त्याच्या सत्कारासाठी हजरच ठेवतात

ज्याप्रमाणे देवता पाहुणे म्हणून बोलाविल्या जातात, त्याप्रमाणे अंतरिक्षातील अप्सरा व पऱ्या यानाही निमंत्रणे दिली जातात समारंभात त्या बाहुल्यांच्या रूपाने वावरतात आणि त्याना निरोप देण्याच्या वेळी काही बाहुल्या वर आकाशात उडवितात म्हणजे त्या स्वर्गही गेल्या असे मानतात यांना विद्याधरी म्हणतात

या उत्सवप्रसंगी वाद्यवृंद सतत वाजत असतो सुमारे तीस माणसांचा हा संच निरनिराळी वाद्ये वाजवीत असतो त्याच्यासाठी खास झोपडी बांधलेली असून त्याच्या भोजनाची व्यवस्था मंदिरातच केली जाते नृत्य, गायन, पूजा समारंभ वगैरे अनेक वेळा वाद्यवादन करावे लागते या वाद्यवृंदाला गॅमेलिन ( Gamelan ) असे नाव आहे

## शिधासामुग्री

उत्सवप्रसंगी त्या मोहल्ल्यातील घराकडून शिधा येणे आवश्यक असते मंदिराच्या शेतीचे जरी काही उत्पन्न असले तरी ते पुजारी व रोजचे कार्यक्रम

याला पुरेसे असल्याने असे उत्सव सार्वजनिक शिधा जमवून साजरे करावे लागतात. प्रत्येक घरटी दोन नारळ, दीडशेर तांदूळ, तीन जुडी, १५ नाणी, भाजीपाल्या, फळे असतील त्याप्रमाणे द्यावे लागतात. देवाच्या भेटीला जाताना कोणी रिक्तहस्ताने मंदिरात जाऊ नये हा नियम पाळला जातो. कोणी तांदूळ, रोट्या, काजूगर, कोंबडीची तंगडी, लाल रुपेरी केक, सुपाऱ्या इत्यादि अगर गोड पदार्थ जो तो आपल्या ऐपतीप्रमाणे नेतो. पुजारी त्यांचा नैवेद्य देवाला समर्पण करतो आणि म्हणतो, 'भक्ताने या वस्तु तुला अर्पण केल्या आहेत. त्याचा तू स्वीकार कर.' त्यावर जलसिंचन करून नैवेद्य दाखविला जातो आणि प्रसाद दिला जातो. काही वेळा बोललेले नवस फेडावयाचे असतात, ते अशा प्रसंगी शिधानैवेद्य देऊन फेडले जातात. अशा वेळी चांदीची फुले अगर मौल्यवान वस्तु देवाला नवसप्रीत्यर्थ ज्या वाहिलेल्या असतात, त्या मात्र पुजारी ठेवून घेतो, बाकीच्या परत करतो. प्रसादाबरोबर पुजारी तीन पळ्या तीर्थ देतो. त्याचे सेवन केल्यावर ओले हात नेत्रांना अथवा मस्तकावरील केसांना पुसले जातात.

## देवतांना मिष्टान्नभोजन

उत्सवाचा कार्यक्रम चालू झाला म्हणजे वर सांगितल्याप्रमाणे शिधा जमतो. प्रत्येक घरटी तो आलेला आहे किंवा नाही याचा हिशेब कोठीवरील मनुष्य ठेवतो आणि न देणारा दंडाला पात्र होतो. उत्सवाचे तीन दिवस महिलावर्ग आळीपाळीने मंदिरात जमून मिष्टान्नाचे निरनिराळ्या आकाराचे पदार्थ तयार करतो. निरनिराळ्या आकारासाठी ताडाच्या पानांच्या आकृति बनवून त्यांमध्ये पीठ घालून पदार्थ तयार केले जातात. तांदुळाच्या पिठापासून अनेकरंगी व विविध आकाराचे पदार्थ बनविण्यात महिलावर्ग अत्यंत कुशल असतो. मंदिराच्या दुसऱ्या दालनात ज्या लहान लहान तांदळाच्या आकाराच्या देवता असतात, त्यांना ठराविक आकाराचे पदार्थ नैवेद्यासाठी लागतात, व स्त्रियांना ते पूर्णतः अवगत असतात. या लहान देवतांना हे पदार्थ देण्याचा हेतु असा की, त्यांना विदित व्हावे की, मंदिरात मोठा उत्सव होणार आहे, मुख्य देवता येणार आहेत, तेव्हा त्यांना दुष्ट प्रवृत्तींच्या माणसांपासून अगर देवतांपासून उपसर्ग पोहोचू नये.

बाकचगार गृहिणींना माहीत असते की, अशा वेळी काय काय सामान नैवेद्य दाखविण्याच्या वेळी लागते आणि त्या सर्वांची यादी त्यांना पाठ असते. सर्व सामान जमविण्याची जबाबदारी त्यांचीच असते. त्यांना त्या वेळी खालीलप्रमाणे वस्तु लागतात.

मातीचे भांडे, लालरंगाचे पान, केळीचे पान, लवंगा, बंदकाच अंड, नारळ, अननस, मसाला, मुळे, फणस, पपया, तांदूळ, पाच नाणी, मका, केक, ताडाची कोवळी पाने, मीठ, कार्लिंगड, काकडी, टरबूज, भाजी इत्यादि.

मंदिरात ज्याप्रमाणे मिष्टान्न नैवेद्य तयार केला जातो, त्याप्रमाणे मंदिराच्या आसपासच्या अनेक गृहिणी घरीच सगळे पदार्थ तयार करून आणि सायंकाळी दहापाच महिला त्या एकत्रितपणे घेऊन येतात. एका टोपलीमध्ये व्यवस्थितपणे त्या जिनसांची व फळांची कलापूर्ण मांडणी करून ती वीस-पंचवीस पौंड वजनाची टोपली मस्तकावर धारण करून, मंदिर पर्वतमाथ्यावर असेल, अगर नदी-सागराच्या उथळ पाण्यातून मार्ग असेल तर तो तोल संभाळून, आक्रमण करून उत्सवाच्या दिवशी तेथे घेऊन जातात आणि अर्पण करतात. प्रवासी लोक हा देखावा मोठ्या हौसेने पाहातात आणि त्याची छायाचित्रेही घेतात.

तिसऱ्या दिवशी नैवेद्यासाठी डुकराचा बळी देऊन, त्याच्या मांसाचे निरनिराळे पदार्थ बनवितात. त्याच मांसाचे काही तुकडे फुलांप्रमाणे कापून, ते शिजवून नैवेद्याच्या शिरोभागी ठेवले जातात. वाडीतील अगर मोहल्ल्यातील ज्या लोकांनी शिधा दिला असेल त्या सर्वांना यांतील मांस प्रसाद म्हणून वाटले जाते.

## देवतांना स्थानापन्न होण्यासाठी आवाहन करणे

वर म्हटल्याप्रमाणे या लोकांची अशी भावना आहे की, देवतांचा निवास नेहमी मूर्तीमध्ये नसतो, तेव्हा उत्सवप्रसंगी त्यांना खास विधीने आवाहन करावे लागते आणि मूर्तीमध्ये अथवा मुखवट्यामध्ये प्रवेश करून घ्यावा लागतो. परंतु यामध्ये इंग्रजी ग्रंथकाराला जरी काही नाविन्य दिसले असले तरी भारतीय दृष्टिकोनातून पाहणाराला अगर भारतीयाच्या पंचायतनपूजाविधि ज्ञात असणाराला यामध्ये काही आगळे दिसणार नाही. पंचायतनपूजा करतानाही 'आदित्यादि नवग्रहांना' आवाहन करावे लागते. त्याचप्रमाणे तेथील मंदिरातील दुसऱ्या दालनात सूर्याचे स्थान व इतर महदेवतांचे लहानलहान तांदळे असतात, त्यांचे आवाहन करतात. भारतीय पूजेत गंगा, सरस्वती, नद्या, ब्रह्मा, विष्णु इत्यादि देवतांना आवाहन करतात आणि पूजा-समारंभाला सर्वांना निमंत्रण देऊन मगच इष्टदेवतेचे पूजन केले जाते. 'ध्यानआवाहनादि षोडशोपचारपूजा' याचा अर्थ सरळ आहे की, देवतांना आवाहन करावयाचे आहे. 'ॐ अपसर्पन्तु ये भूता ते भूता भूमिसंस्थिताः ।' या मंत्राने दुष्ट देवतांची हकालपट्टी करावयाची असते. 'देवा आयान्तु-यातुधाना अपयान्तु' । हा मंत्र याच अर्थी वापरलेला आहे. 'आगमार्थं तु देवानां, गमनार्थं तु रक्षसाम् ।' या मंत्राने घंटानाद केला जातो.

कशासाठी? तर देवताच्या आगमनासाठी आणि दुष्ट देवताच्या गमनासाठी. हे सर्व विस्ताराने सांगण्याचे कारण इतकेच की, मूळ मूर्तीमध्ये उत्सवप्रसंगी देवताना स्थानापन्न करणे, हे पूर्णपणे भारतीय पूजापद्धतीला अनुसरूनच आहे. शिवाय मूळमूर्ति आणि उत्सवमूर्ति या वेगवेगळ्या असतात. तेव्हा मूळ मूर्तीमधील देवता अशा समयी उत्सवमूर्तीमध्ये आणावयाचे असते.

देवताचे आवाहन करण्यासाठी मंदिराचा दुय्यम पुरोहित स्नान करून नवीन वस्त्रे नेसून, डोकीला पचावजा कापड गुडाळून, पूजासाहित्य एका तबकात घेऊन, दक्षिणेकडे तोंड करून पूजेला बसतो. दक्षिण दिशेला तोंड करून बसण्याचे कारण असे संभवते की, मरणसमयी जीवात्म्याच्या जाण्याची ती दिशा असल्याने त्याच बाजूने पुन्हा आवाहन करणे हे सयुक्तिक वाटते अथवा महापुरुष हा पश्चिमेस मुख करून बसलेला असल्यामुळे व आज्यभाग हे त्याचे नेत्र असल्यामुळे उजवा डोळा उत्तर आणि डावा डोळा दक्षिणेकडे येतो. यास्तव आज्यभाग दक्षिणस्थ होऊन द्यावे, 'दक्षिणमक्षुत्तर भवत्युत्तर दक्षिणम्' (अश्वलायन सूत्र १०/१६). या वेळी एक मशाल जळत असते. इतकी तयारी झाल्यावर मंदिराचा मुख्य वृद्ध पुरोहित पुढे सरसावतो आणि मोडक्या तोडक्या शिडीवर चढून वर जेथे देवाची पेटी ठेवलेली असते तेथपर्यंत जातो घराचा आकारवजा असलेली लहानशी पेटी, कोनाड्यातून बाहेर काढून घेऊन ती जागा साफसुफ करतो. दुय्यम पुरोहित ती पेटी वरच्यावर धरून ठेवतो. कारण माणसाच्या मस्तकाच्या रेषेखाली ती न्यावयाची नाही असा संकेत असतो. तसे झाल्यास त्यामुळे देवाचा अवमान होतो. पेटी पुन्हा जाग्यावर ठेवली जाते. मंदिरात त्या देवताच्या मूर्ति असतात त्यांची प्राथमिक पूजा, स्नान, पादपूजा झाल्यावर त्यांच्या पूजनाला सुरवात होते. अष्टवसू, नवमहाची पूजा आणि इतर प्रमुख देवताचे आवाहन झाल्यावर, प्रमुख देवतेला अगर इष्टदेवतेला आवाहन करतात. फुलाचे पूजासाहित्य पाण्याने शुद्ध करून घ्यावयाचे 'अपवित्रः पवित्रो वा' हा मंत्र त्या वेळी म्हटला जातो. पृथ्वादेवीची पूजा (म्हणजे मूर्ति नसल्याने नुसतेच भूमिपूजन) व इष्टदेवतेच्या मूर्तीची पूजा झाल्यावर देवताचे आवाहन चालू होते. दोन्ही हात कानाच्या वर नेऊन मानेसह पुन्हा पुन्हा खाली वाकून तो देवाला विनंती करतो, 'हे परमेश्वरा, हा तुमचा भक्त, तुम्ही स्थानापन्न होण्यासाठी तुमची प्रार्थना करीत आहे. चंदनाच्या धूपाच्या धुराची शिडी लावलेली आहे त्यावरून आपण खाली यावे आणि मूर्तीमध्ये स्थानापन्न व्हावे'.

अशी प्रार्थना केल्यावर तो पुरोहित पुन्हा शिडीवरून वर चढतो आणि देवाची पेटी खाली आणून खास तयार केलेल्या उचासनावर ठेवतो. 'ओम् क्षमस्व मां महादेव' या मंत्राने सुरवात केली जाते. नंतर पेटी उघडून तो

पुरोहित चंदनाच्या मूर्ति गुंडाळलेल्या कापडातून बाहेर काढून हातावर घेऊन, फुलाने त्यांवर जलसिंचन करून तबकातील कापडाने ती पुसतो. देवतांसाठी जे मुखवटे केलेले असतात त्यांपैकी एकावर मूर्तीची स्थापना केली जाते. नंतर दुसरे गुंडाळे पेटीतून काढून दुसऱ्या मूर्तीची स्थापना वरीलप्रमाणेच विधि करून दुसऱ्या मुखवट्यावर केली जाते. देवताचे आगमन उत्सवाप्रीत्यर्थ झालेले आहे असे मानले जाते. दोन मुखवट्यापैकी एक पुरुष व दुसरी स्त्रीशक्ति असते, किंवा ते शंकर-पार्वतीसमान मानतात. सर्वत्र पवित्र जलाचे सिंचन होऊन शुचिर्भूतपणा आणला जातो. (याप्रमाणे जलसिंचन करणे, ह्याला अभ्युक्षण म्हणतात. 'तदभ्युक्षाऽग्निप्रतिष्ठाय' – अश्वलायन ३/१ ). या मूर्तींना बसण्यासाठी जे आसन असते त्याला रत्नासन म्हणतात. 'रत्नैःकल्पितमासनं हिमजले स्नानं च दिव्याम्बरम्' या शंकराचार्यांच्या मानसपूजेच्या विधीची आठवण होते आणि हा पूजाप्रकार म्हणजे भारतीय पूजापद्धतीचा बाली द्वीपस्थ आविष्कार आहे. उत्तम वस्त्राला निरनिराळी नाणी, मणी, रत्ने गुंफलेली असतात. त्या वस्त्राची घडीही करता येते. हातात पाण्याचे भांडे व धुपाटणे घेऊन पुरोहित देवताना त्यावर आसनस्थ होण्याची विनंती करतो. देवता स्थानापन्न झाल्यावर नदीदेवता, व इतर निमंत्रित देवताना, या प्रमुख इष्ट देवतेच्या भेटीसाठी बोलाविण्यात येते आणि सात दूतांची त्यासाठी रवानगी होते. यानंतर प्रमुख कार्यक्रमाला सुरवात होते. हे आवाहन तिसऱ्या दिवशी होते.

## पवित्र जल तयार करणे

उत्सवसमारंभाच्या वेळी मंदिरामध्ये पाण्याचे मोठमोठे राजण भरलेले असतात. त्यातून दोन कलशामध्ये पाणी घेतल्यावर ते देवाजवळ नेले जाते. मंत्रोच्चार करून ते देवाला दाखविले, की पवित्र जल तयार होते. या वेळी पवित्र गंगा यमुना या भारतीय नद्यांचा उल्लेख मंत्रोच्चाराने केला जातो. 'ओम् गंगा सिंधुः सरस्वती च यमुना' या मंत्राचे पठण करतात. इतर विधि झाल्यावर शेवटी 'ओम् श्रेयो भवतु' या मंत्राने पवित्र जल बनविण्याचे काम पूर्ण केले जाते. भारतामधील पुण्याहवाचनविधीमध्येही हा विधि अंतर्भूत केलेला आहे. दोन कलशांमध्ये पाणी भरून, त्यांत काही द्रव्य टाकून, वर आंब्यांची पाने ठेवून त्यावर देवतास्वरूप सुपारी घालून तांदूळ अथवा नारळ ठेवला जातो. पूजारंभ झाल्यावर पुरोहित 'कलशस्य मुखे विष्णुः कंठे रुद्रः समाश्रिताः' इत्यादि मंत्राने या कलशामध्ये विष्णु, रुद्र, ब्रह्मा, मातृगण, सप्तसागर, सप्तद्वीप, वसुंधरा, चारी वेद, गायत्री, सावित्री, गंगायमुना या नद्या आणि शेवटी वरुणदेवता या जलामध्ये येवोत अशी प्रार्थना झाल्यावरच ते पवित्र जल म्हणून अभिमंत्रणाला, पूजासाहित्य शुद्ध करण्याला, तीर्थ देण्याला अथवा समारंभाच्या शेवटी अवभृत

स्नानासाठी उपयोगात आणले जाते. भारतीय संस्कृतीला यामध्ये काही आगळे वाटण्याचे कारण नाही. दोन्ही देशांचे विधि व मंत्र एकच आहेत.

याशिवाय ज्याप्रमाणे भारतीय गंगा, सरस्वती अथवा मानससरोवर येथील पाणी पवित्र मानतात, त्याप्रमाणे बाली लोक पर्वतमाथ्यावरील बाटूर सरोवरातील पाणी पवित्र मानून, त्याचा उपयोग करतात. पवित्र जल बनविण्याचे काम पुरोहित मंत्र म्हणून करीत असतो, त्या वेळी इतर भक्तमंडळी ते मंत्र स्वस्थ चित्ताने ऐकत असतात. शांतिसूक्ताचे पठण श्रद्धेने श्रवण करतात. शेवटी यातील तीर्थ सर्वांना दिले जाते. क्वचित प्रसंगी या वेळी पुरोहिताच्या अंगी देवतासंचारही होतो.

## देवतांचे मंगलस्नान

देवता स्थानापन्न झाल्या म्हणजे मंत्रविधीने त्यांना स्नान घालण्यात येते. सुवासिक अत्तर, उटणे व इतर पदार्थ स्नानाला वापरतात. त्यांच्या केसांना तेल लावतात. याच वेळी नखे साफ करण्याचा विधि केला जातो. स्नानाच्या वेळी वाद्ये वाजत असतात. काही वेळां नृत्य केले जाते. हे नैमित्तिक स्नान झाले तरी स्नानासाठी म्हणून तिसऱ्या दिवशी सायंकाळी देवतेची मिरवणूक निघते. अशा स्नानाची प्रत्येक मंदिराची जागा जवळपासच विहीर, सरोवर इत्यादि ठिकाणी असते. मिरवणुकीने तेथे गेल्यावर देवांना स्नान घालतात. काही भक्तमंडळीही स्नान करतात आणि परत मंदिरात येतात. बालीलोक बहुधा सायंकाळी स्नान करतात, त्यामधून ही रूढि निघाली असावी. यज्ञयागामध्ये सर्व कार्यक्रमांच्या शेवटी अवभृतस्नान हा विधि भारतीय पाळतात. या वेळी सर्वजण मिरवणुकीने समुद्र, नदी, तळे या ठिकाणी जाऊन स्नाने करतात, त्यातीलच हा प्रकार असावा.

## दुष्ट देवतांचे पूजन

या समारंभाच्या वेळी दुष्ट प्रवृत्तीच्या ग्रहांनी अथवा अदृश्य योनीतील जीवात्म्यांनी या ठिकाणी येऊन कार्यामध्ये विघ्ने आणू नयेत, यासाठी उपाय योजण्यात येतात. मंदिरात प्रवेशद्वारी बांबूंच्या तोरणामध्ये रक्षक देवता आणि काही अन्न या जीवात्म्यांसाठी ठेवलेले असते, हे आपण वर पाहिलेच आहे. त्याप्रमाणे मुख्य समारंभाच्या तिसऱ्या दिवशी मंदिरातील दुसऱ्या दालनात असलेल्या सूर्यादि नवग्रहांची पूजा होते. या शैवपंथीय बेटात सूर्यपूजा आजही चालते, हे मोठे सूचक मानावे लागेल. कारण अमेरिकेत मेक्सिकोमध्ये सूर्यवंशीय लोक गेले, तेव्हा ते जर याच मार्गाने गेले असतील तर त्यांच्या संस्कृतीचा हा एक अवशेष राहिला असणे अशक्य नाही. या ग्रहांच्या पूजेच्या वेळी एका

लेग्वडी कटईत ६ अंडी, नारळाचा कीस, मासांचे ९ तुकडे व ६६ धान्यांचे दाणे एकत्र हलविले जातात ही पूजा व नैवेद्य पशुपतिपूजा म्हणून प्रसिद्ध आहे. या मद्देवताना वरील न्याय अर्पण केल्यावर त्याची प्रार्थना केली जाते की, ' सर्व मद्द व राक्षसगणानो, खाली या. हे खाणे खा आणि देवाच्या भोजनप्रसगी व्यत्यय आणू नका. त्याच्या खाण्यात भाग मागू नका आणि खाणे झाल्यावर आपापल्या दिशेकडे जा. पूर्वकडे ईश्वराच्या घरी, दक्षिणेकडे ब्रह्मयाच्या घरी, पश्चिमेकडे महादेवाच्या घरी, उत्तरेकडे विष्णूच्या घरी आणि मध्यभागी शिवाच्या घरी जा ' या पूजेच्या मत्राचे पठण होतच असते.

या उत्सवप्रसगी देवताच्या करमणुकीसाठी नृत्याचा कार्यक्रम होतो. नृत्य हा या सस्कृतीमधील एक वैशिष्ट्यपूर्ण भाग आहे. तो पाहण्यासाठी अनेक प्रवासी तेथे जातात. तसेच चित्रपटातून या नृत्याचे वारवार दाखवणारे दाखविण्यात येतात ४ ते १२ वर्षे वयाच्या मुले-मुली या कलेत तरबेज असून, त्यांचेच नृत्य उत्सव-प्रसगी होते. बारा वर्ष वयाच्यापेक्षा जास्त वय असलेले दुसरे कोणी सहसा नाचत नाहीत. हौसेखातर कोणी तसे केले तर निराळे नृत्याचे कार्यक्रम सायकाळी मदिरात अथवा वडाच्या झाडाखाली होतात. नर्तक उत्तम पोषाख घालून सजलेला असतो त्याच्या भाळी चदनाचा टिळा लावला जातो उजेडासाठी मशाली पाजळलेल्या असतात आणि वाद्याच्या गजरात कार्यक्रम चालू असतो. या नृत्याच्या वेळी बहुधा रामायण-महाभारत यातील कथाभागावर आधारभूत प्रसग असतात. या नृत्यासाठी प्राथमिक तालमी घेऊन प्रयोग ठाकठीक बसविलेले असतात. कित्येकदा शेजारच्या गावातील नर्तक आपला कार्यक्रम अशा वेळी करतात किंवा त्याना बोलाविण्यातही येते

नृत्यामधील दुसरा प्रकार म्हणजे छायाचित्रे ( Shadow Play ) होत या सस्कृतीमधील हा कार्यक्रमसुद्धा आकर्षक असतो त्याना ' वायांग ' ( Wayang ) म्हणतात एका साध्या दिव्याच्या साथेने पडद्यावर चित्रांच्या आकृति पाडून हा कार्यक्रम सादर केला जातो.

नृत्याचा तिसरा प्रकार म्हणजे सघयाग ( Sanghyang ) नृत्य होय विशेषतः पर्वतावर काही ठिकाणी हे नृत्य पाहावयास मिळते आणि ते नेहमी रात्रीचे होते. दोन लहान मुली अगावर फुलाचे अलकार घालून हे नृत्य एकाग्रतेने करतात प्रेक्षकाना वाटते की, त्याच्या अगात देवताचा सचारच झालेला आहे. एक वृद्ध बाई गाणे म्हणत असते आणि त्या तालावर या दोन मुली डोळे मिटून नृत्य करतात. शरीर लवविण्याचे अनेक प्रकार त्या या वेळी करून, शेवटी पेटत्या निखाऱ्यावरून चालत जातात. देवाचा पुजारी पाण्याचे भांडे

त्यांच्यासमोर धरून देवतास्वरूप त्या पाण्यात उतरावे म्हणून विनंती करतो. त्याच्या एकंदर अविर्भावावरून त्यात काही मंत्रतंत्र, जादूटोणा असावा, असे प्रथमदर्शनी वाटते, पण तसे नसून ते एक नेत्र मिटून कुशलतेने करावयाचे नृत्य असते.

भुतेखेते

यांना ते लेयक ( Leyaks ) म्हणतात. ते रात्री वावरते, अग्नीज्वालेमध्ये नाचते, स्मशानात राहून नवीन पुरलेल्या प्रेतावर आपला चरितार्थ चालविते. ते वाटेल त्या रूपात जगात वावरते. एखादे वेळी रस्त्यावर गाडी हाकणाऱ्याशिवाय देखील ते गाडी चालवू शकते. बाली लोक त्याच्या नावाचा उच्चारही करण्यासही भितात. त्याच्या नांवाचे अनेक पुतळे उभारलेले असून त्या ठिकाणी त्याना खाणेपिणे दिले जाते. देवतांपेक्षासुद्धा या योनीतील प्राण्याना माणसे घाबरतात. ज्याला या जीवात्म्यावर ताबा मिळवायचा आहे, तो स्मशानात राहून तीन महिने-पर्यंत रात्रीच्या वेळी त्यांची आराधना करतो, शेवटी त्यांना विपुल खाद्यपदार्थ देऊन तो त्या विद्येचा अधिकारी बनतो. नंतर तो एकटाच राहून जादुगार म्हणून अनेकांचे हितअहित तो या विद्येने साधू शकतो.

परंतु या विद्येमुळे एखादा रोगी बनला तर वैदान्दाजवळ त्याची मात्रा असते. तो सर्व दुष्परिणाम निवारण करू शकतो. त्यांना ताईत देतो. त्यामध्ये कोको-बिया, जुळे केळे, कापूर, फुलावरून खाली गळलेले पावसाचे पाणी अथवा धातूच्या पत्र्यावर कोरलेले ताईत, सर्पाची लाळ, इत्यादि वस्तूंच्या साहाय्याने तो उपाय योजतो.

पावित्र्य

मंदिरातील कार्यक्रम किती पावित्र्याने केले जातात ते आपण वर पाहिलेच आहे. सोयरसुतक असल्यास कोणी मंदिरात जाणार नाहीत. तसेच स्त्री मासिक पाळीमध्ये असेल तर मंदिरात जाणार नाही. मंदिरातील पुरोहितांना किती कठीण परिस्थितीत रहावे लागते तेही पाहिले आहे. प्रथमदर्शनी स्त्रीवर्ग, मग तो कोणत्याही वर्णाचा असो, उघडया छातीने सर्वत्र फिरताना इतरांना चमत्कारिक वाटते, परंतु संवयीने त्यांच्या दृष्टिकोनांत बदल होतो. चोळी घालणारा वर्ग म्हणजे वेश्याव्यवसाय करणाऱ्या स्त्रिया होत. इंडोनेशिया सरकारने कायद्याने कंचुकी घालणे आवश्यक ठरविले आहे आणि शहरी स्त्रिया क्वचित त्याचा उपयोग करू लागल्या आहेत. परंतु ग्रामीण भागात अद्यापि प्राचीन रूढीच अस्तित्वात आहे. येथील स्त्रिया जरी अशा अर्धनग्न अवस्थेत समाजात वावरत असल्या तरी कोणी पापी नजरेने त्यांच्याकडे पाहाणार न[illegible]ी पक्की स्त्री प[illegible] झोपलेले

आदळणारही नाहीत, स्त्रीच्या देहाला इतकेच काय पण हातालाही पुरुषवर्ग स्पर्श करणार नाही अथवा एकत्र खेळणार नाहीत. इतकी कडक शिस्त आहे म्हणूनच अजूनही समाजधारणा मजबूत व प्राचीन रूढींना अनुकूलच आहे.

### उत्सवसमाप्ती

पाहुण्या देवताना निरोप दिल्यावर सर्व मंडळी पुन्हा मंदिराच्या दालनात येतात. मुखवट्यावर ज्या देवतांच्या लहान मूर्ति ठेवलेल्या असतात त्या पेटान्दा काढून घेतो. त्याना पूर्ववत् कापडात गुंडाळतो, नंतर शिडीवर चढून ती पेटी पूर्ववत जाग्यावर ठेवतो. मुखवट्याचा साज उतरवून फलक मोकळे करतात. येथे आपण हे ध्यानात घेतले पाहिजे की, मुखवटा म्हणजे देव नव्हे. देवतास्वरूप त्यामध्ये मंत्राचे आवाहन करून आणावे लागते हे आपण वर पाहिलेच आहे. मुखवटा धातूचा असो वा पाषाणाचा असो वा मातीचा असो, तो ज्या देवतास्वरूपाचा असेल त्याला भक्तिभावाने अर्पण केलेली पूजा पावते या संबंधी एक मराठी कवि म्हणतो—

> केला मातीचा गणपती । परी माती नव्हे गणपती ॥
> माती मातीमाजीं सामावें । पूजा गणपतिसी पावे ॥ १ ॥
> केला मातीचा पशुपती । परी माती नव्हे पशुपती ॥
> माती मातीमाजीं सामावे । पूजा शंकरासी पावे ॥ २ ॥

तेव्हा पूजेचे माध्यम कोणतेही असले तरी पूजन त्या त्या देवतेला पोहोंचते हाच या कवितेचा भावार्थ होय. नंतर सर्व सामानसुमान जाग्यावर ठेवले जाते अथवा घरोघर पोहोंचविले जाते. मंदिर झाडून साफ केले जाते, दरवाजे बंद होतात आणि लोक घरोघर परत जातात.

मुख्य मूर्तीचा पूजाविधि झाल्यावर ती कापडात गुंडाळून पुन्हा पूर्ववत् पेटीमध्ये ठेवली जाते, ही पण भारतीय संस्कृतीच होय. *श्रीमद् भागवताची* वल्लभाचार्यकृत जी संस्कृत चूर्णिका आहे, त्यामध्ये याचप्रमाणे विधि सांगितलेला आहे, तो भाग असा की, ' ततस्तन्मयात्मानं ध्यायन् निर्माल्य शिरस्याधाय देव देहे मूर्ति मंदिरे करंडादिषु वा संस्थाप्य पूजाविधिं समापयेत । '

(अ. ३/४९-५३)

### अंत्यविधि समारंभ

या संस्कृतीमधील प्रेतयात्रा जरा रहस्यमयच आहे. तेव्हा थोडक्यातच त्याचा परामर्ष घेऊ. या संस्कृतीमध्ये पुनर्जन्माचे तत्त्व मानतात. कारण मानवांनी जर जिवतपणी उत्तम कृत्ये केली तर मृत्यूनंतर त्याला उत्तम गति मिळते.

रमणीयाचरणं कुर्वन्तो रमणीयां योनिमारोहन् ।
कपूयाचरणं कूर्वन्तः कपूयां योनिमारोहन् ॥

( छांदोग्य उपनिषद )

नाहीतर एरव्ही वाघ, सिंह, कुत्रा ही पशुयोनी मृत्यूनंतर जीवात्म्याला प्राप्त होते. मरणकाळापासून दहनकाळापर्यंत आत्मा घराभोवती घुटमळत राहतो. त्याच्या मार्गदर्शनासाठी मृत्यूनंतर घरासमोर दोन बांबू उभे करून त्यावर दिवे लावण्यात येतात. मृत्यु झाल्यावर सर्वांनाच एकदम दहन मिळत नाही. कारण ते काम फार खर्चाचे असल्याने सामान्य माणसाला परवडत नाही. कालांतराने अशी प्रेते सामुदायिक रीतीने जाळतात. असे जर आहे, तर मृत्यु आल्याबरोबर प्रेताचे काय करतात? मृत्यु झाला म्हणजे चारपाच दिवस प्रेत घरात ठेवून देतात, कारण त्यामुळे नातेवाईक व इतर आप्तेष्टमंडळी समाचाराला येऊ शकतात. घराच्या अंगणात दोन बाबूंची कुंडें करतात. एक दफन-देवता प्रजापतीच्या नावाने आणि दुसरे सूर्यदेवतेच्या नावाने. या सुमारास शेजारपाजारचे लोक डोक्यावरून भेटी आणतात आणि घराच्या कोपऱ्यात रचून ठेवतात. मृत्यूनंतर सुतक पाळले जाते आणि ती कुटुंबे मंदिरात जात नाहीत. हा विधि तीन प्रकारचा असतो. तो म्हणजे ' उत्तम ' ब्राह्मणवर्गासाठी आणि क्षत्रियवर्गासाठी, ' मध्यम ' मध्यमवर्गासाठी आणि ' नीच ' शूद्रांसाठी, जो सर्वांत कमी खर्चाचा असतो.

पांचव्या दिवशी प्रेताला स्नान घालतात, केस विंचरून त्याला तेल लावले जाते, कानशीने त्याचे दात घासले जातात. वास्तविक हा विधि लग्नाच्या वेळी अगर त्या अगोदर करतात. पण जर एखाद्याचा करावयाचा राहिला असेल तर तो या वेळी करावा लागतो. शेवटी त्याच्या अंगाला तांदुळाचे पीठ, मद्य, मीठ, मसाला व चंदनाची भुकी याचे मिश्रण करून चोपडतात आणि त्यामुळे अंगाला येणारी दुर्गंधी कमी होते. प्रेताच्या हातापायांचे अंगठे दोरीने एकत्र बांधले जातात. पेदान्दा त्या ठिकाणी येतो आणि फुटके आरशाचे तुकडे डोळ्यांवर, लोखंडाचा कीस दातांवर, जास्वंदफुले नाकपुडीत, सुवर्णाची अंगठी तोंडात आणि हातापायाच्या ठिकाणी लोखंडी खिळे ठोकून देतो. याचा अर्थ ते असा सांगतात की, यामुळे त्याचा आत्मा उत्तम गतीला पोहोचतो. त्याचे नेत्र आरशासारखे चकचकीत राहतील, दात लोखंडाप्रमाणे मजबूत होतील. नेहमी श्वासाबरोबर उत्तम सुवास येईल आणि हातपाय लोखंडाप्रमाणे कामकाजाला मजबूत होतील. या प्रक्रियेशी मानवाच्या निरीक्षण बुद्धीतून निर्माण झालेला सूक्ष्म असा वैज्ञानिक

कार्यकारणभाव आहे, हे लक्षात घेता, जीवनाच्या उत्क्रांतीचा अभ्यास करणाऱ्यांना या बारीकसारीक गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या वाटतील. राष्ट्राराष्ट्रातील संस्कृतीचे दुवे अशाच बारीकसारीक गोष्टींच्या नाजूक धाग्यांनी एकत्र गुंफले जातात म्हणून समाजशास्त्राच्या दृष्टीनेही या गोष्टींचे महत्त्व आहे असे मला वाटते.

भारतीय अश्वलायन सूत्राप्रमाणे मृताच्या नाकपुड्यावर स्रुवापात्रे, कानावर प्रशिहरण पात्रे, उपस्थानावर शम्यापात्र, दोन्ही मांड्यांवर अरणी, उजव्या गुडघ्यावर उखळ आणि डाव्यावर मुसळ इत्यादि ठेवण्याचा नियम सांगितला आहेच.

त्यानंतर एक अंडे घेऊन ते सर्व उघड्या शरीरावर फिरविले जाते. यानंतर तो देह लवलचर कापडामध्ये घट्ट गुंडाळून दोऱ्यांनी बांधला जातो. त्यावर साडाच्या पानाचे वेष्टन घालून, पुन्हा कापड गुंडाळून बांबूच्या शवपेटीमध्ये ते ठेवतात. वाजतगाजत ते प्रेत स्मशानात नेऊन दोन फूट खड्डा करून त्यात पुरून टाकतात आणि माणसे घरी परत येतात. येथे हे लक्षात ठेवले पाहिजे की, पुरणे हा अंतिम विधि नव्हे, कारण योग्य वेळी ते पुन्हा उकरावयाचे असते.

पुढे त्या मयताच्या वारसांनी दफनासाठी पैसा जमविला, पेदान्दाकडून शुभदिवस मिळविला आणि एखाद्या श्रीमंत माणसाचे दफन अथवा सामुदायिक दफन व्हावयाचा दिवस ठरला म्हणजे पुढची क्रिया चालू होते. दफनाचा एकंदर खर्च सुमारे २५ हजार रुपये अथवा त्याहून जास्तही होतो आणि तो ज्याप्रकारचे पवित्र जल वापरले जाईल त्यावर अवलंबून असतो. (याशिवाय आप्तेष्टांना अनेक भोजने अनेक दिवस द्यावी लागतात). हे पवित्र जल उत्तरेकडील स्तिमनी पर्वतावरील बाटूर सरोवरातून आणावे लागते. आणणारा माणूस ते तेथून घेताना तळ्यात किंमत म्हणून काही नाणी टाकतो. (राजपुताना भागात वहिभाट नावाची उच्चवर्णीय जात आहे. सर्पाची वंशावळ ती सांगते. यापैकी एखादा जर विहिरीवर पाणी प्याला तर तेथे काही पैसे ठेवूनच मग ते पुढे जातात. तात्पर्य हेच की, कोणतीही वस्तु विनामूल्य घेऊ नये हाच त्यांचा उद्देश असतो); शिवाय शवपेटी बनविण्यालाही फार खर्च येतो. त्यासाठी घराबाहेर छप्पर घालून कारागिर बांबूची शवपेटी बनविण्याला पंधरवडाही घेतात. या पेट्या बनविणारे कारागिर कुशल असतात. ब्राह्मणवर्गाला बैल, 'वृषभो दक्षिणा' म्हणजे ब्राह्मणाला बैल दक्षिणा द्यावी असे अश्वलायन सूत्र १४।९ वचन आहे. क्षत्रियाला पंखवाला सिंह, वैश्याला हरिण आणि क्षुद्राला अर्धा हत्ती व अर्धा मासा या आकाराच्या शवपेट्या सांगितलेल्या आहेत. काही वेळा क्षत्रिय, वैश्य यांनी बैलाची शवपेटी बनविली तरी चालते. या शवपेट्यांमध्ये प्रेते

ठेवण्याची जागा असते. पेटीची आकृति अगदी हुबेहूब त्या जनावराइतकी कुशलतेने काढतात.

दफनाचा दिवस ठरला म्हणजे नातेवाईक लोक स्मशानात जातात आणि आपापल्या मृताची प्रेते उकरून मिळतील तेवढ्या अस्थी बाहेर काढून घरी आणून एका चंदनाच्या फलकावर त्याच्या पुन्हा प्रतिकृति तयार करतात. त्याना उकूर ( Ukur ) म्हणतात, अथवा अगेनन ( Angenan ) असेही म्हणतात. हाडे एकमेकाना जोडून शरीरातील शिरा व नाड्या यासाठी दोऱ्याचा उपयोग करून, नारळामध्ये तांदूळ घालतात व तो हृदयाच्या ठिकाणी ठेवतात. हृदयाशी संपर्क साधण्यासाठी त्याला एक काठी बांधून त्याच्या दुसऱ्या टोकाला अंड्याच्या कवचात तेलवात ठेवतात. या प्रतिकृतीवर पवित्र जलाचे सिंचन होते. पण या मध्ये जीवात्मा आणण्यासाठी ती प्रतिकृति स्मशानात नेऊन तेथे खड्ड्याच्या आसपास पुन्हा खणणे चालले असताना सर्वजण एकत्र जमून मोठ्याने पुष्कळ वेळ आक्रोश करतात 'माई, माई' म्हणजे 'आत्म्या, लवकर ये, लवकर ये' असा त्याचा एकसारखा गोंगाट चालू असतो. दुष्ट प्रवृत्तींचे जीवात्मे दूर ठेवण्यासाठी काही नाणी आजूबाजूला गवतावर फेकली जातात. हा आक्रोश चालला असताना अंड्याच्या कवचातील तेलवात कोणीतरी पाजळतो आणि आत्मा परत आला आहे असे पेदान्दा लोकाना सांगतो. नंतर सर्वजण त्या प्रेताच्या प्रतिकृतीसह परत येतात. पति अगर पत्नी जर पूर्वी मृत झाली असेल तर त्याच्या प्रतिकृति एकदमच दहनास नेतात लिंगदेह हा खाचेत पार्थिव देहाला अग्निसंस्कार होईपर्यंत पडून राहातो आणि त्यानंतर खाचेतून निघून धुराबरोबर स्वर्गलोकी जातो असे श्रुतिवचन आहे. ( अश्वलायन, ४।८ )

सामुदायिक दहनयात्रा

वर सांगितल्याप्रमाणे शवपेट्या तयार झाल्या म्हणजे या प्रेतांच्या प्रतिकृति त्यामध्ये घालून सार्वत्रिक मिरवणूक, शुभदिवशी वाद्यवृंदाच्या घोषत निघते. यातील मंडळी पांढरा झगा, हिरव्या विजारी घालून दुर्गादेवीला अर्पण करण्यासाठी नैवेद्य घेऊन जात असतात. ही देवता पृथ्वीदेवीसमान असून मृत्युसमयी तिला तृप्त करावयाची असते. ( भारतामध्येही स्मशानात दुर्गादेवी असते आणि त्यावरूनच चौदाव्या शतकातील दुर्गाडीचा अथवा दुर्गादेवीचा दुष्काळ प्रसिद्ध आहे ) शवपेटीचे मनोरे सुरक आणि सांपत्तिक स्थितीनुसार अकरा माळ्यापर्यंत उंच असतात.[1] घोडा-बैलाच्या आकृति आठ फूट उंचीच्या असून त्याच्या पोट

१. भारतामध्ये मोहरम सणाच्या शेवटी तानूत मिरवणूक निघते. त्या वेळी हे डोले असेच उंच उंच तयार करतात. ही सुद्धा मृताचीच मिरवणूक असते.

आणि पाठीच्या मधील भागत प्रेताच्या प्रतिकृति ठेवलेल्या असतात. प्रेतयात्रेच्या वेळी पैसे उधळले जातात, तसेच काही फळे उधळली जातात, तीर्थाचे सिंचनही होत असते. हे तीर्थ दोन प्रकारचे असते ' तोय पजट ' म्हणजे तादुळाचे पिवळे पाणी आणि चदनाची भुकी यांपासून सर्वसाधारण लोकासाठी तयार केलेले आणि ' तोय-अमृत ' म्हणजे ज्याने पुनर्जन्म टळतो व जे देवताप्रीत्यर्थ वापरले जाते ते. या मिरवणुकीमध्ये काळे कपडे परिधान करून काहींचे नृत्य चालू असते, त्यामध्ये देव व दानवाची युद्धे प्रतिकात्मक रीतीने दाखवितात. पण त्यात शेवटी देवाचा विजय होतो, म्हणजे प्रेते राक्षसाना खावयास मिळत नाहीत असा भावार्थ. या यात्रेच्या वेळी फटाके उडविले जातात व नाणी फेकली जातात, त्यामुळे भुतेखेते दूर राहतात अशी श्रद्धा आहे. स्मशानात पोहोचल्यावर नातेवाईक प्रेताला प्रदक्षिणा घालून एकेक लाकूट त्याच्या शवपेटी खाली ठेवतात. काड्याच्या पेटीने विस्तव न पेटवता सूर्याच्या किरणाद्वारे तो पेटवितात अथवा दोन लाकडे एकमेकावर घासून तो पेटवितात. या पवित्र अग्नीने प्रेताचे दहन करतात. दहन सुरू झाले म्हणजे लोकाना तबाकू, सुपारी, मद्य दिले जाते आणि त्याच्या गप्पागोष्टी चालतात. पेदान्दा मत्र म्हणून सर्वांवर पवित्र जल शिंपडीत असतो. अग्नीने एकदा मनोऱ्याला स्पर्श केला म्हणजे काही लोक त्यावरील मौल्यवान कपडे ओढून घरी घेऊन जातात एका काठीला बाधलेल्या दोन कोंबड्याना सोडून देण्यात येते आणि त्या उडून जातात. म्हणजे जीवात्मेही असेच निघून गेले असे मानतात. या सार्वजनिक दहनामुळे आकाश धुराच्या लोटानी भरून जाते अशा प्रकारे शवपेटया जळाल्यानतर त्यावर पाणी ओतून मिळतील त्या अस्थि अथवा रक्षा जमा करून एका मातीच्या भाड्यात घालून सागराकडे नेतात.

मुसंचितं संचित्य पवनेन सम्यूय ।

म्हणजे अस्थी नीट वेचून कुभात ठेवल्यावर चिताभस्म सुपाने पाखडतात. अस्थींचा कलश बाबूच्या एका ताटीवर ठेवतात आणि वाद्यासह मिरवणूक चालते. समुद्राच्या गुडघाभर पाण्यात गेल्यावर ती रक्षा पाण्यावर पसरतात. पेदान्दा मत्राचे पठण करीत असतो आणि सागराला प्रार्थना करतो की, ' ही रक्षा तू आपल्या विशाल उदरात चिरतन सामावून ठेव. ' नतर सर्वजण स्नान करून दु:खी अंत:करणाने घरी येतात

## गोल अथवा चौकोनी विहिरी

सन १९४७ साली भारतामध्ये म्हैसूर प्राती ब्रह्मगिरी येथे उत्खनन करण्यात आले. त्या वेळी अश्मयुगातील वरील प्रकारच्या विहिरी आढळून आल्या. १६ ते २१ फुटाची गोल विहीर अथवा ७ × ५ × ६ फूट चौकोनी विहीर

ठेवण्याची जागा असते. पेटीची आकृति अगदी हुबेहूब रान्या जनावराइतकी कुशलतेने काढतात.

दफनाचा दिवस ठरला म्हणजे नातेवाईक लोक स्मशानात जातात आणि आपापल्या मृतांची प्रेते उकरून मिळतील तेवढ्या अस्थी बाहेर काढून घरी आणून एका चंदनाच्या फलकावर त्याच्या पुन्हा प्रतिकृति तयार करतात. त्यांना उकूर ( Ukur ) म्हणतात, अथवा अंगेनन ( Angenan ) असेही म्हणतात. हाडे एकमेकांना जोडून शरीरातील शिरा व नाड्या यांसाठी दोऱ्यांचा उपयोग करून, नारळामध्ये तांदूळ घालतात व तो हृदयाच्या ठिकाणी ठेवतात. हृदयाशी संपर्क साधण्यासाठी त्याला एक काठी बांधून त्याच्या दुसऱ्या टोकाला अड्याच्या कवचात तेलवात ठेवतात. या प्रतिकृतीवर पवित्र जलाचे सिंचन होते. पण या-मध्ये जीवात्मा आणण्यासाठी ती प्रतिकृति स्मशानात नेऊन तेथे खड्ड्याच्या आसपास पुन्हा खणणे चालले असताना सर्वजण एकत्र जमून मोठ्याने पुष्कळ वेळ आक्रोश करतात. 'माई, माई' म्हणजे 'आत्म्या, लवकर ये, लवकर ये' असा त्याचा एकसारखा गोंगाट चालू असतो. दुष्ट प्रवृत्तींचे जीवात्मे दूर ठेवण्यासाठी काही नाणी आजूबाजूला गवतावर फेकली जातात. हा आक्रोश चालला असताना अड्याच्या कवचातील तेलवात कोणीतरी पाजळतो आणि आत्मा परत आला आहे असे पेदान्दा लोकांना सांगतो. नंतर सर्वजण त्या प्रेताच्या प्रतिकृतीसह परत येतात. पति अगर पत्नी जर पूर्वी मृत झाली असेल तर त्याच्या प्रतिकृति एकदमच दहनास नेतात. लिंगदेह हा राखेत पार्थिव देहाला अग्निसंस्कार होईपर्यंत पडून राहातो आणि त्यानंतर राखेतून निघून धुरासरोबर स्वर्गलोकी जातो असे श्रुतिवचन आहे. ( अश्वलायन, ४।८ )

## सामुदायिक दहनयात्रा

वर सांगितल्याप्रमाणे शवपेट्या तयार झाल्या म्हणजे या प्रेताच्या प्रतिकृति त्यामध्ये घालून सार्वत्रिक मिरवणूक, शुभदिवशी वाद्यवृंदाच्या सोबत निघते. यातील मंडळी पांढरा झगा, हिरव्या विजारी घालून दुर्गादेवीला अर्पण करण्या-साठी नैवेद्य घेऊन जात असतात. ही देवता पृथ्वीदेवीसमान असून मृत्युसमयी तिला तृप्त करावयाची असते. ( भारतामध्येही स्मशानात दुर्गादेवी असते आणि त्यावरूनच चौदाव्या शतकातील दुर्गाडीचा अथवा दुर्गादेवीचा दुष्काळ प्रसिद्ध आहे ). शवपेटीचे मनोरे सुबक आणि आपापल्या स्थितीनुसार अकरा माळ्यापर्यंत उंच असतात.[१] घोडा-बैलाच्या आकृति आठ फूट उंचीच्या असून त्याच्या पोट

१. भारतामध्ये मोहरम सणाच्या शेवटी ताबूत मिरवणूक निघते. त्या वेळी हे डोले असेच उंच उंच तयार करतात. ही सुद्धा मृताचीच मिरवणूक असते.

आणि पाठीच्या मधील भागात प्रेताच्या प्रतिकृति ठेवलेल्या असतात. प्रेतयात्रेच्या वेळी पैसे उधळले जातात, तसेच काही फळे उधळली जातात, तीर्थांचे सिंचनही होत असते. हे तीर्थ दोन प्रकारचे असते ' तोय-पंजंट ' म्हणजे तांदुळाचे पिवळे पाणी आणि चंदनाची भुकी यांपासून सर्वसाधारण लोकांसाठी तयार केलेले आणि ' तोय-अमृत ' म्हणजे ज्याने पुनर्जन्म टळतो व जे देवताप्रीत्यर्थ वापरले जाते ते. या मिरवणुकीमध्ये काळे कपडे परिधान करून काहींचे नृत्य चालू असते. त्यामध्ये देव व दानवांची युद्धे प्रतिकात्मक रीतीनें दाखवितात. पण त्यात शेवटी देवांचा विजय होतो, म्हणजे प्रेते राक्षसाना खावयास मिळत नाहीत असा भावार्थ. या यात्रेच्या वेळी फटाके उडविले जातात व नाणी फेकली जातात, त्यामुळे भुतेखेते दूर राहतात अशी श्रद्धा आहे. स्मशानात पोहोचल्यावर नातेवाईक प्रेताला प्रदक्षिणा घालून एकेक लाकूड त्याच्या शवपेटी खाली ठेवतात. काड्याच्या पेटीने विस्तव न पेटवता सूर्याच्या किरणाद्वारे तो पेटवितात अथवा दोन लाकडे एकमेकांवर घासून तो पेटवितात. या पवित्र अग्नीने प्रेताचे दहन करतात. दहन सुरू झाले म्हणजे लोकांना तंबाकू, सुपारी, मद्य दिले जाते आणि त्यांच्या गप्पागोष्टी चालतात. पेदान्दा मंत्र म्हणून सर्वांवर पवित्र जल शिंपडीत असतो. अग्नीने एकदा मनोऱ्याला स्पर्श केला म्हणजे काही लोक त्यावरील मौल्यवान कपडे ओढून घरी घेऊन जातात. एका काठीला बांधलेल्या दोन कोंबड्याना सोडून देण्यांत येते आणि त्या उडून जातात. म्हणजे जीवात्मेही असेच निघून गेले असे मानतात. या सार्वजनिक दहनामुळे आकाश धुराच्या लोटांनी भरून जाते. अशा प्रकारे शवपेट्या जळाल्यानंतर त्यावर पाणी ओतून मिळतील त्या अस्थि अथवा रक्षा जमा करून एका मातीच्या भांड्यात घालून सागराकडे नेतात.

सुसंचितं संचित्य पवनेन सम्यूय ।

म्हणजे अस्थी नीट वेचून कुंभांत ठेवल्यावर चिताभस्म सुपाने पाखडतात. अस्थींचा कलश बांबूच्या एका ताटीवर ठेवतात आणि वाद्यांसह मिरवणूक चालते. समुद्राच्या गुडघाभर पाण्यात गेल्यावर ती रक्षा पाण्यावर पसरतात. पेदान्दा मंत्रांचे पठण करीत असतो आणि सागराला प्रार्थना करतो की, ' ही रक्षा तू आपल्या विशाल उदरात चिरंतन सामावून ठेव. ' नंतर सर्वजण स्नान करून दुःखी अंतःकरणाने घरी येतात.

## गोल अथवा चौकोनी विहिरी

सन १९४७ साली भारतामध्ये म्हैसूर प्रांती ब्रह्मगिरी येथे उत्खनन करण्यात आले. त्या वेळी अश्मयुगातील वरील प्रकारच्या विहिरी आढळून आल्या. १६ ते २१ फुटांची गोल विहीर अथवा ७ × ५ × ६ फूट चौकोनी विहीर

होती. यामध्ये मानवी देहपंजराच्या अस्थी, मुडकी, मातीची भांडी, लोखंडी वस्तु, मणी, बांगड्या, दात, शिंपले इ० वस्तु आढळल्या. साधारणतः सनपूर्व चवथ्या शतकातील या निहिरी असाव्यात, असा शास्त्रज्ञांचा अंदाज आहे. यामध्ये जी नाणी सापडली ती पण सन पूर्वीचीच आहेत. चिंगलपेट, हैदराबाद, पुदुकोटा इ० दक्षिणेतील शहरी अशा प्रकारच्या निहिरी आढळल्या. येथे जे अस्थींचे अवशेष मिळाले त्यावरून असे अनुमान करण्यात आले आहे की, ते अवशेष या निहिरीमध्ये ठेवण्यापूर्वी, अन्य ठिकाणी काही काळ पुरले गेले असले पाहिजेत. किंबहुना वाळविले गेले असले पाहिजेत आणि नंतरच या ठिकाणी ठेवण्यात आले.

सांप्रतही बस्तर संस्थानातील मरिया गोंडजमात, ओरिसामधील गादोब जमात, छोटानागपूरकडील मुंडजमात आणि आसाममधील खासिया, नागा जमाती मृताचे अवशेष याच प्रकाराने जतन करून ठेवतात.

भारतामधून अतिप्राचीन काळी ज्या वसाहतवाल्यांनी स्थलांतर केले, त्यांचेच वंशज आज बाली बेटात आहेत आणि पूर्वीच्याच रूढि थोड्याफार फरकाने आजही चालू आहेत, हे निश्चितपणे दिसून येते.

( भारतीय पुराणवस्तु ग्रंथ, पृ. ४२ )

वरील विवरणावरून आणि भारतीय धर्मशास्त्राच्या आधारावरून मला असे दाखवावयाचे आहे की, अतिप्राचीन भारतीय संस्कृति आज बाली बेटात नांदत असून आधुनिक भारतीय संस्कृतीवर काही सुधारणावादी संस्कार झालेले असावेत असे आजच्या पौरोहित्य विधींवरून दिसून येते.

या बाली प्रकरणात देवतांच्या आविष्कारापेक्षा, देवतांचे उत्सव, समारंभ व काही सामाजिक रूढि यांवरच भर दिला गेला आहे, त्याची मीमांसा लक्षात यावी यासाठी जाणीव आहे, पण सांप्रतची बालीसंस्कृति म्हणजे पूर्वीची भारतीय संस्कृति होय हे दर्शविण्यासाठी त्याचा ऊहापोह करणे आवश्यक होते, हे वाचकांनी ध्यानी घ्यावे.

## बालीसंस्कृति आधारग्रंथ


1 Bali Temples and Festivals by Gane Belo
2 Bliss in Bali by Gacques Chegory.
3 Bali, Enchanted Isle by Hellen Eva Yates
4 Bali Dvipa by Swamy Sadanand


---

# वाचकांना नम्र निवेदन

देवीकोश ग्रंथाचे वाचन करणारे भाविक जनहो, सुमारे १५ वर्षांपूर्वी कोणत्याही पूर्वसंस्काराविना, आदिशक्ति जगदंबा देवीच्या कृपाप्रेरणेने या अति-विशाल शक्तितत्त्वाचे संकलन करण्याची महत्त्वाची कामगिरी माझ्याकडे आली. मी एकाकी राहून, प्रयत्नाची शिकस्त करून जेवढे संकलन करता आले, तेवढे आर्थिक संकटांची पर्वा न करता आपल्यापुढे माडले व आपण सर्वांनी त्याचे मनसोक्त कौतुक केले, याबद्दल मी शतशः ऋणी आहे. येथील माहिती संपूर्ण नाही. याची मला पूर्ण जाणीव आहे, पण प्रत्येकाच्या प्रयत्नाला सीमा असतेच ना! अद्यापही यामध्ये संशोधनाला आणि पूर्णत्व येण्याच्या दृष्टीने प्रयत्नवादी माणसाला खूप खूप वाव आहे व तसा कोणी प्रयत्न केल्यास मला आनंदच वाटेल.

डॉ. पी. एन्. जोशी यांनी ग्रंथपरीक्षण करताना म्हटल्याप्रमाणे हा देवीकोश असला, तरी कोशाची माडणी यामध्ये नाही. फक्त निरनिराळ्या दृष्टिकोनातून शक्तितत्त्वाचा आविष्कार वाचकाला घडावा, आर्य संस्कृतीची श्रेष्ठता समजावी, आर्यांच्या प्राचीन प्रसरणकालाचा रम्य इतिहास कळून आल्यावर अभिमान वाटावा, देवतांच्या उत्सव-समारंभाचे व वैभवाचे दर्शन घडावे, शिल्पातील भव्यता व देवताविषयक स्वरूप समजावे, मानवी भावना व समजुती सर्वत्र सारख्याच आहेत हे मनात बिंबावे आणि मानवांनी या दृश्य-अदृश्य शक्तीपुढे सदैव नतमस्तक रहावे, हेच विशद करण्याचा अंतरीचा हेतू होता. तो हेतू कितपत साध्य झाला, याचा निर्णय सुज्ञ वाचकांनीच घ्यावयाचा आहे. आई जगदंबेच्या मनातील हेतू तडीला गेला याबद्दल व देवीकोशकार म्हणून चिरस्मृतीचे भाग्य मला दिले याबद्दल, तिचे चरण-कमल शतशः वंदन करण्यापेक्षा मी अधिक काय करू शकणार? —जय जगदंबे—

# देवी–केकावली

पृथ्वी–वृत्त

ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – – ᴗ –

त्रिकाळजगि आदिशक्ति तळपेचि कार्यान्विता ।
प्रदीर्घ परि राखिते स्वकिय रूपडे मागुता ॥
कुणा करुनिया पुढे करित कारभारीपणा ।
करा धरुनिया करी लिहवि ग्रंथ विस्तारणा ॥ १ ॥

अकल्पनिय स्तोत्रपाठ स्वरूपें किती संस्कृती ।
परी विकट ज्ञान तें सुलभ नाहिं सर्वांप्रती ॥
धरोनि मनिं हेतुतें रचित काव्यग्रंथादिका ।
मिळो सुलभ एकठायिं विखुरें पुराणादिका ॥ २ ॥

कथा विदित वाङ्मयास, मधु-कैटभा मारिसी ।
अघोरपथि जातिही वसत संप्रती भारती ॥
अगा, असुर-वृत्ति उन्नतपणें उफाळी द्रुजां ।
उडी त्वरित घेऊनी निपटि वृत्ति अष्टाभुजा ॥ ३ ॥

उदात्त तव प्रार्थना वदत ग्रंथ सप्तशती ।
जनांसि धनधान्य दे, पुरव कामना आंस ती ॥
मिळो जय सदा, मिळो यश सदा, नको द्वेष तो ।
युगानुयुग भक्ति-पोटिं जनघोष हा चालतो ॥ ४ ॥

समाधिसमयिं सनातन सु-तत्त्व गीता वदे ।
त्यजी दुरित कामना शरण रीघ कृष्णा-पदें ॥
स्वतंत्रपण तें नको, कुटिलवृत्ति ' मी मी ' नको ।
तुही तुहि वदा वदा विनवि अंबिके ही पिको ॥ ५ ॥

कबीर विणि शालजोडि म्हणतो मृडाणीस्तव ।
मनीं खचित जाणतो, अखिल कर्म देवास्तव ॥
ऋषी स्तवन-स्तोत्र, वस्त्र-सम अर्पि देवास हे ।
म्हणोनि मम काव्य-वस्त्र अजि वाहि मातेस हें ॥ ६ ॥

स्व-सत्व हरणीं, मुला कुटुनि चांगुणे घातिला ।
कुळाल तुझवी मुलां भजनिं दंग जइं जाहला ॥
सुभक्तियुत भावनें विनवितां पुन्हां दाविली ।
तशी मरण भीक घाल जननीं तुझ्या भेटिशीं ॥ ७ ॥

अपूर्वतम ग्रंथ धी रचित संत ज्ञानेश्वरू ।
समर्पण करी गुरुपदिं निवृत्ति सिद्धिवरू ॥
वदे मज पसायदान खल सांडु दे व्यंकटीं ।
म्हणोनि तुज प्रार्थना, मजसि देइ ते दान कीं ॥ ८ ॥

तुका तुळित तोळि थोरिव, वदे नको ही नको ।
उपानहचि विठ्ठला चरणिं राहु दे मागतो ॥
अनादि तव रूप त्या, स्वचित पूर्णसे ज्ञान दे ।
रजासम तुझ्या पदीं सतत त्यासि गे लोटुं दे ॥ ९ ॥

विठाइ ति विटाई नाम मुखिं घेत नामा पहा ।
विशुद्धतम भावनें दगड साध्य झाला तया ॥
विशुद्ध मनभावना करि पुनीत गंगाजळे ।
तथैव मम भावना, प्रकटरूप दावी भले ॥ १० ॥

समस्त सुर स्वर्गिचे स्तविति ब्रह्मरूपा जया ।
त्वरे तिडकि तारिसी, हरसि संकटा त्यांचिया ॥
सवाल संसारिचा हरासि तूच दुःखे भये ।
म्हणोनि तुज अंबिके, विनवि वारण्या ताप हे ॥ ११ ॥

नव्या भवन मंदिरीं नविन मूर्ति जइ येतसे ।
तुझ्या प्रथम वंदना, सचित देवसे येतसे ॥
तया समयि ते गमे परमब्रह्म भेटिस ये ।
अशीस तव घेऊनी वसतसे निजस्थानिं गे ॥ १२ ॥

जटी जपतसे जधीं सतत नित्य अष्टोत्तरी ।
खडी सचित सिद्धि-खाण खुलते तयाला तरी ॥
जप स्मरणिं आत्म-शांति मिळते गती उत्तमा ।
नवार्णव-जपांत दुर्लभ तुझ्या दिसे कांहिं ना ॥ १३ ॥

शिळा शिकल शिल्पकार क्षणही गमे थांबला ।
स्वचिति-रत-सायुधी कुशल घांव तो घातला ॥
समाधिस्थित संयमी घडाले मूर्ति ही सुंदर ।
सहर्षपर नाचला, वदुनि सुंदरा सुंदर ॥ १४ ॥

कटू कडक चंडतापि न मिळे मुळी शांतता ।
अकालिन अगांतुकी जलद ओततां सौख्यता ॥
जगी त्रिविध राबतां नच कुठे गमे शांतता ।
कृपाघन स्त्रवून तूं, विनवि देवते दे अतां ॥ १५ ॥

सदैव स्मरणा घडो, भजन कीर्तना आवडो ।
पदच्युति पदी न हो चरण-युग्म सेवा घडो ॥
सगूण गुण कीर्तने गडद आत्मबोधामृते ।
स्तवी सबल अंबिका खचित त्यासि उद्धारिते ॥ १६ ॥

किमर्थ मनिं भेदभाव जन-संत देवामधे ।
रणी मरण देउनी करित देव उद्धार हे ॥
जिगीषु जन-मान्य-संत नच मार्ग हा आचरी ।
कृपा करुनि दाटशी, खलजनाप्रती उद्धरी ॥ १७ ॥

उदात्त तव तत्त्व गे निखिल वस्तु वाटी जनां ।
पुरा परम भक्त तो कधि परोक्ष कीं खाईना ॥
तुझा भरवसा धरी खचित तारिसी कीं तया ।
तुझ्या वरदहस्तिते अचुक पावतो गे जया ॥ १८ ॥

शुभा शुचित भावि उत्तम घडे सदां कर्म तें ।
निकृष्ट-कृश भाविं उत्तम कसे फळां येतसे ॥
पवित्र-तप-दान-यज्ञ समभाव सेवा घडो ।
जळो कपट-दुष्ट-काम सम-भाव सारा गळो ॥ १९ ॥

परात्पर सुभक्त तो कधिं न आर्यक्षी निंदितो ।
तुझे स्वरूप मानुनी दुखविणे, मनी नाणितो ॥
अकर्मेक अनादरुं अनुग्रहां नसे पात्र तो ।
घडे उलट कोपही, त्वरित नामुशी पावतो ॥ २० ॥

अनेक अरि-वीरसें प्रबळसे तुवां ताडिलें ।
नशा-नियति-नीच-भ्रांत-उन्मादिता झाडिले ॥
परोपरि-परायणी पुरुष, पांग त्वां फेडिले ।
यदूपतिपरी वहू विनितभक्त त्वा तारिलें ॥ २१ ॥

अगा अभय कार्य स्फूर्ति मनुजा तुवां अर्पिली ।
प्रदिप्ततम ज्ञानदीप धरिला समोरी तरी ॥
दवाव दश-दुर्गुणी-मनुज हेतु, भासे मला ।
अविंध-रत-वृत्तिनाश दिसतो मला चांगला ॥ २२ ॥

स्वइच्छ सुरस सांपडे शपथ देवतें सांगतो ।
स्तुती-स्तवनिं सामुदायिक तुझ्या सधीं मग्न तो ॥
क्षणो-क्षणिक तेधवां विसर दुःख संसारिचे ।
विदग्ध अभिलाषता अनुभवी समाधी सुखें ॥ २३ ॥

निलंब निज पुष्ट, तुंग-कुच, योग्य देवी तुला ।
त्रिवीध जगतासि पोषण स्वधर्म संतातिला ॥
प्रदीर्घ पयदान पाजुनिच पाडसा पोषितें ।
पयोधर परास पाझरुनि साधका तारितें ॥२४॥

विरंचि-हर-विष्णु पूजित तुझीं सदा पाउलें ।
भिडस्त-मुळि पूजनीं, श्रम उगीच कां वाहुं गे ॥
स्वरूप तव जाणते नच कधी परा सेविती ।
स्वरूपिं तुज जाणते, नच कधीं परां पूजिती ॥२५॥

अति प्रखर चंडताप शिरिं साहताती तरू ।
मलीन बहु जाहलें रचित पर्णपृष्ठावरू ॥
घनांबु शिडकोनि सिंचन करी तया अमृतें ।
श्यामघन दयामृतें मम धुवोत मालिन्य तें ॥२६॥

सुबुद्ध मनिं जाणती नच चुकोचि भोक्तव्यतां ।
तयांसि अनुरूप बुद्धि समयीं तरीं प्राप्तता ॥
अचिंत्य जरि लोटतां, शिरसि खापरा फोडण्या ।
नको मजसि थामना, प्रतिक्षणांत रक्षीं क्षणा ॥ २७ ॥

मदोत्कटहि माउली खचित साधकांची जगी।
चिरायु चरणाश्रये पिकत श्रेष्ठ विद्यानिधी॥
कृपा निखिल वर्षतां बनत सृष्टिधात्राच तो।
निरूपणि तुझ्या रमे सकल श्रुति गात्रांत तो॥२८॥

तुझे चरणिं पूर्ण निष्ठ मजसी अधिष्ठान दे।
असो सतत कार्यनिष्ठ मज कार्य सातत्य दे॥
जरी सतत आर्पिशी, खचित भाग्य निष्ठेस ये।
खरा परम निष्ठवत तरि पाठराखीस ये॥२९॥

सदा सतत दर्शनी मिळत गोडसा गे रसा।
धुवा धुपट सोवळ्या कुटकिं आप काढाचसा॥
ममतिंव झटका नको, चढ उतार प्रेमा नको॥
दयांमृत, दयाबुधे भराति ओहटीही नको॥३०॥

मनोमय मति वृती तवपदी असो यज्ञ कीं।
विचार वच जाप्य हो, नमन कार्य हस्तादिकीं॥
भ्रमतिस प्रदक्षिणा, हवन ते घडो भक्षणी।
प्रणामि परिशुद्ध हो, ह्रदय लागतां मेदिनीं॥३१॥

स्वकामपर कर्म सांधुनि सदैव निष्कामतां।
नितांत-रत कार्यमग्न गति देई सेवाव्रता॥
फलांत नच तृप्ति वांच्छित सुखी स्वकर्मांतरी।
तव स्वरुपि तन्मयी रसुनि कठ डोलो तरी॥ ३२ ॥

अती परिचयी कुणी वदति मान ना मान्यता।
निमूट न खरें सुभक्त आणि देव नात्यास त्यां॥
पुती परिचयांत वाढवित मातृप्रेमा जसा।
तसा सतत नांदु दे मजवरी कृपाधारसा॥ ३३ ॥

खला नयन-तृप्ति देशि जरि मंदिरी पातला।
असो नच असोहि मंदिरी तरी शुभांगे मला॥
अगा, करुणवर्षिणी अणिक भाफ ध्यानीं असो।
सुषुप्ति अवधारणी तव स्वरूप दृष्टी वसो॥ ३४ ॥

न कांहिं परते मिळो, सतत मानवा सेविता ।
परिश्रम जरी दुणे मनिं मिळो समाधानता ॥
दिगंत दरबार हा तव पदीं असो अंबिके ।
चुरो सु-मन हे तिथे जन शिरी धरो धूळ ते ॥ ३५ ॥

नसे अणु अणू उणे भजत भक्तिभावें नरां ।
तुझे चरण संपुटी भरति गे सुखासागरा ।
नव्या नियति नीतिचे नयन दावि मार्गाप्रती ।
सुभाग्य-दिन शोधि मी मज गमे लपे सांप्रती ॥ ३६ ॥

मिळासि मदिरा पितां विसरतो स्वदेहाप्रती ।
प्रमत्त-मद पोरचेष्टिं न स्मरेचि वस्त्रादिकीं ।
लईलुट लुटोनि देखिरस तृप्ति आनंदता ।
रता परम-ब्रह्मी भ्रांति निपजो जिता वा मृता ॥ ३७ ॥

सुत्या भगवती स्तुति सतत गाऊं दे गाऊं दे ।
सुगी मधुर गाऊनि सुखद मार्ग तो दाऊं दे ॥
प्रसाद-पट अंबिके झडकरी धरी वो करीं ।
पुराण-पर पोतहि अढळ ढाळ माझे शिरीं ॥ ३८ ॥

मला विदित भक्त-बाळ-नृप आणि स्त्रीहट्ट तो ।
सदा पुरविलाचि जाय नियमां जगीं जाणतो ॥
करी असुर हट्ट त्यासि शिव सत्वरी पावतो ।
ध्रुवापरिस हट्टभावें तव दर्शना बैसतो ॥ ३९ ॥

गडाड गर्जन गावाशिवि अंबिका अंबिका ।
नवार्णव जपाक्षरीं तव सु-नाम राहो सुखा ॥
मनोजय मनोगती समयिं अंबिके दे निकी ।
अखंड मज प्राप्त होय फलितार्थ कार्यादिकीं ॥ ४० ॥

निकृष्ट-निपटा-निपोटे मनिं छाहि जई कांजि तो ।
अप्राप्य अनपेक्ष अमृतफळासि फेंड त्यागितो ॥
स्वयें समजतां स्वरूप तव मंगळा कां त्यजूं ? ।
सकाम सद्भावित्हीन जन ओंगळा कां भजूं ? ॥ ४१ ॥

जलौघ जिरतां जलांबुधि जली न थांबे करी ।
प्रपुल्लित प्रवाह रोटे दरदरीं तया सागरीं ॥
प्रणाम प्रणति परोपरि पदीं जडूं लागली ।
कशी अवरूं मी तया ? स्वपदि खेचुनी घेतली ॥ ४२ ॥
गमे मजसि अश्रु-शिंपडण आवडे गे तुला ।
दयामृत दयाघना बनवुनी तई ओपला ॥
अनाथ अतिथी सनाथ करि कीर्ति ही नांदते ।
कृपाघन-स्वरूप वाकळ जनीं समा ओढते ॥ ४३ ॥
समग्र समजून रुप मन होई वेडे-पिसे ।
दलाढ्य बहुढंगि जाणुनि पदे तुझीं ध्यातसे ॥
रुतून बसले रुतून बमलें नको ओढुं गे ।
तुझें चरण-खुंटि घोरपड सु-दृढा बांध गे ॥ ४४ ॥
कठीण जगणें मुलांस जरि टांकि माता तया ।
नको मरण त्यापरी म्हणुनि फोडिं टाहो पहा ॥
तुझें हृदय-अंबुधी त्वरित उर्मिही येऊं दे ।
उचंबलुनि वाहुं दे, तव पयामृतें जीवूं दे ॥ ४५ ॥
तपी तल्पमळे तुझ्या निशिदिनी कथासागरीं ।
गृहादि-जन-ग्रामकंटक-कुठार त्यागावरी ॥
मनासि न गमे तुजे विरहवन्हिनें पोळतो ।
तिमीर-घन लोट संचित, तुझें पदीं पाहतो ॥ ४६ ॥
किती दिवस आणखी तळमळूं तुझ्या दर्शना ।
तुझ्या पद-रता नरा उचित नाहि ही वंचना ॥
नको करु नको असे सकल-संग मी त्यागितो ।
निसंग पदिं राहुं दे वरद अंबिके मागतो ॥ ४७ ॥
भगीरथ प्रयत्न अंति न तुटें तुझें अंतर ।
निचिंत नयना पुढें न तरि तोडिसी अंतर ॥
करी अभय तूं करी गळित धैर्य मी होत गे ।
पदांबुज पदामृता त्यजुं कसें कुठें जाऊं गे ॥ ४८ ॥

घडोघडी घटीघडी वय अखंड मी नाशिले ।
रुचीक-रुचि दिव्य-संत उपदेश मी फेंकिले ॥
नको पळहि वाळणें नयन-गोळ हेलावतो ।
चुकी भरुनि नां निघे सतत आसवें गाळतो ॥ ४९ ॥

स्वकीय सुख-संतती, स्व-जनकासि जइं त्यागिते ।
स्वकीय सहचारिणी अनुसरीत त्यां कौतुकें ॥
स्वकीय सुगि-सोयरे सहजची तया वाळिती ।
अशा समयिं अंबिके उघड दार घे हातिं कीं ॥ ५० ॥

नको शिरासि शाल मंदिल तुझी दुशाला नको ।
सुरेंद्र नगरी नको मलिन-द्रव्य-कीर्ती नको ॥
रसाळ रस रंगिला सकस भक्तिचा देइं गे ।
दयार्णव दिगंत स्राव शिरिं अंबिके वाहुं दे ॥ ५१ ॥

मुखामधिं मदोत्कटा गदगदा ध्वनी-घोष दे ।
उचंबळ खळाळुनी नयनिं पूर तो लोटुं दे ॥
मनोघन मनोगती मुसमुशी स्रवूं दे सरी ।
प्रसाद-पट अंबिकें मजवरी करी वो करी ॥ ५२ ॥

नको नजर नर्तकी कराविं रोखुं माझ्यावरी ।
नको कुरखुरी नको कुरटिं कावरी-बावरी ॥
गव्हं गुदमरावयासि इतुकी पुरे चातुरी ।
चुका क्षणिक क्षालना, शरण लीन त्यांमांवरी ॥ ५३ ॥

ह्यासि- हितगूजही मनमुरादसे बोलुं दे ।
अघाविवरि आम्रही दिलखुशी मला सांगु दे ।
गमे झगझगीत झालर बिनीवरी पामर
कटाक्ष करुणाजळें भिजवुनी करी उद्धर ॥ ५४ ॥

गृहीं-जनि स्वसौहृदीं कटु अनूभवे पोळलो ।
म्हणून तर अंबिके, तव-पदीं रमूं लागलो ॥
नको परतवूं, नको परतवू नको लोटुं गे ।
तुझे चरण सेवितां, मरण येऊं दे, येऊं दे ॥ ५५ ॥

वळो मजवरी कृपा सतत वागवी भावनां ।
घडो सतत त्याग हा असुर लोभ द्रव्या मनां ॥
नको विषय सौख्य हें कधि नसेचि तृप्ती जया ।
जडो भगवती तुझें रुचिर-रूप चित्तालया ॥ ५६ ॥

कळो न हित लेकरां, म्हणुनि प्रार्थना मी करी ।
खळो न नयनाश्रुही त्वदिय ध्यान जेव्हां धरी ॥
गळो सकळ राग-लोभ-कटुता कृपा ही करी ।
घडो स्मरण तें सदा चरण-पाद सेवा करी ॥ ५७ ॥

चळो न मन हे जरीं विषय नाचती ही मुतें ।
छळो न मज यापुढें जननि घोर चिंता चितें ॥
जळो अमित घोर पातक जरी असें फार ते ।
झळो मन सदा तुझ्या शुचित दर्शना-अमृतें ॥ ५८ ॥

सुगंध संसारिचा उधळुनि सुखी जाहलो ।
सुदुःस्तर सिंहासनीं तव कृपे जनीं बैसलों ॥
शुभाशकुन योग दर्शनि मिळे जनीं सर्वदा ।
उणेंपण कृपें नसे सतत राहि संतुष्ट गा ॥ ५९ ॥

परात्परहि पुण्यशील पुण्यप्रतापी जरी ।
शिराणि शरणागती सु-गति देवि झाली खरी ॥
नितांत खल-निर्झरी स्व-करिं रक्षणाला उभी ।
कुणांस भिवूं मी तरी? वरदहस्त आई उभी ॥ ६० ॥

दयानिधी दयाघना अमित शक्ति वर्णू किती ।
मदीय मति मंदशी स्फुरलि काव्यपंक्ति प्रती ॥
चुडा चुरूनि मौक्तिका, जडण केली काव्या खरी ।
जलौघ जल-जान्हवी, विनवि देवि मानी वरी ॥ ६१ ॥

अगोचरहि आद्यशक्ति अदिती पुरी जाणली ।
जळीं-स्थळिं-वनांतरी भरूनि पूर्णशी राहिली ॥
कृपीवलहि मातृ-शक्ति मुरमाड भू सेवितो ।
निमज्ज-मनिं, शक्ति-तत्त्व जगिं मींच हाकारितो ॥ ६२ ॥

पढीक-पत-पाहुणे, विनति येत माझें घरां ।
फराळ-फळ अर्पिलें फणस फार काटेरि हां ॥
सुवास-सुख एथ ना, विनवितो पहा फोडुनी ।
वदां स्व-मत आपुले, मधुरसे गरे चाखुनी ॥ ६३ ॥

सु-काव्य मिरवावया खचित गूण ते तीन कीं ।
प्रगल्भ-प्रतिभा, प्रवाहि-रचना नि प्रज्ञामती ॥
क्रमे जशि जनीं-कवीमयुर-ज्ञानदेवा गती ।
वरां विनविती इथें गुण जरी नसें एक कीं ॥ ६४ ॥

सु-शब्द शुभ सौष्ठवादि गुण काव्यरूपा नसे ।
चरित्र गुणवान देविपर पाप-नाशी असे ॥
करोनि श्रवणास साधुजन देति साधू-जनां ।
परी न मिळतां कुणी सतत तेंचि गाती मनां ॥ ६५ ॥

पटाइत नसे कवी परि प्रयत्नवादी खरा ।
सु-संभवचि वाचनी खरखरीत वाटे जरा ॥
तुम्ही रसिक-श्रेष्ठ हो, विनाति गूण घ्यावा बरा ।
कडू कचित भासता विनावितो क्षमा हो करा ॥ ६६ ॥

खळाळुनि खुळावतो हृदयभाव तो मोहरीं ।
वचे वठवितां पुरें बळ नसेचि गे वैखरीं ॥
विशुद्ध मन होतसे खळखळोनि नेत्रांतरीं ।
सुविद्य भवभूति वर्णोनि ठरो फिका अंतरीं ॥ ६७ ॥

समाप्ति आजि ग्रंथ पावत खरी तुझी गे कृपा ।
जगीं बदलत्या क्षणीं कठिण पूर्ण संकल्पता ॥
सुरू करुनि कार्यपूर्ती घडणें अपेक्षा कुणा ? ।
परी मिळत गोड शेवट, तुझी कृपा ही घना ॥ ६८ ॥

कसें प्रवसलें ? कुणी वदविलें ? महाकाव्य हें ।
कुणी मजसुरीं असे ? स्फुरण दिव्यग्रंथा दिलें ? ॥
कसा विसरूं ध्यान तें जननिचे जिवे जागते ?
जहाळ जरची जनी दिसत गौरमामांत जें ॥ ६९ ॥

वसंततिलका

वंदीत नित्य कर जोडुनि सुप्रभातीं ।
शुंभासुरादि खल दैत्य विनाशकर्ती ॥
निर्दाळी दैत्य करिती अडणूक त्याला ।
त्या चंडमुंड महिषासुरमर्दिनीला ॥ ७० ॥

वंदीत नित्य कर जोडुनि सुप्रभातीं ।
चामुंडरूप दिसतें, बहुरूप कांती ॥
जी मोहवि सुरवरादिक इंद्रब्रह्मा ।
कीं तापसी मुनिवरा रत ध्यानब्रह्मा ॥ ७१ ॥

वंदीत नित्य कर जोडुनि सुप्रभातीं ।
गौरी गणेशजननी सुरविघ्नहर्ती ॥
माता म्हणोनि नमना करी स्कंद जीला ।
विघ्नाविनाशी वरदा शुभ देवतेला ॥ ७२ ॥

वंदीत नित्य कर जोडुनि सुप्रभातीं ।
योगी वशिष्ठ प्रतिपाळि जयांसि प्रीती ॥
रक्षितसे सुरभि संकटिं विप्रवर्या ।
जी आद्यशक्ति खपते निजविश्वकार्या ॥ ७३ ॥

वंदीत नित्य कर जोडोनि सुप्रभातीं ।
अष्टभुजाहि महिषासुरमर्दिनी ती ॥
वर्षास ऐशिवरी नांदत भक्त धामीं ।
तें स्थान मुंबईसमीपचि गौरग्रामीं ॥ ७४ ॥

शिखरिणी

न जाणे मंत्रातें कृति नच कळे देवि लवही ।
न जाणे तंत्रातें मन नच वळे यंत्र पदिंही ॥
न जाणे शक्तीतें स्तवनिं न गळे अज्ञपणही ।
सदा दे सद्बुद्धी अनुसर पदो देवि कृति ही ॥ ७५ ॥

न जाणे मी पूजा विपुल मनिं आलस्य जडलें ।
न जाणे कर्तव्या मन विमुख ध्यानिं न रमले ॥
क्षमावंते, माते, सकलजन उद्धार करि ये ।
कु-पुत्रातें देखूं परि नच कु-माता नयनिं ये ॥ ७६ ॥

धरित्री या माते, बहुत तव रूपें विखुरली ।
गणीं गे त्यांते मी मम जननी तूतें वरियली ॥
न शोभे कल्याणी समुचित असा त्याग समये ।
कु-पुत्राते देखूं परि नच कु-माता नयनिं ये ॥ ७७ ॥

जगन्माते अंबे तव चरणपूजा नच घडे ।
मनोभावे सेवा नच प्रचुर वाचा बडबडे ॥
परी माते दृष्टी विलसितही स्नेहार्द्रे वळये ।
कु-पुत्रातें देखूं परि नच कु-माता नयनिं ये ॥ ७८ ॥

सुरां देवा सेवा विविध विधिची मी त्याजियली
निरालंबी लंबोदर जननि तूंते वरियली ॥
मृडाणी रुद्राणी शिवसरि वरि दक्ष तनये ।
कु-पुत्रातें देखूं परि नच कु-माता नयनिं ये ॥ ७९ ॥

सदा आत्मा राहे विलगुनि शरीरा जड जरी ।
सुखादुःखासाही सवंगडि उभा नित्य समरीं ॥
चिताभीतीयुक्ता तव पदिं रिघे अंत्यसमये ।
कु-पुत्रा देखोनी उदरिं जननी ठाव धरि ये ॥ ८० ॥

महामाये मूळे परम विशदे शक्ति अमळे ।
रमा, रम्ये, शांते, सरलहृदये, देवि कमळे ॥
जगन्मूळे, आद्ये, कवि विबुध वन्दे श्रुतिनुतें ।
कृपेवीणें अंबे जगिं अमरता केंवि मिळतें ? ॥ ८१ ॥

## अभंग

अंबामाते तुझी अगाध करणी । असुरमर्दिनी, नमीतसे ॥
महिषासूर जगीं मातला बहूत । देवासी घालीत पायातळीं ॥

कागाळी हो त्यांनी, केली तूझें कानीं । दानवाला रणीं नष्ट करी ॥
मधू कैटभही, धूम्रलोचनही । चंडमुंड तेही निर्दाळीले ॥
कृष्णाजीनंदन वर्णि तूझे बळ । शुंभ नी निशुंभ मारियेले ॥ ८२ ॥

असूर मातले भूमिवरी भारी । तयांना निर्दाळीं अंबामाता ॥
अंतराळामध्ये सुवत्ता तेजाची । तुला ठाव त्याचीं तेजामध्यें ॥
नियंता तो तूज धाडी भूमीवरी । असूरां संहारी, तारी देवां ॥
अंबिका पाहुनी सुरांना आनंद । कृष्णाजि नंदन त्यांत दंग ॥ ८३ ॥

आमुच्या देवता सदा शस्त्रधारी । संकटाते हारी भक्तांचिया ॥
अंबामाते तूझ्या अष्टभुजांतरी । त्रिशुळादि भारी शस्त्रभार ॥
त्रिशूळ फिरवी सांब जेव्हां करीं । थरारे मुरारी ब्रह्मादिक ॥
मुरारीस प्रीय सुदर्शनचक्र । जलांमाजी नक्र उद्धरीला ॥
उद्धरीले जन कोदंडधारीनें । कृष्णाजि-नदन मर्म जाणे ॥ ८४ ॥

रत्नसागरासी देवदानवांनीं । मेरूमांदारानी घुसळिलें ॥
अमोल तीं रत्नें चवदा निघती । वांटणी इच्छिती देवासुर ॥
वांच्छित ते दोघे अमृतरसातें । कलह करी ते तयालागीं ॥
सुरा-अमृतासी देव-दानवाते । मोहिनीरूपाते वांटी हरी ॥
विश्वरूपा मोहे दानव भुलला । भुलुनी सुरेला स्वीकारीती ॥
कृष्णाजी नंदन जाणितो मोहिनी । महाळसा देवि नाम पावें ॥८५॥

दंडकारण्यांत पुण्यपीठ तीन । घडवी दर्शन अंबिकेचे ॥
नासिकाजवळ सप्तशृंगी माता । मूळ आदीमाया सूज्ञ जाणें ॥
महालक्ष्मीसी पहा कोल्हापूरी । तुळजाभवानी तुळजापूरी ॥
रेणुका माहुरी, अंबेची जोगाई । करा हो सगाई भक्त तुम्हीं ॥
मराठ्याची मान ताठ हो भारतीं । कृष्णाजी-नंदन विनवितसे ॥८६॥

## अनुष्टुभ

कवी दुःख कवी जाणे । अन्या का जाणवे कधीं ?
प्रसूतीकाळचें दुःख । वंध्या का जाणते कधीं ?
दृष्टीचें सत्य कर्तव्य । शुभ सर्वत्र पाहाणें ॥
परी ती अशुभें ओढी । कचित् हो शुभगामिनी ॥

दोषांचे गुणरूपाने । गुणी-ग्राहण होऊं दे ॥
गुणाला दोप-रूपानें । पाहतां दोषी तो स्वयें ॥
गुणिजनी गुण वेंचोनी । पावणें सज्जना पदे ॥
येथे दृष्टीस ये दोप । सत्य तो तव दोप रे ॥
बुद्धिवादी सदा वाद । कां खेळां नसल्या गुणी ?
उत्कृष्ट देखि जें येथें । घेवोनी चाल वाढवा ॥
मद्धृदयाधिष्ठिता देवी । काव्य हें वदवीतसे ॥
वृक्षाचें सहजा भावें । मधुरसें फळ येतसे ॥
भावना वाहवी माझी । दुथडी सरिता जशी ॥
लोटोनी नेई ती सर्वां । अश्रद्धा, श्रद्धवानही ॥
मद्रार्चे प्रसवली काव्य । जननी प्रसवते जशी ॥
देविभक्त शिरीं घेती । देविच्या अमृता कथा ॥ ८७ ॥

हरिणी

सुरगुरु परी मोठे मोठे प्रकांडहि पंडिते ।
विवरण विरीं केलें माते, परी नच पूर्ण ते ॥
विविध वल्यीं माया तूझी अगम्य सदा नरां ।
टिपुस टिटवी शोषूं दे ना न अंताहि सागरा ॥ ८८ ॥

पटलि पसरे आदीमाये स्वरूप तुझे जगीं ।
दिसत मज गे ठायी ठायीं तुझें निजरूपही ॥
प्रसव प्रसुती कोण्या पंथी परी तुज पूजी गे ।
परिमित अती बुद्धी माझी किती किति शोधू गे ॥ ८९ ॥

अंबेचा जोगवा

अंबेचा जोगवा हो । अंबेचा जोगवा ।
गर्जना उदयोऽस्तु चालवा ॥ ध्रु० ॥

औटपीठ निवास प्रमुख ।
सुरस शूर चरित्र आवीट ।
गाता भक्तिभावें धीट ।
अक्षय सुख लाभे जीवा, हो ॥ १ ॥

रेणुकापीठ मातापूर ।
अंबा–जोगाई, कोल्हापूर ।
सप्तशृंग गड अवघड ।
अर्धपीठ निवास बरवा, हो ॥ २ ॥

भरजरी पट करी लखलख ।
भाली कुंकुमाचा मळवट ।
शिरीं रत्नजडित कीरिट ।
ऐका पैंजण गुंजारवा, हो ॥ ३ ॥

ब्रह्मा-विष्णु-महेश पूजित ।
अष्टभुजाहि शस्त्रायुत ।
प्रचंड शक्तिची ये प्रचित ।
चंड-मुंड-महिष दानवा, हो ॥ ४ ॥

आश्विन शारदीय नवरात्र ।
दीप तेवति अहोरात्र ।
घटिं माळ विविध कुसुमांत ।
भक्तजन करिती सेवा, हो ॥ ५ ॥

माझी माय कुलस्वामिनी ।
त्रिगुणरूप ब्रह्मचारिणी ।
गावूं असुर-हनन-गुण गाणीं ।
तारील भक्तांचा हा थवा, हो ॥ ६ ॥

## संत एकनाथकृत आदिशक्तीचे वर्णन

### जोगवा

अनादि निर्गुण प्रगटली भवानी । मोह महिषासुर मर्दना लागुनी । त्रिविध तापाची करावया झाडणी । भक्तालागुनी, पावसी निर्वाणी ॥ १ ॥

आईचा जोगवा, जोगवा मागेन ॥ ध्रु० ॥

द्वैत सारोनी माळ मी घालीन । हाती बोधाचा झेंडा मी घेईन । भेदरहित, वारीला जाईन ॥ २ ॥

नवविध भक्तिच्या करीन नवरात्रा । करूनी मागेन पोटीं ज्ञानपुत्रा । धरीन सद्भाव अंतरींच्या मित्रा । दंभ सासरा, सांडीन कुपात्रा ॥ ३ ॥

पूर्ण बोधाची घेईन परडी । आशातृष्णेच्या पाडीन दरडी । मनोविकार करीन कुरवंडी । अद्भूत रसाची, भरीन दुरडी ॥ ४ ॥

आतां साजणी झाले मी निःसंग । विकल्प नवऱ्याचा सोडियेला संग । कामक्रोध हे झोडियेले मांग । केला मोकळा, मार्ग सुरंग ॥ ५ ॥

ऐसा जोगवा मागुनी ठेविला । जाऊनी महाद्वारी नवस फेडिला । एका जनार्दनें एकपणे देखिला । जन्मभरणाचा, फेरा चुकविला ॥ ६ ॥

## समर्थ रामदासकृत आदिमायेजवळ मागणे

कल्याण करी आदिमाये । जनहित विवरी ॥ १ ॥ ध्रु० ॥
तळमळ तळमळ होतचि आहे । हे जन हातिं धरी ॥ २ ॥
अपराधी जन चुकतचि गेले । तुझी तूंचि सावरी ॥ ३ ॥
कठीण त्यावरी कठीण आले । आता न दिसे उरी ॥ ४ ॥
कोठे जावें, काय करावें । आरंभिली बोहरी ॥ ५ ॥
दास म्हणे आम्हि केले पावलो । दयेसि नाहि सरी ॥ ६ ॥

## संत ज्ञानेश्वरांचे ज्ञानेश्वरीनिर्मिती नंतर मागणे

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥ १ ॥
जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।
भूतां परस्परें जडो । मैत्र जीवांचें ॥ २ ॥

